नम्र जाला भूता । तेणें कोंडिलें अनंता ॥ —तुकाराम.




वार्षिक वर्गणी:—मुंबईंत २–४–०. बाहेरगावीं २–८–०.

दर अंकास ट. ह. सह ०–४–६.

**मनोरंजन वर्ष ९, अंक ७ वा, माहे जान्युआरी १९०४.**

## विषयानुक्रम.



**लेखकांस सूचना.**—**मनोरंजना**ला शोभतील अशा लहानलहान गोष्टी, विविध माहिती, चुटके, आख्याइका, वगैरे मजकूर लिहून पाठविल्यास लेखाच्या योग्यतेप्रमाणें आणि **मनोरंजना**च्या सामर्थ्याप्रमाणें लेखकास अल्पस्वल्प मोबदला देण्यांत येईल. मजकूर थोडक्यात आणि संपूर्ण असावा. लेख जेवढे लहान आणि मनोरंजक असतील तेवढे जास्त योग्यतेचे समजले जातील. सं म.



# आमचे टपाल.

या महिन्यापासून **मनोरंजनासंबधी** वर्गणीदारांच्या निवडक पत्रांचे जबाब या ठिकाणीं देण्याचें ठरविलें आहे यायोगें एकाच जातीच्या पत्रानां निरनिराळी उत्तरे पाठविण्याचे बाबतींतील आमची मेहनत बरीच कमी होईल अशी आशा आहे

व्यवस्थापक—**मासिकमनोरंजन.**



वाय् डी एन् हरदा, लिहितात —माझ्याकडे भेटीचे पुस्तक **नवयुग** व्ही पी ने पाठविलें तें मिळाले परतु ते साध्या बांधणीचें आहे, व माझ्या एका स्नेह्याला आपण कापडी बांधणीचें पुस्तक पाठविलें असें का? त्याचप्रमाणें मला साधें पुस्तक येऊन व्ही पी चा आकार ८१० केला व माझ्या स्नेह्याला कापडी पाठवून त्याला ८६ आकार केला हा काय घोटाळा आहे तो कळवावा इ

यात काहींएक घोटाळा झालेला नाहीं. आपण कापडी बांधणीचें पुस्तक मागविलें नसल्यामुळें आपल्याकडे साधेंच पाठविलें होतें आपल्याकडे ८८ बाकी येणें होती आपल्या स्नेह्याकडून पूर्वीच सर्व वर्गणी आली होती, आणि ह्मणूनच त्याच्याकडे फक्त कापडी बांधणीबद्दल ८४ व व्ही पी खर्च ८२ मिळून ८६ चें व्ही पी रवाना झालें होतें.

व्ही जी डी अजमीर, लिहितात —आपण मजवर जी सहा आण्याची बाकी काढलीत ती कोणती? आपली सर्व वर्गणी पूर्वीच पाठविली असावी असें वाटतें.

सर्व जुन्या वर्गणीदारांकडून) प्रारभी वसूल केलेली नाही. आपला गैरसमज दूर होईल अशी उमेद आहे.

पी वडाळें, लिहितात'—आमचेकडून मागील बाकीबद्दल ८६ वसूल केलेत व येथील दुसऱ्या एका वर्गणीदाराकडून फक्त ८२ च घेतलेत. मग आमच्या-कडूनच ८४ जास्त का घेतले?

असा पक्षपात करण्याचें आह्माला काहीच कारण नाही. त्या इसमाकडून पूर्वी गुणसुंदरीचे वेळी ८४ वसूल झाले होते. अर्थात् त्याचेकडून २८४ वर्गणी आली होती व आपल्याकडून २ रुपयेच आले होते ह्मणून आपल्याकडे येणें असलेली ८६ व त्याचेकडे येणें असलेली ८२ बाकी व्ही. पी त आकारली होती.

हिशोबाच्या भानगडीसंबंधी आमच्याकडे आणखीहि कित्येक पत्रे आली आहेत या बहुतेकांचा गैरसमज झालेला दिसतो वर्गणीदाराच्या सवडीप्रमाणें पहिल्या अंकाचे वेळीं व तत्पूर्वी कोणी १॥ रु १॥। रु. २ रु २। रु वगैरे वर्गणी पाठविली होती अर्थात् ज्याच्याकडे जेवढी बाकी येणें निघत होती तेवढी नवयुगाचे व्ही पींत आकारली होती कोणाकडे ८२ तर कोणाकडे ८४, ८६, ८८, ८१०, ८१४, १-रुपया व त्याहून कमीजास्ती येणें असलेली-रक्कम आकारून व्ही पी. पाठविली होती. व्ही. पी पाठविताना प्रत्येकाचा हिशेब लक्ष्यपूर्वक तपासून नतरच बाकी आकारण्यांत आली आहे कोणीहि आपला गैरसमज करून घेऊ नये. पक्षपात करण्याचें आह्मास कांहींएक कारण नाहीं व पक्षपातानें किंवा चुकीनें आह्मी कोणाकडेच कमीजास्ती बाकी आकारलेली नाहीं याउपर ज्या कोणाला संशय असेल त्यांनीं उत्तराकरिता कार्ड अगर टिकीट पाठविल्यास त्याच्या हिशेबाचा तपशील पाठविण्यात येईल ज्यांच्याकडून जबाबासाठी टिकीट येणार नाहीं त्याच्या पत्राचा-जबाब मिळणार नाहीं

त्याचप्रमाणें या ठिकाणीं सर्वांस विनयपूर्वक कळविण्यात येतें कीं, ज्यांनां आपल्या पत्राचा जबाब पाहिजे असेल त्यांनी त्यासाठी नेहमी रिप्लायकार्ड अगर पाव आण्याचें टिकीट पाठवावे पुष्कळ वर्गणीदार रिप्लायकार्ड पाठवित नाहीत त्याचप्रमाणे आपला रजिस्टर नंबर व संपूर्ण नांव कळवित नाहीत. या-साठी सर्वांस विनति करण्यांत येते की पत्र पाठवितांना प्रत्येकानें पत्रात आपलें सविस्तर नाव व पत्ता लिहावा व रजिस्टर नंबरहि कळवावा. ज्यांच्याकडून याप्रमाणें व्यवस्था होणार नाहीं त्याच्या पत्राचा जबाब न गेल्यास कोणीहि रागावूं नये

व्यवस्थापक—**मासिक मनोरंजन.**

# नवयुगांतील पंचाक्षरी.

मी **नवयुगांतील एक पंचाक्षरी आहें.** ह्मणजे नुकत्याच प्रसिद्ध झालेल्या व **मनोरंजनाच्या** सर्व वर्गणीदारास भेटीदाखल पाठविलेल्या **नवयुग** कादंबरीत माझें पाचअक्षरी नांव आलेलें आहे.

( १ ) (१) डावे बाजूकडील माझे पहिलें अक्षर कापून टाकिलें तर पाठवणी करणे— (२) २ अक्षरें काढून टाकल्यास परीक्षणार्थ घेतलेला थोडा अंश— (३) अक्षरे गाळल्यास अलंकारयुक्त शब्द—(४) आणि ४ अक्षरें गाळल्यास वाणीचा प्रतिशब्द—असे अर्थ होतात

( २ ) (१) आता उजव्या बाजूकडील शेवटचें एक अक्षर सोडून दिल्यास बेफिकीर वृत्ति—(२) २ सोडल्यास काळजी, मुर्वत—(३) ३ सोडल्यास उबदार वस्त्राचें द्रव्य—(४) आणि ४ सोडल्यास पति असा अर्थ होतो

( ३ ) (१) माझे पहिले अक्षर दशावतारांतील ६ व्या अवताराच्या नावात येते, (२) दुसरे अक्षर ७ व्या अवतारनामात येते, (३) तिसरें अक्षर ५ व्या अवतारनामात येतें, (४) चवथे अक्षर ४ थ्या अवतारनामात येते, (५) आणि पाचवे अक्षर देवाच्या भाषेच्या नावात येतें

( ४ ) (१) माझें पहिलें व दुसरें अक्षर घेतल्यास शत्रूचा वाचक—(२) २ रें आणि ३ रें मिळून गव्हापासून उत्पन्न होणाऱ्या वस्तूचा वाचक—(३) ३ रें आणि ४ थे ही अक्षरें घेतल्यास स्तुति करणें असा अर्थ—(४) आणि ४ थे व ५ वे हीं घेतल्यास पर्वताने युक्त असा अर्थ होईल

( ५ ) (१) माझें १।३।२ अक्षरें मिळून मराठे जातीतील एक आडनाव आहे, (२) ३।४।२ मर्कट जातीचा प्रतिशब्द, (३) ४।३।२ खाट वाजलें विणण्याकडे उपयोग होण्यासारखी वस्तु, (४) आणि ५।२।३।४ संस्कृत भाषेचा प्रतिशब्द

**नवयुगांतील** असा मी **पंचाक्षरी** आहे तर नवयुग पुस्तकरूपी किल्ल्याच्या कोणकोणत्या भागात मी आहे व माझ्या संपूर्ण नावाचा अर्थ काय तें सांगा ह्मणजे मला हुडकून काढल्याबद्दल श्रमाचा मोबदला ह्मणून **मनोरंजक ग्रंथप्रसारक मंडळीनें प्रसिद्ध केलेल्या** पुस्तकापैकीं कोणतेंहि एक पुस्तक फक्त टपाल-हशील घेऊन बक्षिस देण्यात येईल उत्तरासोबत प्रत्येकाने १ आण्याचें टिकीट

पाठवावें वक्षिस पुस्तकाचें ट ह. स्वतन्त्र द्यावें लागेल ३० एप्रील पर्यंत बक्षिसाची मुदत आहे. पंचाक्षरी कुठेंकुठे आहे तें स्थल निदान $\frac{3}{4}$ पेक्षा जास्त दाखविलें पाहिजे. त्याहून कमी स्थळी दाखविणाराचा वक्षिस पुस्तकावर हक्क रहाणार नाही नवयुगाचें लक्ष्यपूर्वक वाचन व्हावे, एवढ्याच हेतूने हे बक्षिस ठेविलें आहे.

**मनोरंजक ग्रंथप्रसारक मंडळी, गिरगांव—मुंबई.**

---

# मनोरंजनाच्या आश्रयदात्यांस विनंति.

**मनोरंजना**कडे लोकांचें लक्ष्य वेधून **मनोरंजना**ला जास्त लोकाश्रय मिळावा व त्यायोगें पुस्तकात अधिकाधिक सुधारणा करता याव्या, म्हणून **मनोरंजना**च्या वाचकास **नवयुगा**सारखी मोठीं पुस्तकें दरसाल भेटीदाखल फुकट देण्यात येत असतात चालू वर्षी रोख रकमेच्या बक्षिसाची योजना करण्यातहि हाच हेतु होता. परंतु रोख रकमेच्या बक्षिसाची योजना लोकांस फारशी आवडली नाहीं, हें अद्यापपावेतों **मनोरंजना**ला तीन हजार वर्गणीदार झाले नाहींत यावरून स्पष्ट होत आहे रोख रकमेच्या बक्षिसानी काहीं विवक्षित वर्गणीदाराचा फायदा व्हावा व बाकीच्यास काहींहि लाभ होऊ नये, ही योजना पुष्कळास रुचली नाही, आणि ती रहित करून सर्व वर्गणीदारास हितकर होईल अशी दुसरी काहींतरी व्यवस्था करण्याविषयी **मनोरंजना**च्या अनेक हितचिंतकाकडून आह्माला वरीच पत्रें आलीं होती, परंतु आह्मीं पूर्वी आश्वासन देऊन चुकलो असल्यामुळे मध्यतरीं ती योजना बदलणें आह्माला इष्ट वाटलें नाहीं परंतु जाहिरातींत प्रसिद्ध केल्याप्रमाणे ता० ३१ दिसेंबर १९०३ पर्यंत तीन हजार वर्गणीदार झाले नसल्यामुळें व ती योजना वाचकास मुळीच पसत नसल्याचा पुष्कळांकडून आलेल्या पत्रावरून स्पष्ट अनुभव आल्यामुळें आता ती योजना रहित करून प्रत्येक वर्गणीदाराचा फायदा होईल अशी निराळी योजना करण्याचें आह्मी ठरविलें आहे ती व्यवस्था पुढीलप्रमाणें —

(१) दर अकीं हाफटोन प्रोसेसचीं एकदोन सुदर चित्रें देणें.

(२) दर अकीं ८ पासून १६ पर्यंत पृष्ठें जास्त मजकूर देणे

(३) दरसाल दोन पुस्तकें बक्षिस देणें

ह्या तिहींपैकी १ ली सुधारणा ३ हजारावर वर्गणीदार होताच तावडतोब अमलात आणण्यात येईल त्याचप्रमाणें चार हजाराहून जास्त वर्गणीदार झाल्यास पहिली व दुसरी, आणि पाच हजाराहून जास्त वर्गणीदार झाल्यास पहिली, दुसरी व तिसरी अशा तीनहि सुधारणा एकदम अमलात आणण्यात येतील ह्मणजे ५ हजारावर वर्गणीदार झाल्यास दर अकीं एकदोन सुदर चित्रें, ६४ पृष्ठाऐवजी ८० पर्यंत पृष्ठे, व याशिवाय आणखी दोन सुदर बक्षिसपुस्तकें दरसाल वाचकास भेटीदाखल फुकट देण्यात येतील व यायोगें प्रत्येक वर्गणीदाराचा फायदा होईल

**मनोरंजना**चा जास्त प्रसार होऊन वाचनाभिरुची झपाट्यानें वृद्धिंगत होत जावी, एवढ्याच हेतूनें हे साहस करण्याचें आह्मीं योजिलें आहे; आणि

**मनोरंजना**चे सहृदय आश्रयदाते या कामी हस्तेंपरहस्तें आह्मांला साह्य करतील अशी आह्मी उमेद बाळगितों. प्रत्येक आश्रयदात्यानें एकेक, दोनदोन नवीन वर्गणीदार मिळवून दिल्यास अल्पावकाशात **मनोरंजना**ला तीन हजारावर काय, पण पाच हजारावर वर्गणीदार सहज मिळतील! यासाठीं **मनोरंजना**चे वर्गणीदार **मनोरंजना**ला एखाददुसरा नवीन वर्गणीदार अगत्यपूर्वक मिळवून देण्याचा प्रयत्न करतील, अशी आशा आहे

**मनोरंजना**ला दुसऱ्याहि रीतीनें एक साह्य करिता येण्याजोगें आहे. मराठी जाणणाऱ्या व वाचनाची गोडी असून पुस्तकास उत्तेजन देणाऱ्या अशा बऱ्याचशा सुशिक्षित ऐपतदार गृहस्थाकडे **मनोरंजना**च्या अंकाची एक प्रत अवलोकनार्थ पाठविण्याचे आह्मी योजिलें आहे यासाठीं प्रत्येक आश्रयदात्यानें आपल्या गावातील सुशिक्षित ऐपतदार वाचकाची कांहीं नावें (संपूर्ण पत्त्यासह) कळविण्याची कृपा केल्यास **मनोरंजना**वर त्याचे फार उपकार होतील ज्याच्याकडे अंक पाठविल्यास त्याचे कांहींतरी चीज होईल अशींच नावें कळविण्याची **मनोरंजना**च्या आश्रयदात्यानीं प्रेमपूर्वक कृपा करावी, अशी सर्वांस सविनय विज्ञप्ति आहे जे आश्रयदाते **मनोरंजना**वर ही कृपा करितील त्याना आमच्या पुस्तकांपैकीं कोणतेहि पुस्तक ३१ मार्चपर्यंत पाऊणपट किमतीनें देण्यात येईल

---

# लेखकांस बक्षिसें.

**बक्षिस १ लें, रोख रुपये १५.  बक्षिस २ रे, रोख रुपये १०.**

एक चित्तवेधक, मनोरंजक आणि उपदेशपर अशी संपूर्ण गोष्ट लिहिणाऱ्या लेखकास वरील बक्षिसापैकी १ बक्षिस देण्यात येईल.

**बक्षिसाच्या अटी**—(१) गोष्ट ता ३० एप्रिल १९०४ शनिवार रोजीं सध्याकाळी ५ वाजण्याचे आत आमचे हाती आली पाहिजे (२) ती **मनोरंजना**च्या ६ पृष्ठाहून लहान आणि १२ पृष्ठाहून मोठी नसावी (३) मजकूर सुवाच्य, जाड फुल स्कॅप पेपरच्या उभ्या बदोवर (ह्मणजे अर्ध्या फुल स्कॅपवर, पाव फुल स्कॅपवर नव्हे ) माजिन सोडून शाईने काळजीपूर्वक आणि स्वच्छ लिहिलेला असावा. पेन्सिलीने लिहिलेल्या, खोडाखोड केलेल्या अगर निष्काळजीनें लिहिलेल्या मजकुराकडे लक्ष्य पुरविले जाणार नाही. (४) स्वतत्र गोष्टीची योग्यता जास्त समजली जाईल परतु भाषातर अगर रूपांतर असल्यास कोणत्या गोष्टीचा आधार घेण्यात आला आहे तें स्पष्ट कळविले पाहिजे. (५) गोष्ट कोणत्याहि प्रसगाला अनुलक्षून असली तरी चालेल, परतु ती चित्तवेधक असून तीत मनावर कांहीतरी इष्ट परिणाम घडविणारे कथानक असावे. गोष्ट जेवढी लहान तेवढी बक्षिसास जास्त लायक समजण्यात येईल यासाठी ती मोठी करण्यापेक्षा चित्ताकर्षक करण्याकडेच लेखकाचे लक्ष्य अधिक असावे (६) केवळ **मनोरंजना**च्या आश्रयदात्यासच वरील बक्षिसे मिळविण्याचा हक्क आहे आश्रयदाते नसलेल्या ज्या कोणाची वरील बक्षिस मिळविण्याची इच्छा असेल त्याने गोष्टीसोबत **मनोरंजना**ची वर्गणी पाठवून पहिल्यानें आश्रयदात्यात नाव नोदविले पाहिजे. (७) गोष्टीवर खुणेसाठी एखादे वाक्य अगर कविता लिहून निराळ्या पाकिटात ती खूण, लेखकाचें सपूर्ण नाव, पत्ता आणि **मनोरंजना**चा रजिस्टर नबर लिहून पाठवावा (८) जून महिन्याच्या अकात या बक्षिसाचा निकाल देण्यात येईल.

**मनोरंजक ग्रंथप्रसारक मंडळी, गिरगांव—मुंबई.**



नामदार प्रो. गोपाळ कृष्ण गोखले, बी. ए., सी. आय. ई.

# मनोरंजन.



## ना. प्रो. गोपाळ कृष्ण गोखले, सी. आय्. ई.

नामदार प्रो. गोपाळ कृष्ण गोखले यांना सी. आय्. ई. ही पदवी देऊन सरकारानें त्यांचा बहुमान केल्याचें वृत्त ऐकून कोणा महाराष्ट्रीयाला आनंद वाटल्यावाचून राहिला असेल? हा बहुमान एकट्या गोपाळरावांचाच नव्हे, तर त्यांच्यासारख्या निरपेक्ष, देशसेवारत, निष्कपट आणि सरळ वर्तनाच्या प्रत्येक तरुण सुशिक्षिताचा समजला पाहिजे.

गोपाळरावजींकडे केव्हांहि जा, त्यांची ती सदा हसतमुद्रा, लहानांपासून थोरापर्यंत सर्वांशीं आदरपूर्वक आणि मोकळेपणानें भाषण आणि त्यांची ज्ञानलालसा हीं पाहून मन प्रसन्न होतें. कोणत्याहि गोष्टीचा ग्रह त्यांच्या मनावर फार खोल होतो, ही त्यांच्या निष्कपट अंतःकरणाची साक्षच म्हटली पाहिजे, आणि असा एकदा ग्रह झाला म्हणजे त्यांना त्या गोष्टीवाचून दुसरें कांहीं दिसत नाहीं, इतकें त्यांचें त्या गोष्टीशीं तादात्म्य होतें. त्यांची न्यायबुद्धि इतकी जागृत असते कीं, शत्रुविषयींसुद्धा आपले हातून अन्याय घडू नये, म्हणून ते फार जपतात. सरकारी अधिकाऱ्यांच्या कृत्यांत वाईट हेतु गृहीत धरून मग त्यांवर टीका करणें हें त्यांना आवडत नाहीं. यामुळें त्यांच्याविषयीं अविचारी लोकांची गैरसमजूत होते. गोपाळराव विलायतेहून परत आल्यावर त्यांच्या-संबधानें वावटळ उठून लोकमताचें वातावरण अत्यंत क्षुब्ध झालें होतें, अशा वेळीं एका गृहस्थाशीं बोलतांबोलतां ते म्हणाले होते कीं "लोक कांहीं म्हणोत, पण मीं केलें तेंच योग्य होतें, अशी माझी मनोदेवता मला सांगत आहे. ज्यांनीं मला बातमी दिली, तेच आतां भित्रेपणा करून मागें रहातात, आणि मीं सरळपणाचा मार्ग धरला म्हणून माझ्यावर उलटतात! अशांच्या पसंतीहून माझ्या मनोदेवतेची पसंती मला अधिक मानली पाहिजे. लोकांची अप्रियता काय आज आहे व उद्यां जाईल, पण न्यायाचा कांटा ढळतां कामा नये. तुम्ही पहाल, कीं जे लोक आज माझी एवढी निंदा करीत आहेत तेच आणखी पांचचार वर्षांनीं माझी तितक्याच जोरानें स्तुति करूं लागतील! मात्र माझी इच्छा आहे तशी देशसेवा करण्यास मीं जिवंत रहावें व प्रसंग यावे."

गोपाळरावजींनीं यांतला प्रत्येक शब्द खरा करून दाखविला आहे, यांत शंका नाहीं.

गोपाळरावांच्या प्रयत्नांचें एकंदर सार व धोरण थोडक्यांत सांगावयाचें झालें तर तें पुढील कवितेंत सांगतां येईल —

> "Haste not, rest not, calmly wait,
> Meekly bear the storms of fate,
> Duty be thy Polar guide,
> Do the right, whatever betide!
> Haste not, rest not, conflicts past
> God shall crown thy work at last!"

---

# विविधवृत्त.

१९०४ सालच्या राष्ट्रीय सभेची बैठक मुंबई येथें भरविण्याचें ठरलें आहे.

---

लंदन शहरांत नुसती दूध विकणाराची दुकानें १२००० आहेत

---

हॅमलेट् व मॅक्बेथ् हीं नाटकें अनुक्रमें जर्मनी व फ्रान्समध्यें फार प्रिय आहेत.

---

सर्व देशांपेक्षा जर्मनींत शेक्स्पिअरवर पुष्कळ ग्रंथ झाले आहेत

---

अवघ्या इंग्लंडांत संस्कृत अध्यापकाच्या जागा दोनच आहेत. जर्मनींत मात्र विसांपेक्षा जास्त आहेत!

---

प्रेसिडेंट रूस्व्हेल्ट् हे वस्ताद निशाण मारणारे आहेत सहज चालताचालता अथवा रपेट करताकरतां ते नेमकी गोळी मारतात.

---

स्वच्छ हवा आणि पाणी ह्यासारखें दुसरें औषध नाहीं, असें नेपोलिअन बादशाहाचें मत असे

---

म्याको नावाचा एक रशियन शेतकरी आठ फूट चार इंच उंच आहे त्याला वेळेस चार रत्तल खाणें लागतें

---

स्तुति आणि प्रशंसापर शब्द शहाण्या मनुष्याला अधिक विनयशील करितात; परंतु मूर्खाला तेच गर्विष्ठ आणि अविचारी बनवितात.

---

सर्व हिंदुस्थानांत एकंदर ऐकशें एक्याण्णव कॉलेजें असून त्यांत दोन लक्ष तीस हजार विद्यार्थी शिकत आहेत.

---

मधमाशीची गति तासाला ४० मैल आहे; परंतु ती जेव्हां तोंडांत मध घेऊन आपल्या पोळ्याकडे माघारी फिरते, तेव्हां दर तासाला तिचा वेग १२ मैलाहून जास्त नसतो.

---

चिकागो युनिव्हर्सिटीतील कांहीं विद्यार्थिनींनी असें ठरविलें आहे कीं, स्त्रियास शिक्षणापेक्षा सौंदर्यच फार महत्वाचें असल्याकारणानें त्यांनी घरावाहेर जाऊं नये.

---

आजपर्यंत पोपच्या गादीवर एकंदर २६३ इसम वसले त्यांपैकीं २१३ इटालियन् व ५० इतर. ह्या इतरांपैकी १६ ग्रीक्, १४ फ्रेंच्, ७ जर्मन्, ५ लिव्हटाइन्, ३ स्पॅनिश्, २ आफ्रिकन्, १ डच्, १ पोर्तुगीझ् व १ इंग्रज

---

इंग्रज व जर्मन वायका घरकामात कुशल असतात स्पॅनिश व इटालियन ममताळू असतात आणि फ्रेंच आपल्या नवऱ्याच्या पदवीकडे पहाणाऱ्या असतात सर्वांत अमेरिकन स्त्रिया मोठ्या मुत्सद्दी व चतुर असतात

---

दूध कृतीनें इतकें घट्ट होतें कीं, त्याच्या छत्रीच्या मुठी, चमचे वगैरे जिनसा तयार करिता येतात पारीस शहरातल्या म्युनिसिपालिटीसतर एका कन्त्राटदारानें रस्त्यावर घट्ट दुधाची फरसबदी करून देण्याचें कबूल केलें होतें

---

ज्यूल्स व्हर्न (Jules Verne) नावाच्या एका वृद्ध कादंबरीकारानीं १०० वर उत्कृष्ट ग्रंथ लिहिले आहेत ते इतके उतार झाले होते तरी त्याचा लेखनव्यवसाय दांडगा असे. ते दररोज सकाळी सहा वाजता उठत व पाच तास काम करित वसत

---

ग्रेट ब्रिटनची संपत्ति १७७,००,००,००,००० रुपयाची आहे. अमेरिकेंतील युनायटेड स्टेट्सची २४३,००,००,००,०००, फ्रान्सची १४४,००,००,००,०००, जर्मनीची १२०,००,००,००,०००, आणि रशियाची ९६,००,००,००,००० रुपये आहे.

---

मि चेंबर्लेन ह्यास फुलवागेचा फार शोक आहे त्यास लढ्ढ सिगांस फार आवडतात अलेक्झांडर डुमास व स्टान्ले वेमन ह्याचे ग्रंथ ते आवडीनें वाचतात. वर्तमानपत्रांपैकी डेली न्यूज् वाचण्याचें त्यानी सोडून दिलें आहे त्याना शारीरिक व्यायामाचा कंटाळा आहे.

---

इंग्रजी भाषेत शब्दसंख्या २,०६,००० आहे. जर्मन भाषेत ८०,०००, इटालिअन भाषेत ७५,०००, फ्रेंच भाषेत ३०,०००, तुर्की भाषेत २२,५००, स्पॅनिश भाषेत २०,०००, आणि मराठी भाषेत १०,५०० आहे, असें एका शास्त्रज्ञानें ह्मटलें आहे.

---

नुक्तीच म्यांचेस्टर येथें बहिऱ्यामुक्यानीं शेक्सपिअरच्या 'रोमिओ आणि ज्यूलिएट' या नाटकाचा प्रयोग करून दाखविला. सबंध नाटकांत एक शब्दहि न उच्चारतां पात्राचे सर्व मनोविकार नुसत्या अभिनयानें आणि खुणानीं स्पष्ट रीतीनें दाखविलेले पाहून प्रेक्षकांना मोठें कौतुक वाटलें.

---

विलायतेंतील एका शोकी गृहस्थानें हवेच्या फेरबदलासाठीं समुद्रकांठच्या एका गावीं जाण्यापूर्वी आपले पाढरे केस काळे भोर होण्यासाठीं कलप लाविला. परंतु त्या गावीं पोंचल्यानंतर केसांवरील कलपाच्या मिश्रणावर समुद्राच्या हवेचा असा कांहीं चमत्कारिक परिणाम झाला कीं, त्या बिचाऱ्याचे काळे भोर केस हिरवे चार होऊन गेले!

---

प्रसिद्ध इंग्रजी कवि स्विनबर्न हा नुकताच एका मोठ्या दुखण्यांतून उठला असतां एका वर्तमानपत्रानें त्यासंबधानें पुढील हकीगत दिली आहे. तें पत्र ह्मणतें "स्विनबर्न ह्याचें वय ६७ वर्षांचें आहे, पण दिसण्यांत तो बराच तरुण दिसतो, त्याचें कारण समुद्रस्नान करण्याचा व रोज बराच लांबपर्यंत पायानें व्यायाम करण्याचा त्याचा नियम हें होय. क्षारयुक्त जलस्नान आणि शारीरिक श्रम हीं आरोग्याचीं साधनें आहेत, असें आपले इकडेहि वैद्यशास्त्रज्ञाचें मत आहे.

---

पार्लमेंटमधील एका भामट्याचा असा क्रम असे कीं, एक रात्र हॉटेलांत काढावी व सकाळीं आपले खोलींतील बिछान्यावरील चादर व इतर वारिकसारिक कपडे [illegible] पोचारा करता मर्दूं बुवाची लबाडी अशा रीतीनें पैदा केलेल्या चल्याकेटा [illegible] उघडकीस येऊन नुकतीच त्याला १० वर्षांची सजा मिळाली. [illegible] जवानांत गेल्या १५ पासून २० मार्कपर्यंत किंमतीचा माल उठवित [illegible] कबूल केलें आहे.

---

युरोपातील उत्तरेकडील देशातील लोकाचे केस तलम व तेजदार असतात. जर्मन व स्वीडीश लोकाचे केसाचा रग इतका सुरेख असतो की, तसा कलपानेंहि होणार नाही कृत्रिम टोपावर लावावयाचा केसाचा पुरवठा वहुतेक रशिया व ग्यालिशिया प्रातातील शेतकऱ्याच्या मुलीकडून होत असतो ह्या मुलीस लग्न झाल्यानतर काही विशिष्ट शिरस्त्राण घालण्याचे असल्यामुळे त्याना केसाची जरूर नसते बोहिमिया, मोरेव्हिया व ग्यालिशिया प्रातातूनतर अशा तऱ्हेचे केस विकण्याचा बाजार आहे ह्या बाजारांत बायका केस विकावयास घेऊन येतात

---

अमेरिकेत प्रसिद्ध होणाऱ्या एका वर्तमानपत्रात कादबऱ्याकरिता खर्च होणाऱ्या झाडाची जी संख्या दिली आहे ती पाहून खरोखर आश्चर्य वाटते ! इग्रजीत फार प्रसिद्ध असलेल्या नऊ कादबऱ्यासाठी वीस लक्ष रत्तल वजनाचे कागद लागले व त्यासाठीं चार हजार झाडाचा नाश करावा लागला ! नुस्त्या नऊ कादबऱ्यांची ही कथा, तेव्हा तिकडे प्रत्यहीं प्रसिद्ध होणाऱ्या शेंकडो विनोदपर आणि मनोरजक पत्रासाठी व पुस्तकासाठी वर्षाचे काठी केवढ्या विस्तीर्ण अरण्याचा फडशा पडत असेल, ह्याची कल्पना कोणालाहि करिता येईल

---

बायकाचा आरशापाशीं किती वेळ जातो या प्रश्नाची मीमासा एका उद्योगी माणसाने करून प्रयोगांतीं ठरविलें आहे की, मुलगी सहापासून दहा वर्षपर्यंत वयाची असली तर रोजची सातआठ मिनिटे, दहापासून पधरा वर्षाचे दरम्यान रोजची पधरा मिनिटे, आणि पधरापासून बाविसाव्या वर्षापर्यंत रोजची बावीस मिनिटें याप्रमाणें तिसाव्या वर्षापर्यंत चढते मान असते पण पुढे ते उतरतें. पस्तिसाव्या वर्षी ते वीस मिनिटावर परत येतें चाळिसाव्या वर्षी ते पधरा मिनिटावर येतें व पुढे झपाट्याने उतरते याप्रमाणें सत्तर वर्षाच्या बाईच्या आयुष्यातले ५,८६२ तास ह्मणजे सरासरी ८ महिने (रात्र आणि दिवस धरून) नुसते आरशाकडे पहाण्यांत जातात !

---

तारीख १ जानेवारी १९०३ रोजी जपानच्या सैन्यात ११,६११ लष्करी अमलदार व ४,५७,४८० शिपाई होते सध्या ४,३०,००० पायदळ, एक लक्ष घोडेस्वार, आणि १२०० तोफा एवढे लष्कर जपान देशात आहे जपानात सतरापासून चाळीस वर्षापर्यंतच्या वयाच्या माणसानी लष्करात नोकरी केलीच

पाहिजे, असा नियम आहे जपानचें सैन्य कवायतींत तरबेज असून त्याच्या अंगी स्वदेशाभिमान ओतप्रोत भरला आहे. तसेंच ते लोक बुद्धिमान्, हुषार आणि कितीहि विकट प्रसंग गुजरला तरी धीर न सोडणारे आहेत ते मृत्यूला मुळींच भीत नाहींत

---

'हिंदुधर्म आणि सुधारणा' हे एक अनेक दृष्टया संस्मरणीय पुस्तक आहे. सदर्हू पुस्तकाच्या लेखन आणि संपादनावरून प्रसिद्ध कादंबरीकार थॅकरे ( Thackeray ) याच्या (Henry Esmond) हेन्रि एस्मंड या पुस्तकाची आठवण होते ज्यास निदान हा ग्रंथ बाहेर पडेपर्यंततरी उद्धारक म्हणण्याचें कोणास वारिष्ट नव्हतें, अशा प्रि गोळेसाहेब यांचे लेखणींतून हा ग्रंथ उतरला आहे या पुस्तकाची भाषा बरीच शुद्ध व मोहक आहे कादंबरी, निबंध, इतिहास व तत्वज्ञानभक्तास या ग्रंथात गोडी लागते हा ग्रंथ प्रसिद्ध झाल्यावर जिकडेतिकडे बरीच चळवळ उडाली व सदर ग्रंथाचीं गुजराथी, कानडी वगैरे भाषांत भाषांतरें होण्याचीहि वदंता होती सदर्हू पुस्तकावर बहुतेक वर्तमानपत्रांत टीका आली असून केसरींत मात्र त्या संबधानें अवाक्षरहि नाहीं!

---

गेल्या आक्टोबर महिन्यांत मोर्लेकृत ग्लॅडस्टन साहेबाचें चरित्र बाहेर पडलें सदर्हू ग्रंथास अपरिमित मागणी आहे ज्या दिवशीं हें पुस्तक प्रसिद्ध झालें त्या दिवशींतर लंडनांतील प्रसिद्ध बुकसेलर मेसर्स म्याक्मिलन् यांच्या कामदारास या एका पुस्तकाच्या विक्री व टपाल रवानगीपुढें फुरसत नाहींशी झाली म्याक्मिलनपासून १०० हातावर असणाऱ्या विकर्स कंपनींतहि याच दिवशी सदर्हू पुस्तकाची विक्री जारीनें झाली मागणीदारांत प्रसिद्ध व्यक्ति, परदेशचे वकील, कायदेपंडित, लष्करीलोक, पाद्री व मास्तरलोक यांचा भरणा बराच होता हें पुस्तक वाचण्याची कांहीं लोकांची फारच उत्सुकता दिसली प्रसिद्ध आयरिश इतिहासकार जस्टिन् म्यकार्थि यांनींतर कंपनीस लिहून पाठविलें कीं "माझी प्रत मला ज्या मार्गानें जलद पोंचेल त्या मार्गानें पाठवावी" इंग्लंडांतील मजूरलोकदेखील आपापसांत वर्गण्या करून हें पुस्तक घेत आहेत ग्लॅडस्टनसाहेब निवर्तल्याला आज पांच वर्षे होऊन गेलीं इतक्या अवकाशांत बहुव्यासंगी मोर्लेसाहेब यास त्याचें त्रिभागी चरित्र जगमान्य होईसें लिहितां आलें—पण आमच्या तेलंगाचें चरित्र लेखकाच्या लेखणींतून अजून उतरत आहे!

---

कृत्रिम नीळ, कृत्रिम साखर वगैरे जिनसा पुष्कळांना ठाऊक आहेत. परंतु कृत्रिम अथवा बनावट कापूर पुष्कळांनी ऐकला नसेल. कापराचा उपयोग औषधांत, सुगंधि मालमसाल्यात, दारुगोळा करण्याचे कामी, कातडें कमाविण्यांत, आणि फोटोग्राफ घेण्याच्या कांहीं रासायनिक द्रव्यात फार होतो पण कापराचा जितका खप आहे त्या मानानें त्याचे उत्पन्न थोडें आहे कापूर हा एक प्रकारच्या झाडाच्या रसापासून करतात हीं झाडें फार थोडीं आढळतात. यामुळें कापूर बाजारात फार महाग विकतो ह्मणून कांहीं अमेरिकन शास्त्रज्ञानी कृत्रिम कापूर तयार करण्याचा प्रयत्न चालविला होता आणि तो सिद्धीला गेला आहे. हा कृत्रिम कापूर खऱ्या कापरासारखा अगदीं हुबेहुब असून किमतीने स्वस्त असल्यामुळें खरा कापूर तयार करणाराचें या कृत्रिम कापराच्या खपानें नुकसान होईल असा संभव दिसतो. हा कृत्रिम कापूर तयार करण्याचा कारखाना अमेरिकेंत न्यूयॉर्क पासून २५ मैलावर चेस्टार येथें लवकरच मोठ्या प्रमाणावर काढण्यात येणार आहे यापासून हिंदुस्थानच्या कापराच्या व्यापाराला धक्का बसेल अशी भीति आहे

---

बल्गेरिया प्रांतात मैला नावाची एक खुपसुरत स्त्री आपल्या आईबापासह एका गावीं रहात असे. सदहू सुंदरीस कांहीं तुर्की शिपायानी फरारी करण्याचा बेत करुन एके दिवशीं रात्री त्यानीं तिच्या घरास गराडा घातला बाहेरील गलबला ऐकून घरातील माणसें खडबडून जागी झाली व शस्त्रास्त्रें जवळ करुन दरवाजा पडेपर्यंत दम धरुन तशींच बसलीं दरवाजा पडल्याबरोबर बदमाषावर एकदम बंदुकांचा भडिमार करून तीन असामींचे बळी घेतले व बाकीच्यास दूर पळवून लाविलें. अशा तऱ्हेचा भडिमार दोहीं बाजूनी सुमारें दहा मिनिटे-पर्यंत चालून अखेरीस एक शिपाई खेरीज करुन बाकी सर्व शिपाई व वर सांगि-तलेल्या तरुणीची आईबापें गतप्राण झाली व खुद्द तरुणीहि बेहोष होऊन पडली. ही संधी साधून त्या जिवत राहिलेल्या शिपायानें तिला घोड्यावर घातली व शिकार एकदाची साधली ह्या आनंदानें आपणहि तिचे मागोमाग चढतो आहे तोंच ह्या तरुणीनें आपल्या हातांतील जंबिया त्याचे पोटात खुपसून त्याचा प्राण घेतला!

---

# चोराची कृतज्ञता.

कोण ती भयंकर रात्र ! डोळ्यांत बोट घातलें तरी दिसणार नाहीं इतका बाहेर काळोख पडलेला थंडीहि पण कडाक्याची अगोदरच माळव्याची थंडी प्रसिद्ध, आणि त्यांत या सालींतर पावसाचें मान दिढीवर गेल्यामुळें थंडी बेसुमार भडकली होती. अशा वेळीं गावाबाहेर बंगल्यांत एकटीदुकटीनें रहाणें ह्मणजे केवढें जिवावरलें संकट ! पण सरस्वतीबाईंचा त्या गोष्टीला कांहीं इलाज होता काय ? काय करील बिचारी ? नवरा ठेवील तसें रहाणें प्राप्त !

गणपतरावांना साहेबी थाटानें रहाण्याची मोठी हौस असे. आणि ही हौस पुरविण्याइतकी मिळकतहि होती त्यांच्यासारखी हुशारी गांवांत एकाहि वकिलाचे अंगीं नसल्यामुळें कोणालाहि वकिलाची जरुरी लागली कीं प्रथम तो गणपतरावांकडे येई यामुळें वकीलसाहेबांची प्राप्ति अर्थातच डोळ्यांस येण्याइतकी वाढली यांत नवल नाहीं गणपतरावांचा नावलौकिक नुसता याच शहरांत होता असें नाहीं, तर आसपासच्या पांचपन्नास कोसांत तो पसरला असल्यामुळें कारणपरत्वें दूरदूरचे लोक त्यांना शंभरशंभर रुपये रोजानें घेऊन जात असत ! आज वकीलसाहेबांची स्वारी अशीच बाहेर एका गांवीं गेली होती, आणि पांचसहा दिवस परत येण्यास लागतील ह्मणून त्यांनीं घरीं सांगितलें होतें

पुरुषाची गोष्ट निराळी असते पण आपल्या हिंदुलोकांत बायकांना गांवाबाहेर बंगल्यांत एकटेदुकटें रहाण्याची सवय नसते त्यामुळें असें रहाण्याचा प्रसंग ह्मणजे त्यांना जिवावरलें संकट वाटतें यांत नवल नाहीं पण नवऱ्याच्या तत्त्वतीपुढें बोलावें कोणी ? आणि सरस्वतीबाई बोलल्या असत्या, तरी त्याचा उपयोग थोडाच झाला असता ! त्या एखादे वेळीं सहज बोलताबोलतां अशी गोष्ट काढीत, केव्हां स्त्रियांच्या भित्रेपणामुळें होणारी आपल्या समाजाची हानि, स्त्रियांच्या [illegible]मुळें सार्वजनिक आरोग्यांत पडणारी न्यूनतरता, स्त्रियांच्या भित्र्या स्वभावानें भावी पिढींत दिसणारें प्रतिबिंब इत्यादि विषयांवर वकीलसाहेबांकडून मोठ्या [illegible] टेक्चरें मिळावयाचीं घरें सोबतीकरितां एखादादुसरा नोकर [illegible] ठेवण्याविषयीं म्हटलें, तर तिकडूनहि गणपतरावांनीं ह्मणायचें कीं " [illegible] नोकर मिळाला ह्मणजे ठेवायचाच आहे तोंपर्यंत आपला सदवा [illegible] झालें ? त्याच्या नुसत्या ढेंकण्यानें जें [illegible] दुसऱ्या [illegible] तरुणाच्या हातांतल्या सोट्यानें व्हायचें नाहीं "

सारांश, वकीलसाहेबांना विश्वासू नोकर उभ्या वर्षांत कधी मिळाला नाहीं, आणि गणपतराव बाहेर रहात तेव्हां कित्येक रात्री सरस्वतीबाईचा डोळ्याशीं डोळा लागला नाहीं.

[ २ ]

आज सरस्वतीबाईनां अस्वस्थता वाटण्यास अधिकच कारण झालें होतें. गणपतराव पांचसहा दिवसांनीं परत येईन ह्मणून सांगून गेले होते, पण त्यांची गाडी गांवाबाहेर पडली असेल नसेल इतक्यांत त्यांचा एकुलता एक मुलगा बापू याला सडकून ताप भरला मुलाची जात ! खेळण्याच्या नादांत त्याला त्या तापाचें कांहींच वाटलें नाहीं पण पुढें डोकें दुखूं लागलें तेव्हां गोरेंमोरें तोंड करून तो रडतरडत आईपाशीं गेला आणि तिच्या मांडीवर त्यानें धाडकन् अंग टाकिलें तेव्हां सरस्वतीबाईच्या मांडीला त्याच्या तापाची उष्णता चांगलीच कळली आज बापूला एकाएकीं एवढा ताप भरण्याला काय कारण झालें असेल ह्मणून त्या आठवण करून पाहूं लागल्या, पण कांहीं कळेना. त्यांनीं मुलाला तसेंच खाद्यावर टाकून एका हातानें जवळची वळकटी उलगडली, आणि त्यावर दोन चौघड्या टाकून बिछान्याला अधिक मऊपणा आणल्यावर बाळाला त्यावर निजवून आपण जवळच त्याचे अंगावर हात ठेवून बसल्या

या वेळीं त्यांचें चित्त सारखें भ्रमण करित होतें आपण हा बंगला विकत घेतला खरा, पण यांत पूर्वी कुणाचीं मुलेंबाळें नांदलीं आहेत किंवा नाहींत याची चौकशी प्रथम करायला पाहिजे होती ती आपल्या यजमानांनी केली नसेल; बंगला थोडक्यांत सोयीचा मिळाला अन् घेतला; अधिक चौकशी करण्याचें कुणाचें अडलें आहे ! इत्यादि विचार सरस्वतीबाईच्या मनांत कितीकदांतरी आले असतील आपले कुळधर्मापैकीं विस्मृतीमुळें कांहींएक करायचें तर राहिलें नाहींतना ? ह्मणून त्यांनीं नीट आठवून पाहिलें पण खंडोबा, जोगाई, जोखाई, चंडिका, भमदेव, रेडकोबा वगैरे कोणाहि देवतेचें कांहीं कमती पडल्याचें दिसून येईना. देवाचे नवस फेडल्यावाचून राहिले, किंवा देवाच्या तीर्थाचा किंवा प्रसादाचा आपल्या हातून उपमर्द घडला कीं काय, ह्मणूनहि त्यांनीं आठवण करून पाहिली पण तसें घडल्याचें स्मरेना. देवादिकांचें उणें पडलेलें दिसेना, तेव्हां आपल्या बाळाला कुणाची दृष्टविष्ट लागली असेल, किंवा कुणी कांहीं जादुटोणा केला असेल अशी शंका त्यांच्या मनांत आली. ह्मणून त्यांनीं अगोदर उठून मुलावरून मीठमोहऱ्या ओवाळून टाकिल्या, आणि आतां पुढें काय करावें,

कोणा पंचाक्षऱ्याला बोलवावें, ह्मणून विचार करित बसल्या अंगरोगाची परीक्षा पंचाक्षऱ्यावाचून इतरांना बरोबर होत नाहीं, ही समजूत सरस्वतीबाईंच्या हाडींमासीं खिळलेली होती तेव्हां वैद्याला अगर डाक्तरला बोलावण्याचें सोडून, प्रथम नवसाचा आणि पंचाक्षऱ्याला बोलावण्याचा त्या विचार करूं लागल्या यांत नवल नाहीं होताहोता संध्याकाळ झाली, अंधार पडला, आणि त्याबरोबर थंडीचा कडाकाहि वाढूं लागला सदवा रोजच्याप्रमाणें घरीं जेवण्यास जाण्या-विषयीं परवानगी मागून चालता झाला

आतां सरस्वतीबाई घरांत अगदीं एकट्याच होत्या रोज गणपतराव किंवा सदवा यांपैकीं कोणी घरांत नसलें तरी बापू जागा असेपर्यंत सरस्वतीबाईंना एकटें वाटत नसे बापूची आपली वडवड चालली असे हें असें कां आणि तें तसें कां असें विचारूनविचारून तो स्वरस्वतीबाईंना पुरेपुरेसें करी, त्यामुळें सर्वांपेक्षां बापूची संगत त्यांना मोठी असे पण आज गणपतराव गांवीं गेले, सदवा घरीं गेला, आणि बापूहि निजून राहिला, तेव्हांतर त्यांना अगदींच करमेनासें झालें त्या अमळ उठल्या मऊसा भात करून तो दुधाबरोबर बापूला अळेंबळें घातला, थोडासा आपणहि खाल्ला, आणि पुनः बापूच्या पलंगडीपाशीं येऊन बसल्या

[ ३ ]

रोज संध्याकाळ होतांच सदवा घरीं जाई व आठ वाजण्याचे आंत जेवणखाण उरकून पुनः निजायला बंगल्यावर येई आज रोजच्यासारखा साडेसात वाज-ण्याच्या सुमारासच तो घरून बंगल्यावर येण्याला निघाला होता, आणि काठी टेंकितटेंकित तो अर्ध्या वाटेवर आलाहि होता इतक्यांत एकाएकीं त्याला चक्कर येऊं लागल्यामुळें तो मटकन् खालीं बसला, आणि पांचसात मिनिटांत एकाएकीं बेशुद्ध झाला हें पाहून त्याच्या भोंवतीं बरीच मंडळी एकत्र जमली कोणी ह्मणाले " सरवाला विषारी जनावर चावलें, आणि त्याची लहर येऊन तो पडला " कोणी ह्मणाले " त्याला अफू खाण्याची सवय असल्यामुळें बाहेरचें विष बाधणें शक्य नाहीं, पण कांहींतरी मर्मावर आघात होऊन तो बेशुद्ध झाला असेल " याप्रमाणें कोणाचें कांहीं, कोणाचें कांहीं तर्क चालले होते ! पण इतक्या जमलेल्या मंडळींतून कोणालाहि त्याला गाडींत घालून इस्पितळांत नेण्याचें सुचलें नाहीं शेवटीं ह्मातान्याच्या मुलाला ही बातमी कळून तो आपल्या बापाला गाडींत घालून इस्पितळांत घेऊन गेला.

पण इकडे सरस्वतीबाईंची काय वाट ! त्या आपल्या मुलाच्या अंथरुणापाशी त्याच्याकडे एकसारखी टक लावून कितीवेळतरी बसल्या होत्या. त्यांचे चित्त भ्रमण करीत होते. 'मन चिंती तें वैरीहि न चिंती' असें ह्मणतात ते कांहीं खोटें नव्हे ! त्या वेळीं त्यांच्या मनात काय विचार आले, आणि काय नाहींत ! गणपतरावांचा स्वभाव एरवीं कितीहि चांगला असला, तरी घरातल्या गोष्टी-संबधानें ते मुळींच फिकीर करित नाहींत हें चांगलें नाहीं, असें त्यांना वाटलें चागलें नाहीं, इतकेंच नाहीं, तर आपल्या बायकोला आणि एकुलत्या एका मुलाला असें रानावनांत सोडून पैशाच्या मागें आठआठ दिवस फिरत रहाणें हें लोभीपणाचें व निष्ठुरपणाचें चिन्ह आहे, असेंसुद्धा त्यांच्या मनात आल्या-वाचून राहिलें नाहीं. परमेश्वरानें आपणास संपत्ति व पतिप्रेम हें दिलें आहे तसें अपत्यसुख दिलें आहे किंवा नाहीं अशी शंका मधूनमधून मनात येऊन त्या अश्रू गाळित बसल्या होत्या. मुलाला एवढासा ताप आला तो काय, आणि त्याकरिता ही बाई व्यर्थ आपल्या जिवाला कष्टी करते काय ! असें वरवर पहाणारास वाटणें साहजिक आहे पण अपत्यशोकानें पोळलेल्या अंत करणाला पुन तसा शोक करण्याचा प्रसंग येईल कीं काय ही भीति किती दुर्बल करित असते, याची कल्पना तशा दुर्दैवी माणसाविना दुसऱ्यास व्हावयाची नाहीं ! सरस्वतीबाईंच्या सहा लेंकरांतून बापू हा एकटाच वाचला होता तेव्हा त्याचें नुसतें नख दुखलें तर सरस्वतीबाईंचें सगळें हृदय पिळवटलें जाई, यात आश्चर्य वाटण्याचें कारण नाहीं

वर सांगितलेल्या चिंतेच्या भोंवऱ्यात सांपडल्यामुळे सरस्वतीबाईला कशाचेंच भान राहिलें नाहीं दहा वाजून गेले, अजून सदवा कसा आला नाहीं, ह्मणून त्यांनीं मनाला प्रश्न केला नाहीं; किंवा अमावास्येची काळोखी रात्र, थंडीचा असा कडाका पडलेला, आणि घरात मुलगा तापानें फणफणलेला, याला औषधपाणी करू ह्मटलें तर डाक्तरला बोलावू जायलातरी कोणी घरात आहे काय ह्मणूनहि त्यांनीं आपल्या मनाशी चौकशी केली नाहीं त्या बिचाऱ्या आप-ल्याच चिंतेत अगदीं चूर होऊन गेल्या

बापूनें थोडासा भात खाल्ल्यावर त्याच्या तापाचा जोर किंचित कमी झाल्या-सारखा दिसला व थोड्या वेळानें त्याला किंचित् झोपहि आल्यासारखी वाटली सरस्वतीबाईंचे मन मात्र स्वस्थ नव्हतें, तें सारखें भ्रमण करीत होतें मधूनमधून बापु कण्हे, आणि 'आईग' ह्मणून हाक मारी, तेव्हा मात्र भरधाव घोड्याचा

लगाम एकदम ओढला ह्मणजे ते जसे चमकून थबकतात, तसें होऊन त्याचे मन क्षणमात्र ठिकाणीं येई, पण किंचित् अवसर गेला पुरे, की पुन त्याचे देहभान नाहींसें होई यापमाणें अर्धरात्रपावेतों चाललें होते

अर्धरात्र उलटल्यावर बसल्यावसल्या सरस्वतीबाईंचे नेत्र जड होऊ लागले तथापि उठून वळकटी पसरून निजण्याची बुद्धि त्याना होईना बापूचें कण्हणेंहि आता अमळ कमी होत चाललें होतें यावरून त्याला स्वस्थ झोंप लवकरच लागेल असा अजमास होता तरी आपण आडवे झाल्याबरोबर आपणास कदाचित् गाढ झोंप लागेल, आणि इकडे बापूने काहीं पाणीबिणी मागितलें किंवा त्याचा जीव पुन मघासारखा घाबरू लागला तर कळावयाचेसुद्धा नाहीं, त्यापेक्षा बसल्यावसल्या काय डोळ्याना विश्रांति मिळेल तेवढी घ्यावी, असा त्यानीं विचार केला आणि मागच्या पेटीला पाठ टेकून त्या तशाच डोळे मिटून बसून राहिल्या लवकरच त्याना झोंप लागली

सुमारे दोन वाजण्याचे सुमारास बापूचा जीव एकाएकीं घावरा होऊ लागला तो 'आई आई' असें मोठ्याने ओरडला, त्याबरोबर सरस्वतीबाई खडबडून जाग्या झाल्या आणि पहातात तों बापू अंथरुणावर गडबडा लोळत आहे। तापाच्या उष्णतेनें त्याचे अंग फुटत होतें व मनस्वी तहान लागून जीव घावरा झाला होता त्याची ती अवस्था पाहून सरस्वतीबाईंचा एकदम धीर सुटला. त्या अगदीं घाबरून गेल्या, आणि "लवकर कुणीतरी जाऊन अण्णासाहेब दाक्तराना घेऊन याहो" ह्मणून वेड्यासारख्या बोलू लागल्या रोजच्याप्रमाणें आज सदबाहि आला नाहीं, आणि दुसरें कुणीच माणूस घरात नाहीं, ही गोष्ट त्या घाबरलेल्या स्थितींत सरस्वतीबाई अगदीं विसरून गेल्या त्यानीं सदवाला पुष्कळ हाका मारल्या, पण तो 'ओ' देईना तेव्हा त्याला गाढ झोंप लागली असेल, आपण जाऊन आता उठवू आणि दाक्तराला आणण्यासाठीं पाठवू ह्मणून हातात कंदील घेऊन दार उघडून त्या पलीकडल्या दालनात सदवा निजत असे तेथे गेल्या तेथें सदबा तर कोठे दिसला नाहीं, पण पलीकडच्या खोलीत जेथें वकीलसाहेबाची तिजोरी ठेवलेली होती तेथे कंदील जळत असलेला त्यानीं पाहिला आणि माणसाची चाहूलहि ऐकली.

[ ४ ]

सरस्वतीबाई या वेळीं पुत्राच्या दु खानें इतक्या वेड्या झाल्या होत्या कीं, तिजोरीच्या खोलीत माणसाची चाहूल ऐकली तरी ते चोर असतील, आणि

आपण समोर गेल्यास वेळेस आपणास ठार करण्यासुद्धा चुकावयाचे नाहींत, ही कल्पनासुद्धा त्याच्या मनाला शिवली नाहीं. सदवा कोठे दिसेना, तेव्हा तो नाहींतर दुसरें कुणीका असेना, आपण त्याच्या हातापाया पडून त्याला दाक्तराला आणावयाला पाठवू, अशा विचाराने त्या रडतरडत त्या खोलीच्या दरवाजा-पर्यंत गेल्या इकडे चोरानी तिजोरी फोडण्याची खटपट चालविली होती, पण साधलें नव्हतें, इतक्यात सरस्वतीबाईंचा अत्यंत केंविलवाणा शब्द ऐकून ते तेथेच थबकले पळून जावे किंवा तिच्यावर हात टाकावा, यापैकी एकहि गोष्ट त्यानी मनात आणली नाहीं. त्याचे साथीदार बाहेर उभे होते. त्याना बाई एवढ्या मोठ्याने ओरडत असून हे खुशाल आत कसे राहिले आहेत, याचे आश्चर्य वाटत होते, आणि ते त्याना तेथून लवकर निसटण्याविषयीं आग्रह करित होते पण त्यातला एक करीमखान याच्याने पाऊल उचलवेना सरस्वतीबाईंनी त्याच्या हातापाया पडून जेव्हा ह्मटलें कीं "तुह्मी कुणीहि असा, पण आता या वेळी अण्णासाहेब दाक्तराना बोलावून आणाल तर मला अभागिनीला पुत्रदान दिल्याचे पुण्य परमेश्वर तुह्माला देईल!" तेव्हातर करीमखानाच्या कठोर हृदयाचें पाणी झालें कारण त्याच्या एकुलत्या एका मुलाला असेच एके रात्री एका अनोळखी गृहस्थानें मृत्यूच्या दाढेतून काढलें होते व त्या उपकाराबद्दल तो नित्य शतशः त्याला दुवा देत असे पुत्राची आसन्नमरणावस्था आईबापाच्या हृदयाला किती तीव्र वेदना देणारी असते, याचा अनुभव त्याला स्वताला नुकताच येऊन गेल्यामुळें करीमखानहि आपण कोण, येथे कशाला आलों व करित आहों काय, या गोष्टीचें भान विसरून जाऊन सरस्वतीबाईची ती अत्यंत करुणावस्था पाहून कळवळून ह्मणाला "आह्मी कोण आहो ते तुला सांगून काय करावयाचे आहे? बेटी, तू असल शात हो; खुदा तुझ्या लडक्याला आराम करील, तू स्वस्थ रहा, कोणत्या दाक्तराला बोलवावयाचे तें मला सांग, मी आत्ता त्याला घेऊन येतो पण तुझ्या बच्च्याला काय होत आहे, तेंतर सांगशील?"

सरस्वतीबाईंनी झालेली हकीगत थोडक्यात सांगितली, आणि आता उशीर न लावता अगोदर दाक्तरला आणा ह्मणून हात जोडून त्याची प्रार्थना केली. तेव्हा करीमखानहि दुसरातिसरा विचार सोडून देऊन भूतदयेने प्रेरित होऊन दाक्तरास आणण्यासाठी एकदम बाहेर पडला व बाहेरच्या दाराला आतून कडी लावून घेण्यास त्याने बाईला सांगितलें. आपण बाईशीं बोलत उभे राहिलों आहों हें पाहून आपले सोबती भराभर पळून गेले, हें त्यास ठाऊक होतेंच ह्मणून

दार लावण्याविषयीं बाईला पुन वजावून तो धूम धावत अण्णासाहेब डाक्टराच्या घरीं जाऊन पोहोंचला व त्याना जोरानें हाका मारून जागे केल्यावर सरस्वतीबाईंच्या मुलाच्या प्रकृतीचें वर्तमान कळवून तसेच तातडीनें घेऊन आला

डाक्तरसाहेबावरोबर करीमखानहि ज्या दिवाणखान्यात बापू निजला होता तेथें गेला या ठिकाणीं तो पूर्वी कधीच आला नव्हता यामुळे त्याचें लक्ष्य त्यातल्या तसविरीकडे साहजिकच गेलें दिवाणखान्यात शिरण्यावरोबर समोरच वकीलसाहेबाची एक मोठी ऑइलपेंटिंगची रंगीत तसवीर टांगलेली होती तिच्याकडे करीमची दृष्टि जाताच तो दचकला आणि वारकाईनें पाहू लागला तेव्हा त्याला आलेली शंका खरी आहे अशी त्याची खात्री झाली त्या तसविरीकडे व नंतर बापूच्या तोंडाकडे त्यानें एकदा पाहिलें आणि नंतर सद्गदित अंतःकरणानें तो मनाशीच ह्मणाला " या खुदा! वेशक, मेरे प्यारे बचेको मोतसे जिसने बचाया वो यही शख्स है तोवा तोवा! मे ऐसा नादान, बेअक्कल हू के इसीके घरमे वारदात करनेकेवास्ते मे चल आया! इन्शा अल्लाह ताला! खुदाने मुझे आज अच्छा बचाया परवरदिगार, इस बचेको निहायत खुष रखखे यही मेरा गरीवका अर्ज है खुदा मेरा गुन्हा माफ करे "

डाक्तरसाहेब थरमामीटर लावून उष्णता पहात नाडीचे ठोके मोजित होते, एवढ्या वेळात करीमखानाची ही कळकळीची आणि पश्चात्तापपूर्वक प्रार्थना संपून त्याचें चित्त ठिकाणावर येऊन पोंचलें होतें डाक्तरसाहेबानी लागलीच एका कागदावर काहीं इंग्रजींत लिहून सरस्वतीबाईंना सांगितलें कीं, माझ्या वरोवर तुमचा कोणी माणूस द्या ह्मणजे त्याच्या हातीं औषध पाठवून देईन औषधाचा एकच घोट पोटात गेल्यावरोवर मुलाला वरें वाटून स्वस्थ झोंप लागेल मुलाची तब्यत घावरण्यासारखी मुळींच नाहीं, आणि व्यर्थ काळजी करून तुह्मीहि आपली तब्यत विघडवून घेऊ नये तुमच्या करितासुद्धा एक औषध मी पाठवीन तें घेतल्यानें तुह्माला स्वस्थ झोंप लागून जाग्रणाचा शीण जाईल "

" तुमचा कोणी माणूस, " हीं अक्षरें ऐकून सरस्वतीबाई चपापल्या आज सदवा निजण्यासाठीं रोजच्यासारखा आला नाहीं, पण त्याचे जागीं परमेश्वरानें दुसराच एक माणूस पाठवून दिला, ही गोष्ट एवढा वेळ मुलाच्या दुखण्याच्या चिंतेंत त्या अगदीं विसरून गेल्या होत्या पण डाक्तरसाहेबाच्या वरील शब्दानी त्या गोष्टीचें पुन स्मरण होऊन त्यानीं करीमखानाकडे कृतज्ञदृष्टीनें पाहिल्या-

बरोबर करीमखानानें लागलीच ह्मटलें " आपण फिकीर करूं नका, मीच जाऊन औषध आणतों! " आणि यावर सरस्वतीबाईच्या उत्तराची वाट न पहाता तो तात्काळ बाहेर पडला

[ ५ ]

बापूचें दुखणें बरें होऊन तो चांगला धट्टाकट्टा झाला. तोपर्यंत करीमखान रोज त्याच्या समाचाराला येत असे हा त्याचा दयाळूपणा पाहून सरस्वतीबाईंनीं एके दिवशी त्याला तुह्मी कोण, कुठले व आमच्यावर एवढी कृपा करण्याची बुद्धि तुह्माला कशानें झाली, वगैरे हकीगत विचारल्यावर करीमखानानेंहि ती सगळी कांहींएक न लपवितां मोकळ्या मनानें सांगितली. ती ऐकून सरस्वतीबाईला परमेश्वराच्या अपार कारुण्याचें फार नवल वाटलें

* * * *

या गोष्टीला दोन वर्षें झाल्यानंतर एके दिवशीं गणपतराव एक इंग्रजी वर्तमानपत्र वाचित होते, त्यात करीमखानाला एका मुलाचा खून केल्याच्या आरोपावरून फाशीची शिक्षा झाल्याचें वाचिलें. तें वर्तमान वाचून गणपतरावाच्या व सरस्वती-बाईच्या दोघांच्याहि डोळ्याला पाणी आलें इतक्या कोमल आणि कृतज्ञ अंत:करणाच्या माणसाकडून दागिन्याच्या लोभास्तव खून करण्याइतके निष्ठुर-पणाचें किंबहुना क्रौर्याचें काम होणें अशक्य आहे, असें सरस्वतीबाईस वाटलें पण या मर्त्य जगात नेहमीं न्याय होतोच असें नाहीं असें गणपतरावानी सांगितलें. करीमखान फाशी गेला याबद्दल वारंवार स्मरण होऊन जर कोणी माणूस रडलें असेल तर सरस्वतीबाई होत!

## जड जम्बाल.

ही परिसा जम्बालकथा,
दाविल ती संतोषपथा,
सांडुनि लोभा तृप्ति वरा,
सस्मृति संसेव्याहि करा १

जम्बालनामा मणिपट्टनांत
पूर्वी द्विजश्रेष्ठ असे रहात,
कपर्दिकाही नव्हती तयाची,
वार्ता सुदूरा कनकादिकांची ! २

तये द्विजानें कठिना तपाते
करोनियां तोषविलें भवातें,
प्रसन्न झाला भवही तयास
बोले " तुझ्या साग मनोरथास ३

तपासि का गा करिसी द्विजाते !
जे त्वन्मनीं इष्ट कथीं मला ते,
इच्छा नराच्या पुरवावयाते
अखण्ड आहे बल जाण माते " ४

भवाचिया ऐकुनि ह्या वचाला,
जम्बाल भारी परितुष्ट झाला,
प्रसन्न पाहोनि उपास्य देवा
झाली ह्मणे सार्थ न कोण सेवा ? ५

जोडोनि जम्बाल तदा करांते
करी अशा प्रश्रित भाषणाते –
" दरिद्र मी इच्छितसे धनाते
देईल हर्षा धन मन्मनाते ६

पतिव्रता मद्दयिता असे ती,
प्रमोद आज्ञाकर पुत्र देती,
सभ्यांत मीही गणिलों जनांत,
दरिद्रताव्या न रुजा मनात ७

विद्यावदातान्तरे मत्कुमार
जनांत ते आदरणीय फार,
प्रेमार्द्रचित्ता गणनाथ ! देवी
सरस्वती मत्तनयासि सेवी ८

परंतु लक्ष्मी मजला न पाहे,
कपर्दिका मत्सदनी न साहे,
आजन्मवैरी समजे मला ती,
वाटे, वधो ती न शके द्विजाती ! ९

लक्ष्मी वसो मत्सदनी सुखानें,
ह्या दे वरा, मद्विपदा लया नें,
मी पावलो सर्व सुखे जगात,
न काम वित्ताविण मन्मनात." १०

हे वाक्य ऐकोनि महीसुराचे
दयार्द्र झाले मन शंकराचे,
जो शुद्धभावे नर ईश्वराला
भजेल, पावेलचि वांछिताला ११

बोले तयाते भव " मी प्रसन्न
झालो, तुला जाणतसे विपन्न,
तू मत्प्रसादे धन पावशील,
सौख्ये धनोत्थे बहु लाहशील १२

---

१ ससार २ आवडण्याजोगी, सुखकारक ३ शंकराला ४ नम्र, मर्यादशील.

१ उपाधि, दु:ख २ विद्येनें प्रफुल्लित झालें आहे मन ज्याचें ३ ब्राह्मणाचे ४ द्रव्यापासून उत्पन्न झालेलीं

कपोत देतो तुजला द्विजाते !
जम्वालका ! ने अपुल्या गृहाते,
विष्ठा तयाची तुज हेमरूप
सदैव देईल धना अमूप. १३

कपोत हा द्रव्यनिधीच पक्षी,
प्राणापरी तो सदनात रक्षी;
तदीय विष्ठा तुजला धनेश
करील, राहील न दुःखलेश. १४

जोपासना त्या करि अण्डजाची,
अहो कळो पूर्ण तुला तयाची,
हा सर्व तूझे पुरवील काम
जाणें तयाला तव सौख्यधाम " १५

भवोपकार द्विज थोर मानी,
त्याचे दयालुत्वहि फार वानी,
जम्वाल हा लाहुनि पक्षि हर्षे,
मयूर जैसा नववारिवर्षे १६

कपोत घेओनि गृहासि आला
जम्वाल, आनन्द तयासि झाला,
प्राणापरी रक्षियला तयाने,
कपोत तो स्वादुफलाम्बुदाने. १७

कपोतविष्ठाकनके द्विजाचे
दारिद्र्य झाले परिलुप्त साचे,
लक्ष्मी तयाच्या रमली गृहांत
झाला विवृद्धादर तो जनांत १८

तो प्रत्यहीं अण्डजदत्तभर्मा
घेओनि झाला परिवृद्धशर्मा !
विभूषणे लाहुनि रम्य दार
झाले तयाचे परितुष्ट फार. १९

जम्वालकान्ता गुरुगौरमुक्ता-
फलव्रजाने मृदुकान्तियुक्ता-
विभूषणां लाहुनि तृप्त झाली,
प्रभूत हेमे स्वमनांत वाली २०

कौशेयवस्त्रे दिसलीं विशाल,
जम्वालकाच्या गृहिं सर्वकाल,
मुक्ताफलांचे अतिरम्य हार
देती तदङ्गा सुषमा अपार २१

सुवर्णतन्तुग्रथिताम्वरांते
दिले तयाने अपुल्या सुता ते,
त्यांच्या सरले कटके करास
मुक्तास्रजा शोभविती उरास २२

देती रुची स्वादुरसोपपन्ने
सदैव त्यांच्या रसनास अन्ने,
सुधोपमे सेवियलीं तयांनीं
पेये सदा तोपितमानसांनी २३

१ पक्ष्याची २ किंमत ३ मधुर फळें आणि पाणी देऊन. ४ नष्ट. ५ वाढला आहे आदर ज्याविषयीं ह्मणजे सन्माननीय

१ पक्ष्याने दिलेलें सोनें २ सुखसंपन्न ३ दार ह्मणजे बायको ह्या शब्दाचा उपयोग नेहमीं पुल्लिंगी अनेक वचनीं होतो ४ मोठ्या व शुभ्र अशा मोत्याच्या घोंसानीं रमणीय असे दागिने मिळवून ५ विपुल ६ रेशमाचीं वस्त्रें ७ शोभा. ८ सोन्याच्या ततूंनीं ह्मणजे जरीच्या धाग्यानी विणलेलीं. ९ मोत्याचे हार

अशापरी वत्सर एक गेले,
धनें तयाचें मन तुष्ट केलें,
परी पुढें लोभ अवार्य झाला,
जम्बाल तेव्हां मुकला सुखाला २४

तृष्णा तयाची अनिवार्य झाली,
लाहोनिया हेम न ती निमाली,
यथा श्रमें, कीं, धनतर्ष शान्त
धनें न कीजे, करिजे सुखान्त २५

श्रमोपलब्धें न धनें निमाला
जम्बाल, तल्लोभ विवृद्ध झाला,
तृष्णा जलाची शमते जलानें,
तृष्णा धनाची न शमे धनानें! २६

[illegible] तयानें मग हा विचार,
झाला जयें हर्ष तयास फार,
जो जाहला स्वीय सुखास अन्ध,
त्याच्या लुपे चित्ति विवेकगन्ध २७

म्हणे मनीं तो द्विज " एकदाची
साधेन मारी खनि हाटकाची!
सुवर्णलाभास नको उशीर
[illegible] मदुदयीं न धीर २८

[illegible]
[illegible]
[illegible] आजि आता,
[illegible] समग्र हाता २९

[illegible]

कपोतकाया असिधेनुकेनें
निघे चिराया मग तो त्वरेनें,
समीप येतां खलु नाशकाल
पीडी नरा मूर्खविचारजाल ३०

वाटो न कां किंप्रभु तो द्विजाती
वाटो न कां अण्डज तत्प्रजा ती!
जम्बालसा किंप्रभु वित्तलोभें
क्रौर्यें करी, अल्प धरी न तो भे ३१

हा हन्त! हा हा! चिरिला तयानें
कपोत तो, क्रूरतमें मनानें,
पक्षी न त्यानें चिरिला, सुखाचा–
निधीच, हा तर्क उमासुताचा ३२

सगोदरीं मास, न हेम होतें,
न तोपला विप्र बघोनि हो, तें,
दुःखातिरेकें बडवी उरास,
चोळी करें तो अपुल्या करास ३३

कपोत पञ्चत्ववशेसि जातां
नवें द्विजाच्या धन ये न हातां,
पूर्वोपलब्धें द्रविणें तयास
सोडोनि केलें मन जावयास ३४

लक्ष्मी तयाचेवरि रुष्ट झाली,
जाऊं तया सोडुनि ती निघाली,
चाञ्चल्य लक्ष्मीसहजें प्रसिद्ध
न हो तिचें चित्त गुणानुविद्ध ३५

१ सुरीनें. २ वाईट राजा ३ उमा हें विद्याधर कवीच्या मातुश्रीचें नाव ४ मोघानें ५ लक्ष्मी जन्मली तेव्हांच तिच्याबरोबर चाञ्चल्य उत्पन्न झालें, ही गोष्ट प्रसिद्ध आहे ६ गुणानीं आकृष्ट.

जम्बालकान्ता मणिहारहीना
दुर्दैवयोगें दिसली सुदीना;
हळूहळू काञ्चन भूषणेंही
झालीं अदृश्ये द्विजवर्यगेहीं. ३६

कार्पासवस्त्रे नुरलीं गृहांत
ऊर्णापटांची मग काय मात !
गृहीं तयाच्या उरले न कांहीं,
शके कवी हा न वदों दशा ही ! ३७

दयारचप्रासकपर्दिकांनीं[1]
भिक्षासमासादिततण्डुलांनीं[2]
तो लागला वृत्ति करावयाला
तो फार कष्टी हृदयांत झाला. ३८

स्वापदा[4] अवलोकितां
अनुताप त्याप्रति जाहला,
व्यर्थ तो अनुताप, कीं, नचि
पूर्व तो स्थिति लाहला,
सौख्य चिन्तुनि आपुलें
अतिवेळ तो मनि कावला;
शेवटीं हृदयीं फुटोनि
हताश तो मृति पावला ! ३९

कविच्या शमदायिनी मना,
'जडजम्बाल' कथा रुचो जना;
'अतिलोभ सुखा सदा हरी'
कवि 'विद्याधर' बोध हा करी. ४०

---

१ करुणा उत्पन्न होईल असा स्वर काढून याचना करून मिळालेल्या कवड्यांनीं २ भीक मागून मिळविलेल्या तांदुळांनीं ३ चरितार्थ. ४ आपली दुःखस्थिति.

# तुझें दर्शन.

आनंद होय नयना, मन सौख्य पावे,
उल्हास होय हृदया, मनिं तो न मावे,
मोदें तशीच वपु जाय सखे ! भरोनी,
शोका न आश्रय मिळे तुजला बघोनी. १

सारी जसा चद्र निशातमासी,
प्रफुल्लवी सत्वर उत्पलासी,
चिंता तशी जाय क्षणीं पळोनी,
येई हृदीं शांति तुला बघोनी. २

घरीं येतां जाती श्रम हरुनि हे सर्व सखये !
घरीं येतां होई विसर असुखाचा मज प्रिये !
तुझा पाहोनी हा मुखशशि गमे, सुंदर असा
स्मितें शोभे भारी सुखकर शशी पूर्णचि जसा

मार्गप्रतीक्षा करुनी सचित्त,
बघूनि येतां मज पूर्ण श्रांत,
प्रसन्न नेत्रीं सुखवीसि देहा !
तें प्रेम मी काय कथुं अहाहा ! ! ! ४

प्रेमें तुझी सर्व कृती उठेली,
आकर्षितें मन्मन सर्व काळीं
वाटे न जावें तुजला त्यजोनी,
सदा रहावें तव सन्निधानीं. ५

मंजूळ बोल तव सुंदरि ! आयकावे,
नेत्रां, तुला पाहुनि, नीववावें,
कौशल्य, सद्गुण तुझे बघुनी रिझावे,
सौख्यांत हें जीवित घालवावें. ६

ऐशा गृहास दुखवीं न कधींच देवा !
दे तेथ सौख्यनिधिचा तव सर्व ठेवा,
स्वर्गांत सौख्य मजला न गमे विशेष,
आहे जरी गृहिं असें 'गृहिणीनिदेश' ! ७

---

# १९ व्या शतकांतील बंड.

## प्रकरण ७ वें

## अगदींच अशक्य !

[illegible] साडेनाताचा ठोका पडताच डा शरच्चंद्र शारदाबाईच्या वाड्याच्या पायऱ्या चढू लागले पराकाष्ठेच्या अधीरतेनें ते कुमुदसुंदरीची भेट घेण्यास आले होते परंतु दिवाणखान्यात कुमुदसुंदरी किंवा शारदाबाई यांपैकी कोणीहि भेटलें नाहीं' हे पाहून ते विस्मित झाले इतक्यात वृद्ध गिरिजा पुढे येऊन ह्मणाली "आपण माझ्या कुमुदला भेटायला आला, नव्हे का ? ती आपलीच वाट पहात बसली आहे दर पण तिला भेटण्यापूर्वी माझे ह्मातारीचे दोन शब्द ऐकून घ्या [illegible] कुमुद काहीं आता लहान राहिली नाहीं तिच लग्न झटल ह्मणजे या पूर्वीच व्हायला पाहिजे होत—"

[illegible] यावर काही बोलणार तोंच ह्मातारी किंचित् हसल्यासारखे करून [illegible] ह्मणाली " समजलें,– समजलें आपण काय ह्मणणार ते ! पण [illegible] ठेवा आजदिखील ती नाहींच ह्मणणार आहे तुह्मी किती पाहिजे [illegible] आग्रह केला तरीदिखील ती तुह्माला चक्क नाहीं ह्मणून जवाब देणार [illegible], आपल्याला लग्नच कर्तव्य नाही—कुणाचीहि पत्नी होऊन रहाण्याची [illegible] इच्छा नाहीं आपल मुलींच कुणावर अस प्रेम नाहीं आणि [illegible], [illegible] ह्मणणहि खोट नाहीं तुमच्याशिवाय खरोखरच तिच कुणावरहि प्रेम [illegible] ' तुह्माला आश्चर्य वाटत आहे। पण माझ्या ह्मातारीच्या हे केव्हाच [illegible] चुकल आहे अहो, कुमुदला या ह्मातारीन लहानाची मोठी केली [illegible] या ह्मातारीच तिच्यावर नारख लक्ष्य आहे त्यामुळ [illegible] गोष्टी समजत नाहींत किंवा ऐकूंहि येत नाहींत त्या या ह्मातारीला [illegible] आणि ऐकूंहि येतात शरच्चंद्र, माझी कुमुद पहिल्यान तुह्माला [illegible], पण [illegible] पहाल तर [illegible] नाहीं ह्मणण तिच स्वताच नाही बर–तिच्या [illegible] या [illegible] मूर्खपणाच्या गोष्टी तिला शिकविल्या [illegible] आणि कुमुद आज नाहीं ह्मणाली तरी धीर [illegible] निज प्रेम जडल आहे पण तिला स्वताला तें [illegible] धरल तर [illegible] तें तिच्या प्रत्ययास येईल,

आणि मग—मग काय ! ती आपण होऊनच होय ह्मणेल वरं ! तेव्हां आज आतां ती नाहीं ह्मणाली तर तुह्मी आपलं तें हसण्यावारीच न्या. पण एकमात्र ध्यानात धरा, तिला राग येईल असं मात्र अक्षरहि उच्चारू नका, आणि तुह्मालाहि राग येऊ देऊ नका आपल्या प्रियकराला झिडकारून लावणारी मुलगी मूर्खच ह्मटली पाहिजे दुसरं काय ! तेव्हां तिच्या या मूर्खपणाचा तुह्माला राग येऊ देऊ नका, तर उलट तिची कींव करा मी पुनः पुन्हा सांगते कीं, तुमच्याशिवाय तो अन्य कुणावरहि प्रेम करणार नाहीं लहानपणापासून मी तिचा स्वभाव ओळखित आहें. तिचं प्रेम फक्त एकाच पुरुषावर आहे—आणि ते तुह्मीच आहां तेव्हां तिला राग येईल असं काहींएक करू नका तिचा ह्लीचा विचार ह्मणा किंवा अविचार ह्मणा—परंतु तो पुढं बदलण्याला तिला सोपं जाईल असं करा. तुह्मी आपल्या मनाची अशी समजूत घाला कीं, हा मूर्खपणा तिचा नसून आईनं तिच्या डोक्यात भरविला आहे तिची आई काय पाहिजे ते का ह्मणेना, माझं मन मला पक्कं सांगत आहे कीं, शरच्चंद्र आणि कुमुदसुंदरी हा जोडाच ईश्वरानं निर्मिलेला आहे. ईश्वरानंच तुह्मा उभयतांच्या जन्माच्या गांठी मारून टाकल्या आहेत तेव्हां तुह्माला माझं सांगणं ह्मणून इतकंच आहे कीं, तूर्त तिचं ह्मणणं तुह्मी हसण्यावारींच न्या. तिचं कोवळं अंतःकरण दुखवेल असं काहींएक तिच्या दृष्टोत्पत्तीस येऊ देऊ नका शरच्चंद्र, ऐकाल ना एवढं या ह्मातारीचं सांगणं ?”

शेवटचें वाक्य ह्मातारीनें अशा कांहीं केविलवाण्या स्वरानें उच्चारिलें कीं, शरच्चंद्राचें अंतःकरण तत्काळ कळवळलें. तो ह्मणाला “गिरिजे, कुमुदची वास्तविक आई तूंच आहेस तेव्हां तुझी तिजबद्दलची कळकळ योग्यच आहे मी मोठ्या आनंदानें तुझ्या ह्मणण्याप्रमाणें वागेन तूं मुळींच काळजी करू नकोस !”

“जा तर मग; कुमुद त्या पलीकडच्या खोलींत बसली आहे जा, ईश्वराची तुमच्यावर सदैव कृपादृष्टि राहील ! हो, पण मी अगदींच विसरून गेलें शारदाबाईंनीं आपल्याला प्रथम बोलाविलं आहे त्या, त्या आतल्या दिवाणखान्यात आहेत कुमुदची आणि तुमची गांठ पडण्यापूर्वी शारदाबाईंना तुह्मांला कांहीं सांगायचं आहे. चला त्या काय ह्मणतात तें ऐका ह्मणजे मग मी तिथंच कुमुदला पाठवून देईन” असें ह्मणून गिरिजा शरच्चंद्राला शारदाबाईंच्या दिवाणखान्याकडे घेऊन गेली.

गिरिजेनें उघडलेल्या दरवाज्यांतून आत जाऊन शरच्चंद्र पहातो तों शारदाबाई नेहमींप्रमाणें एक मोठें थोरलें पुस्तक वाचण्यांत गर्क झाल्या आहेत. त्यांच्या पुढ्यांतील टेबल, पुस्तकें आणि वर्तमानपत्रें यांनीं गच्च भरून गेलें आहे. शरच्चंद्राला पहातांच शारदाबाई हातांतील पुस्तक बाजूला ठेवून ह्मणाल्या "या, तुह्मी आज येणार आहां असें कुमुदनें मला सांगितलें होतें. शरच्चंद्र, तुह्मांला केव्हांहि पाहिलें तरी मला अत्यानंद होतो. बसा, आपण थोडा वेळ स्वस्थपणें बोलूं."

शारदाबाई आज किंचित् कचरतकचरत बोलत होत्या. नेहमींप्रमाणें त्यांचें भाषण अस्खलित चाललें नव्हतें. शरच्चंद्राच्या हें तेव्हांच ध्यानांत आलें. तरींदेखील त्या जें कांहीं बोलत होत्या तें अगदीं स्पष्ट होतें. त्यांत आत बाहेर कांहींएक नव्हतें. त्या पुढें बोलूं लागल्या "कुमुदची आणि तुमची आतां गांठ पडेल. परंतु ती जें कांहीं तुह्मांला सांगेल तें ऐकून तुमचें अंतःकरण दुखवेल अशी मला मोठी धास्ती पडली आहे. तुमच्या स्वतांबद्दलहि मला फार वाईट वाटत आहे, आणि तिच्याबद्दलहि मला तसेंच वाईट वाटत आहे, असें ह्मणण्यास हरकत नाहीं. कारण कुमुदला लग्नच करावयाचें असतें तर तुमच्याखेरीज इतर कोणीहि तिला योग्य पति मिळाला नसता. शरच्चंद्र, माझ्या कुमुदचा पती होण्याला जर कोणी योग्य असेल तर ते तुह्मीच आहां, आणि तुह्मांलाच मीं तिला मोठ्या आनंदानें दिली असती. परंतु आपला जो आज इतक्या वर्षांचा परिचय आहे, त्या परिचयावरून कुमुदवर माझी केवढी भिस्त आहे, तिच्यासंबधीं माझी केवढी महत्वाकांक्षा आहे हें तुह्मांला कळल्याविना राहिलें नसेल. महत्वाकांक्षेपेक्षांहि कांहीं निराळा शब्द या माझ्या इच्छेला दिला पाहिजे. मीं स्वीकारिलेल्या पवित्रकार्याला तिला अगदीं लहानपणापासूनच वाहून टाकिली आहे. तिनें या कार्याला आपलें सर्वस्व—संपत्ती, प्रीति, प्रेम, विचार, आयुष्य सर्व कांहीं त्या पवित्रकार्याला अर्पण केलें पाहिजे असें साहजिकच मला वाटत आहे. तेव्हां अशा मुलीला लग्न करतां येणें अगदींच अशक्य आहे. लग्न केलें ह्मणजे मनुष्य स्वार्थाला लागलें असें ह्मणण्यास मुळींच प्रत्यवाय नाहीं. त्याचा सारा लय मग तिकडेच लागला. माझी स्वताचीच गोष्ट घ्याना? जरी मी पतीपासून विभक्त आहें तरी या अठरावीस वर्षांत कुमुदची आई या पलीकडे माझ्या हातून कांहीं विशेष झालें आहे काय?"

"पण मी विचारतों यापेक्षा अधिक तें काय व्हावयास पाहिजे?"

शरच्चद्राचें हें बोलणें ऐकून शारदाबाईनी मधुर हास्य केले त्या ह्मणाल्या "शरचद्र, हें तुह्मी बोलत नसून तुमचे प्रेम बोलत आहे वरें ! ते असो; मी त्यावद्दल कांहीं ह्मणत नाहीं कदाचित् माझ्या कुमुदवद्दल माझा असा कांहीं ग्रह झाला असेल की, तिच्यासाठी माझे सपूर्ण आयुष्य खर्च करण्यातहि मी आपणास कृतकृत्य मानीन"

"शिवाय तें तुमचे पुस्तक ! आजवर अशा महत्वाच्या विषयावर असा उत्तम ग्रथ झालेला कायतो तोच आहे"

"असेल, परतु शरच्चद्र, मी पतीपासून विभक्त झालें नसते तर ते पुस्तक कधींहि माझ्या हातून लिहून झालें नसते, हे नाहीं का तुमच्या ध्यानात येत? पतीने माझा किती वेळ घेतला असता हे त्या पुस्तकावरून चागलें दिसून येणार आहे परंतु मला वाटते, तुह्माला हे सांगून थोडाच उपयोग होणार आहे कारण तुह्मी तूर्त प्रेमानदात मग्न झालेले आहा!"

"आपल्याला हें खरें वाटेल तर मी धन्य होईन."

परतु शारदाबाईचें शरच्चद्राच्या या उद्गाराकडे मुळींच लक्ष्य नव्हते त्या ह्मणाल्या "शरचद्र, तुमचें प्रेम माझ्या मुलीवर जडलें आहे—कुमुदलाहि हे माहीत आहे तिला जे कांहीं सागायचे असेल ते लवकरच ती तुह्माला सागेल या बाबतीत कोणताहि निर्णय करणें हें तिचें काम आहे ती पूर्णपणे स्वतत्र आहे, काय पाहिजे तें करण्यास ती मुखत्यार आहे, हें तुह्मी स्पष्ट ध्यानात धरा तिनें या बाबतीत माझा सल्ला विचारला तर मी आपलें मत तिला सागेन, नाहीपेक्षा मी मुळीच कांहीं बोलणार नाहीं इतर गोष्टीप्रमाणे या गोष्टींतहि पाहिजे ते करण्यास ती पूर्ण मुखत्यार आहे तिच्या स्वातत्र्याआड मी कधीहि येणार नाहीं !"

"ब , फारच उत्तम ! आणखी ते काय पाहिजे ?"

"आता कुमुदची आणि तुमची गाठ पडण्यापूर्वी मी तुह्माला का बोलावले याचें कदाचित् तुह्माला गूढ पडलें असेल; तर असें करण्यात माझा हेतु इतकाच आहे कीं, कुमुद तुह्माला कांहीं सागो—या विवक्षित प्रश्नाचे ती कांहीं पाहिजे तें उत्तर देओ—परंतु हें मात्र तुह्मीं लक्ष्यात ठेवा की, तुमचा स्नेह, तुमचा सहवास आह्माला दोघींनाहि प्रिय आहे; या जगातील इतर कोणाहिपेक्षा तुमच्या स्नेहाची किमत आह्मी दोघीहि अधिक मानितों—"

"शारदाबाई, मजवर आपण जे कांहीं उपकार केले—"

"उपकार!" शरच्चंद्राला बोलूं न देता शारदाबाईच ह्मणाल्या "असे काय आह्मी तुमच्यावर उपकार करून ठेविले आहेत? भलतेंच कांहीं बोलण्यांत काय अर्थ? तुमच्यावर उपकार करण्याजोगें आमच्याजवळ आहे काय? संपत्ति, मान, योग्यता कोणत्याच गोष्टीची तुह्मांला उणीव नाहीं तुमच्या तुह्मीच या सर्व गोष्टी संपादन करित आहां आमच्याजवळ आमच्या ममतेपेक्षा तुह्मांला देण्याजोगें काहीएक नाहीं, आणि ती आमची ममता अगोदरच सर्वप्रकारें तुमच्यावर जडली आहे आतां मला जावई करण्याची इच्छाच असती—सध्या मात्र खरोखरच मला ती इच्छा नाहीं—तर तुह्मांलाच मीं मोठ्या आनंदानें जावई केले असते"

शारदाबाईंचे हे प्रेमळ उद्गार ऐकून शरच्चंद्र सद्गदित झाला शारदाबाईंचे आभार कसे मानावे हेंदेखील त्याला सुचेना शारदाबाई गंभीर स्वरानें पुढें बोलूं लागल्या "शरच्चंद्र, तुह्मी तरुण आहां, रूपसंपन्न आहां, गुणवान् आहां, तुमच्यावर कोणाहि मुलीचें प्रेम जडणें साहजिक आहे स्वरूपवान् पती मिळावा असें प्रत्येक मुलीला वाटत असतें फार कशाला, माझे पतीदेखील रूपवान् होते तुमच्या स्वरूपाविषयीं कुमुदच्या काय ग्रह झाला असेल मला कांहीं सांगवत नाहीं, कदाचित तिला त्याचें कांहीं वाटत नसेल—कदाचित् वाटतहि असेल तुह्मांला सर्व गोष्टी अनुकूल आहेत तुमच्यासारखा पती मिळावा ह्मणून किती मुलीतरी परमेश्वराची मनांत प्रार्थना करित असतील इतकें जरी आहे तथापि या गोष्टींचा निर्णय करण्याचें काम कुमुदवरच सोपविण्यास मला मुळींदेखील [illegible] वाटत नाहीं मर्जीस येईल तसें तिनें खुशाल करावें"

"थोडेंसें माझें ऐकून घ्या," शरच्चंद्र अधीरतेनें ह्मणाला. "तुह्मीं स्वीकारलेल्या [illegible] कुमुदला वाहून टाकली आहे असें तुह्मी ह्मणतां तुमच्या मताप्रमाणें [illegible] योग्य आहे त्यांत वावगें मुळींच नाहीं परंतु—मला क्षमा करा—कदाचित मी [illegible] असेन—तुमची जी कांहीं महत्वाकांक्षा आहे तसें [illegible] कुमुदच्या ठिकाणीं दिसून येत नाहीं समाजावर आपली छाप [illegible], [illegible] आपल्याला पाहिजे तशी घडामोड करविण्याजोगी [illegible] तिच्या अंगीं दिसून येत नाहीं"

"[illegible], तुमचा तर्क कदाचित् खरा असेल, परंतु थोडा धीर धरा तिला [illegible] विशेष प्रकारचें शिक्षण दिलें आहे तें तिचें तिलाच कळावयास लागूं द्या, [illegible] मात्र चमत्कार होतो तो असो तूर्त तिजबद्दल मला

ताप सहन आहे आणि माझी केवढी उमेद आहे हें तुह्माला पूर्णपणें माहीत आहे. तिचा मार्ग तिला अवघड होणार नाहीं, असें करा. आणि आज तिनें तुमचा कितीहि आज्ञाभंग केला तरी आपल्या स्नेहात त्यानें व्यत्यय येऊं देऊं नका एवढी माझी तुम्हाला विनंति आहे" इतकें बोलून शरच्चद्राचा प्रेमानें निरोप घेऊन शारदाबाई तेथून निघून गेल्या

थोड्याच वेळानें मग कुमुदसुदरी येऊन खोलीच्या दरवाज्यात उभी राहिली त्या वेळीं तिचा पोषाख अगदीं साधा होता परतु या साधेपणामुळें तिच्या स्वाभाविक सौंदर्यात कोणत्याहि प्रकारें कमीपणा दिसत नव्हता—नव्हे ते उलट अधिकच खुललेलें दिसत होतें ह्मणण्यास चिंता नाहीं अत करणात उठलेल्या विचार-तरगांची छाया तिच्या मुद्रेवर स्पष्ट दिसत होती. आपले विचार नीट व्यवस्थित करण्यासाठी जणों ती क्षणभर दरवाज्यात उभी राहिली आणि नतर पुढें येऊन ह्मणाली "शरच्चद्र, आपण आला हे फार चागल केल. माझ्या विनतीला मान दिल्याबद्दल मी आपली फार आभारी आहे—"

"वा !" शरच्चद्र विनोदानें ह्मणाला "तुझ्या आज्ञेबाहेर मी कधीतरी वागेन का ? तू आज्ञा केलीस त्याप्रमाणें मी आलो—"

"पुरे झाल, आपला हा विनोद नेहमींचाच आहे–" कुमुदसुदरी गभीर स्वरानें ह्मणाली.

"विनोद ! वा. ! विनोद करण्यासाठींच का तूं मला येथे बोलाविलेस ? तूतर ह्मणालीस कीं, तुला काहीं अत्यत महत्वाच्या गोष्टीसबधी काहीं सांगावयाचें आहे; आणि ते तू सागितलें नाहींस तर आपणामध्ये कदाचित् वितुष्ट येण्याचा सभव आहे तेव्हा हें अनिष्ट कसेंतरी टाळलेंच पाहिजे ह्मणून मी मुद्दाम येथे आलों आहें आता अशी ती महत्वाची गोष्ट कोणती तें एकवार मला कळूदे—"

"सागतें, त्यासाठीच मीं आपल्याला आज इथ येण्याविषयीं विनति केली. परतु शरच्चद्र ! ते सागण्याचें काम फार कठीण आहे, एक क्षणभर थाबा–ती गोष्ट-अशी आहे कीं,तिचा एकवार स्पष्टपणे निकाल लावल्याविना आता चालायच नाहीं. तथापि मला जें काहीं सागायच आहे ते अगदी उघडउघड परतु आपलें मन न दुखावेल अशा सौम्य शब्दानीं सागितलं पाहिजे आपला मजवर फार लोभ आहे, त्या आपल्या लोभात आणि आपल्या स्नेहात यान अतर येतां कामा नये—"

"परंतु कुमुद, तें तुला एवढें अवघड का वाटावें हें मला समजत नाहीं तू मनात आणलेंस तरीदेखील तुला निष्ठुर होता यावयाचें नाहीं तुला काय सांगायचें असेल तें खुशाल सांग"

"तें माझ्या स्वताविषयींच आहे—"

"मगतर फारच उत्तम ! तुझ्या स्वताविषयी तू कितीहि सांगितलेंस तरी माझी कांहीं तृप्ति होणार नाहीं!"

"तुमचं आपलं आहे तें आहेच !" शरच्चंद्राच्या बोलण्यानें कुमुदसुंदरी गोंधळल्यासारखी झाली तथापि धीर करून पुढे ह्मणाली "शरच्चंद्र, तुमचा माझा परिचय झाल्याला आज कितीतरी वर्षें झालीं तुह्मी माझे सर्वांत जुने स्नेही तुह्मी मजबद्दल कितीतरी कळकळ दाखविता तुमच्यासारखा मजवर कुणाचाहि लोभ नाहीं—"

मोठ्या धीरानें ती हें बोलत होती, तरीहि तिचा उडालेला गोंधळ शरच्चंद्राच्या लक्ष्यात आलाच तो ह्मणाला "कुमुद, उगीच घाई करूं नकोस तुला सांगता येईल तेव्हा सावकाशीनें सांग किंवा पाहिजे तर तुला काय सांगायचें आहे तें लिहून कळीव—"

"छे, छे! हें मला मुळींच लिहून कळविता येणार नाहीं" इतकें बोलून ती स्तब्ध राहिली शरच्चंद्रहि बराच वेळ काही बोलला नाहीं शेवटीं तो विषयच बदलून टाकावा अशा विचारानें तो ह्मणाला "कुमुद, तुझें तें नाटक—राणी वसुमतीविषयींचें नाटक—मला फारच आवडलें तू जी भूमिका घेतली होतीस तिजबद्दल ह्मणशील तर तें दिवशीं आह्मी राणी वसुमतीलाच प्रत्यक्ष पहात होतों एखाद्या नाटकातील कसलेल्या पात्रालादेखील इतकें चांगलें काम करता आलें नसतें!"

"मी खरोखरच वसुमती होतें केवळ सोंगच घेतलेलें नव्हतें!"

"खरोखरच तशी स्थिति असली पाहिजे" शरच्चंद्रानें शांतपणे उत्तर दिलें

"निदान माझ्यातरी तसा समज झाला खरा त्या वेळेपुरतीतरी तू वसुमती होतीस खास!"

पुन्हा दोघेहि स्तब्ध राहिलीं दोन वेळा कुमुदसुंदरीनें बोलण्याचा आविर्भाव आणिला, परंतु व्यर्थ शेवटीं तिसऱ्या खेपेला अडखळतअडखळत तिचे शब्द बाहेर येऊं लागले :

"शरच्चंद्र, गेल्या आठदहा वर्षांपासून आपला स्नेह आहे मी आठ वर्षांची असतांना मला वाटतं आपला व आमचा परिचय झाला आणि त्या दिवसापासून तों या घटकेपर्यंत आपण एकमेकाना नावानं हाक मारित आलो–इतका आपला स्नेह अकृत्रिम आहे, नव्हेका ?"

"होय, यांत मुळीच शंका नाहीं कुमुद, आपण स्नेही आहों, सोबती आहों, सर्व काहीं आहों, परंतु बंधुभगिनीचें नातें मात्र कृपा करून मध्ये आणू नकोस त्या ठराविक मूर्खपणात शिरण्याची मला वाटतें आपल्याला आवश्यकता नाहीं."

"बंधुभगिनीचा संबंध आपणामध्ये यावयाचा नाहीं, हें मला वाटत मी पूर्णपण समजून आहें." कुमुदसुंदरी गंभीर स्वरानें ह्मणाली शरच्चंद्र यावर काहीच बोलला नाहीं कुमुदसुंदरीच्या मुखकमलाकडे पहात तो स्तब्ध बसला होता कुमुद-सुंदरीच पुन्हा ह्मणाली "परंतु शरच्चंद्र, आपण वहिणीपेक्षाहि मजवर अधिक लोभ करिता, हेंहि मी जाणून आहें आजवर आपण मजसाठी फार श्रम घेतले आहेत मीहि आपल्याला भावापेक्षा अधिक मानित आलें—"

"अगदी खरे आहे"

"आपणा उभयतांमध्ये असा अकृत्रिम प्रेमभाव आहे ह्मणूनच मी आपल्याला आज काहीं सांगण्याचं योजिलं आहे अलीकडे मला असं वाटू लागलं आहे कीं, आपल्या या अकृत्रिम प्रेमाला काहीं निराळं स्वरूप येऊ लागलं आहे जी गोष्ट कधीहि घडून यावयाची नाहीं, अशा गोष्टीच्या नादी आपलं मन लागलं आहे तेव्हा अशा स्थितींत आपला व माझा जो स्नेह आहे त्या स्नेहासाठीतरी आपल्याला याबद्दल इशारा देणं—ती गोष्ट अगदीच अशक्य आहे असं स्पष्टपण सांगणं—हे माझं कर्तव्य आहे—

असें ह्मणून कुमुदसुंदरी निर्भिड आणि प्रांजलवृत्तीनें शरच्चंद्राकडे पाहू लागली. शरच्चंद्रहि आश्चर्यानें तिच्याकडे पहात होता. परंतु तो तिच्या या विलक्षण उद्गारा-विषयीं विचार करित नसून वृद्ध गिरिजेनें नुकतेच तिच्याबद्दल जें काहीं सांगितलें त्याविषयी तो विचार करित होता 'आज आता ती नाहीं ह्मणाली तर तुह्मी आपलं तें हसण्यावारीच न्या, तिला राग येईल असं मात्र अक्षरहि उच्चारू नका. आणि तुह्मालाहि राग येऊ देऊ नका तुमच्यावर खरोखरच तिचं प्रेम जडलं आहे' इत्यादि जे काहीं गिरिजेनें सांगितलें ते त्याच्या मनात घोळू लागलें

काहीं वेळानें तो हळूहळू ह्मणाला "कुमुद, तुझी आईदेखील असें काहीं ह्मणत होती खरी आता हें अगदींच अशक्य असेल तर तसें वेळींच समजणें खरोखर चागलें—"

"खर ना पण हें ? तर मग शरच्चद्र, ती गोष्ट अगदींच अशक्य आहे हें मी आपल्याला स्पष्टपणें सागतें—"

"परतु कुमुद, तुझी काहीं हरकत नसेल तर हें अगदीं अशक्य कां आहे हें समजण्याची मला उत्कठा आहे."

"याला दोन कारण आहेत" कुमुदसुदरी मोठ्या अवसानानें ह्मणाली. "पहिल असं आहे की, आईनं जो उद्योग आरभिला आहे त्यात मी तिला पूर्ण साह्य केल पाहिजे, तिच त्या कामी मला पूर्णपण अनुकरण केल पाहिजे अर्थात् तुमची पत्नी होऊन सर्वस्वीं तुमच्या आधीन, तुमच्या आज्ञेंत रहाण्याच मला नाकारिल पाहिजे शरचद्र, काय पाहिजे ते होओ परतु—"

परतु शरच्चद्राने तिला तितक्यावरच थावबून आपण मध्ये बोलण्यास सुरुवात केली "कुमुद, जरा थाव! तुला सर्वस्वीं माझ्या आधीन होऊन रहावें लागेल, माझ्या आज्ञेंत रहावे लागेल हें तुला समजलें कसें ?"

कसें बरें कुमुदसुदरीला हें समजलें असावें ? एका क्षणापूर्वी तिला यातील काहींएक समजलें नव्हते मग आताच कसें समजलें ? पुढें काय होईल याचा विद्युद्वेगानें तिच्या अत करणात प्रकाश पडला, हेंच त्याचें कारण होतें आपण आपल्या खुषीनें शरच्चद्राच्या अकित होऊन राहिल्याचें तिला दिसू लागलें तिला तिचें स्वतःचें निरालेंच स्वरूप दिसू लागलें ही कुमुदसुदरी त्या दुसऱ्या कुमुदसुदरीकडे उत्कठेनें पहात होती त्या दुसऱ्या कुमुदसुदरीनें आपलें शरीर, मन, स्वातत्र्य, सर्व काहीं आपल्या प्रियकराला अर्पण केलें असून ती सर्वस्वी त्याच्या आधीन होऊन राहिली होती त्या दुसऱ्या कुमुदसुदरीचें हें चित्र कुमुदसुदरीच्या डोळ्यापुढें स्पष्टपणे उभें राहिलें आणि त्याबरोबर प्रेम ह्मणजे काय हेंहि अगदी पहिल्यानेंच तिला कळून आलें प्रेमाचा प्रत्यय आल्याची ही तिची अगदी पहिलीच वेळ होती. कुमुदसुदरी घुटमळू लागली तिला हें कळलें कसें ? ती खाली पाहू लागली

"तुला हें कळलें कसें कुमुद?" शरच्चद्रानें पुन्हा विचारिलें "मी तुला एखाद्या गुलामासारखीं अगदीं माझ्या तत्रानें चालवयास लावीन, हे तुला कळलें कसें?"

"हे पहा शरच्चंद्र, तें कांहीं मला सांगतां येणार नाहीं" कुमुदसुंदरी अडखळत अडखळत बोलूं लागली. "परंतु आपल्या पत्नीनें सर्वस्वी आपल्या आज्ञेप्रमाणें वागावें असें–मला वाटतें–एकंदर पुरुषांना वाटत असतें. ते कोणत्याहि मताचे किंवा पक्षाचे असोत, तोंडानें काय पाहिजे ती वडबड करोत, परंतु पत्नीविषयीं त्यांना असेंच वाटत असतें. हो हो, माझी पक्की खात्री आहे! बरं, क्वचित् प्रसंगीं एखाद्या पुरुषालाच पत्नीच्या आज्ञेंत रहाण्याचा प्रसंग आला तर त्यामुळें त्याच्या पुरुषत्वाला हीनपणा येतो. बायकोच्या बुद्धीनें चालणाऱ्या पुरुषाला समाज दूषण देतो बाइलवुन्या ह्मणून लोक त्याचा तिरस्कार करितात—"

"हा जर सृष्टिक्रमच असला—"

"छे, छे! तसें मुळींच कांहीं नाहीं!" कुमुदसुंदरीचें सर्व अवसान पुन्हा आलें आईनें शिकविलेल्या गोष्टी तिला पुन्हा आठवूं लागल्या "हा एक समाजांत आपला प्रघात पडला आहे आणि हा प्रघात किंवा ही रूढी फार काळपर्यंत चालू राहिल्या-मुळें तिला जवळजवळ सृष्टिक्रमाचें स्वरूप आलें आहे, यापेक्षां अधिक कांहीं नाहीं. सृष्टिक्रमांत—ईश्वराच्या आज्ञेंत—असा भयंकर कठोरपणा असेलतरी कसा? तें कांहीं नाहीं! शरच्चंद्र, स्त्रियांच्या परवशतेसंबंधीं मी आजवर बरेंच वाचलें आहे व ऐकलेंहि आहे त्याच्या या परवशतेला फक्त दोनच कारणें आहेत—त्यांचें दारिद्र्य आणि त्यांचें प्रेम मी कधींहि या परवशतेंत सांपडणार नाहीं, कारण एकतर मी सुदैवानें दरिद्री नाहीं आणि दुसरें प्रेमाला मुळीं मी थाराच करूं इच्छित नाहीं"

"काय? तुझ्या ह्मणण्याप्रमाणें मीं तुला समान हक्क दिले तरीदेखील तू कबूल होणार नाहींस?"

"अं–हं!" कुमुदसुंदरी मान हालवून ह्मणाली "मला तुमचा भरवसा येणार नाहीं तुह्मी अगदीं निष्ठेनें आपलें वचन पुरें पाडाल असेंच कीं नाहीं तुह्मी ह्मणणार? परंतु मला नाहीं वाटत, असा संबंध ह्मणजे कसा होईल याची तुह्माला बरोबर कल्पना झाली असेलस! जिथें पत्नीला खरोखरच समान हक्क आहेत, अशा संसाराची मुळीं तुह्माला पहिल्यानें कल्पनादेखील यायची नाहीं! असा संसारच मुळीं अस्तित्वांत नाहीं असा संसार होण्याचे दिवस अद्यापि आले नाहींत ते दिवस यावे, असा संसार करतां येणें शक्य व्हावें, अशा प्रकारचें समाजाला शिक्षण दिलें पाहिजे असा संसार आह्माला थाटावा लागेल आणि तोतर तुमच्या मनोवृत्तींच्या विरुद्ध होईल तुह्माला तो आवडणारहि नाहीं शरच्चंद्र, हल्लींच्या सामाजिक

स्थितींत प्रेम आणि लग्न याच्याबरोबर समानहक्काच मुळींच पटायचं नाहीं, हें मी कबूल करितें आणि ह्मणूनच पतिपत्नीच्या नात्यापेक्षा आपणामध्ये स्नेह्याचं नातं आहे तेंच मला अधिक पसंत आहे "

"संसार चालण्यांत व्यत्यय न येता तुला घेता येतील तितके हक्क तू खुशाल घे, मी त्याला कधींहि हरकत घेणार नाहीं, मगतर झालें ना ?"

"आपल्या या औदार्याबद्दल मी आपली आभारी आहे परंतु ही गोष्ट अशक्य आहे तुह्मी हा भलतासलता नाद सोडून द्या आणि आपल्या स्नेहांत अंतर येईल असं करू नका ह्मणजे मला फार आनंद होईल "

"बरें तसें का होईना ? कुमुद, एखादी गोष्ट अगदीं अशक्यच असेल, तर तिच्या नादीं लागणेंहि मूर्खपणाच होईल आपला पतिपत्नींचा संबंध जुळून येणेंहि अशक्य आहे कारण तुझ्या ह्मणण्याप्रमाणें लग्न आणि समानता या दोन गोष्टी एकत्र जुळणें शक्य नाहीं तेव्हां तुझेंच ह्मणणें आपण खरें मानू, परंतु मी एक मात्र सांगून ठेवतों कीं, हाच सिद्धांत जर सर्वत्र लागू करावयाचा असेल तर तुह्मीं आरंभिलेला उद्योग कधींहि सिद्धीस जावयाचा नाहीं ! पण ते जाऊं दे. तू ह्मणालीस कीं, माझ्या ह्मणण्याप्रमाणें जुळून येणें अशक्य असण्याला आणखी कांहीं कारणें आहेत, तीं कोणतीं तेंतर कळूं दे—"

"हो दुसरें कारण असें आहे कीं, तुह्माला जुन्या पद्धतीप्रमाणं लग्न करायचं असणार, तेव्हां तुह्माला पत्नीहि पण तशीच पाहिजे आहे तुमच्या धर्मशास्त्रांत सांगितल्याप्रमाणं तिनं आपला पत्नीधर्म पाळला पाहिजे आपलं घर, आपला संसार, आपला पती आणि आपलं कुटुंब याव्यतिरिक्त तिनं दुसऱ्या कशाचा विचारहि करता कामा नये—"

नरेन्द्राला हें ऐकून खरोखरच हसूं आलें परंतु तें तसेंच दाबून धरून तो ह्मणाला "कुमुद, तू काय ह्मणतेस हें तुझें तुलातरी पूर्णपणें समजलें आहे कीं नाहीं देव जाणे' परंतु अलीकडच्या स्त्रीशिक्षणाचा हा परिणाम आहे यांत शंका नाहीं—"

"तो कशाचाहि परिणाम असला तथापि शरच्चंद्र, याबद्दल तुमची पूर्ण सहानुभूति असली पाहिजे सर्व दिवसभर जर मी दुसऱ्याविषयींच विचार करित बसलें—उदाहरणार्थ तुमच्याविषयींच विचार करीत बसले तर माझ्या शिक्षणाचं आणि माझ्या जन्माचंतरी सार्थक मजकडून कसं होणार ? "

शरच्चद्रानें गभीर मुद्रेनें मान हालविली हा मोठा विचाराचा प्रश्न होता खरा. आणि कुमुदसुदरीनेंहि अगदी स्पष्टपणें तो पुढें ठेविला होता

ती पुढें ह्मणाली "मी अगदी तिन्हाईत या नात्यान या गोष्टीचा विचार करित आहे. मी प्रेमाच्या नादीं लागलें तर मी माझ्या स्वतालादेखील विसरून जाईन हा मोह काहीं विलक्षण आहे हें मी जाणून आहें आता हा काळपर्यंततरी तसा काहीं प्रकार माझ्या अत करणाचा झाला नाहीं हे अगदी खास आहे तथापि त्याचा काय नियम सागावा! हें जाळ आहे यात एकवार मन गुरफटल कीं गुरफटलच! शरच्चद्र, या आपल्या अल्पायुष्यात आपल्याला शक्य तेवढ समाजहित प्रत्येक व्यक्तीन केलच पाहिजे हाहि एक प्रश्न विचार करण्यासारखा नाहीं का?"

"हो हो, मी ते सारें समजलों अलीकडे याच कल्पना प्रचलित झाल्या आहेत. आणि त्या एखाद्या स्पर्शजन्य रोगाप्रमाणें तरुण मडळीला पछाडित असतात बरें कुमुद, तुझ्या इच्छेविरुद्ध तुझें मन वळविण्याची माझी इच्छा नाहीं माझे मन मला सागत होतें—आणि अद्यापिहि सागतच आहे कीं, या तुझ्या स्नेहाला प्रेमाचे स्वरूप कधी ना कधीतरी येईलच येईल! आतापर्यंत काहीं ते आलें नाहीं, हें उघडच झालें काहीं हरकत नाहीं आपण धीर धरू स्वहित आणि समाजहित याविषयीं ह्मणशील तर तू आणखी काहीं पाहिजे तें केलेंस तरी मी सुचविलेल्या मार्गाचें अवलबन केल्याविना त्यातील काहींएक साधणे शक्य नाहीं! आतापर्यंतच्या आयुष्याचा तू पूर्ण सदुपयोग करून घेतलेला आहेस हे कुणीहि कबूल केलेंच पाहिजे—"

"शरच्चद्र, स्तुति केल्याविना तुह्माला चैनच पडत नाहीं का?"

"यात मी स्तुति करित नाहीं, खरे आहे ते सागतो तू ह्मणतेस कीं, तुला अद्यापिहि काहीं शिकायचे आहे, तेव्हा माझ्या समजुतीप्रमाणे त्याचा अर्थ इतकाच की, पुष्कळशी पुस्तके वाचून त्यातून तुला पुष्कळसें शिकावयाचे आहे-"

"कदाचित् तसहि असेल—"

"कोणतातरी एखादा धदा करण्याच्या हेतूने बहुधा लोक पुस्तके वाचून ज्ञान सपादन करित असतात परतु पुढें त्याचें काय होते? हजारो लोक डॉक्टर, वकील, शिक्षक होतात, पण त्यापैकीं फार झालें तर एखाद्यानेंच आपल्या धद्यात काहीं सुधारणा केली असेल. अगदीं एखाद्यानेच—समजलीस! बाकीचे जसें चाललें आहे तसेंच चालवून आनदानें असतात वकिलीची परीक्षा झाली ह्मणजे मग

कोणताहि वकील आणखी कायद्याचा अभ्यास करण्याच्या भानगडीत पडत नाहीं; शिक्षकाची एकवार जागा मिळाली ह्मणजे कोणीहि आपला अभ्यास पुढे चालवित नाहीं, डॉक्टरची सनद मिळाली ह्मणजे कोणीहि मग वैद्यशास्त्र पुढे शिकण्याची भानगड करित नाहीं तेव्हा तू आता आणखी शिकून काय करणार? या नउशें नव्याण्णव लोकांप्रमाणेंच स्वस्थ रहाणार की काय?"

"काय ह्मणून? मीं त्या बाकी राहिलेल्या एका व्यक्तीप्रमाण होणार—"

"ते मात्र कदापि होणे नाहीं! कुमुद, ती गोष्ट खरोखरच अशक्य आहे मी तुला पूर्णपणें ओळखतों तुझ्या अंगी ग्रहणशक्ति चांगली आहे, कोणतीहि गोष्ट तेव्हांच तुझ्या ध्यानात येते, परतु तेवढ्यावरून तू ह्मणशील कीं कोणत्या एखाद्या विषयात काहीं सुधारणा करीन, तर ते मात्र तुझ्या हातून होणे नाहीं! दुसऱ्याने शोधून काढलेलें तू पाहिजे तितकें शिकशील तेव्हा आणखी किती हव्या तेवढ्या नव्या गोष्टी तुझ्या डोक्यात भरल्या ह्मणून त्याने तुझ्या बुद्धीचा अधिक विकास का व्हावयाचा आहे?"

"आज हे सार तुह्मी स्पष्टपण सांगत आहा—"

"हो, आज स्पष्ट सांगण्याचीच वेळ आली आहे आज एकवार मला स्पष्टस्पष्ट सांगू दे सुधारणा करण्याचें आणि स्त्रियाची परवशता दूर करून त्याना समान हक्क प्राप्त करून देण्याचें काम दुसऱ्या मुलींना—ज्याच्याविषयीं कोणालाहि काहीं वाटत नाही अशा मुलींना—करू दे, त्यानां हवी तितकी विद्वत्ता संपादन करू दे, काय पाहिजे ते करु दे त्याच्या ज्ञानाचा, त्याच्या मेंदूचा अपव्यय झाला तरी त्याची फारशी पर्वा नाहीं तुझ्यासारख्या उदात्त मनाच्या मुलीचा अपव्यय होण्यापेक्षा तें हजारपटीने बरें—"

"मजसारख्या मुलीचा असो किंवा अन्य कोणाचा असो, परतु हा अपव्ययच होऊ न देण्याविषयींचा माझा यत्न आहे—"

"असेल! परतु कुमुद, हे सारे श्रम व्यर्थ आहेत एकीचे पाहून दुसरीनें करावे, यापलीकडे त्यात काहीं नाहीं! पुढे कोणाला याचें स्मरणदेखील रहाणार नाहीं"

"तेंतर सगळ्याच्याच दैवीं आहे तरीहि नुसता प्रयत्न करणं ह्मणजे काहीं थोड नाहीं प्रयत्न करणारा प्रत्येक जण आपल्या विषयाची थोडीबहुत कशीना कशीतरी प्रगतीच करितो वर ते जाऊ द्या शरचद्र, अशक्य गोष्टीचा नाद तुह्मी सोडून दिला ह्मणता, तेव्हा आता आजतरी आपल्याला आणखी कांहीं बोलायच राहिल नाहीं—"

"एक क्षणभर थांब मला काय सांगावयाचें आहे ते एकवार सांगून टाकू दे. आतापर्यंत झालें ते केवळ तुझ्या तर्फेचे झालें आता माझें ह्मणणें काय आहे तें ऐकून घे तुझ्या अंगचे सद्गुण हे ईश्वरानें तुला दिले आहेत, आणि ते तू फुकट घालवावेस अशा हेतूनें खात्रीनें दिलेले नाहींत ते वंशपरंपरेनें तुला प्राप्त झाले आहेत–ते तसेच पुढच्या पिढीला देणे हे तुझें कर्तव्य आहे तू जी अशी सद्गुणसंपन्न झाली आहेस त्याचें श्रेय तुझ्या पूर्वीच्या पिढीकडे आहे पुढील पिढी अशीच तयार करणें हे आता तुझें कर्तव्य आहे कुमुद ! थोर माता, थोर पराक्रमी पुत्रांना जन्म देतात तुझा वंश तूच खुटवणार काय ? तू आपल्या स्वताचा अशा रीतीनें अक्षम्य दुरुपयोग करुन घेणार काय ? प्राप्त झालेला मानवजन्म अशा रीतीनें विफल करणार काय ? पराक्रमी आणि थोर वंशाची भावी माता होण्याचें नाकारुन तू जगाचें नुकसान करण्याचें श्रेय संपादन करणार काय ? कुमुद, या गोष्टीचा कधी तू विचारतरी केला आहेस ?"

"शरच्चंद्र, या तुमच्या ह्मणण्याचा मजवर काहींएक परिणाम व्हावयाचा नाहीं" कुमुदसुंदरी बेपर्वाईनें ह्मणाली "हा कोटिक्रम मीं बराच वेळ ऐकिला आहे पुढील पिढीसंबधींच हे आपलें कर्तव्य आहे, आणि ते आपण बजाविलच पाहिजे, वगैरे गोष्टी मी फार वेळ ऐकिल्या आहेत. दुसऱ्याच्या मनावर याचा परिणाम होईलतर होओ, परंतु माझं मन अशानं मुळींच बदलायचं नाहीं. मी सर्वतोपरी स्वतंत्र रहाणार आहे, आणि ह्मणूनच या प्रेमपाशात मी आपल्या स्वताला गुतवून घेता कामा नये आपण याला 'प्रेमपाश' ह्मणतों नाहीं का? हा शब्दच मुळीं दास्यत्वाचा द्योतक आहे बस्स, मला त्याच्याशी काहींएक कर्तव्य नाहीं माझं आयुष्य मी पूर्ण स्वातंत्र्यांत घालविणार—"

"अरेरे ! कुमुद, तू काय ह्मणते आहेस तें तुला समजतदेखील नाहीं तुझ्या या स्वतंत्रतेचें पर्यवसान अखेरीस स्वताच्या निखालस गुलामगिरींत होणार ! बरें प्रेमाविषयी ह्मणशील तर प्रेम ह्मणजे काय हेच तुला अजून कळलें नाहीं—"

"तसेंहि असेल कदाचित् ! तें काहीं असो मला शेवटीं जें काहीं सांगायचं आहे तें हेंच कीं, मला स्वतंत्रता पाहिजे"

"ठीक आहे, मलाहि काहीं अधिक सांगायचें नाहीं आणि खरेंच ह्मणशील, तर मला जें काहीं सांगायचें होतें ते सर्व मी सांगून टाकिलें आहे प्रेमाविषयीं माझी जी कल्पना आहे ती तुझ्या कल्पनेच्या अगदी विरुद्ध आहे प्रेमामुळें जर

कोणाला दास्यत्व प्राप्त होत असेल तर तें पुरुषाला होय तुला सुखी करण्यापलीकडे मला अधिक सुखाची आकांक्षा नाहीं कुमुद, तू जर इतकी भयंकर श्रीमंत नसतीस तर तुझ्यासाठी परिश्रम करण्यात मला फार आनंद झाला असता श्रीमंतीपासून हा मोठा तोटा आहे की, श्रीमंत पत्नीसाठीं श्रम करायला मिळत नाहींत असो परंतु कुमुद, एवढ्यानेंच मीं तुझी आशा सोडली असें समजू नकोस आज जे काहीं अगदींच अशक्य दिसत आहे त्यावर कालांतरानें शक्यतेची हळूहळू छाया पडण्यास प्रारंभ होईल आणि पुढेतर असा एक सुदिन येईल की, तेव्हा अशक्यतेला तुझ्या अंत करणात थारादेखील मिळणार नाहीं मग! मग तू होऊनच मला तसें सांगशील, समजलीस कुमुद ! तू होऊनच सांगशील! कारण तुझ्या स्थितीत झालेला हा फेरबदल माझ्या मत्र डोळ्यांत आपण होऊन कुठला यायला? कुमुद, मग तुझ्या प्रेमानें दुसऱ्या कुणाकडे धाव घेतली तरीदेखील मला सांगितल्यावाचून मात्र राहू नकोस हो—"

"शरच्चंद्र!" कुमुदसुंदरी मोठ्या उतावळीनें ह्मणाली "काय भलतंच बोलता हे? असं कधीतरी होईल का? आणि यदाकदाचित् झालंच तर अन्य कुणालाहि या माझ्या अंत करणात थारा मिळायाचा नाहीं, हे खात्रीनं समजा तुह्माला अशक्य गोष्टींची स्वप्नं पडत आहेत तरीदेखील तशी वेळ आलीच तर तुह्माला सांगितल्याविना मी रहाणार नाहीं"

शरच्चंद्र हसला वास्तविक त्याची ही हसण्याची वेळ नव्हती तरीहि तो हसला कुमुदसुंदरीच्या बोलण्याचालण्यावरुन या अनंत विश्वाला व्यापून राहिलेल्या प्रेमाची तिला कल्पनाहि अद्यापि नव्हती हे त्याच्या स्पष्ट निदर्शनास आलें आणि ह्मणूनच तो हसला नाहींपेक्षा त्याला या वेळी पराकाष्ठेचें दु खच झालें असतें तो भग्नहृदय झाला असता तो ह्मणाला "वा! फार उत्तम आहे तोंपर्यंत आपला स्नेहसंबंध-बंधुभगिनीचा संबंध मात्र नव्हे हो—कायम राहील त्यांत मुळीच व्यत्यय येणार नाहीं आता आपला गैरसमज अनायासें दूर झालेला आहे, तेव्हां आपणामध्यें वितुष्ट येण्याची धास्ती आता मुळीच राहिली नाहीं असेंच की नाहीं कुमुद?"

कुमुदसुंदरीहि आता निर्भिडपणें त्याच्याकडे पहात ह्मणाली "शरच्चंद्र, अगदी अस्संच आपला स्नेहसंबंध पूर्वीप्रमाणेच चालला पाहिजे तुह्माला माझा राग आला नाहीं याचा मला फार आनंद होत आहे"

"ठीक आहे कुमुद, तर मग मी आता तुझा निरोप घेतो" असें ह्मणून शरच्चद्र तेथून उठून हळूहळू शारदाबाईच्या वाड्यावाहेर पडला.

कुमुदसुंदरीहि त्याला पहातपहात वाड्याच्या बाहेरच्या दरवाजापर्यंत गेली तिचे डोळे शरच्चद्राच्या जणों मागोमाग चालले होते! मनाची स्थिति काय होती हे मात्र तिचें तिलाच हा वेळपर्यंत समजत नव्हते तिला जें कांहीं सांगावयाचें होते, ते तिने स्पष्टपणे शरच्चद्राला सांगून टाकिले होते त्यानेंहि तें शांतपणें ऐकून घेतले होते त्या योगाने तो रुष्ट झाल्याचे मुळीच दिसून आलें नाहीं. तथापि कुमुदसुंदरीच्या मनाला स्वस्थता मुळीच आली नाहीं. तिचें मन निराश झाले. ती उद्विग्न झाली होती. याचे कारण काय? तिचे ते दुसरें स्वरुप तिच्या नेत्रांपुढे उभे रहात होते सर्वांचा नाद सोडून—स्वातन्त्र्याची, समान हक्काचीदेखील पर्वा न करिता शरच्चद्राचें प्रेम प्राप्त करून घ्यावे अशी विलक्षण ओढ तिचें मन घेऊ लागलें खिन्न आणि विचारमग्न अंत करणाने ती परत आपल्या खोलीकडे जाऊ लागली. इतक्यात वृद्ध गिरिजा तिच्याजवळ आली आणि प्रेमानें तिच्या पाठीवर हात फिरवून विचारू लागली "शरच्चद्राला काय सांगितलस बेटा?"

"त्याच्या ह्मणण्याप्रमाण होण अगदी अशक्य आहे ह्मणून सांगितल—"

"अहाग खुळे पोरी! अशक्य आहे ह्मणून सांगितलस?" गिरिजा किंचित् रागावल्यासारखे करून ह्मणाली "हें तू काय केलस, तेतरी तुला समजल का? तू अशी अज्ञान कशी? बेटा, त्यात अशक्य कांहींच नाहीं तस झाल्यावाचून रहाण हे मात्र अशक्य आहे अस पाहिजेतर ह्मण! पतीविना का तू रहाणार? सृष्टिक्रमाच्या विरुद्ध का तू जाणार? बेटा, काय पाहिजे ते केल तरी स्त्री ती स्त्रीच! तिच जिण पतीवाचून व्यर्थ आहे पतीवाचून तिला अवसानहि नाहीं आणि शोभाहि नाहीं हा मूर्खपणा तू आपल्या डोक्यातून काढून टाक—"

ह्मातारी कदाचित् आणखीहि कांहीं बोलली असती परंतु कुमुदसुंदरी तेथून निघून गेली.

# करमणूक.

"गंगाधरपंत, तुमचं अक्षर बुवा अगदी वाईट !"
"सांगतो कोण ? जो तो ह्मणतो तुमच्या अक्षरासारखं अक्षर नाहीं !"

---

"डाव्या डोळ्यांत काय गेलंय कोण जाणे– अगदी वाचवत नाहीं !"
"मग उजव्यानेंच वाचा की !"

---

"तिसऱ्या पिढींत अंगी सभ्यता येते ह्मणतात."
"हें खरें असेल, तर तुमच्या नातवाच्या अंगी ती दिसली पाहिजे"

---

एकदा एका चहाविक्यानें आपल्या चहाच्या डब्याची जाहिरात देऊन तींत मोठ्या ढोबळ अक्षरांनीं खालीं लिहिल्याप्रमाणें डब्याची शिफारस केली होती —

"If you ask for one, you will ask for no other"

---

मास्तर—राजनीति ह्मणजे काय ?

चाणाक्ष मुलगा—स्वतःच कुरापत काढून दुसऱ्याचा माल बळकावण्याची आणि पुन साव ह्मणून घेण्याची कला

---

"बाबा ! मोहिनी ह्मणजे काय हो ?"

बापानें मुलाच्या आईकडे हसत मुद्रेनें पाहिलें, आणि गालातल्या गालांत हसूं ठेवून व खालीं मान घालून पुस्तकाकडे दृष्टि वळविली

---

मास्तर—स्थान अथवा स्तान ह्मणजे ठिकाण, अथवा रहाण्याचा देश जसें हिंदु लोकांचा देश तो हिंदुस्थान अथवा हिंदुस्तान त्याप्रमाणेंच अरबस्तान, बलुचिस्तान, इत्यादि आतां तुह्मी अशीं 'स्तान' लावून झालेलीं कांहीं नांवें सांगा पाहूं ?

मुलगा—अंगुस्तान

---

आई—आज बापू सारखा तासभर लिहीत बसला आहे हें नवलच ह्मणायचं !

बाप—खरंच का ? इतकं काय तो लिहितो आहे ?

"दिवाळीत कोणत्या जातीच्या फटाक्याच्या पेट्या किती पाहिजेत "त्यांची याद."

---

रोगी—डाक्तरसाहेब माझ्या कानाला काय झालें ते पहा. मला कानांत कांहीं विचित्र आवाज ऐकू येत असतो

त्रासलेले डाक्तर—ऐकू येतोना ? मग काय पाहिजे ? कान ऐकण्यासाठींच नाहीं तर काय खाण्यासाठीं दिले आहेत ?

---

नोकर—( यजमानास ) आपल्याला भेटायला कुणी आले आहेत. खालीं दाराशीं उभे आहेत !

यजमान—मला भेटायला ? कोण आले ? प्रतिष्ठित आहेत ?

नोकर—नाहीं रावसाहेब, आपल्यासारखेच आहेत

---

गोपाळराव—काहो गणपतराव, तुह्मांला आमच्या लग्नाचे वेळी नुसतें पान-सुपारीलासुद्धा यायला झालें नाहींना ?

गणपतराव—( दुःखानें ) ह्मण आहेना ? घरच झाल थोड अन् व्याह्यांनी धाडल घोड ! मलाच लग्न केल्याचा पश्चात्ताप होत आहे, तर तुमच्या समाधानाला इतक्यातच येण्याला मला फुरसत कुठून मिळेल ?

---

मास्तर वर्गात यन्त्रशास्त्र शिकवित होते यन्त्राच्या चक्राला गति कशी मिळते तें दाखविण्यासाठी प्रत्यक्ष यन्त्र आणून व त्याचा दांडा हातानें फिरवून दाखवित असतां ते ह्मणाले "अ हें एक चक्र व ब हें दुसरे चक्र पहा या दोन्ही चक्रांना या ढ नें गति दिल्याबरोबर तीं फिरायला लागली"

वर्गांतलीं मुलें एकमेकांच्या तोंडाकडे पाहून हसू लागलीं हें सांगावयास नकोच !

---

मास्तर—ऑक्सिजन वायु प्राणधारणाला अत्यंत अवश्य आहे या वायूवांचून प्राण्याचें चालावयाचें नाहीं या वायूचा शोध एकोणिसाव्या शतकाचे प्रारंभीं एका शास्त्रज्ञानें लाविला—

एक चुणचुणीत विद्यार्थी—सर, हा शोध लागण्यापूर्वी माणसें कशीं जगत होतीं ?

---

एका बोर्डिंग हाऊसमधील कांहीं विद्यार्थि गणिताचे परीक्षेचे दिवशीं सकाळीं उदाहरणें सोडविण्यात इतके गुंग होऊन गेले होते की, त्यास जेवणाचे घंटेचेंहि भान राहिलें नाहीं परंतु एका कविताभक्त विद्यार्थ्यास एकदम काव्यस्फूर्ति होऊन तो त्यास उद्देशून ह्मणतो :—

अरे, दहा वाजले, मुदा वाढल्या, घंटा वाजे झणाणा !
भोजनाची वेळ झाली, मुगटे कारे नेसाना ?

---

बायको—आपण कांहीं ह्मणा, पण बायका कांहीं पुरुषाइतक्या चौकस नसतात

नवरा—कांहीं गोष्टीत नसतात हें मी कबूल करतो त्याच्यापुढे एखादें यंत्र ठेविलें, तर त्याची माहिती करून घेण्याची बुद्धि त्याना व्हायची नाहीं पण एखादी बाई दारावरून गेली पुरे, कीं ती कोण, कुठें रहाते, तिच्या अंगावर कायकाय दागिने होते, ते खरे कीं गिलिटाचे आहेत वगैरेवगैरे गोष्टींचा तपास केल्याशिवाय त्याना चैन ह्मणून पडायचें नाही

---

"स्त्रियात पुरुषापेक्षा सोशिकपणा जास्त असतो"

"हें कशावरून ताडलेंत ?"

"कशावरून ह्मणजे ? त्याच्या पायावरून !"

"ते कसें ?"

"अहो मडमाच्या पायात निमुळते बूट असतात, तरी पाय जखडले गेल्याबद्दल त्या कधीं तक्रार करित नाहींत, आणि आमच्या स्त्रियाचे पाय उन्हाळ्यात फुपाट्यात भाजून फोड येतात तरी त्याच्या गोष्टी सरत नाहींत !"

---

उत्तमराव—काहो ठोंब्याजी, तुह्मी लग्न केव्हा करणार ?

ठोंब्याजी—लग्न करायला हो काय लागते? पण माझी एक अट आहे! ती कुणी पतकरील तेव्हा ही खारी लग्न करणार.

"अशी कोणती अट बुवा ?"

"दुसरी कांहीं नाहीं मुलगी सुंदर असावी, आणि तिचा बाप श्रीमंत असून मूर्ख असावा एवढीच मुलगी सुंदर असून तिचा बाप श्रीमंत नसेल तर मी तिला

पतकरणार नाहीं; आणि मुलगी सुंदर आणि बाप श्रीमंत असून तो मूर्ख नसेल तर तो मला जावई करणार नाहीं, अशी अडचण आहे."

---

वर्तमानपत्राचा बातमीदार खाणावळ घालणाऱ्या बुवास—मामा, मी पुण्याच्या वर्तमानपत्राचा बातमीदार आहें, इतर जेवणारासारखा नाहीं इकडे लक्ष्य देऊन एकवेळच्या जेवणाबद्दल काय घ्याल तें बोला !

"तुम्ही बातमीदार का आहात ? बरें सांगितलेंत ! तुमच्याकरिता विशेष नियम म्हणजे हा कीं, तुम्हीं जेवणाबद्दलचे चार आणे आगाऊ दिले पाहिजेत."

बातमीदाराची स्वारी परत फिरली हे सांगावयास नकोच !

---

गंगाधरपंतानी रामभाऊजवळून ५० रुपये बुधवारी आणून देण्याच्या करारानें घेतले होते. शुक्रवार गेला, शनिवार गेला, आदितवार गेला तरी गंगाधरपंतांच्या हाताशी रुपये येईनात तेव्हा त्याना आतां बुधवारपर्यंत रुपये कसे मिळतील अशी काळजी येऊन पडली सोमवारचाहि दिवस गेला, तरी रुपये हातीं आले नाहीत आतां एका दिवसात ५० रुपये आपणास कसचे मिळतात, आणि आपण करारातून कसचे मोकळे होतों, असें गंगाधरपंतांला वाटलें म्हणून त्यानीं निराशेचा एक उसासा टाकून अंगांत कोट घातला आणि मंगळवारी सकाळीं रामभाऊ उठले नव्हते तोंच त्यांच्या घरी जाऊन दाराशी हाका मारण्याचा सपाटा चालविला रामभाऊनीं गंगाधरपंताचा आवाज ओळखला, आणि ते रुपये परत आणून देण्याकरिता आले असतील असे वाटून त्यांनी गंगाधरपंतांला दार उघडले व म्हटलें "उद्यांचा करार होता, तेव्हा पैसे देण्याची आजच एवढी घाई करण्याचें कारण नव्हतें"

"घाई कसली ! म्हटलें हातीं पैसे आले नाहीत हें आज सांगितलें काय अन् उद्यां सांगितलें काय आपणांस सारखेंच मग सावकाराचें एक दिवसाचे व्याज उगीच कशाला चढवा ? करार चुकल्याबद्दल मला इतके वाईट वाटले कीं कांहीं पुसू नका, काल सगळ्या रात्रींत माझा डोळ्याशी डोळा लागला नाहीं—"

"हेंच का सांगायचे होतें ? मग उद्यापर्यंत थांबलां का नाहीं ? लवकर सांगून माझी एक दिवसाची झोंप मात्र बुडविलीत ! आता मला कसली झोप येते !"

# एम. पीं. च्या मागचा ससेमिरा.

इंग्लंडच्या पार्लमेंटच्या मेंबर लोकांस बाहेरच्या उपद्यापी मंडळीकडून वारंवार सांकेतिक, सौम्य अथवा निकराचे विचित्र निरोप येत असतात. असले निरोप कांहींकांचे मानसिक स्वास्थ्य डळमळविण्यास पुरेसे होतात हें सांगावयास नकोच

एकदा एका इसमानें एका मेंबरास खाली लिहिल्याप्रमाणें पत्र पाठविलें होतें हें पत्र काळ्या कव्हरात बंद केलेलें असून वर पांढऱ्या शाईनें फिकविंजीत पत्ता लिहिलेला होता —

"महाराज !

ह्या पत्रावरून आपणास कळविण्यात येत आहे कीं, आपण बुधवारीं दुपारी पार्लमेंटगृहात जाऊं नये ! कदाचित् गेला, तर नेहमीचे जागेवर न बसता दुसरीकडे बसावें नाही तर आपले जिवास धोका येईल कारण मी व माझे जोडीदार वरील दिवशीं तुम्ही ज्या जागेवर बसत असता ती बाजू डायनामाइटनें उडवून देणार आहों ही गोष्ट आपणास कळविली याचें कारण आपण मजवर वेळोवेळ उपकार करित असता हें होय.

आपला आज्ञाधारक सेवक

एक हितेच्छु

ता. क.—मी कोण आहें हें आपणास उमगणार नाही व मला उमगून काढण्याचे भरीसहि आपण पडूं नये उगीच भानगडीत पडाल तर जिवास मुकाल !"

सदरहू पत्र ज्या मेंबरास आले त्यानें तें पार्लमेंटच्या एका कामदारास दाखविण्यापलीकडे कांहीं केलें नाहीं तो त्या दिवशी आपले नेहमीचे जागेवर बसून आपलें काम करित होता वास्तविक पहाता वरील पत्राबद्दल त्या वेळेस त्यास भानदेखील राहिलें नव्हतें

---

अशाच तऱ्हेचें दुसऱ्या एका मेंबरास एकदा पत्र आलें होतें हें पत्र लाल शाईनें लिहिलेलें असून त्याच्या डाव्या कोपऱ्यास एक तांबडा हात काढलेला असून "स्वातन्त्र्य ! कांहीं झालें तरी बेहत्तर !" असे शब्द तांबड्या अक्षरांनीं लिहिलेले होते वरील पत्रातील मजकूर येणेंप्रमाणे —

"आपण पुष्कळ दिवसपर्यंत पार्लमेंट सभेत चालविलेला वर्तनक्रम फार वाईट असल्यामुळे आपल्यावर 'रक्तहस्ताभयबंधु समाजा'चा कोप होऊन आपलें नाव

समाजाच्या 'अदल बसविण्यास योग्य अशा गृहस्थांच्या' यादींत पडले आहे. यापुढे आमचे समाजाच्या सभासदानी आपणास सार्वजनिक कामातून कायमचे दूर करण्यास कितीहि जुलमाचे उपाय योजिले, तरी त्यास समाज जबाबदार होणार नाही"

मदर्हू पत्रावरुन ह्या समाजाचा पत्ता कळण्यास कांहीं मार्ग नव्हता हे पत्र ज्या मेंबरास आले तो मेंबर प्रमुख असून अजूनपर्यंत आपलें काम सुखरूपपणे करित आहे

---

पार्लमेंटगृहात बाहेरच्या लोकास बसण्याकरिता ह्मणून जागा असते त्यात बसण्याची एका मतदारास परवानगी पाहिजे होती. ती त्याने आपल्या मेंबर-मार्फत मिळवून सुमारे दोन तासपर्यंत बसल्यावर सदर मेंबरास खाली लिहिल्या प्रमाणें पत्र लिहिले.—

"मि. एक्स् ह्यास मि. ब्लाकचे नमस्कार परवानगीप्रमाणे बसून मी दोन तासपर्यंत आपली पार्लमेंटातील वागणूक पाहिली. ह्यावरून मला वाटतें की, ही वागणूक आमच्या हितसबधाविरुद्ध आहे पुढील वेळी आपली भेट होईल तेव्हा खरपूस समाचार घेईन"

बिचाऱ्या एक्स् ने वरील दोन तासात 'हिअर, हिअर!' ह्या शब्दाशिवाय तोंडातून अक्षर काढिले असेल तर शपथ!

---

एकदा एका स्कॉटिश मेंबराच्या नावावर एक निनावी पत्र आले होतें. ते येणेप्रमाणे —

"आपण आज रात्रीं दहा वाजता पार्लमेंटगृहाचे सज्जावर जाऊन कठड्यास टेकून उभे रहावे ह्मणजे काही वेळानें तुह्माला एक तांबडा कंदिल लाविलेली बोट आपणाकडे येत आहेसें दिसेल, नतर तुह्मी पत्रात लिहिलेल्या सांकेतिक शब्दाने ओरडा ह्मणजे तीतून तुह्मास सांकेतिक उत्तर येईल ह्याप्रमाणें सांकेतिक खुणा पटल्यावर त्या बोटीतील लोक तुह्माजवळ काही गोष्टी काढतील त्या तुमच्या एकमेकाच्या हिताच्या असतील आपणास अशी सूचना आहे की, इतकें करण्यास आपण चुकू नये, चुकाल तर प्राणास मुकाल!"

सदर्हू मेंबर इतके सर्व करण्यास चुकला, परंतु अद्यापपावेतो प्राणास मात्र मुकला नाहीं!

---

एकदा कोणीएक मेंबर दारूच्या परवान्यासंबधानें कांहीं सक्तीचे नियम करावे अशाविषयीं खटपट करीत असतां त्यास एका खाणावळवाल्या मतदाराकडून हे नियम लहानलहान खाणावळीस लागू होऊं नये अशा आशयाचें एक पत्र आलें त्या पत्रांत आणखी पुढील मजकूर होता.—

"आपल्या प्रतिपक्षास मतें न देतां आपणासच द्यावीं ह्यासाठीं मी पुष्कळ लोकांस मोफत दारू पाजित असतों. माझे ह्मणण्याप्रमाणें आपले हातून होत नसल्यास मोफत दारू देण्याचें मला बंद करावें लागेल. मग मात्र परिणाम तुमच्या कल्पनेबाहेर होईल."

---

बहुतेक मेंबरलोकांस त्याच्या तर्फेच्या वर्तमानपत्रकारापासून बरीच मदत होत असते व त्याचे अनुकूल अभिप्रायाविषयीं मेंबरलोक फार जपत असतात. एकदा एका एडिटरसाहेबास आपल्या बगलेंतील एका मेंबराचें कांहींएका बाबतींत वर्तन पसंत पडलें नाहीं. सबब त्यानी त्यास तसें न करण्याविषयी पुष्कळ सूचना केल्या, परंतु व्यर्थ. अखेरीस त्यास त्वेष येऊन त्यानीं सदर मेंबरास खालील आशयाची तार केली —

"तुह्मीं सध्या जो क्रम पत्करिला आहे तोच पुढें चालविणें असेल तर आह्मास तुमची साथ करणें कठिण जाईल।"

---

## कित्येक हिंदुस्थानी ह्मणी.

१ जिस्के मूहपर मुछ नहीं–उस्कु अकल कुछ नहीं।

२ तू बकता जा— मय सुनता हूं।

३ टुटे तो फकीर, बने तो अमीर, मरे तो पीर।

४ दिनकू तो दिवाना लगा हय—मय तो अपने वखतकू उठूंगा

५ दिन आया वाका—और टूट गया टाका।

६ जोगी जुगत जाना नहीं—कपडे रंगे तो क्या हुआ।

७ थोडा खाया उने बहोत खाया—बहोत खाया उने कुछ नहीं खाया।

८ भाई जुगजुग जिया करो, नाम खुदाका लिया करो, भुख्खेकू कुछ दिया करो, और दूध—बतासा पिया करो।

---

# १९०३ सालीं ज्योतिषशास्त्रासंबंधीं लागलेले नवीन शोध.

१. तीन नवे ग्रह व उपग्रह यांचा शोध लागला

२. कांहीं उपग्रहांना नावे दिलीं नव्हतीं तीं देण्यांत आलीं.

३ सूर्यबिंबावर दिसणाऱ्या डागासंबधानें कांहीं अधिक निश्चित ज्ञान झालें. या डागाचा पृथ्वीच्या लोहचुंबक शक्तीशीं निकट संबंध आहे ही गोष्ट नवीनच कळली डॉ नॉर्मन लॉकियर या नामांकित शोधकानें पुष्कळ शोधाअतीं असें ठरविलें आहे कीं, हे डाग ह्मणजे सूर्यावर असलेल्या अनेक पर्वतांच्या छाया होत या छायांच्या योगानें सूर्यावरच्या वातावरणात प्रथम फरक पडतो व त्यामुळें पृथ्वीच्या लोहचुंबक शक्तीवर परिणाम घडतो.

४. मंगळाच्या भ्रमणाचा काळ निश्चित करण्याकरिता शोधकानीं खटपट चालविली होती प्रथम असें समजण्यांत आलें की, पृथ्वीच्या व मगळाच्या गतींत विशेषसा फरक नाहीं. ह्मणजे आपल्या पृथ्वीवर जसी २४ तासांची दिवसरात्र असते, त्याचप्रमाणें मगळावरहि आहे परंतु मि पार्सिवल लोवेल यानी मगळाचे गतीचे फोटोग्राफ घेऊन असें निश्चित केलें आहे की, मगळवारची दिवसरात्र २४ तासांपेक्षा पुष्कळ अधिक असली पाहिजे

५ मंगळावर कित्येक रेषा दिसतात, त्यावरून कित्येक शास्त्रज्ञानी असें अनुमान केलें होतें कीं, या रेषा ह्मणजे त्या ग्रहावरल्या नद्या, कालवे वगैरे होत. हा समज गतवर्षापर्यंत होता पण १९०३ सालीं मि० माडर यानी एक प्रयोग करून असें सिद्ध करून दाखविलें आहे कीं, या दिसणाऱ्या रेषा खरोखरीच्या रेषा नसून नुसता दृष्टिभ्रम आहे.

६ फ्रान्स देशातल्या एका शोधकाने एक नवा धूमकेतु शोधून काढिला आहे त्याचें सूर्यापासूनचें अंतर पृथ्वीच्या सूर्यापासूनच्या अतरापेक्षा २ ७ ह्मणजे सरासरी पावणे तीनपट आहे याचा शोध ता १५ जानेवारी १९०३ रोजीं लागला मार्सेल्स येथें दुसऱ्या एका शोधकानें दुसऱ्या एका धूमकेतूचा शोध लाविला तो गेल्या जुलै महिन्यात पृथ्वीच्या अगदीं जवळ आला होता

---

# जर्मनीच्या बादशहाचा दिनक्रम.

युरोपातील सर्व राजपुरुषात जर्मनीचे बादशहा दुसरे विल्यम हे बहुगुण-संपन्न आहेत त्याना सहा प्रकारच्या भाषात अस्खलित बोलता येते स्वभाषे-पेक्षाहि इंग्रजी भाषेतंतर ते फारच उत्तम बोलतात त्यांनीं एक नाटक लिहिलें आहे, त्याची तालीम ते स्वत देत असतात त्यानी स्वत एक प्रार्थना तयार केली आहे ती ते कधींकधीं देवळातील लोकास बरोबर घेऊन ह्मणतात त्याना जेवण करिता येते, बुद्धिबळें खेळता येतात व चित्रें काढिता येतात. त्यानी शिल्पकला व विद्युत्शास्त्र ह्याचा अभ्यास केला आहे. ते एका हातानें एका मिनिटात दोन सावजें, ह्याप्रमाणें चार तासपर्यंत शिकार करू शकतात पंचवीस वर्षांत त्यानी तेवीस हजार पशुपक्ष्याची शिकार केली आहे त्याना शंभरावर पदव्या आहेत त्याचे नुसते कपडे पंधरा लक्ष रुपये किंमतीचे आहेत दिवसातून निरनिराळ्या तऱ्हेचा त्याचा पोषाख असतो ते फार लवकर निजून उठतात ते नेमाने तालिम करितात त्याची अंघोळ थंड पाण्याची असते त्याचें जेवण फार साधें असते व ते तयार होताना त्याजवर राणीसाहेबाची देखरेख असते त्याना जेवण्यास फार वेळ लागत नाहीं मद्य वगैरे पिण्यांत ते फार नेमस्त आहेत. न्याहारीचे वेळी ते आपल्या मुलास बरोबर घेऊन न्याहारी करितात ते कोठेंहि गेले तरी मुलाच्या तजविरी बरोबर बाळगितात कौटुंबिकसुख त्याना उत्तम प्रकारचे आहे न्याहारी झाल्यानंतर ते थेट आपल्या वाचनमंदिरात जातात त्याच्या बहुतेक पत्रव्यवहाराची व्यवस्था जरी निरनिराळ्या चिटणिसाकडून झालेली असते, तरी काहीं पत्रव्यवहार बादशहा स्वत पहातात रोज त्याचे नावावर शेंकडों पत्रें येतात, निरनिराळे प्रकारचे रिपोर्ट तुरळक वाचून पहावे लागतात; गरीबगुरीबाकडून अर्ज येत असतात त्याना उत्तरें द्यावी लागतात, परंतु ही सर्व व्यवस्था ते फार जलद करितात हल्लीं हा पत्रव्यवहार त्यांनी तारायंत्रद्वारें बराच कमी केला आहे ते सहसा वर्तमानपत्रें अगर पुस्तकें वाचित नाहींत कारण तीं वाचण्यास त्यास फुरसदच नसते वर्तमानपत्रें वाचून त्यातील वेचे काढून रोज त्याचे टेबलावर ठेवण्याचें काम एका चिटणिसाकडे सोंपविलेलें आहे बादशहाचा रोख विशेषेंकरून लंडन, पारिस व न्यूयार्क येथील वर्तमानपत्रावर असतो जेव्हा त्याना एखादा विषय समजून घ्यावयाचा असतो, तेव्हा त्या विषयावरील पुस्तकें न वाचता त्या विषयात पारंगतता मिळविलेल्या पंडितास ते आपणाकडे

आमत्रण करून त्याजपासून तो विषय शिकून घेतात. ज्या वेळीं एक्स् किरणाचा शोध लागला, त्या वेळी एक्स् किरणाचा शोधक खुद्द प्रो रांजन् ह्यास बोलावणें पाठवून बर्लिन् येथे आणविलें व त्याजजवळ फार चौकस रीतीने संभाषण करून त्यानी चार घटकात खुद्द शोधकाएवढे ज्ञान संपादन केलें सकाळचें काम आटोपल्यानंतर बादशहा गाडींतून अथवा घोड्यावर बसून रपेट करावयास जातात गाडींतून जातात त्या वेळीं बरोबर राणी असते फिरून आल्यावर दोन वाजेपर्यंत पुन: काम करित बसतात व बाहेर फिरावयास जातात तों संध्याकाळ होते दोन्ही मुख्य जेवणाचे वेळीं पच्चीस वरीच पाहुणेमंडळी असते बादशाहा हे मंडळींतले आहेत मंडळींत असले ह्मणजे त्यांचें तेज जास्तच चमकते. त्याच्या डोक्यास कधींहि शांतता नसते झोपेंतसुद्धां एखादे वेळी मध्येंच उठतात व एखादी विसरलेली गोष्ट अथवा बेत किंवा नवीन विचार सुचल्यास तो टिपून ठेवितात ह्या कामासाठीं त्याचे बिछान्याजवळ नेहमी कागद व पेन्सिल ठेविलेली असते.

---

जर्मन प्रोफेसराचा पगार फारच भिकार असतो तिकडील १९१ प्रोफेसर दरमहा ६० किंवा त्याहून कमी पगारावर नोकरी करित आहेत. ८७ प्रोफेसर १०० अगर त्याहून कमी पगारावर आहेत. ७४ इसम २५० पर्यंत दरमहावर आहेत. कायते ४ च प्रोफेसरास १२५० पर्यंत दरमहा मिळतो यानीं महादेवाकडे शिफारसपत्र मिळवून इंग्लंडात जन्म घेतला असता व नंतर हिंदुस्थानच्या स्टेटसेक्रेटरीच्या वशिल्यानें हिंदुस्थानातील कॉलेजात प्रोफेसराची नोकरी पटकाविली असती तर खात्रीनें याच्याहून कितीतरी पटीनें पगार कमविला असता 'गरीब विचारे !

---

# जर्मनीच्या बादशहाचा दिनक्रम.

युरोपातील सर्व राजपुरुषात जर्मनीचे बादशहा दुसरे विल्यम हे बहुगुण-संपन्न आहेत त्याना सहा प्रकारच्या भाषात अस्खलित बोलता येतें स्वभाषे-पेक्षाहि इग्रजी भाषेततर ते फारच उत्तम बोलतात त्यानी एक नाटक लिहिलें आहे, त्याची तालीम ते स्वत देत असतात त्यानी स्वत एक प्रार्थना तयार केली आहे ती ते कधींकधीं देवळातील लोकास बरोबर घेऊन ह्मणतात त्याना जेवण करिता येते, बुद्धिबळें खेळता येतात व चित्रें काढिता येतात. त्यानी शिल्पकला व विद्युत्छास्त्र ह्याचा अभ्यास केला आहे ते एका हातानं एका मिनिटात दोन सावजे, ह्याप्रमाणें चार तासपर्यंत शिकार करू शकतात पचवीस वर्षांत त्यानी तेवीस हजार पशुपक्ष्याची शिकार केली आहे त्याना शभरावर पदव्या आहेत त्याचे नुसते कपडे पधरा लक्ष रुपये किंमतीचे आहेत दिवसातून निरनिराळ्या तऱ्हेचा त्याचा पोषाख असतो ते फार लवकर निजून उठतात ते नेमाने तालिम करितात त्याची अघोळ थड पाण्याची असते त्याचें जेवण फार साधे असते व ते तयार होताना त्याजवर राणीसाहेबाची देखरेख असते. त्याना जेवण्यास फार वेळ लागत नाहीं मद्य वगैरे पिण्यात ते फार नेमस्त आहेत न्याहारीचे वेळी ते आपल्या मुलास बरोबर घेऊन न्याहारी करितात ते कोठेहि गेले तरी मुलाच्या तजविरी बरोबर बाळगितात कौटुबिकसुख त्याना उत्तम प्रकारचें आहे न्याहारी झाल्यानतर ते थेट आपल्या वाचनमदिरात जातात त्याच्या बहुतेक पत्रव्यवहाराची व्यवस्था जरी निरनिराळ्या चिटणिसाकडून झालेली असते, तरी काहीं पत्रव्यवहार बादशहा स्वत. पहातात रोज त्याचे नावावर शेंकडों पत्रें येतात, निरनिराळे प्रकारचे रिपोर्ट तुरळक वाचून पहावे लागतात; गरीबगुरीबाकडून अर्ज येत असतात त्याना उत्तरें द्यावी लागतात, परंतु ही सर्व व्यवस्था ते फार जलद करितात हल्लीं हा पत्रव्यवहार त्यानी तारायत्रद्वारें बराच कमी केला आहे ते सहसा वर्तमानपत्रें अगर पुस्तकें वाचित नाहींत. कारण तीं वाचण्यास त्यास फुरसदच नसते वर्तमानपत्रें वाचून त्यातील वेचे काढून रोज त्याचे टेबलावर ठेवण्याचे काम एका चिटणिसाकडे सोंपविलेलें आहे बादशहाचा रोख विशेषेकरुन लडन, पारिस व न्यूयार्क येथील वर्तमानपत्रावर असतो जेव्हा त्याना एखादा विषय समजून घ्यावयाचा असतो, तेव्हा त्या विषयावरील पुस्तकें न वाचता त्या विषयात पारंगतता मिळविलेल्या पडितास ते आपणाकडे

आमत्रण करून त्यांजपासून तो विषय शिकून घेतात ज्या वेळीं एक्स् किरणाचा शोध लागला, त्या वेळी एक्स् किरणांचा शोधक खुद्द प्रो रॉजन् ह्यास बोलावणें पाठवून बर्लिन् येथे आणविलें व त्याजजवळ फार चौकस रीतीनें संभाषण करून त्यानी चार घटकात खुद्द शोधकाएवढे ज्ञान संपादन केलें सकाळचें काम आटोपल्यानतर बादशहा गाडींतून अथवा घोड्यावर बसून रपेट करावयास जातात गाडींतून जातात त्या वेळीं बरोबर राणी असते फिरून आल्यावर दोन वाजेपर्यंत पुन: काम करित बसतात व बाहेर फिरावयास जातात तों संध्याकाळ होते दोन्ही मुख्य जेवणाचे वेळीं पन्नास बरीच पाहुणेमडळी असते बादशाहा हे मडळींतले आहेत. मंडळींत असले ह्मणजे त्यांचे तेज जास्तच चमकते. त्याच्या डोक्यास कधींहि शातता नसते झोपेंतसुद्धां एखादे वेळीं मध्येच उठतात व एखादी विसरलेली गोष्ट अथवा बेत किंवा नवीन विचार सुचल्यास तो टिपून ठेवितात ह्या कामासाठीं त्याचे बिछान्याजवळ नेहमीं कागद व पेन्सिल ठेविलेली असते

---

जर्मन प्रोफेसराचा पगार फारच भिकार असतो तिकडील १९१ प्रोफेसर दरमहा ६०' किंवा त्याहून कमी पगारावर नोकरी करित आहेत ८७ प्रोफेसर १०० अगर त्याहून कमी पगारावर आहेत ७४ इसम २५० पर्यंत दरमहावर आहेत. कायते ४ च प्रोफेसरास १२५० पर्यंत दरमहा मिळतो यानीं मह्मदेवाकडे शिफारसपत्र मिळवून इंग्लडात जन्म घेतला असता व नतर हिंदुस्थानच्या स्टेटसेक्रेटरीच्या वशिल्यानें हिंदुस्थानातील कॉलेजात प्रोफेसराची नोकरी पटकाविली असती तर त्यांनीं याच्याहून कितीतरी पटीनें पगार कमविला असता गरीब बिचारे !

---

# शीलाचें माहात्म्य.

प्रल्हाद हा फार सद्गुणी, धर्मनिष्ठ, दयाळू, महान् भगवद्भक्त होता ही गोष्ट पौराणिक कथा जाणणाराना ठाऊक आहेच हा हिरण्यकशिपु राजाचा मुलगा नरसिंहावताराने हिरण्यकशिपुला मारल्यावर प्रल्हादाला गादी दिली व प्रल्हाद आपल्या सद्गुणाच्या योगाने इतका लोकप्रिय व बळवान् झाला कीं, त्याने आपल्या गुणाच्या बळावर त्रैलोक्य जिंकलें तेव्हा इंद्राला भय पडलें की, आता हा आपलें पद घेईल एवढी अचाट शक्ति प्रल्हादाच्या अंगी कशी आली तें कळावें म्हणून इंद्र बृहस्पतीकडे गेला त्यानें इंद्राला शुक्राचार्यांकडे जाण्यास सांगितलें व शुक्राचार्यांनीं "तू प्रल्हादालाच विचार, म्हणजे तो सांगेल" असें म्हटलें तेव्हा इंद्र ब्राह्मणाचा वेष घेऊन प्रल्हादाकडे गेला आणि त्याची सेवा करित राहिला तेव्हा एके दिवशी प्रल्हादानें त्याला आपण त्रैलोक्याचें राज्य कसें मिळविलें ते सांगितलें तो म्हणाला "मी राजा आहें म्हणून कधी कुणाशीं गर्वानें किंवा ताठ्यानें वागत नाहीं; कुणाचा हेवा, द्वेष किंवा तिरस्कार करित नाहीं, राग आवरून धरतों, कुठेंहि चागलें घेण्यासारखें दिसलें तर घेतों, सर्वांशीं ममतेनें वागतो, नीतिशास्त्राचा उपदेश ऐकून त्याप्रमाणें वागण्यास झटतो, विद्वानाचा मान राखतों आणि त्याच्यापासून ज्ञान मिळवितो अशा रीतीनें मीं हे राज्य मिळविलें आहे आता ब्राह्मणा ! मी तुझ्या सेवेनें सतुष्ट झालो आहे, तेव्हा तुला काय पाहिजे ते माग"

यावर ब्राह्मणवेषधारी इंद्र म्हणतो "महाराज, आपण मजवर प्रसन्न होऊन माग असें म्हणताच, तर आपल्याजवळ जें शील ( आपल्या वर्तनातला व स्वभावातला चागुलपणा ) आहे, तेवढें द्यावें"

हें ब्राह्मणाचें चमत्कारिक भाषण ऐकून प्रल्हादाला वाईट वाटलें, परंतु आतां खेद करून उपयोग काय ? तोंडातून गेलेलें वचन खरें केलें पाहिजे तेव्हा तो "दिलें" असें म्हणाला

प्रल्हादाच्या तोंडून हीं अक्षरें निघताच एक मोठा तेजस्वी पुरुष त्याच्या अंगातून बाहेर पडला त्याला "तू कोण आहेस ?" म्हणून प्रल्हादानें विचारताच "मी तुझें शील आहे" एवढें म्हणून तो पुरुष चालता झाला

त्याच्यामागून त्याच्याचसारखा दुसरा एक पुरुष तशाच रीतीनें निघून जाऊं लागला त्यालाहि "तू कोण ?" म्हणून प्रल्हादानें विचारलें तेव्हा तो म्हणाला "मी धर्म आहें जिकडे माझा मित्र शील जातो, तिकडेच मीहि जातों."

नंतर तिसरा एक तसाच दिव्य पुरुष प्रल्हादाच्या अंगातून निघून त्या दोघांच्या मागोमाग जाऊं लागला त्यालाहि "तूं कोण ?" म्हणून प्रल्हादानें विचारल्यावर तो म्हणाला "मी आचार आहें. जेथें धर्म असतो तेथें मीहि रहातो "

ते तिघेहि जाऊं लागले तेव्हां त्यांच्या मागोमाग आणखी एक मोठा बलवान् पुरुष प्रल्हादच्या अंगातून निघून जाऊं लागला त्याला विचारल्यावर तो म्हणाला "मी बल आहे जिकडे शील, धर्म व आचार असतात, तिकडे मीहि असतो "

त्या चौघांच्या मागून त्यांच्यासारखीच एक तेज पुंज देवी प्रल्हादाच्या अंगातून निघून जाऊं लागली तिलाहि वरच्यासारखा प्रश्न केल्यावर ती म्हणाली "मी लक्ष्मी आहें जिथं शील, धर्म, आचार, आणि बल जातं तिकडे मीहि जाते, ज्याअर्थी तूं शीलाचा त्याग केला आहेस त्याअर्थी आह्मालाहि त्याच्या मागून जाणं भाग आहे."

हे ऐकून प्रल्हादाला फार भय वाटलें आणि त्यानें लक्ष्मीला म्हटलें "मी एकटें शीलच दिलें असतां तुह्मी सगळीं त्याच्या मागोमाग कां जाता ?"

त्यावर लक्ष्मी म्हणाली "हे प्रल्हादा ! तूं जें एवढं त्रैलोक्याचं राज्य जिंकलस तें एकव्या शीलाच्या जोरावर धर्म, आचार, बल व द्रव्य हीं सगळीं शीलाच्या बरोबर आपोआप येतात तशींच त्याच्याबरोबर आपोआप जातात, म्हणून माणसानं प्रथम शील संपादन केलं पाहिजे तें मिळविलं कीं सगळं कांहीं मिळविलं, आणि तें हरविलं कीं सगळं कांहीं गेलं म्हणून समज ज्याला शील नाहीं त्याच्या-पाशींहि संपत्ति केव्हांकेव्हां जाताना दिसते पण ती कशी ? तर आपलंच घर समजून चुकून भलत्याच घरात एखादे वेळेस मनुष्य शिरतो त्याप्रमाणं ती तिथं फार वेळ टिकत नाहीं म्हणून सगळ्या गुणांत शील हा गुण मुख्य आहे त्याला फार फार जपलं पाहिजे " एवढें बोलून लक्ष्मी शीलाच्या मागोमाग त्या ब्राह्मणाकडे गेली.

ह्या पौराणिक कथेंत व्यवहाराचें तत्त्व किती सुंदर रीतीनें गोविलें आहे ! व्यापार, उद्योग, सुधारणा, राजकीय उन्नति, सगळ्याच गोष्टींत शीलवान् माणसांची उणीव आहे. ती उणीव भरून आल्यावर बाकीच्या गोष्टी मिळविण्यास वेगळी खटपट करावयास नको शीलाच्या बरोबर त्या आपोआपच येतील सगळ्या उन्नतीचें, सगळ्या सुधारणेचें, सगळ्या उत्कर्षाचें मूळ येथें आहे म्हणून शील संपादन करण्याविषयीं मुलांना व मुलींना नेहमीं उपदेश करीत रहावें.

---

# मोंगलबादशहांविषयीं कांहीं दंतकथा.

एका बादशहास लिहिण्यास शाई फार जाड लागे एकदा एका कागदावर सही करीत असता शाई पुरेशी जाड नाहीं असें वाटून बादशहा फार सतापला व दौतींतील शाई एका तळीत ओतून टाकण्याचा त्यानें हुकूम केला तळीच्या पाण्यात शाई पडण्यावरोवर सर्व पाणी इतकें काळेंकुट्ट झालें, की सर्व लोक आपापल्या दौती ह्या पाण्यानें भरून घेऊन जाऊं लागले!

---

एका नबाबानें दमास्कसहून एक उत्तम तरवार आणून ती कशी काय चालते हें पहाण्याकरिता एका गुलामाचे अंगावर तिचा प्रयोग केला परंतु गुलाम आपला उभाचे उभा जरा हालचाल केल्यावरोवर मात्र विचाऱ्याच्या शरीराची दोन अर्धें होऊन पडली!

---

मुर्शिदकुलीखान पायानें सहल करावयास लागला म्हणजे आपले हातात काठी न घेता ती एका हुजऱ्याच्या हातात देऊन त्याला पुढे चालवी! ह्या हुजऱ्याचे मागोमाग दुसरा एक हुजऱ्या असे, त्याचें काम हुक्का ओढणें व नबाबसाहेबास धूर देणें! वाटेत कोठें गर्दभराज भेटले तर न्हाव्यास बोलावून त्याचा आननशिरजात स्मश्रू करवून घ्यावा व केशविरहित झाल्यावर मशारनिल्ह्याची स्वारी कशी काय खुलते हें पाहून आपली कर्मणूक करून घ्यावी!

---

जिवंत महिषासुरावर यथेच्छ शस्त्रप्रयोग करून नंतर रफू करून घेणें, तळ्यात नाणी उडविणें, मोहरा हवेंत फेकून त्यावर निशाण मारणें व वर सांगितलेला गर्दभस्मश्रू ह्या बहुतेक मोंगल बादशाहाच्या मनोरंजनाच्या रीति असत!

---

ताजमहालाचा पाया खणण्यापूर्वी शहाजहान बादशाहानें सदर इमारतीवर भावी रत्नजडित काम करणाऱ्या कारागिरास एके ठिकाणी जमवून त्याचेदेखत मोहराच्या मोठमोठ्या थैल्या यमुना नदीत फेंकून दिल्या हे पाहून त्यातील काहींकास अचंबा वाटला व त्याप्रमाणें त्यानी उद्गारहि काढिले हें पहाण्यावरोबर त्या आश्चर्यचकितास बादशाहानें एकदम रजा दिली व म्हणाला "ज्याना भिकार मोहराचा एवढा लोभ वाटतो त्याचे हातात हिरेमाणके कोणीं द्यावीं?"

---

आणि या संकटांतून आपणास सोडविणारा आतां स्वयपाक्यावांचून कोणी नाहीं असें पाहून त्याला खरीखरी गोष्ट एकदा सांगून टाकावी आणि त्याच्या हातापायां पडून त्याच्या मार्फत मजीभाईला दोन गोष्टी सांगून तें प्रकरण दाबून टाकावें, असा विचार करून बाळू डोळ्यांत आसवें आणून काकुळतीनें ह्मणाला "गोष्टतर खरी आहे, पण मी ती कशी सांगू? धनजीशेटजीनीं ही गोष्ट कुणाजवळ बोलू नकोस, नाहींतर एखादे दिवशीं फाशीं जाशील ह्मणून मला मुद्दाम बजाविलें आहे"

"नुसतें बजावलेंच आहेना? तुला शपथविपथतर नाहींना घातली?"

"शपथहि घातली आहे तुमच्याजवळ खोटें कशाला बोलू? तुला ह्मसोबा, ह्मणगोबा, रेडकोबा, जोगाई, जोखाई, नवलाई या सर्वांची शपथ आहे ह्मणून त्यानीं मला ह्मटलें."

"हं! तरमग मी ती गोष्ट तुला विचारणार नाहीं आणि तूंहि सांगू नयेस हें बरें. बरें तू आतां नीज. पुढचेंपुढें पहातां येईल. तू काळजी करू नकोस नी तुझ्या केसालासुद्धां धक्का लागू देणार नाहीं."

भोळ्या बाळूला समाधान वाटलें कीं, देवाची शपथ मोडून आपला अपराध कबूल करण्याचा प्रसंग आला होता, पण तो बरा टळला! पण जी गोष्ट आपल्या शेटजींला किंवा आपणाला अशा दोघानाच ठाऊक, ती मजीभाईला कशी कळली, याचें त्याला राहूनराहून नवल वाटलें. बाळूनें जेवढें सांगितलें तेवढ्यानें स्वयपाक्याचा मतलब साधला धनजीशहाला नरम आणण्यास ही एक गोष्ट पुरे आहे असें त्याला वाटलें, आणि आपण कसा युक्तीनें तपास लावला तें ऐकून मजीभाई आपलेवर खुष होतील या विचारानेंच त्याला मोठें समाधान वाटू लागलें

## प्रकरण १७ वें

# मंजीभाईचें पदार्थसंग्रहालय.

आज मंजीभाईच्या घरीं मोठीच गडबड चालली आहे. त्याची मुलगी पिरोजा ही उपवर झाली असल्यामुळें तिच्यासाठीं वर शोधताशोधता नाकीं नव आले होते शेवटीं मोठ्या मुष्किलीनें एका ठिकाणीं जुळलें आणि आज भावी व्याही आपल्या भावी सुनेला पाहून साखरपुडा देण्यास आले होते व्याह्याची वरदास्त ठेवण्यात मंजीभाई गढून गेले होते मंजीभाई कर्जबाजारी होते, पण त्याचे हे व्याही चागलें पैसेवाले असून त्याची अडत इंग्लंड, अमेरिका, जपान, जावा, सीलोन वगैरे दूरदूरच्या देशात होती शिवाय सरकारातहि त्याचें वजन चागलें असून सरकारानें त्याला जे पी केलें होतें अशा मोठ्या श्रीमंत घराण्यात आपली मुलगी पडावी ही मंजीभाईची फार इच्छा होती म्हणून ते व्याह्याची खुशामत करण्यात, त्यांना मेजवानीचा बेत थाटाचा ठेवण्यात, आणि आपण कर्जबाजारी दिसू नये म्हणून जपण्यात अगदी निमग्न झाले होते पिरोजा आज उत्तम सुवासिक तेलानें न्हाऊन व उंची रेशमी साडी नेसून आणि अंगावर भूषणें घालून सजली होती मंजीभाई, मंजीभाईचें कुटुंब व पिरोजा सगळींच आनंदात होती

मंजीभाईची तब्यत आता खुप दिसते आहे खरी, पण अखेरपर्यंत ती अशीच खुप राहील की मध्येंच कांहीं विघ्न येईल कोणास ठाऊक? पण शंका कशाला पाहिजे? मंजीभाईनीं बाळूला मुद्दाम ठेवून घेतलें आहे ना? मग विघ्नाला काय कमी आहे?

आजपर्यंत बाळूनें एखादें काम बिनबोभाट होऊ दिलें आहे असे कधींच घडलें नाहीं त्याच्या ग्रहाचा गुणच असा विलक्षण असे की, जेथें बाळ आहे, तेथें विघ्न हा ठरलेलाच आहे! जसा विघ्नहर्ता गणेश, तसाच विघ्नकर्ता बाळू! हे जर खरी गोष्ट, तर आजच्यासारख्या आनंदाच्या दिवशीं बाळूचे ग्रह उगेच राहतील? आजनंतर बाळूचें काम विशेषच होतें!

मंजीभाईची तब्यत आज खुप होती म्हणून वर सांगितलेंच आहे. पाहुण्यांच्या भरात ते गवरसाहेबाचा समाचार घेण्यासाठीं त्याच्या खोलींत गेले आणि त्यांना तराकापी जवाप मिळाली किंवा नाहीं म्हणून चौकशी केली त्यावर गवरसाहेबानीं "थोडा येईल, काय घाई आहे" असें बोलून त्यांना न मिळाल्याचें सुचविलें ते पाहून मंजीभाई म्हणतात " आज

आमच्या घरांत व्याह्याच्या मेजवानीची थोडीशी गडबड आहे त्यामुळे नोकर चाकर हे सगळे तिकडे गुतले आहेत त्यांचे हात लवकर रिकामे व्हावयाचे नाहींत त्यापेक्षा तुमच्या तैनातीला ही दोन पोरें देतो" असे ह्मणून मजीभाईनी आपल्या दोघा मुलाना बोलावून आणून त्याना रावसाहेबाचा नीट समाचार घेण्यास व त्यानां आपला बागबगीचा, तलाव वगैरे सगळें दाखविण्यास सागितले आणि "वात्रटपणा किंवा दाडगाई वगैरे केलीतर खबरदार!" असें मुलानां दटावून, व "तुमच्याशी यांनी जास्तीकमी कांहीं केले तर विनमुरवत मला सागा" असे रावसाहेबाना सागून मजीभाईची स्वारी दुसऱ्या कामाला गेली

रावसाहेब मजीभाईच्या या भाषणावर ह्मणाले कीं "टुमी वेफिकीअ अआ, टुमची मुले काई टशाटली नाईट आनि असली टअ मुले टी मुलेच! लेकआच्या जाटीला ठोडासा डाडगेपना पाइजेच आटापासून शेळपट झाली-टअ पुढे कस होनाअ? मुलान्चे फाअसे मनावअच घेऊ नये फाअच गडबड करू लागली, टअ टुमाला नाई का मला सागटा येनाअ?"

मुलाच्या मनात हे रावसाहेबाचे शेवटचे शब्द घोळत राहिले होते, आणि या रावसाहेबाना आपण शेळपट कीं कसे त्याचा एकदा चागला हात दाखवू आणि हे आपल्या बाबाकडे कशी तक्रार नेतात ते पाहू, असा त्याचा बेत ठरला

त्याचे आपसात असे ठरले की, एकाने रावसाहेबाना गोष्टी बोलण्याचे नादी लावावे आणि तोपर्यंत दुसऱ्याने दुसऱ्या एका दालनात इकडच्यातिकडच्या चार दगड, माती, जुन्या विटा वगैरे सटरफटर जिनसा जमा करून त्या व्यवस्थेने नीट माडून ठेवाव्या व त्याचेवर राणीच्या बागेतल्या पदार्थसग्रहालयासारख्या चिठ्ठया लावाव्या या बेताप्रमाणे एकजणाने रावसाहेबास चहा वगैरे आणून देऊन त्याना बराच वेळ गोष्टीच्या नादात गुतविलें, आणि तेवढ्यात दुसऱ्याने दगड, माती, चुना, काहीं जुनी भाडी, थोडेसे खोटे दागिने, मातीची चित्रे, वाघाची व हरणाची कातडी, चाकू, सुऱ्या वगैरे सामान दुसऱ्या दालनात टेबलावर व्यवस्थेने माडून व त्यावर चिठ्ठया लावून ते दालन बद केले इतकी सगळी तयारी झाल्यावर ते दोघेहि रावसाहेबाना आपले घर व बागबगीचा दाखविण्यासाठी निघाले रावसाहेबाना घर पहाण्यात विशेष काहीं अर्थ वाटला नाहीं, तेव्हा आमचे 'अजब घर' अथवा पदार्थसग्रहालय पहाण्यास चला ह्मणून ते आग्रह करु लागले रावसाहेबाना ते पहाण्यात उत्कठा वाटली, हें सागावयास नकोच! ते तिकडे जाण्यास लागलीच निघाले.

ते ठरलेल्या दालनात गेले तेथें अगोदर सर्व तयारी करून ठेविलेली होतीच. तेथला एक दगड हातीं घेऊन एक मुलगा ह्मणाला "रावसाहेब! हा दगड बारीक नजरेने पहा, ह्मणजे यात विशेष काय आहे ते समजेल हा दिसायला साध्या दगडासारखा आहे, पण त्यावर जाऊ नका सन १२५९ सालीं आफ्रिकेंत एक मोठा ज्वालामुखी पेटला होता, त्यातला हा दगड आमच्या बाबानीं मोठ्या प्रयासानी मिळविला आहे"

इतक्यात दुसऱ्या मुलाने त्याचा हात धरून त्याना दुसरीकडे "हें पहा" ह्मणून ओढून नेण्याचा यत्न करावा आणि दुसरा एखादा दगड हातीं घेऊन ह्मणावें "रावसाहेब, सोन्याच्या खाणीत सापडलेला हा दगड आहे यातून कमीतकमी दोन तोळे सोने निघेल असें सागतात हा दगड बाबानी चाळीस रुपयास विकत घेतला"

पलीकडे थोडासा चुना ठेविला होता त्यासबधाने अशी माहिती देण्यांत आली कीं "अमेरिकेंत ब्राझिल देशात एका नदीच्या तळाशी सापडलेला हा गाळ आहे चादीसोन्याच्या दागिन्यावर याचा हात फिरविला ह्मणजे त्याना विलक्षण चकाकी येते याच्या योगानें जुने दोनदोनशे वर्षांचे दागिने अगदी काल घडल्यासारखे नवे दिसू लागतात"

रावसाहेबाना या गोष्टीचें आश्चर्य वाटू लागलें आणि ते त्यातला थोडासा चुना घेऊन आपल्या हातातल्या सोन्याच्या वेढ्यावर घासून पाहू लागले तें पाहून ती मुलें रावसाहेबाच्या भोळेपणाला हसू लागली त्या दोघानी रावसाहेबाना एका दालनातून दुसऱ्यात याप्रमाणें पुष्कळ वेळ फिरवून नतर बाग दाखविण्यास नेलें तेथेहि फिरूनफिरून रावसाहेबास कटाळा आला, पण मुलं माघारीं फिरेनात हे अमके झाड विलायतेहून आणिलें आहे, तमके झाड अमेरिकन आहे, अशा तऱ्हेनें कांहींतरी दाखवित ते दोघेहि रावसाहेबाना एका तलावापाशीं घेऊन गेले या तलावापाशीं जाण्यास मध्यतरी एक नाला होता, आणि त्यावर एक लाकडाची फळी टाकून जाण्यापुरती वाट केली होती त्या दोघा मुलापैकीं एकजण पुढें गेला, आणि एकजण मागे राहिला व त्या दोघानीं मिळून रावसाहेब त्या फळीवरून जात असता ती फळी उलटून दिली यामुळे अर्थातच रावसाहेब पाय घसरून नाल्यात पडले नाल्यात पाणी फार नव्हते, पण होते ते अगदीं घाणीचें वोळनचाळून गावातल्या मोऱ्या सोडलेला तो नाला तेथे घाणीविषयीं काय विचारावयाचें? पोरानी शेवटी आपली फजीती केलीच, असें

पाहून रावसाहेब संतापले आणि "चए आहे! भाईसाहेबाना सागून देईन हा कोन वातटपना! मी समजट होटो की मुले गईंच असटील पन हा कोन पोअर्गेल? टोआमोठ्याना नि सकपने लाज आननाई ही गोस्ट आहे!" असें म्हणून रावसाहेब धरफडत नाल्यातून वर येण्याचा प्रयत्न करित होते रावसाहेबाची ती क्रुद्ध मुद्रा पाहून ते दोघे मुलगे पळाले, आणि आज बाबा आपणास एप रारपूस इनाम देतील, तेव्हा आपल्या कृत्याची बनावणी चागली केली पाहिजे असें आपापसांत बोलत चालले होते त्याचे हे बोलणें त्याची बहीण पिरोजा हिने एका झाडाच्या आडून ऐकलें आणि ती म्हणाली "पाहुण्याची फजीती करून आणखी वर खोटे बोलण्याची तयारी करता नाहीं का? मी आताच जाऊन बाबाना सगळी हकीगत सागते पहा"

पिरोजा हिचें वय चौदा वर्षांचें होतें तरी तिचें लग्न झालें नसल्यामुळे ती अद्याप आपल्या भावडांशीं खेळत असे, त्याची थट्टामस्करी करित असे, धिगामस्ती करण्याचीसुद्धा कधींकधीं स्वतंत्रता घेई पिरोजा हिने आपलें सगळें बोलणें ऐकलें आहे, तेव्हा कदाचित् ती खरोखरच बाबाना जाऊन सागेल व बाबाची तिच्यावर अधिक प्रीति असल्यामुळें त्याना तिचे म्हणणें खरें वाटून आपणास शिक्षा होईल म्हणून तिला धरण्यासाठी ते दोघेहि तिच्या पाठीस लागले पिरोजा धूम पळत होती व हे दोघे तिला धरण्याचा प्रयत्न करित होते ती एखाद्या झाडाच्या आड लपे व हे तिला पाहून काढित पाठलाग करीत, असें पुष्कळ वेळ चाललें होते शेवटी पिरोजा थकली आणि आता भावांच्या हाती सापडण्यापेक्षा एखाद्या खोलीत लपून रहावे म्हणून ती जवळच्याच खोलीत शिरली व ते पाठलाग करणारे आपले भाऊ आत येतील यासाठीं तिने आतून कडी लावून घेतली तिच्या भावानी तिला बाहेर निघतां येऊ नये म्हणून बाहेरून कडी लावली आणि ते चालते झाले.

प्रकरण १८ वे

## पिरोजेला वाळूचा पायगुण भोवला !

पिरोजा ज्या खोलींत लपून बसली होती ती खोली रावसाहेबाची आहे हें तिला ठाऊक नव्हतें रावसाहेबहि त्या वेळी आगाशींत नळावर जाऊन चिखलानें भरलेलें आपलें अंग धूत होते त्यामुळे पिरोजा चुकून आपल्या खोलींत शिरली हें त्यानाहि ठाऊक नव्हतें ते टुवालानें अंग पुसून खोलींत येऊन पहातात तो रूपवान् व वस्त्रालंकारानीं भूषित अशी एक तरुणी दाराला आतून कडी लावून आपल्या खोलींत उभी असलेली त्याच्या दृष्टीस पडली त्याबरोबर रावसाहेबाची चित्तवृत्ति चंचल झाली आणि त्याना थोडीशी भीतीहि पण वाटली इकडे रावसाहेबाना पहाताच पिरोजेच्या अंगालातर दरदरून घाम सुटला आपण परपुरुषाच्या खोलीत दिवसाढवळ्या दाराला कड्या लावून बसलों आहों, हें कोणी पाहिलें किंवा बाबाना समजलें तर आपली दशा काय होईल? लोक काय भलतेंच उठवितील? आणि आपल्या अंगाला कलंक लावतील, हें समजण्याइतकें शहाणपण तिच्या अंगी आलेलें होतें यामुळें भीतीनें तिच्या तोंडचें पाणी पळालें होतें बाहेरून कडी लावली नसती तर ती केव्हाच पळून गेली असती. पण आता तेंहि शक्य नव्हतें कडी काढा म्हणून ओरडावें तर तेंहि वाईट! त्याच्या योगानें आपल्याला कोंडल्याबद्दलची टिमकी आपल्याच तोंडानें वाजविली असें होणार अशा चुचकळ्यात ती पडली तिला मुख्य भीति तिच्या बापाची वाटत होती कारण, मजीभाईचा स्वभाव फारच रागीट असे त्याना आपली ही गोष्ट कळली तर ते मारण्याखालीं आपलें एकहि हाड शाबूत ठेवणार नाहींत, अशी तिची खात्री होती म्हणून ती आता काय करावें या विचारात पडली होती रावसाहेबानीं तिला तू इथें कशी आलीस, व बाहेरून कडी कुणी लाविली म्हणून विचारलें परंतु पिरोजा भीतीनें इतकी घाबरून गेली होती कीं, तिच्यानें बोलवेना. ती मुळमुळू रडायला लागली. इकडे सकाळपासून रावसाहेबाचा समाचार घेण्यास फावलें नाहीं म्हणून मजीभाई स्वतः रावसाहेबाकडे येत होते त्याचा आवाज ऐकूनतर पिरोजा अगदीं गर्भगळित झाली! बाबाचा शब्द ऐकू येत आहे, तेव्हा बहुधा ते इकडेच येत असावेत, ते आले आणि त्यानी मला इथें पाहिलें तर ते मला आणि पाहुण्याना काय म्हणतील आणि काय नाहीं, या विचारानें तिची आता अगदीं त्रेधा उडाली जशी पिरोजेची तशीच राव-

साहेबाची पण अवस्था झाली होती मजीभाई इकडे येऊन हा प्रकार पहातील, तर काय ह्मणतील ? आपल्या अब्रूला हा विनाकारण कलंक लागला असें होईल. आता याला उपाय काय करावा ह्मणून रावसाहेब विचारांत पडले होते. पण विचार करायला आता वेळतरी कोठें राहिला होता ? वरील विचार त्या दोघाच्या मनात येतात न येतात तोंच मंजीभाईंनीं दारावर थाप देऊन "रावसाहेब, दार उघडा" ह्मणून हांक मारली.

"तू आता माझ्या पलंगाखालीं लप, मी कांहीं युक्ति करुन भाई-साहेबाना लवकरच लावून देतों, आणि ते गेले ह्मणजे तूहि जा, पण तोंपर्यंततरी तूं या पलंगाखाली अगदीं श्वास कोंडून लपून बैस" ह्मणून रावसाहेबानी पिरोजेला पुष्कळ सागून पाहिलें. पण तें ती कबूल करीना. रावसाहेब आपलें ह्मणणें ऐकून दोघाची अब्रू वाचविण्याबद्दल तिला गयावया करुन सागत होते, पण ती मुलगी कांहींकेल्या ऐकेना. ती अगदी मूढ होऊन उभी होती ती जागची हालेना इकडे मजीभाईंनी हाक मारूनमारून डोकें उठविलें शेवटी रावसाहेब पिरोजेच्या पाया पडले आणि पलंगाखालीं लपून बसण्याविषयीं तिचें मन एकदाचे वळलें ह्मणून आनद मानित त्यानीं मजीभाईच्या हाकेला 'ओ' देऊन दार उघडण्याचा विचार केला त्या गडबडीत रावसाहेबाना दार बाहेरून लाविलें असल्याबद्दलचे विस्मरण झालें त्यानीं आतली कडी काढली, तरी दार उघडेना तेव्हा बाहेरून कडी लाविलेली मजीभाईंनी पाहिली, आणि "बाहेरून कुणी कडी लाविली ह्मणून विचारलें आपण आता मुलाचें नाव घेऊ तर ते कदाचित् पिरोजा आपल्या खोलींत असल्याबद्दलचे बाहेर फोडतील या भीतीनें रावसाहेबानीं कोणाचेंच नाव न सागता टाळाटाळ करून वेळ मारून नेली मजी-भाईहि आज कामामुळें त्रासून गेले होते, ह्मणून त्यानींहि अधिक चवकशी न करता "आपण आज थकलों आहों, आता क्षणभर इथेच अग टाकतो" असें ह्मणून पिरोजा ज्या पलगाखालीं लपली होती, त्याच पलगावर त्यानीं अग टाकलें. मजीभाईंनी तेथून लवकर जावें ह्मणून रावसाहेबानी नानाप्रकार केले ! तुह्मी येथें निजता पण तिकडे तुह्माला कोणी कांहीं विचारायला येईल, त्याला तुह्मी येथें आहा हें कसें कळावें ? त्यापेक्षा तुह्मी आपल्याच माडींत जाऊन निजाल ते चागलें येथें आमचा आपला प्रवासी बिछाना आहे नऊ बिछान्यावर लोळल्या-खेरीज तुमचीं हाडें दुखण्याचे बद होणार नाहीं अशा अनेक सबबी सागून पाहिल्या, पण कांहीं उपयोग झाला नाहीं आता मुकाट्यानें तोंडावर पाघरुण

घेऊन स्वस्थ झोपतरी घ्या ह्मणून रावसाहेबानी ह्मटलें, पण तेहि त्यानां पटेना रावसाहेबाना पिरोजा एखादे वेळी शिंकली तर सगळे बेंड फुटावयाचें ही भीति क्षणोक्षणीं वाटत होती. पिरोजेला आशा होती कीं, आपल्या बाबाना पडल्या-बरोबर झोंप लागेल पण तीहि आशा व्यर्थ झाली कारण मजीभाई इकडच्या तिकडच्या गोष्टी काढून मुद्दाम झोंप टाळतातसें दिसलें अशा चिंतायुक्त स्थितींत पिरोजेला आता फार वेळ बसावे लागलें नाहीं कारण, प्रत्येक कामात विघाड करणारा कळीचा नारद भोळा बाळू तितक्यात त्या खोलींत घाबऱ्याघाबऱ्या आला, आणि एकदम पलगाकडे जाऊ लागला मजीभाईनी त्याला घाबरण्याचें कारण विचारलें तेव्हा तो ह्मणाला " आपले ते सुरतेचे पाहुणे नव्हेत का ? त्याच्या पगडीचा डबा मीं या खोलीत पलगाखालीं ठेविला आहे ते बाहेर जाण्यास निघाले आहेत व त्याना पगडी पाहिजे आहे—"

" या खोलीट कसला आला पगडीचा डभा ? " ह्मणून रावसाहेब त्याच्या अगावर धावून गेले त्याना भीति ही पडली की, हा पलगाच्या खालीं पाहू लागला ह्मणजे सगळें बिंग निघावयाचें खरा प्रकार असा होता कीं, बाळूनें तो डबा पलीकडच्या खोलीत पलगाखाली ठेविला होता पण सारख्यासारख्या खोल्या असल्यामुळें भूल पडून तो रावसाहेबाच्या खोलींत पहाण्यास आला होता आपले हातून भूल होत आहे हे त्याला खरेंच वाटेना व तो रावसाहेबाना ह्मणाला " वा ! मीं माझ्या हातानें या खोलीत पलगाखाली डबा ठेविला अन् तुह्मी नाहीं ह्मणता ? पण मी कसें ऐकेन ! " असे बोलून तो आवेशानें पलगा-खाली डबा पहाण्यासाठीं वाकू लागला रावसाहेबाच्या अगाचा आता अगदी सताप झाला ते हुमरीतुमरीवर आले आणि " आमी काय चोअ आहो टअ टुझा डबा असून नाईं मनू ? टू आमच्या पअवानगीवाचून आमच्या खोलीटच का अगोदअ आलास ?" असें बोलत वाकू आणि तो पलगयाच्या आड झटदिशी झाले व त्याला गचाळ्या देऊन बाहेर काढू लागले य कश्चित् क्षुल्लक कारणावरून नोकराचाकरावर हात टाकण्याइतके सतापायला रावसाहेबाना काय झालें ते मजीभाईला कळेना, ह्मणून ते इतका वेळ मुकाट्याने बसले होते, परतु आता त्याच्यानें उगें बसवेना ते ह्मणाले " रावसाहेब, त्याच्याशीं कशाला उगीच वाद घालता ? बोलूनचालून ती हलकट माणसें डबा ठेविला असेल एका ठिकाणीं आणि पहात असेल भलत्याच ठिकाणीं पाहीना ! तो ह्मणतो त्याप्रमाणे इथे डबा निघाला, तरी आपल्यासबबानें थोडाच कुणी सजाय घेणार आहे ? तशात

तो स्वत. तोंडानें म्हणत आहे की, आपण तो डबा इथे पलंगाखाली ठेविला म्हणून ! तेव्हा होऊद्या एकदाची त्याची खात्री " असें म्हणून रावसाहेबाच्या उत्तराची वाट न पहाता मजीभाई वाळूला म्हणाले " ह, आटप, पाहून घे पलंगाखालीं डबा असला तर, आणि मुकाट्यानें चालता हो वेड्याला हुजत कुणाशीं घालावी आणि कुणाशीं नाहीं, याविषयींची अक्कलच नाहीं ! "

वाळूला काय, पडल्या फळाची आज्ञा ! तो लगलीच पलंगापाशीं सपाट्यानें जाऊन खालीं हात घालून पाहू लागला पिरोजा आपलें अंग अगदी चोरून बसली होती, तरी तिच्या अंगाला वाळूचा हात लागला, आणि त्याबरोबर " अरे बापरे, केवढें भूत !" अशी वाळूनें गर्भगळित होऊन किंकाळी फोडिली व तो भीतीनें धाडकन् खालीं पडला त्याची ती भयंकर किंकाळी ऐकून मजीभाईहि ताडकन् उठून पलंगापासून दूर झाले आणि काय चमत्कार आहे म्हणून पलंगाखालीं वाकून पहातात तों आपली आवडती मुलगी पिरोजा पदरानें तोंड झाकून रडत असलेली त्यांना दिसली

मजीभाईंची तब्यत आतापर्यंत खुप राहिली होती सकाळपासून त्यांची मुद्रा प्रसन्न दिसत होती व नोकरचाकरांनासुद्धा आपल्या मालकाची पुष्कळ दिवसांनी अशी खुप तब्यत पाहून आनंद वाटत होता. पण त्या आनंदात हे केवढें जबर-दस्त विरजण पडलें ! हा सगळा वाळूचा पायगुण !

## प्रकरण १९ वें

## बाळूची स्वामिनिष्ठा येथेहि दिसली.

कोणीहि गृहस्थ कितीहि शांत वृत्तीचा असला तरी आपल्या तरुण उपवर मुलीला परक्याच्या खोलींत आतून कडी लावून बसलेली व दार उघडल्यावर पलंगाखालीं लपलेली पाहिल्यावर त्याला संताप चढणार नाहीं, असें कधींहि व्हावयाचें नाहीं! आणि मजीभाई म्हणजे काय? प्रत्यक्ष जमदग्नीचा अवतार! मग त्याच्या रागाला काय विचारता? ही गोष्ट पट्कर्णी होऊन आपली अब्रू नगाऱ्यावर येऊं नये म्हणून वास्तविकपणें पहाता त्यांनीं प्रथम नीट खात्री करून घेऊन मग मुकाट्यानें मुलीला शिक्षा करावयाची, पाहुण्याचे चांगले वाभाडे काढून त्याला घराबाहेर घालवावयाचें व बाळूला काहीं लालुच दाखवून तो या गोष्टीचा बभ्रा न करील अशी तजवीज करून झालेला प्रकार जागच्याजागींच दाबून टाकावयाचा. पण मजीभाईंचें पित्त आता जें खवळलें होतें त्याच्या योगानें त्याच्या बुद्धीला जणू अगदींच भ्रंश झाला होता. त्यांनीं मोठ्यानें आरडाओरड करून सगळे नोकरचाकर व शेजारीपाजारी गोळा केले, आणि त्याच्या देखत रावसाहेबांची फजीती करून त्याचें बिऱ्हाड बाहेर फेंकून दिलें. ते खरी हकीगत सांगत होते, पण ती ऐकून घेतो कोण? मुलगी बिचारी पाहुण्याची ही स्थिति झाली तर आपली काय होईल, या भीतीनें गांगरून गेली होती व खाली मान घालून थरथर कांपत उभी होती. तिच्या नाजूक गालावर मजीभाईंनी आपलीं पांचहि बोटें [illegible] उमटविलीं आणि मागाहून म्हटलें "कारटीनें माझें नांव [illegible] कलंक लाविला! असली कारटी जगून काय करायची आहे? [illegible] दुष्कृत्यें करण्यास जिवंत ठेवण्यापेक्षा आपल्या हातानें '[illegible] दोन तुकडे' करून मोकळें व्हावें, इतका या कारटीला पाहून [illegible] संताप होतो. पुढें आहे ती सुरी! आण म्हणजे या व्यापातून [illegible] मोकळातरी होईन."

"[illegible] मजीभाई [illegible] संतापाच्या व उद्वेगाच्या भरांत बोलले [illegible] एकनिष्ठ प्रामाणिक चाकर! मालकानें अमुक [illegible] आणण्याचा उशीर की बाळू धांवलाच! कोणीकडूनतरी [illegible] नाहीं, हें त्याचें ब्रीद. त्यानें [illegible] मोठा चाकू काढून व तो उघडून [illegible] भोळेपणा पाहून जमलेल्या साऱ्या

मडळीला तशा स्थितींतसुद्धा आश्चर्य वाटल्यावाचून आणि हसू आल्यावाचून राहिलें नाहीं

इकडे मजीभाईच्या घरीं झालेली गडबड गावात लोकानां कळून काय झालें हें पहाण्यासाठी सगळें गाव उलटलें. कोणतीहि गोष्ट लोकाच्या कर्णोपकर्णी झाली ह्मणजे तिला काय स्वरूप येईल आणि काय नाहीं, याचा नेम नाहीं तसेंच याहि गोष्टीचें झालें. वास्तविक रावसाहेब व पिरोजा दोघेंहि धुतल्या तादुळा-सारखी स्वच्छ होती परतु दैवयोगाने विचित्र आपत्तीत येऊन पडल्यामुळे लोकाच्या उपहासाला, अचकटविचकट तर्काला आणि अमर्याद निंदेला ती बिचारीं बळी पडलीं

लोकात ही गोष्ट इतकी फैलावली, तेंव्हा भावी व्याह्यानाहि ती हकीगत कळून तेहि धावत आले, आणि त्यानीं प्रथम मजीभाईच्या हातातला चाकू काढून घेतला, तमाशा पहाण्यासाठी जमलेल्या लोकाना हाकून दिलें आणि नोकराचाकरापैकीं एकासहि जवळ न ठेविता सर्वांस जाण्यास सागितलें मग मजीभाईला काहींएक न विचारता रावसाहेबाला व मजीभाईच्या पत्नीला सगळी हकीगत विचारली पिरोजेकडून तिला जी कळली होती ती तिनें त्या गृहस्थास सागितली व ती रावसाहेबानी सागितलेल्या हकीगतीशीहि जुळली पण ती खरी आहे की नाही हें पहाण्यासाठीं त्या गृहस्थाने पिरोजेच्या दोघा वडखोर भावास बोलावून विचारलें. तेंव्हा त्यानीहि रावसाहेबाना नाल्यात पाडल्याचें, आपलें बोलणें पिरोजेने आडून ऐकल्यामुळे आपण तिच्या मागें धावत फिरल्याचे, लपण्यासाठी चुकून रावसाहेबाच्या खोलीत जाऊन आतून तिने कडी लावल्याचे व तिची फजीती करण्यासाठी आपणच स्वतः बाहेरून कडी लावून पळून गेल्याचे कबूल केलें इतकें सारें जमल्यावर मजीभाई आले, तेंव्हा पिरोजा शरमेने न ओरडता पलगाखालीं लपून बसली वगैरे पुढची सारी हकीगत जुळून रावसाहेब व पिरोजा हे दोघेंहि निर्दोषी आहेत याविषयीं त्याना व मजीभाईच्या पत्नीला यत्किंचितहि शका उरली नाहीं. पण मजीभाईची खात्री कशी करावी, हा एक मोठा प्रश्न होता त्याच्या डोक्यानें एखादा ग्रह करून घेतला ह्मणजे प्रत्यक्ष ब्रह्मदेव खालीं उतरला तरी त्याच्यानें त्याची समजूत घालवत नसे. तथापि आपण प्रयत्न करून पाहूं ह्मणून मजीभाई बसले होते त्याचेजवळ व्याही गेले आणि ह्मणाले "भाईसाहेब! आपण बेफिकीर रहा;

मी सगळी हकीगत ऐकून घेतली आहे. तिच्यावरुन रावसाहेबाकडे काहीं दोष येत नाहीं—"

पुढे ते काहीं बोलणार होते, पण मजीभाईनी त्याना बोलू दिलें नाहीं ते संतापून ह्मणाले "रावसाहेब! या हरामखोर, नीच, पाजी माणसाला 'रावसाहेब' ह्मणावयाचे? यालातर खेटरें मारून गाढवावर बसवून गावभर धिंड काढावयाची, इतकी याची योग्यता आहे प्रत्यक्ष माझ्या तरुण पोरीला आपल्या खोलीत कोंडून ठेविली आणि आपलें काळें कृत्य उघडकीला येऊ नये ह्मणून तिला पलंगाखालीं लपविलें, तरी तो निर्दोषी आहे असें तुमचे ह्मणणे अ? वा! काय न्याय जगात आहे? तो कलेक्टरसाहेबाचा शिरस्तेदार नाहीं, प्रत्यक्ष गवर्नर असला ह्मणून काय झालें? माझ्या घरात आनंदोत्सवाच्या दिवशीं दिवसाढवळ्या असा दगा करणार हा कोण? आणि त्याला आपण निर्दोषी ह्मणता, तेव्हा स्त्रियाच्या अब्रूची तुह्माला काहींच किंमत समजत नाहीं असेंच ह्मटलें पाहिजे आपण अशा माणसाचें वकीलपत्र घ्याल असें नव्हतें मला स्वप्नीं वाटलें!"

एका शब्दावर मजीभाईने एवढे चऱ्हाट वळवून त्या चऱ्हाटाचे दोन तडाखे त्या आपल्या भावी व्याह्यालाहि देण्यास कमी केलें नाहीं, हे पाहून व्याहीहि बिचारे चकित झाले, आणि पुन्हा बोलण्याचा प्रयत्न करू लागले परंतु मजीभाई त्याला बोलूच देईनात रावसाहेब किंवा पिरोजा याचे नाव काढलें की मजीभाईच्या पायाची तिडीक मस्तकाला जाई असें झालें तेव्हा आता ही बोलण्याची वेळ नव्हे असें पाहून त्या गृहस्थाने मजीभाईचा हात धरून त्याला त्याच्या निजण्याचे खोलीत नेलें आणि डोकें गरम झालें होते ते शात करण्यासाठी त्यावर कोलनवाटरची पट्टी ठेविली

## प्रकरण २० वें.

## भुताची गोष्ट.

मागच्या प्रकरणात सांगितल्याप्रमाणें रावसाहेबांवर भलतीच तोहोमत येऊन त्याची बेअब्रू झाल्यावर मग त्याना तेथें रहाणें बिलकूल आवडलें नाहीं त्यानी मजीभाईला न विचारतां आपला गाशा गुडाळला, आणि एक भाड्याची गाडी करून आपल्या गावचा रस्ता धरला वाटेतच त्याना भीमभाई आणि पूनमचद वकील भेटले त्यानीं रावसाहेबांचें तोंड उतरलेलें पाहून तसें होण्याचें कारण काय ह्मणून विचारलें. रावसाहेबानीं आपल्यावर कशी भलतीच तोहोमत आली व आपणास तोंड काळें करून मजीभाईच्या घरातून निघणें कसें भाग पडलें ते सागून शेवटीं ह्मटलें "छेः बुवा, या पाचचार दिवसांट आपण फार हएवान जालो."

हें ऐकून भीमभाईच्यानें रहावेना. तो ह्मणाला "तुह्मीतर माणसासारखे माणूस दिसता मग हैवान झालों ह्मणून कसें ह्मणता ?"

रावसाहेबांच्या मनात 'हैराण' ह्मणावयाचें होतें; पण त्याच्या बोबड्या भाषेंत हैराणाचें विकृत स्वरूप 'हएवान' झालें हें भीमभाईच्या लक्ष्यात आलें नाहीं असें नाहीं पण मुद्दाम थट्टा करण्याची त्याची खोड गेली नव्हती रावसाहेबानी त्या थट्टेकडे लक्ष्य न देता मजीभाईच्या घरची सगळी हकीगत सांगितली आणि मजी-भाईच्या व्याह्याचे लोकही शेजारच्या गावात एका मुक्कामावर धर्मशाळेंत उतरले आहेत व त्याच्यासाठीं रसदेचें सामान घेऊन मजीभाईच्या घरून बाळू व आणखी एकजण जाण्यास निघाले आहेत, वगैरे सागून आणि अवांतर गोष्टी बोलून रावसाहेबानीं त्या दोघाचा निरोप घेतला. पुनमचद वकील व भीमभाई या दोघानीं रावसाहेबा-विषयीं आपली पूर्ण सहानुभूति दाखवून व थट्टामस्करीच्या प्रकारात झालेल्या गोष्टी विसरून पूर्ण लोभ ठेवण्याविषयीं विनति करून रावसाहेबाना निरोप दिला व निरोप देतांना चार पावलें पोंचविण्यासुद्धा ते गेले मजीभाईच्या येथें झालेल्या एकदर प्रकाराशीं याची सभ्यता, मनमिळाऊपणा, आणि अगत्य वगैरे गुण मिळवून पाहिले तर त्याच्यापेक्षा हे धनजीशहाचे मित्र शतपटींनें चागले, असा रावसाहेबाचा ग्रह झाला.

इकडे मजीभाईच्या घरून रसद घेऊन जाणाऱ्या गाडीबरोबर बाळू व त्याचा एक सोबती पिलू हा आहे हें ऐकल्यापासून भीमभाईला त्याची हुरेवडी करण्याची प्रबळ इच्छा झाली. त्या इच्छेप्रमाणें करण्यास प्रस्तुतची वेळहि अनुकूल

अशी होती आज घडघडीत अमावास्या असल्या कारणाने लवकरच काळोख पडल्यावर वाळू व पिलू याची खूप मौज करता येईल असा विचार करून भीमभाई पुनमचद वकिलास सोडून देऊन आपल्याचसारख्या एका थटेखोर व वाडगी अशा मित्राला घेऊन आला व त्या गाडीच्या रस्त्यावरच पण गावापासून दूर एक नदी होती त्या नदीपाशी रस्त्याचे दोन्ही वाजूस दोन मोठालीं झाडें होती त्या झाडाच्या मागें ते दोघे लपून वसले

इकडे वाळू व पिलू हे दोघे सामानाची गाडी घेऊन रस्त्यानें वोलतचालत, गाणीं गात, हसतखेळत मौजेने येत होते येतायेता नदीपासून काहीं अतरावर एक गर्द झाडी होती तेथपर्यंत आल्यावर पिलूला एकाएकीं त्या झाडीत मागें घडलेल्या दोन खुनाची आठवण झाली, आणि तो ती गोष्ट तिखटमीठ लावून वाळूला सागू लागला तो ह्मणाला "एके अमावास्येला पहिल्याच रात्री सरासरी आठनऊ वाजण्याच्या सुमारास एक गाडी या रस्त्याने जाताजाता या गर्द झाडीत शिरल्यावरोवर—"

पिलू इतके वोलून पुढे काहीं भयकर प्रसगाविषयी सागणार, तर वाळू इकडे भीतीनें थरथर कापू लागला, आणि गोष्टीचा ओघ फिरविण्यासाठीं ह्मणाला "या रस्त्यानें गाड्या पुष्कळ जातात त्याच्याशी आपल्याला काय करायचें आहे? पण तुला मजीभाईच्या इथें नोकरीला राहून किती दिवस झाले?"

पिलूला ती गोष्ट सागण्याची फार उत्कठा लागली होती ह्मणून तो ह्मणाला "तें मग सागेन ती गाडी या झाडीत शिरल्यावर—"

पुन वाळूनें वोलण्याचा ओघ फिरविण्यासाठीं विचारलें "मजीभाईसारखा कजूप माणूस आपण नव्हता वुवा कधी पाहिला—"

"मला गोष्ट सागू दे एकदाची आणि मग तू दुसरें हवे तें विचार! गोष्ट सागता सागता मध्येंच गडवड का करतोस?" असें ह्मणून पिलूने ती गोष्ट सागण्यास पुन सुरुवात केली

वाळूला वाटलें कीं, आता ही भुताची गोष्ट सागितल्यावाचून पिलू रहात नाहीं तेव्हा त्याने झोंपेची वतावणी केली पण पिलू काहीं कमी हट्टी नव्हता! तो वाळूला चापट्या मारून निजू नकोस ह्मणून एकीकडे सागत होता, आणि आपली गोष्ट पुढें चालवित होता त्या गोष्टीचे तात्पर्य असें होतें कीं, एक मनुष्य या रस्त्यानें जात असता या झाडीपर्यंत सुरक्षित आला पुढे एक सुदर परी त्याच्या नजरेस पडली तेव्हा तो मोहित होऊन तिच्या मागोमाग जाऊ लागला इतक्यात त्याच्या

चोहों बाजूंनं भिंती उभारल्या जाऊन तो मध्ये अडकला आता पळण्यास वाट राहिली नाहीं असें पाहून भिंतीवरून उडी मारून जावें ह्मणून तो भिंतीवर चढला पण भिंतीवर पाय ठेवताच ती भिंत एकदम ढासळली आणि एक खुलें मैदान दिसूं लागलें. हा प्रकार पाहून तो घाबरला आणि पळून जाऊं लागला पण इतक्यात एक मोठा जंगी—ताडाइतका उंच—पुरुष त्याच्या रस्त्यात आड येऊन उभा राहिला आणि त्याचा हात धरून त्याला फरफरा ओढित दुसरीचकडे नेऊं लागला पुढे मेघगर्जनेसारख्या गंभीर घोगऱ्या आवाजानें तें भूत ह्मणालें कीं 'मी वीरभद्र नावाचा पिशाचगणांपैकीं एक आहें. माझी भूक कांहीं फार नाहीं मला रोजचा एक बळी मिळाला ह्मणजे पुरे होतो मी माणसाचें पोट फाडून फक्त काळीज खातों व पुनः पोट शिवून देऊन त्याला घरीं जाऊं देतों घरीं गेल्यावर आपल्या बायकापोरांना भेटल्यावर मग तो मनुष्य अर्थातच मरतो ' असें ह्मणून तो वीरभद्र त्या माणसाला एका खजुरीच्या झाडापाशीं घेऊन गेला त्या झाडांत तो रहात असे. त्या झाडापाशीं जाताच त्या पिशाचानें कांहीं चमत्कारिक आवाज केला त्या बरोबर तें झाड दुभगलें आणि वीरभद्र त्या माणसाला बाहेर उभा करून सुरी आणण्यासाठीं ह्मणून आंत गेला इतक्यात त्या माणसाला एक युक्ति सुचली त्यानें चटकन् खिशांतून एक लिंबू व चाकू काढून त्याचे चार तुकडे केले व चारी तुकडे चारी दिशांना टाकून पुढील मंत्र ह्मटला—'छू, वीरभदर मंतरजंतर! सूरजका उजाला! तेरा मूं काला! पिशाचनाथ! मेरा हाथ! काली कनात! जबबंद! बिल्लीकी मूछ! कुत्तेकी पूछ! हातमें तेरे कदा न आवे छू छू छू!' हा मंत्र ह्मणून चिमूटभर माती त्या झाडावर फेंकताच तें झाड एकदम बंद झालें व वीरभद्र आंत कोंडला गेला हें पाहून त्या माणसानें पलायन केलें. त्या माणसाच्या प्रत्यक्ष तोंडून मीं ही हकीगत ऐकली आहे, तेव्हां ती खोटी असण्याचा संभवच नाहीं"

ही गोष्ट ऐकत असतांना बाळूनें झोंपेचें मिष केलें होतें खरें, पण वास्तविक तो सगळी गोष्ट चांगली कान देऊन ऐकत होता. गोष्ट ऐकतांना त्याची छाती धडधड उडत होती, परंतु गोष्टीच्या शेवटींशेवटीं वीरभद्राला झाडांतच अडकावून टाकल्याचें त्यानें ऐकिलें तेव्हांपासून त्याच्या जिवांत जीव आला आणि तो ह्मणाला "तूं सांगतोस ही गोष्ट खरी घडलेली आहे?"

"खरी ह्मणून काय विचारतोस? प्रत्यक्ष त्या माणसानें मला सांगितली तेव्हां ती खरी आहे याविषयीं आतां शंका काय उरली?"

"तर मग बरें झालें तो वीरभद्र एकदाचा झाडात अडकला नाहींतर आज आपल्याला गाठता"

"गाठता यात काय संशय? रोज एक माणसाचा बळी घ्यावयाचा असा त्याचा नेमच असे फार भूक लागली असली तर दोनसुद्धा घेत असे"

"पण आता तो बाहेर निघण्याचीतर भीति राहिली नाहींना?"

"त्याचा काय नेम? बोलूनचालून भूतच तें! लिंबाचा वास आणि मन्त्राचा जोर होता तोंपर्यंत त्याला बाहेर पडता आलें नसेल पण अजून लिंबाचा वास थोडाच राहिला असेल"

इतक्या गोष्टी होतात तों पलीकडे तें खजुरीचें झाड दिसू लागलें पिलूनं तें दाखविलें त्याबरोबर बाळूच्या उरात पुन धडकी भरली आणि आता आपणास भुताने घेरलें तर कसें करावे ह्मणून तो पिलूला कापऱ्या आवाजानें विचारू लागला.

पिलू बाळूपेक्षा पुष्कळच धीट होता तो ह्मणाला "पहिल्या रात्रीं सहसा तो येणार नाहीं आलाच तर आपले जवळ तूप साखर वगैरे पुष्कळ खाण्याचे पदार्थ आहेत ते आपण त्याला खायला देऊ आणि आपले जीव वाचवू तू असा का घाबरतोस?"

"पण तोतर माणसाचें काळीज खातो ह्मणून तू मघाशी सांगितलेंस? त्याला तूपसाखर थोडीच गोड लागणार आहे?"

"भुतानें आपल्या दोघानां खाल्लें तर खाल्लें मजीभाईसारखें भूत रोज आपले हालहाल करतें त्यापेक्षा या भुताने एकदम चट केलें तर या नोकरीच्या त्रासातून तरी सुटू! हें भूत फक्त काळीज काढून पोट पुन शिवूनतरी देईल. पण मजीभाई रोज आपलीं हाडेंसुद्धा झिजवित असतो त्याच्या तडाख्याखालीं सहा महिन्यात आपलें मासतर काय, पण हाडेंदेखील रहाणार नाहींत"

बाळूला या बोलण्याने काहीं विशेषसा धीर आला नाहीं तो भीतीने थरथर कापतच होता ही त्याची अवस्था पाहून पिलू त्याला धीर देण्यासाठीं ह्मणाला "गड्या! तू असा भिऊ नकोस वीरभद्र आलाच तर आपले जवळ लिंबू आहेच झटदिशी कापून त्याचे चार तुकडे चारी दिशाना टाकून देऊ ह्मणजे झालें मग त्याचे बळ आपल्यापुढे काय चालणार आहे?"

लिंबू व चाकू पिलूजवळ आहे व त्याला मन्त्रहि येतो आहे हे ऐकून बाळूचा जीव अमळ स्वस्थ झाला पण ही स्वस्थता फार वेळ टिकली नाहीं हे पुढील प्रकरणावरून कळून येईलच.

Reg No B 165.

सुबोध, मनोरंजक, ज्ञानप्रद आणि हितकर अशीं

स्त्रियोपयोगी पुस्तकें.

| | किंमत | पोस्टेज |
|---|---|---|
| १ महिला पूर्वार्ध. | १–४–० | ०–२–० |
| १ महिला उत्तरार्ध | १–४–० | ०–२–० |
| १ स्त्रियांचीं कर्तव्यें (कापडी बाधणी) | १–०–० | ०–१–६ |
| १ गुणसुंदरी † | ०–१२–० | ०–१–६ |
| १ नवयुग † | ०–१२–० | ०–१–६ |
| १ भारतातील सोप्या गोष्टी | ०–१०–० | ०–१–० |
| १ सरस्वती † | ०–८–० | ०–१–० |
| १ धाकट्या सूनबाई (काप. बाधणी) | ०–१२–० | ०–१–० |
| १ ससारांतल्या गोष्टी | ०–६–० | ०–१–० |
| १ द्रोणसंकोप | ०–६–० | ०–१–० |
| १ बालभारत | ०–५–० | ०–१–० |
| १ रमा माधव | ०–४–० | ०–०–६ |
| १ मुरारराव | ०–४–० | ०–०–६ |
| १ बालरामायण | ०–३–० | ०–०–६ |
| १ हसदूत | ०–२–० | ०–०–६ |
| १ मोहन–तारा | ०–२–० | ०–०–६ |

हीं व दुसरीं सर्व प्रकारचीं पुस्तकें खालील पत्त्यावर मागवावीं –

मनोरंजक ग्रंथप्रसारक मडळी, गिरगांव-मुबई.

† कापडी बाधणीचें पुस्तक हवें असल्यास ४ आणे जास्त पडतील

Printed at the 'NIRNAYA SAGAR PRESS' & Published by K. R. Mitra at Girgaon, BOMBAY, for the 'Manoranjak Granth Prasarak Mandali'

नम्र झाला भूतां । तेणें कोंडिलें अनंता ॥ —तुकाराम.




Vol. IX No 104

वार्षिक वर्गणी:—मुंबईंत २-४-०. बाहेरगावीं २-८-०.

दर अंकास ☞ ह. सह ०-४-६.

प्रीतीचिया बोला नाहीं पैल पाड ।
भल्लतें गोड करूनी नेई । —तुकाराम.

# मनोरंजन.



## ॐ ब्रह्म.

येतां मेघ नभांत वासरमणी तो झांकला जातसे,
होतें गोचर नीर तें न नयनां येतां वरी शैवल,
सेवी दर्पण बिंब तें न हृदयीं होतां मळें व्याप्त तो,
दृष्टीनें न दिसे जरी पडळ तें ये लोचनाच्यावरी,

जाई झांकुनि अग्नि उज्ज्वल अती धूमें जरी वेष्टिला,
रत्नाचें पडते न तेज जरि तें वस्त्रांत बांधीयलें,
उल्बें वेष्टित राहतो निशिदिनीं गर्भाशयीं गर्भ तो,
जाती झांकुनि सर्व अस्थि तनुच्या जैशा त्वचेच्यामुळें,

गेलें झांकुनि त्यापरी जगति या तें ब्रह्म मायेमुळें,
व्हावें ब्रह्म मना! तुला, तरि असे हा मार्ग तूतें खुला;
मायाबन्धन तोड हें, नच पुढें राहीं अतां त्यामधें,
जें जें या जगतीं तयांतिल तुझी आसक्ति घे काढुनी.

अभ्यासें तुज साध्य हें, वदति ते ज्ञानी पुराणान्तरीं
ब्रह्मप्राप्ति—नव्हे स्वयं—मग मना!—होशील ॐ ब्रह्म तूं!



१९

# राष्ट्रीय प्रार्थना.

हे दयामय जगच्चालक ! आह्मी अनन्यभावें तुला शरण आहो आमच्या राष्ट्रावर तू कृपा कर अज्ञानामुळे, अविवेकामुळे, आमच्या राष्ट्रांतील लोकांच्या बुद्धीला भ्रंश होऊन आह्मी स्वकर्तव्यपराङ्मुख झालो आहो खरें कोणतें, खोटें कोणतें, हित कशांत आहे, अहित कशात आहे, मित्र कोण, शत्रु कोण हें काहींच आह्माला कळेनासें झालें आहे आमच्या कल्याणाचा, आमच्या उन्नतीचा मार्ग सोडून देऊन आह्मी अकल्याणाच्या, व अवनतीच्या मार्गांत शिरलों आहो हे बुद्धिदात्या प्रभो ! ही आमची स्थिति बदलू दे, तुझ्या दृष्टीने जें सत्यज्ञान, तुझ्या दृष्टीने जो आमच्या कल्याणाचा, आमच्या उन्नतीचा मार्ग, त्याचा तुझ्याच कृपेने आमच्या राष्ट्रांत उत्कर्ष होऊं दे. त्या सत्यज्ञानावर, कल्याणाच्या—उन्नतीच्या मार्गावर आमच्या राष्ट्राची श्रद्धा बसू दे; आणि तुझ्याच कृपादृष्टीनें आमच्या राष्ट्राच्या डोळ्यावरील अविवेकाचें पटल दूर होऊन आह्माला स्वकर्तव्यज्ञानाची ओळख होऊ दे व आमचें राष्ट्र सुखी होऊ दे

हे कृपाळू परमात्मन् ! हजारो वर्षांच्या कुसंस्कारांनीं आणि मूर्खपणाच्या दुराग्रहानीं अगदीं उघड उघड दिसणाऱ्या गोष्टीहि आह्माला दिसेनाशा झाल्या आहेत डोळे शाबूद असता आह्माला दिसत नाहीं, कान यथास्थित असतां आह्मांला ऐकू येत नाहीं, समजत असून उमजत नाही, असा आह्मांला भयंकर बुद्धिभ्रंश झाला आहे स्त्रीवर्ग आणि पुरुषवर्ग हीं राष्ट्राची दोन अंगें होत अथवा संसार हा एक गाडा असून स्त्री आणि पुरुष हीं त्याचीं दोन चाकें आहेत शरीराचें एक अंग बधिर असेल, तर एकदर शरीर गोळ्याप्रमाणे निरुपयोगी होतें. त्याच्याकडून योग्य हालचाल होत नाही त्याचप्रमाणे गाड्याचें एक चाक मोडकें असलें, तर गाडा नीटपणे चालणें अशक्य होतें हा प्रत्येक मनुष्यमात्राचा नित्य व्यवहारातील अनुभव असून, आमचें राष्ट्र आपल्या स्त्रीवर्गरूपी एका अंगाविषयीं, अथवा संसारशकटाच्या एका चक्राविषयी अर्थात आमच्या राष्ट्रातील स्त्रियांविषयीं घ्यावी तेवढी काळजी घेत नाही ! आमच्या राष्ट्रातील स्त्रीवर्ग अज्ञानांधकारात घोरत पडल्यामुळे अर्थात् राष्ट्राचें एक अंग बधिर झालें असल्यामुळे आमचें राष्ट्र पंगू बनलें आहे. ही गोष्ट यापुढें तरी आमच्या चांगली हृदयांत बिंबेल असें कर. स्त्रीवर्ग आणि

पुरुषवर्ग हीं राष्ट्राचीं दोन अंगें आहेत—एवढेंच नव्हे तर या दोन अंगांत स्त्रीवर्गरूपी अंगच प्रधान आहे, हें आह्मांला कळूं दे. स्त्रिया ह्या मनुष्याच्या जननी होत. जननी सुशिक्षित, कर्तृत्ववान, देशभक्त असल्या ह्मणजे अर्थातच त्या आपल्या पुत्रांनां विद्वान, कर्तृत्ववान आणि देशभक्त करतीलच करतील. ज्या जननीच्या अंगीं देशकार्याचें वारें खेळत असेल, तिच्या संततीच्या अंगांतील रोमरध्रांमधून तें जोरानें उसळल्यावांचून रहाणार नाहीं संपूर्ण महाराष्ट्रीयांचे मुख उज्वल करण्याचें,—'मराठा' हा शब्द ऐकतांच मोठमोठ्या मी मी ह्मणविणारांचा हृत्कंप करण्याचें,—मराठ्यांच्या अंगच्या अतुल शौर्याची, पराक्रमाची, मुत्सद्दीपणाची दिगत ख्याती करण्याचें श्रेय पुण्यश्लोक श्रीशिवाजी राजानें संपादिलें परंतु शिवाजीराजाच्या अंगीं एवढी पात्रता येण्यास वीरमाता जिजाबाई हीच कारण झाली, ही गोष्ट आमच्या राष्ट्रांतील लोकांच्या अंतःकरणांत वज्रलेपासारखी ठसूं दे. राष्ट्राचा उत्कर्ष होण्यास राष्ट्रांतील माताच तशा योग्यतेच्या असल्या पाहिजेत, हें आमच्या राष्ट्रांतील लोकांच्या हृदयांत बाणूं दे. जननी—माताच जर अप्रबुद्ध, अज्ञानी असतील तर त्यांची संतती प्रबुद्ध, कर्तृत्ववान कशी निपजेल! जलसंचयामध्येंच जर घाण असेल तर नळ कितीहि शुद्ध ठेविले तरी त्यांतील पाणी निर्मल कसें होईल! परंतु जलसंचयाचे ठिकाणींच पाणी शुद्ध ठेवण्याचा प्रयत्न केला, तेथेंच गाळ, घाण काढून टाकिली ह्मणजे पुढें नळांविषयीं वगैरे विशेष काळजी वाळगण्याचें प्रयोजन नाहीं तद्वतच राष्ट्रांतील जननीच्या ठिकाणीं सत्यज्ञान, देशभक्ति, कर्तव्यादिकांची जागृति केली ह्मणजे आपोआप संपूर्ण राष्ट्रांत सत्यज्ञानाचा प्रसार होईल व अल्पकालांतच राष्ट्र उन्नतीला पोहोंचेल ही उघड उघड असलेली गोष्ट आमच्या राष्ट्रांतील सध्याच्या पुढारी लोकांस कळूं दे, व आमच्या स्त्रीवर्गाला सुशिक्षित करण्याची आह्माला प्रबळ इच्छा होऊं दे. त्याचप्रमाणें जे कोणी वरील शुभ हेतूनें स्त्रीशिक्षणप्रसारार्थ प्रयत्न करित असतील त्यांचे प्रयत्न यशस्वी होऊंदेत देशभक्ति, देशकार्य, कर्तव्य इत्यादिकांचें बाळकडू आमच्या राष्ट्रांतील भावी माता आपल्या संततीस पाजूंदेत हे दयाळू तात! आह्मां बालकांवर कृपादृष्टि ठेवून आह्माला आमच्या कल्याणाचे प्रयत्न करण्यास बुद्धि दे. आमच्या मतीचा भ्रश दूर कर. अंधारांत चांचपडणाऱ्या आह्मांस ज्ञानदीप दाखीव, मार्गावर—शुद्धीवर आण!



## विविध वृत्त.

पुरुषाचें वजन सरासरी १४० रत्तल भरतें व स्त्रीचे ११५ रत्तल भरतें

---

फ्रान्सदेशात रेल्वेमध्यें २४००० वर स्त्रिया नोकरीवर आहेत.

---

वयात आलेला हत्ती ३ टन अथवा १२ खंडींचा बोजा वाहून नेतो.

---

मनुष्याच्या शरीरातील सर्व रक्त त्याच्या हृदयातून दर दोन मिनिटानीं फिरते

---

एक रत्तल वजनाचा बुचाचा तुकडा एका मनुष्याला पाण्यामध्ये तरण्यास पुरेसा होतो

---

जपानातील लोकाचे पायातील जोडे बहुधा गवताचे अगर लाकडाचे असतात. साऱ्या जपानात चामड्याच्या जोड्याचा कारखाना फक्त एकच आहे

---

सोन्याची तार इतकी बारीक काढता येते की, एक मैल लाबीच्या तारेचें वजन फक्त पाऊण गुंज भरतें

---

युरोपात नुक्तेंच एक लग्न झालें वधूच्या करवलीचे काम खुद्द तिच्या नातीनेच साजरें केलें!

---

एक मनुष्य दरमिनिटाला सुमारें १८ पाइंट अर्थात् दररोज ६ हाग्ज्हेड हवा श्वासरूपानें पोटात घेतो

---

इटालींत बहुधा रविवारचा दिवसच लग्नासाठी शुभदिन समजला जातो परतु पुनर्विवाहाला मात्र शनिवार हा शुभदिन समजतात

---

इ स १७१५ मध्ये जपानात ३,९३,०८७ बुद्धमंदिरें होतीं परतु इ स. १९०० सालीं ही सख्या फक्त ७१,९४७ भरली!

---

इ स. १८७१ सालीं जर्मनींत एक लक्षाहून जास्त वस्तीची फक्त ८ शहरें होती. साम्प्रत ३२ हून जास्त आहेत.

---

जगातील सर्व संपत्ति एकत्र करून ती सारख्या प्रमाणानें विभागली तर प्रत्येक मनुष्याच्या वाट्यास ९० रुपये प्रमाणें येईल.

---

आफ्रिकेंत बायका फारच स्वस्त किमतींत मिळतात डोक्यात खोवण्याच्या टाचण्या ( Hairpins ) चीं दोन ( Packets ) पुडकी घेऊन कधी कधी आपल्या बायका दुसऱ्यांना विकणारे दानशूर पतिराज तिकडे आढळतात !

---

वनस्पत्याहाऱ्याच्या हृदयाचे धक्कारे दरमिनिटाला ५८ पडतात तेच मांसाहाऱ्याचे दरमिनिटाला ७५ पडतात. ह्मणजे एका अहोरात्रामध्यें वनस्पत्याहारी लोकापेक्षा मांसाहार करणारांचे हृदय सरासरी २४,००० वेळ जास्त उडत असते

---

रशियन फोटोग्राफर बुडव्या कुळाचे फोटो आपल्या स्टुडियोंच्या दरवाज्यावर उलटे टांगून ठेवतात इकडील फोटोग्राफरनी हवा असल्यास या युक्तीचा उपयोग करावा.

---

रशियन सैन्यामध्ये वातमी पोंचविण्याच्या कामी बहिरी ससाण्याची फलटण बनविली आहे वातमी पोहोंचविणाऱ्या खबुतरापेक्षा हे ससाणे सहापट जास्त वेगानें काम करतात, असा अनुभव आला आहे.

---

जगातील कोणत्याहि देशापेक्षा हिंदुस्थानात वनस्पतीच्या जास्त जाती आहेत ह्मणजे हिंदुस्थानात २५ हजारावर वनस्पतीच्या जाती असून सर्व युरोपखडात फक्त १० हजारच आहेत

---

जगांत आजपर्यंत जे राज्याभिषेक झाले, त्या सर्वांत रशियाचे साम्प्रतचे झाराचा राज्यारोहणसमारंभ अतिशयच भपक्याचा अर्थात अतिशयच खर्चाचा झाला या समारंभाप्रीत्यर्थ सरकारातून ४,५०,००,००० रुपये खर्च करण्यांत आले व प्रजेने १,५०,००,००० रुपये खर्च केले



# करमणूक.

एक दिमाखखोर लेखक —एडिटरसाहेब! हे कागद सभाळून ठेवा बरें कारण, या कवितेंत मीं माझें सगळें हृद्गत ओतलें आहे

एडिटर—त्याची तुह्माला आता काळजी नको! तें आता कुणाच्याहि नजरेस पडायचें नाहीं

---

विद्यार्थी आपल्या सोबत्यास ह्मणतो "त्रिंबकराव दाक्तर मला अगदीं आवडत नाहींत"

"कारे बुवा ?"

"अरे, शाळेची कटकट निदान आठ दिवस तरी चुकावी ह्मणून मी मुद्दाम आंबट चिंच खाऊन खोकला आणिला, आणि दाक्तरानीं औषध देऊन तो आपला दोन दिवसात घालविला! याला काय ह्मणावे ?"

---

शिक्षक हवा या विषयासंबंधाचा बडा मुलास समजावून देत असता विचारतात "असें काय आहे कीं जे दिसत नाहीं, पण जेथें किंचित फट ह्मणून असेल तेथें गेल्याशिवाय तें रहात नाहीं !"

"कायाचा वास"

---

मि० बडबडे व्याख्यान आटोपून घरीं आल्यानंतर आपल्या स्त्रीयाना ह्मणतात "छ बुवा, आज मनस्वी त्रास झाला डोकें कसें चढून गेलें आहे"

"तुमच्यापेक्षा आमचें दु ख अधिक पाहून समाधान मानून घ्या, झालें"

---

इन्स्पेक्टरसाहेब शाळेची परीक्षा घेण्यासाठीं आले, आणि मुलाना व्याकरण शिकत येत आहे हे पहाण्यासाठीं विचारू लागले "मी काय आहे ?"

मुलाना या प्रश्नाचा रोंख बरोबर कळेना एकजण ह्मणाला "मनुष्य !"

इन्स्पेक्टरसाहेबानीं पुन विचारिलें "मी व्याकरणात काय आहे ?"

त्यापैकीं एक चुणचुणीत पोर उठलें आणि ह्मणालें "काहीं नाहीं, सर !"

---

मुलगा एरंडेल पेईना, म्हणून त्याला समजाविण्यासाठीं रावसाहेब म्हणाले, "पहा, ग्लासात कसें गोड सरबत घातलें आहे तू चट्‌दिशीं घेऊन टाक, नाहींतर पहा हे डाक्तरसाहेब सगळें पिऊन टाकतील, आणि तुला ठेवणार नाहींत—"

"डाक्तरसाहेबाना फार श्रम झाले आहेत, बाबा! तेव्हा त्यानाच तें सगळें देऊन टाका मला नगलें तरी चालेल"

---

"बाळू, तुझ्या पायातला जोडा कशाचा केलेला आहे?"

"कातड्याचा, सर"

"कशाचें कातडें?"

"सांबराचें, सर"

"तर मग तुला कोणत्या प्राण्यानें जोडे घालायला दिले?"

"आमच्या काकांनीं."

---

एक मुलगा आंब्याच्या झाडाखालीं हातात आंबा घेऊन उभा आहे असे पाहून आंब्याची राखण करणारा माळी त्याच्या अंगावर धावून जाऊन म्हणतो "अरे गुलामा, चांगला सांपडलास! झाडावर दगड मारुन आंबा पाडित होतास नाहीं काय?"

"दगड मारित नव्हतों काहीं—"

"मग काय करित होतास तर?"

"मी आपला झाडाखालीं उभा होतों इतक्यात एक आंबा वरून आयता माझ्या हातात पडला मीं म्हटलें, आपल्याला दुसऱ्याचा आंबा घेऊन काय करायचें आहे? म्हणून हा आंबा परत त्या डहाळीवर फेंकणार होतों तुम्हाला काय वाटलें मी दगड फेंकित होतों म्हणून?"

---

मोकाजीरावाना हार्मोनियम वाजविता येत नसे, तरी आपलें त्यानीं ऐटीनें खुर्चीवर बसून रोज रात्री घटकाभर कसेतरी सूर काढित बसावें यामुळें शेजारच्या बाळूअण्णाना फार त्रास होई एके दिवशीं मोकाजीराव आपल्या चारपाच वर्षांच्या लहान मुलाला घेऊन हवा खाण्यासाठीं बाहेर निघाले असता बाळूअण्णा त्याना म्हणतात "मुलगा हुपार दिसतो, पण बेटा मोठा हट्टी दिसतो रोज रात्रीं लोकाची झोंपमोड केल्याशिवाय रहात नाहीं"

दुसरे दिवसापासून शेजाऱ्याच्या कपाळची कटकट चुकली हें सांगावयास नकोच!

# उपयुक्त ज्ञान.

जेवण झाल्यावर मुखशुद्धीसाठीं ताजीं फळें खावी, असें आपल्या वैद्यशास्त्राचें मत आहे आणि ते अगदी खरें आहे आपले फळफळावळीचे, बगीचे ह्मणजे डाक्टराच्या औषधाच्या कारखान्याहून अधिक मोलवान् आणि आरोग्यरक्षणास आवश्यक आहेत, असे ह्मटलें असता चालेल ज्याला काळजाचा रोग असेल त्याला सफरचंद ह्मणजे अगदी रामबाण औषधच असतें मगजशुद्धीचे कामीं त्याची योग्यता फार श्रेष्ठ प्रतीची आहे डाळिंब आणि लिंबू हीं रक्तशुद्धीला फार आवश्यक आहेत नारिंगेंहि या कामाला चागलीं. शिवाय त्याच्या सेवनानें कोठा साफ रहातो पिकलेलीं केळी मेंदूस फार गुणकारी असतात इंग्लडात टायफाईड तापाचे कित्येक रोगी केळ्याच्या सेवनानें दरसाल बरे झालेले आढळतात अंजीर पुष्टिकारक आहे, याविषयीं अनुभवानें कोणालाहि खात्री करून घेता येईल अंजिराच्या बारीक बारीक बिया खाल्ल्या असता बद्धकोष्ठ दूर होऊन चागले जुलाब होतात परंतु या सगळ्या फळात उत्तम फळ ह्मटलें ह्मणजे अक्रोड हें होय मनुष्याच्या शरीरस्वास्थ्याला अवश्य लागणारीं जेवढी तत्त्वें आहेत तेवढी सगळी या फळात सापडतात आणि त्यामुळेंच हीं फळें फार लवकर पचतात त्याच्यात चरबी उत्पन्न करणारे द्रव्य जितक्या मोठ्या प्रमाणात सापडतें तितक्या मोठ्या प्रमाणात दुसऱ्या कोणत्याहि फळात तें सापडत नाहीं

---

## सुगंधि फुलांतून अत्तर काढण्याच्या रीती.

विलायतेंत सुगधि फुलातून अत्तर अथवा फळातून तेल वगैरे काढण्याच्या निरनिराळ्या चारपाच रीती आहेत एक दाब घालून काढण्याची नारिंगे, लिंबू वगैरे ज्या फळाचें तेल काढावयाचें असेल त्याच्या साली एका प्रेसात घालून त्यावर खूब दाब घातल्यानें तेल निघतें दुसरी—फुलाना वाफेचें रूप देऊन मागाहून त्याना प्रवाही रूप देणें यासाठी प्रथम फुलें पाण्यांत घालून उकळतात, ह्मणजे त्यातला तेलाचा अंश वाफेच्या रूपानें जाऊ लागतो ही वाफ काचेच्या नळीत धरून ती दुसरीकडे थंड पाण्यात नेऊन सोडतात अशानें ती वाफ थंड होऊन प्रवाही तेलाच्या रूपानें ती पाण्यावर तरगू लागते गुलाब, जरमेनियम, लवेंडर वगैरे तेलें अशाच रीतीनें काढतात तिसरी रीति—वरच्याप्रमाणें तेल वरल्यावर तें उडून जाऊ नये ह्मणून चरबीशीं किंवा दुसऱ्या एखाद्या तेलाशी त्याचे मिश्रण

करणें ज्या चरबीत किंवा तेलांत हे मिसळावयाचें असतें, ती चरबी अथवा तेल साधारण अर्धा पाऊण तासपावेतों मदाग्नीवर ठेवावें लागते स्पिरिट ह्मणजे दारूच्या अर्क यांतहि वरीलप्रमाणे तेल मिसळतां येते सुधारलेल्या देशांत रसायनशास्त्रज्ञानी सुगंधि फुलापासून अथवा फळांपासून तेल काढण्याची आणखी एक नवीन तऱ्हा काढली आहे. सल्फ्युरेट अथवा कार्बन, क्लोरोफार्म, नाफ्था, ईथर, अथवा क्लोराइड वगैरे उडून जाणाऱ्या द्रव्यावरोबर सुगंधि वस्तू घालून निर्वात केलेल्या कांचेच्या भाड्यात ठेवतात, आणि मग हळूहळू त्याला आंच देतात अशाने सुगंधि तेल थोडक्या खर्चात पुष्कळ निघते असे सांगतात

---

## आजाऱ्यांच्या भेटीस जाणारांनां सूचना.

१ रोग्याला त्रास होणार नाहीं व तुमच्या आगमनाचा कांहीं तरी फायदाच होईल अशी पक्की खात्री असेल तरच त्याच्या खोलीत जा. नसल्यास दरवाजांतूनच रोग्याचा कुशलसमाचार घेऊन मागें फिरा.

२. खोलींत जाणेंच असेल तर तेथे फार वेळ रेंगाळत राहू नका, लवकर आणि गुपचूप रीतीने परत फिरा

३. खोलींत प्रफुल्लमुद्रेने जा. प्रिय आणि उत्साहजनक भाषण करा.

४. परंतु तसें भाषण करताना खोटे मात्र बोलू नका

५ तुमच्या मित्राचें दुखणें कठीण असेल तर बळेच आनंदी मुद्रा करताना आणि उत्साहजनक भाषण करताना आपल्या मुद्रेवर उदासीनतेची व गंभीरतेची झांक येऊ देऊ नका त्याचप्रमाणें असंबद्ध भाषणहि टाळण्याचा प्रयत्न करा.

६ आजाऱ्याला बोलावे लागेल अशा प्रकारचे प्रश्न मुळीच करू नका.

७ बोलताना दुसऱ्याच कसल्यातरी गोष्टी बोला. आजाऱ्याच्या दुखण्याविषयी फारच थोडे बोला तो विषयच मुळीं टाळला तर फार उत्तम.

८. आजाऱ्याच्या भेटीस जाताना त्याला प्रिय, हितकर आणि पथ्यकर होणारी अशी एखादी वस्तु बरोबर न्या

---

निखाऱ्यावर भाजलेले बटाटे शिजविलेल्या बटाट्यापेक्षा जास्त पौष्टिक असून पचनास हलके असतात तळलेले तर पचण्यास जड जातात असें एका नामांकित वैद्याचे मत आहे. हें बटाटे खाणारानी लक्षात वागवावें

---

# काळें पाणी ऊर्फ अंदमान बेट.

एखाद्यानें फार मोठा अपराध केला ह्मणजे त्याला काळ्या पाण्याची शिक्षा देत असतात काळें पाणी ह्मणजे काळ्या रंगाचें पाणी नव्हे, तर एखादी निर्जन, नापीक, वाईट हवेची, स्वदेशापासून दूर असलेली जागा होय अशा जागीं पाठ-विलेल्या कैद्याला मनस्वी त्रास होऊन जिवाचा कंटाळा येणें अगदीं स्वाभाविक असतें. ह्मणून मोठाले गुन्हे करणाराना अशा ठिकाणीं पाठविण्याची चाल पडली आहे.

आपल्या हिंदुस्थानातले काळ्या पाण्याचे कैदी अंदमान बेटात पाठवितात अंदमान यालाच प्राचीनकाळीं अंधद्वीप ह्मणत असावेत हें बेट ब्रह्मदेशापासून दक्षिणेस सुमारें ८५ कोसावर बंगालच्या उपसागरात आहे कलकत्त्याहून निघणारी बोट या बेटाला दहा दिवसात पोंहोंचते या बेटाची लांबी २५ कोसाहून अधिक नाहीं ह्या बेटात वृक्ष व लता याची समृद्धि आहे, परंतु मासे, कासवें, उंदीर, मुंगुसें, कुत्रीं यासारखे क्षुद्र प्राणी खेरीज करून मोठाले प्राणी अथवा सुंदर पक्षी मुळींच नाहींत ह्मटलें तरी चालेल या बेटात जिकडे पहावें तिकडे नारळच नारळ! पृथ्वीच्या पाठीवर नारळाची इतकी समृद्धि दुसऱ्या कोठेंहि नसेल

येथील लोक अगदीं ठेंगू, काळेकुट्ट, कुरूप, वाकड्या छातीचे, ढेरपोटे आहेत तिकडे वस्त्र पांघरणें हे स्त्रियाना व पुरुषाना दोघानाहि ठाऊक नाहीं कोणीकोणी झाडाच्या पानानी अथवा कोल्ह्याकुतऱ्याच्या चामड्यानी शरीराचा अपकृष्ट भाग आच्छादितात परंतु अशाची संख्या शंभरात एकापेक्षा अधिक नाहीं येथील स्त्रीजातीला लज्जा मुळींच नाहीं बायका तांबड्या मातीनें आपलें अंग रंगवितात व मृत मनुष्याच्या हाडाच्या माळा करून गळ्यात घालतात अंदमानी लोक कंदमुळें, मांस व मध यावर निर्वाह करितात मासे धरणें व समुद्रात डुबणें हे त्याचे दोन मोठे उद्योग होत आश्चर्याची गोष्ट ही की, हे लोक दिसण्यात अगदीं ठेंगू असून मोठे मजबूत व जबर आहाराचे असतात एकएकजण एका बैठकीला सात शेर मांस सहज चट्ट करितो! या लोकाच्या स्त्रिया ह्मणजे सगळ्या शूर्पणखाच होत!

अंदमानी लोकाचीं घरें फार मोठालीं असतात एकाएका घरात शंभरशंभर माणसें सहज रहातात हे लोक नेहमीं जमाव करून रहातात याच्यात पुनर्विवा-हाची चाल नाहीं पति मेला ह्मणजे त्याच्या डोक्याची कवटी काढून ती त्याची बायको अलंकार ह्मणून गळ्यात घालिते अशा रानटी लोकातसुद्धा स्त्रियाचे अंगीं

पतिभक्ति, ब्रह्मचर्य व सत्यवादीपणा सुशिक्षित समाजापेक्षांहि अधिक दिसावा, हें आश्चर्य म्हटलें पाहिजे

इ स. १७८९ सालीं इग्रज सरकारानें काळ्या पाण्याचे कैदी या बेटात पाठविले होते, परतु पुढें काय कारण असेल तें असो, ती चाल बद पडली इ स. १८५८ सालीं पुन्हा कित्येक कैदी येथें पाठविले व तेव्हापासून दरसाल कैदी इकडे पाठविण्याची चाल पडली आहे. इग्रजी राज्यातून येथें जे कैदी येतात ते पोर्ट ब्लेअर येथे रहातात. याच ठिकाणीं एका मुसलमान कैद्यानें माजी गव्हर्नर जनरल लॉर्ड मेयो याना ठार मारिलें होतें सध्या या ठिकाणीं सुमारें १३,८०० कैदी आहेत

इग्रजी कायद्याप्रमाणें सहा वर्षांहून कमी मुदतीचे कैदी या ठिकाणी पाठवित नाहींत जन्मठेपेच्या कैदेचे अथवा जन्मठेप काळ्या पाण्याचे कैदी या ठिकाणी पाठविण्यांत येतात जन्मठेप या शब्दाचा अर्थ वीस वर्षें इतकाच धरतात अर्थात् असे कैदी वीस वर्षांनतर काळ्या पाण्याहून परत स्वदेशीं येऊ शकतात कित्येकाना तिकडेच कांहींतरी रोजगार करून स्वतत्रपणें रहावेसें वाटते असे लोक तिकडे लग्न करून घरेंदारें बांधून व दुकानदारी करून आनदानें रहातात

अदमानाच्या दक्षिणेस निकोबार बेट आहे ह्याची लांबी १६ कोसाहून अधिक नाहीं येथील लोक समुद्रकिनाऱ्याला रहातात याची घरें लाकडाचीं असून हवा येण्यासाठीं खिडक्या, जाळ्या, किंवा गवाक्षें ते लोक मुळीच ठेवित नाहीत अदमानी लोकापेक्षा हे लोक किंचित् अधिक सभ्य व लज्जाशील आहेत याचे केंस फार लाब असतात. याच्यात मुलींची लग्नें १६ वर्षांचे आत करित नाहींत त्याच्यात स्वयवराची चाल आहे हे हिंदु लोकांप्रमाणें मृताचें श्राद्ध करितात, ज्योतिषशास्त्रावर विश्वास ठेवितात, भूत-प्रेत-पिशाचादिकाचें अस्तित्व मानितात व आत्मा अमर आहे असें समजतात याच्यात मृताचें सुतक धरण्याची चाल अगदी हुबेहूब हिंदूप्रमाणें आहे सुतकात तबाखू किंवा गोड पदार्थ खाण्याची व दारू पिण्याची मनाई आहे अदमान व निकोबार ह्या दोन्ही बेटात प्राचीन हिंदुमदिराचा भग्न पावलेला अवशिष्ट भाग अद्याप दिसतो यावरून एके काळी येथें हिंदूची वस्ती असावी असें वाटते



फ्रान्सात दरसाल सुमारें चार हजार द्वद्वयुद्धें होतात इटालींत सालाची सरासरी अडीच हजाराची आहे ही पाश्चात्य सुधारणा आहे! ईश्वर करो व या सुधारणेचें वारें हिंदुस्थानास न लागो!

---

# बुद्धघोष.

गौतमबुद्ध याने संस्थापलेल्या बौद्धधर्माचा सर्व जगभर प्रसार करण्यांत अनेकांचें साह्य झालें त्यांत बुद्धघोष हा अग्रगण्य होता हा मगध देशांत रहाणारा एक तरुण ब्राह्मणपुत्र होता हा सर्व विद्येंत व कलांत निष्णात् होता याला तीन वेदहि उत्तम येत होते एकदा याचा व रेवतनामक एका विद्वान् बौद्धभिक्षूचा वादविवाद होऊन भिक्षूनें त्याला हरविलें, तेव्हा त्यानें तत्काळ बौद्धधर्माचा स्वीकार केला! हा ब्राह्मणपुत्र दिसण्यांत सुंदर व तेजस्वी होता आणि त्याचा आवाज हुबेहूब गौतमबुद्धासारखा खणखणीत, मधुर आणि चित्ताकर्षक होता, म्हणून याचें नांव बुद्धघोष असें पडलें याच नावानें तो पुढें प्रसिद्धीस आला

बुद्धघोषानें बौद्धधर्म स्वीकारल्यानंतर 'ज्ञानोदय' नावाचा एक ग्रंथ लिहिला पुढें त्याच्या मनांतून 'त्रिपिटिका' या प्रसिद्ध बौद्धधर्मग्रंथावर विस्तृत टीका करावयाची होती इतक्यांत रेवतभिक्षूनें त्याला सांगितलें की, अशा प्रकारची टीका सिंहली भाषेंत झालेली आहे ती कशी काय आहे ती पहाण्यासाठीं तो सिंहलद्वीपांत गेला पूर्वीच्या काळीं प्रवासाचीं साधनें उपलब्ध नव्हतीं तरीहि लोक ज्ञानाच्या लालसेनें प्रेरित होऊन आपली जिज्ञासा तृप्त करण्यासाठीं अनेक संकटें सोसण्यास कसे तयार होत, त्याचें हें एक अपूर्व उदाहरण आहे! बुद्धघोषानें सिंहलद्वीपांत जाऊन ती टीका मिळविली, इतकेंच नाहीं तर दुसरेहि अनेक ग्रंथ आणिले व ते ब्रह्मीभाषेंत हातानें लिहून काढले ब्रह्मीलोक या गोष्टी-बद्दल बुद्धघोष याचे फार उपकार स्मरतात

'विशुद्धिमार्ग' नामक एक ग्रंथ बौद्धधर्मपर आहे त्याच्या रचनेसंबधानें पुढील चमत्कारिक दंतकथा महावंश नामक प्रसिद्ध ग्रंथांत आढळते, ती अशी –

बुद्धघोष सिंहलद्वीपांत गेला आणि 'त्रिपिटिका' ग्रंथावरची सिंहलीटीका पहाण्यास मागूं लागला तेव्हा तेथील मठवासी भिक्षु म्हणाले "ती टीका समजण्याइतकी विद्वत्ता तुझ्यांत आहे कीं नाहीं तें पहाण्यासाठीं प्रथम दोनच श्लोक देतों या श्लोकांनें पाली भाषेंत भाषांतर करून आण, आणि तें पसंत पडल्यास तुला पुढचें श्लोक देऊ."

बुद्धघोषानें या दोन श्लोकावर मूळ 'त्रिपिटिका' ग्रंथाच्या साह्यानें पाली भाषेंत टीका लिहिली, आणि ती त्या भिक्षूपुढें नेऊन वाचली इतक्यांत चमत्कार असा झाला कीं, कोणी अदृश्य देवतेनें त्याच्या हातातली ती टीका झडप घालून नेली

बुद्धघोषानें ती पुन. लिहून काढली. पुन. तशाच रीतीनें तीहि गेली तेव्हा पुन. लिहिली अशा रीतीनें त्रिवार ती साग्र टीका लिहून काढल्यावर देवतेने नेलेली टीका परत आणून दिली त्या पूर्वीच्या टीकेशीं ताडून पहाता ही शेवटी लिहिलेली टीका इतकी ततोतत जुळली कीं, कोठें कानामात्रासुद्धा कमजास्त झाला नाहीं ! हें पाहून भिक्षु विस्मित झाले या बुद्धघोषाच्या पाली टीकेला 'अर्थकथा' असें नाव आहे साहित्य, विज्ञान, दर्शन, इत्यादि शास्त्राचें मथन करून ही विद्वत्तापूर्ण व गहन टीका लिहिण्यांत आली आहे ह्मणून बौद्धलोक अजून तिला पूज्य मानतात.

सर्व प्राचीन पुरुषांप्रमाणें बुद्धघोषाचाहि काल निश्चित नाहीं. तथापि इ स. पाचव्या शतकाच्या प्रारभी तो झाला असावा असें दिसतें सिंहलद्वीपाचा राजा महानाम याचा तो समकालीन होता; आणि महानामाचा काल इ स. ४१०—४३२ हा आहे

बुद्धघोषाचें चरित्र महावश नामक ग्रथात आहे या महावश ग्रथाचा कर्ता त्याचा समकालीन होता महावशात बुद्धघोषाचें चरित्र ३७ अध्यायात वर्णिले आहे महावश हा विश्वसनीय ग्रथ असल्यामुळें बुद्धघोषाचें चरित्र याथातथ्य वर्णिलें आहे, असें ह्मणण्यास हरकत नाहीं

---

ब्राऊन् ( Broun ) नावाचा एक गृहस्थ १९ फूट लाब व ६ फूट रुंदीचा मचवा घेऊन बोस्टन ( Boston ) पासून मार्सेल्स ( Marseilles ) पर्यंत जाण्यास एकटा निघाला असता वाटेत तुफान होऊन मचवा उपडा पडला परंतु त्यानें मोठ्या शिताफीनें तो उताणा करून पुन्हा स्वारी वर चढली. वरील सकटामुळें अन्नपाण्याचा पुरवठा नाहींसा झाल्यावरून तो फार फिकिरींत पडला होता, परंतु इतक्यात कर्मधर्मसयोगानें एका आगबोटीची गाठ पडून त्याची अन्नपाण्याची अडचण दूर झाली सदर आगबोटीच्या कप्तानानें त्याला "झाला प्रवास तितका पुरे, आतां नेमल्या ठिकाणी जाण्याचा बेत रहित करावा," वगैरे खप सागितलें, परतु ब्राऊन्साहेब काहींकेल्या वळेना त्याने वरील आगबोटीवरून थोडकी अन्नपाण्याची सामुग्री, थोडकेसें दोरखड व काहीं पुस्तकें इतकें घेऊन तो आपल्या मचव्यात उतरला व कप्तान वगैरे मडळीस सलाम ठोकून जवळचा मार्ग क्रमण्यास सुरुवात केली पाण्याचा साठा नाहींसा झाल्यावर पावसाचें पाणी आपले ऑईलकोटात धरून तें पिऊन स्वारीनें जीव जगविला ' हें विलक्षण साहस कीं हट्ट !

---

# जपान आणि रशिया.

जपानची लोकसंख्या ४,७०,००,००० व रशियाची १४,४०,००,००० आहे.

---

जपान देशाचें क्षेत्रफळ १,६२,००० चौरस मैल आहे आणि रशियाचें ९०,००,००० चौरस मैल आहे

---

जपानाला ८२,८०,००,००० रुपयाचें आणि रशियाला १०,५०,००,००,००० रुपयाचें कर्ज आहे

---

जपानचें उत्पन्न ४३,२४,५०,००० रुपये असून खर्च ४३,२४,००,००० रुपये आहे

---

रशियाचें उत्पन्न ३,१२,००,००,००० रुपये असून खर्च ३,०९,००,००,००० रुपये आहे

---

जपानमध्ये बाहेर देशाहून ४१,६२,५०,००० रुपयांचा माल येतो व जपानातून ३९,३७,५०,००० रुपयाचा माल बाह्य देशी जातो.

---

रशियामध्यें बाहेर देशाहून ८४,९०,००,००० रुपयाचा माल येतो व रशियातून १,३१,२५,००,००० रुपयाचा माल बाह्य देशी जातो

---

जपानचें जमिनीवरील लष्कर ४,३०,००० आहे आणि रशियाचें जमिनीवरील लष्कर ३३,५०,००० आहे

---

जपानचें अर्मारावरील लष्कर ३९,५०० आहे आणि रशियाचें अर्मारावरील लष्कर ६५,८०० आहे

---

जपानच्या जमिनीवरील तोफा २,६०० असून समुद्रात अर्मारावर १२०० आहेत रशियाच्या जमिनीवर ३५०० व अर्मारावर २६२० तोफा आहेत

---

# हजारों वर्षांनीं झोंपेंतून जागा झालेला मनुष्य.

खालील फार चमत्कारिक हकीगत 'झखिरत उलखवानीन' नावाच्या एका फारसी ग्रंथावरून घेतली आहे. अकबर बादशाहाच्या पदरीं जे अमीरउमराव होते, त्यांत कुलिजखान नावाचा एक प्रसिद्ध अमीर होता हे इतिहासज्ञास ठाऊक आहेच. जानपुर हा गांव त्याचेकडे जहागीर होता. तेथें त्यानें आपल्या खतानाठीं एक वाडा बांधण्याचें काम सुरू केलें असता, पाया खोदता खोदतां खालीं जमिनींत एक पक्की बांधलेली इमारत लागली. ही इमारत कसली आहे हें पहाण्यासाठीं कुलीजखानानें मोठ्या काळजीपूर्वक मजूर लावून तिच्या वरची माती वगैरे काढविली, तेव्हां असें आढळून आलें कीं, ही मोठी इमारत असून तिला एकच दरवाजा होता व त्या दरवाज्याला एक मण वजनाचें जबरदस्त मजबूत कुलूप लाविलें होतें. कुलिजखानानें तें तोडून दार उघडिलें. तों चमत्कार असा झाला कीं, एक अतिशय म्हातारा मनुष्य बाहेर आला. त्याला पाहून सर्व मंडळी फार आश्चर्यचकित झाली. या मनुष्यानें कुलिजखान व त्याच्याबरोबर आलेल्या दुसऱ्या उमरावाना संस्कृत भाषेंत प्रश्न केला कीं, या पृथ्वीतलावर श्रीरामचंद्राचा अवतार व्हावयाचा होता, तो झाला कीं नाहीं? रामाला सीता सांपडली कीं नाहीं? मथुरा येथें श्रीकृष्ण जन्म घेणार होते. तो घेतला कीं अजून घ्यावयाचा आहे? अरबस्थानांत हजरत पैगंबर व्हावयाचा होता तो झाला कीं अजून व्हावयाचा आहे? त्याचप्रमाणें गंगानदी अजून वहात आहे कीं तिचा ओघ बंद पडला? या सगळ्या गोष्टी झाल्या असतील तर आपल्याला या खाड्यांतून बाहेर काढा, असेंहि त्यानें सांगितलें. तेव्हां या सगळ्या गोष्टी होऊन चुकल्या आहेत अशी त्याची खात्री केल्यावर त्याला बाहेर काढण्यांत आलें. हजारो वर्षें कुंभकर्णी झोंप घेत पडल्या-नंतर जागृत झालेल्या या माणसाला रहाण्यासाठी एकाला एक जोडून सात तंबू उभे करण्यात आले होते. या एकेका तंबूत एक एक दिवस राहिल्यावर आठव्या दिवशीं तो मनुष्य तंबूतून बाहेर पडला आणि मुसलमानी रिवाजाप्रमाणें सर्वांना सलाम करित सुटला. त्यानंतर सहा महिनेपर्यंत तो कोणाशी एक अक्षरहि बोलला नाहीं. सहा महिने झाल्याबरोबर तो एकाएकी मरण पावला!

सवाई माधवरावाच्या समयींहि अशाच प्रकारचा एक (एका गुहेमध्ये समाधी लावून बसलेल्या तापसासंबंधींचा) चमत्कार घडल्याची दंतकथा पुष्कळांनी ऐकिली असेल.



# बालबोध.

एकदा वाघ आणि सिंह या दोघामध्ये वाद निघाला वाघ ह्मणाला कीं अंधाऱ्या रात्रीं थंडी फार असते सिंह ह्मणाला कीं चांदण्या रात्रीं ती अधिक असते आपसात या वादाचा निकाल लागेना, तेव्हा ते दोघेहि एका शहाण्याकडे गेले त्याने दोघाचेंहि ह्मणणें शांतपणें ऐकून घेऊन ह्मटलें, "तुह्मी दोघेहि चुकत आहा उजेड असो, अथवा चांदणें असो, त्यावर थंडीचें प्रमाण नाहीं जेव्हा थंड हवा सुटते तेव्हा थंडी अधिक वाजते असा नियम आहे मग तुह्मी 'मी बरोबर का तू बरोबर?' ह्मणून व्यर्थ का भांडता?"

तात्पर्य, रिकामा वाद घालू नये वादाच्या मुद्द्याकडेच नेहमी नजर द्यावी

---

एका राजाजवळ एक हत्ती होता तो बांधला होता त्या जागी रात्री पाचचार चोर येऊन मसलत करू लागले त्यातला एकजण ह्मणाला "आपल्या फायद्यासाठीं काय वाटेल तें करावे, दया माया, उपकारबुद्धि वगैरे काहीं मनात आणू नये" हत्तीनें हे शब्द ऐकले व ते त्याच्या मनात चांगले ठसले तो दुसरे दिवशी अगदीं बेफाम झाला कोणाला जवळ फिरकू देईना एकदोघा माहाताना तर त्यानें ठार केले हत्ती माजला हे वर्तमान राजाला कळलें, तेव्हा आता याला ठिकाणावर आणण्यास काय करावे याविषयीं तो विचारात पडला आणि दरबारच्या मंडळींचा विचार पुसू लागला हत्ती एकाएकीं इतका का माजला त्याचे कारण कोणास कळेना दरबारी मंडळींत एक शहाणा वृद्ध गृहस्थ होता त्यानें चारकाईनें चौकशी केल्यावरून त्याला कळलें कीं, आदल्या रात्रीं त्या ठिकाणीं चोराची अशा अशी मसलत झाली होती हत्ती माजण्याचें कारण तेवढ्यावरून त्याने तर्कानें जाणलें आणि अर्थात् त्याला ताळ्यावर आणण्याचा उपायहि योजिला त्याने पाचचार चांगली नीतिमान् माणसें त्या ठिकाणीं पाठवून रोज त्याच्याकडून नीतीनें वागल्यापासून प्राणिमात्राचें कल्याण कसें होतें, याविषयींच्या गोष्टी त्या हत्तीच्या देखत करविल्या असें पाचसात दिवस केल्यावर त्या हत्तीलाहि आपल्या उन्मत्तपणाबद्दल पश्चात्ताप वाटला, आणि गरिबीनें राहिलों तर सर्वजण आपल्यावर प्रीति करतात व उन्मत्तपणा केला तर सर्व आपला द्वेष करतात, अशी त्याची खात्री झाली तेव्हांपासून त्यानें पुनः शांतपणा धरला

सारांश, मनुष्याला फार आणि पशूला काय, संगति असेल तसें वळण लागतें



# बहुभाष व लंबजिव्ह.

होते सैनिक दोघे, नामें **बहुभाष, लंबजिव्ह** दुजा,
नृपसैन्यात जयासम वक्ता कोणास ठाउका न तिजा ! १

काव्येतिहाससागर करतलगत याजला, असें गणती,
म्हणती सैनिक सारे, बृहस्पती यांप्रती करो प्रणती ! २

अश्रुतपूर्व कथानक नित्य मुखांतून त्यांचिया वाहे,
सर्वांगरम्य ज्यांत न सत्याचा लेशही परी राहे ! ३

शशिच्या सुखदकरांहीं परिरंभित हसितसुदरा सृष्टी,
रात्रीं अशा घडीभर जमलें नृपदल वरावया तुष्टी. ४

**बहुभाष** म्हणे " ऐका बांधव हो ! काय जाहलें पूर्वी,
साक्षी मी, रवि, नभ हें, अष्टदिशा, वायु, चंद्रमा, ऊर्वी ५

डोळ्याचा धाक पुरे मनुजाच्या व्याघ्रहरिस भिववाया
आयकतों आपण जे, म्यां अनुभविलें नसेच तें वाया ! ६

निर्जन अरण्य होतें, मृगयाकुल मी तयामधें शिरलों,
पडले मागे सहचर अवघे, मी एकला वनी उरलों, ७

आराव ऐकिला मी व्याघ्राचा, मीहि गर्जना केली,
बाहु स्फुरले माझे ! आली पाहुन पुढे अशी केली ८

हू हू म्हणता आला शोधित मज पशुप– मी जसा त्याला,
मम वीराची दृष्टी बघता परि तो दिसे मनी भ्याला. ९

आलें मनात माझ्या ह्यावर केवळ दृगस्त्र सोडावे,
मोडावें ह्याचें बळ, आयु सूत्रास अत्ति तोडावे १०

भ्रूधनु ओढुन दृक्शर वर्षाया लागतांच मी, विरला,
हरला तो पंचानन, ठरला क्षणभर न, मागुता सरला ! ११

घूकास रवी तैसा, झालों मी वनचरास असह तया,
अक्षिशर जरि योजीतों, तींच तया वाटती अमोघ दया. १२

नेला हाकित ऐसा, झालीं कीं दोन योजने, दमलों,
पशु तो गुहेंत शिरला, द्वारी वीरासनस्थ मी रमलों. १३

झाले दिन तीन न ये, रक्षप तो एकवार बाहेरी,
आहें कीं गेलो मी, भीरूपरि आतुनीच तो हेरी १४
झाला व्याकुल, जठरी अग्नीनें होमकुंड पेटविलें,
आला द्वारीं परि मम दृष्टीनें परत त्यास पाठविलें १५
ऐशा शंभर खेपा झाल्या, परि तो न बाहिरी आला,
मेला ह्मणत भला मी सुटलों ह्या मनुजदृष्टिपाताला १६
आला अनुभव मजला तोच यथातथ्य आज मी कथिला,
वाटेल खरा त्याला वीराची दृष्टि ती असे ज्याला! " १७
हसले, वदले सारे लोकी " बहुभाष धन्य धन्य खरा!
ज्याच्या नयनें हरिलें व्याघ्राच्याही कराल रदनखरा " १८
त्या लंबजिव्हहृदयीं शिरला हा धन्यवाद कीं क्षुरसा,
बोले " कां तकाला भुलला? घ्या, घ्या यथेच्छ इक्षुरसा! १९
नौकाधिष्ठित आह्मी जलमार्गे भूप्रदक्षिणा करण्या
होतो जात, कवण तो शूराच्या वर्णिता कवी करण्या! २०
दक्षिणसागरमध्यीं आलो जेथे जलास अंत नसे,
हिमगिरिसहस्र दडलें ज्याच्या उदरात वालुकाकणसें! २१
लहरी ज्याच्या हसुनी वदती आकाश ठेंगणें भारी,
कोण तयाचा आह्मा वीरावाचून गर्व संहारी! २२
एके दिवशीं दिसली आह्मा येता दुरून अल्प तरी[1],
दर्शन जीचें हृदयीं अमुच्या नानातरंग नव वितरी २३
तें क्षुद्र उडुप दिसलें—चसलें जणु पाखरू जलावरती
आलें जवळ न त्याला किंवा तन्नायकास तिळ भीती २४
फुटलें तारू कोठें त्यातुन हा सुटुनिया असा आला,
किंवा प्रभंजनानें गाढमहासागरात वाहविला २५
दंडे तरूं असें किति, एकाकी पाहुनी तया द्रवलों,
ताराया त्यास पुढें नौकाधिष्ठित समस्तही सरलों २६

---

1 होडी

केली पूण तयानें दोन्ही अपुले उभारुनी हात,
तेव्हां समजे आह्मा कीं त्याच्या अजुन जीव देहात. २७

आला नौकेजवळी हांसत नवराच जेविं लग्नाला,
केलें चकित तयानें आह्मा सर्वां वितर्कमग्नाला २८

बोले 'सप्तसमुद्रा लघुन मी चाललों स्वदेशाला,
व्यायाम अल्पसा हा माझ्या त्या स्थूल अवयवा झाला, २९

मासत्रय झालें, मी अन्नावाचून राहलों आहे,
होईल हा व्रतावधि परिपूर्ण असाच एक सप्ताहें ३०

मजला नलगे कांहीं थोडेंसें नस्य[1] द्या, पुरे तितुकें, '
हा नर किंवा किन्नर वदलों आह्मी मनामधें कुतुकें! ३१

नौकाधिप अमुचा दे अपुल्या जवळील नस्यधानीतें[2],
गेला घेउन कोलीं[3] नवला सन्मति अजून मानींवे ३२

बलभीम[4] अन्य न कळे कोठें तो भूवरी जलीं अथवा
आता असेल, नाहीं रविसम ज्या ठाउका कधीं थकवा ३३

तो लंबजिव्ह ऐसें बोलुन थांबे, समस्त "वा!" ह्मणती
बहुभाष नस्यधानी दावुन सर्वांप्रती करी प्रणती ३४

बोले तो "पोताधिप[5] अन्य नसे मीच तो जलावरती
वरुणासम संचरलों, केली की हौस आपली पुरती! ३५

ही तीच नस्यधानी वागवितों जवळ खूण मित्राची
लागे अन्नाहुनिही महती जेव्हां मला अधिक हीची." ३६

---

१ तपकीर २ तपकिरीची डबी. ३ होडी. ४ मारुती. ५ होडीचा धनी.

# वकीलसाहेबांची बहादरी!

गणपतराव नगरकर इंग्लंडाहून बॅरिस्टरची परीक्षा देऊन आल्यास सुमारें सातआठ वर्षें झालीं असतील इतकी वर्षें त्यांनीं नगर येथे आपला धंदा सुरु केला होता; पण जवळ पैसा असेल तर शपथ! ते ह्मणजे आपल्या धंद्यात कमी वाकबगार होते असें नाहीं उलट एखाद्या पटाईत साक्षीदाराची भंबेरी उडविण्याचे कामात, आणि आपल्या वाक्पाडित्याने न्यायाधिशाला दिपवून त्याचे मन आपल्याकडे ओढून घेण्यात त्याचा हात धरणारा सगळ्या नगरात एकहि वकील नव्हता! पण बॅरिस्टरसाहेब इंग्लंडात गेल्यापासून त्यांना एक अतिशय वाईट व्यसन जडले होते ते इतकें कीं, पुष्कळ वेळा पक्षकार लोक बॅरिस्टरसाहेबास भेटण्यास आले तर यांची नुसते डोळे उघडण्याचीहि पचाईत, मग बोलण्याची गोष्ट कशाला पाहिजे! स्वारी सदा दारूच्या निशेंत धुंद असावयाची यामुळे त्याला बहुत-करुन पक्षकार मिळणेच कठीण पडे त्यातून कर्मधर्मसंयोगाने एखादा चुकूनमाकून कोणी मिळाल्यास वेळेवर हे त्याचे कामावर जाण्याची मारामार वरे, अशी मारकूट करुन मिळालेच थोडेसे पैसे, तर त्या रात्री स्वारीचे दारूचे हंसे वाटलेच ह्मणून समजावे! स्वारीचे तडाक्यातून एखाद दिवशी रुपया बारा आणे सुटलेले हातीं आल्यास ते घेऊन बिचाऱ्या सरस्वतीबाई कसाबसा संसार चालवित असत पण अशा हातकोरणींने किती दिवस निभाव लागणार!

एके दिवशी सध्याकाळी बॅरिस्टरसाहेबाची स्वारी आपल्या खोलीमध्यें आरामखुर्चीवर वर्तमानपत्र वाचित पडली होती इतक्यात सरस्वतीबाई अगदी खिन्न मुद्रेनें तेथें येऊन ह्मणाल्या "आपल्या ह्या अशा गुणानी उद्या उपाशीं मरण्याची वेळ आली–हें आपल्या गावीतरी आहे का?"

बॅरिस्टरसाहेबानीं तोंडातील चिरुट एका अंगास धरुन आपल्या प्रियतमेकडे निरखून पाहिलें व हसतहसत ह्मटलें "ओ हो हो! आज स्वारीचा मुखचंद्र इतका निस्तेज का बरें दिसतो!"

"आपल्याला सदासर्वकाळ थट्टा सुचते! आपली खरी स्थिति आपल्या बायकोला कळते याचीतरी काहीं लाज वाटल्या—"

"अलबत, अलबत! मग राणीसरकारचें ह्मणणे आपली अगदीं उपाशी मरण्याची वेळ आली हेंच कीं नाहीं?"

"हो, हेंच–"

"बरें ! मग सरकारचा काय हुकूम आहे ?"

" हे पहा, तुमच्या या असल्या बोलण्यानं एखाद्या साधूलासुद्धा चीड येईल ! जिवावरची पाळी आली तरीसुद्धा आपल्याला ही थट्टा सुचतेतरी कशी ? आपली अन्नान्न दशा होण्याची वेळ आली, अशाच रीतीनं दिवस काढायचे असतील तर मी खात्रीनं सांगतें, पधरा दिवसांचे आतच पोरांना भीक मागायला पाठवाव लागून आपल्याला झाडाखाली बिऱ्हाड धराव लागेल ! जवळ एक पैसासुद्धा नाहीं; कुठ पतसुद्धा राहिली नाहीं कीं कुणी दमडीच उधार देईल ! बाजारातील वाणी, मारवाडी तर पैशाच्या उगराणीसाठी सकाळसंध्याकाळ सारख्या खेपा घालतात, अशा स्थितीत तुह्मी दिवसतरी किती काढणार ?" असें ह्मणून सरस्वतीबाई त्रासाने तेथून निघून गेल्या.

गणपतराव हे लहानपणापासून श्रीमतींत वाढलेले त्याचा बाप नगर जिल्ह्यात एक मोठा जमीनदार होता परंतु गणपतराव लहान असतानाच तो वारल्यामुळें बहुतेक सर्व नगदी माल चाकरनोकरानीं लांबविला होता. येऊन जाऊन राहिली स्थावर जिंदगी पण गणपतरावाच्या लग्नाकरिता व विद्याभ्यासाकरिता तिच्या तारणावर वारंवार रकमा निघून त्या कर्जांची रकम बहुतेक जमिनीच्या किंमतीइतकी झाली होती यामुळे गणपतराव विलायतेहून परत येईपर्यंत एका रहात्या घराशिवाय त्याचीअशी ह्मणावयाला काहींसुद्धा मिळकत राहिली नव्हती. घर ह्मणजे फारशी उत्पन्नाची बाब नव्हे, परंतु तें भरपेठेंत असल्याकारणाने त्याच्या नशिबाने त्याचे दरमहा पंचवीस रुपये भाडे येत असे. गणपतरावाची पत्नी सरस्वतीबाई हीसुद्धा मोठ्या पिढीजाद श्रीमंत घराण्यातील असून हल्लीच्या रीतीप्रमाणें तिला थोडेबहुत शिक्षण मिळालेलें होतें. नवराबायकोचें परस्परावर फारच प्रेम असे इतर लोकांशी आमचे बॅरिस्टरसाहेब फारच कडक रीतीनें वागत मारवाडी व इतर उदमी लोक बॅरिस्टरसाहेबांकडे उधारी वसूल करण्यास वारंवार येत असत, परंतु त्याचेसमक्ष एकाचीहि ब्र काढण्याची छाती होत नसे इतकेंच नव्हे, भरकोर्टांत काम चाललें असतानासुद्धा बॅरिस्टरसाहेबाच्या विरुद्ध बोलायला इतर वकील जरा दबकत असत, इतका त्याचा चोहोंकडे दरारा असे फक्त त्याची आपल्या बायकोवर पराकाष्ठेची प्रीति असल्याकारणानें तिचा मात्र याचेवर पगडा बसलेला होता नगरातील घराचें भाडे परभारा सरस्वतीबाई घेत असत व त्यांत आपला संसार चालवित असत; परंतु गणपतराव अगदीं व्यसनाधीन झाल्याकारणाने व त्याचा धंदाहि चांगला

चालत नसल्याकारणानें तितक्या पैशात त्याचा एवढा मोठा संसारतरी कसा चालावा? दरसाल कर्ज वाढत जाताजाता आता अगदी ओठाशीं पाणी आलें होतें

सरस्वतीबाई गणपतरावाच्या खोलीतून बाहेर गेल्यावर बराच वेळपावेतों ते तसेच आरामखुर्चीवर विचार करित पडले होते "याला कांहींतरी युक्ति काढलीच पाहिजे!" असें ते आपल्याशीच पण जरा मोठ्यानें ह्मणाले पण लागलाच दुसरा प्रश्न पुढे आला "पण ती काय काढावी?" ते बराच वेळ फार गूढ विचारात पडल्यासारखे दिसले त्याच्या चेहेऱ्यावरुन त्याच्या डोक्यात कसल्यातरी भयंकर विचाराचें काहूर माजलें असावे असें दिसत होतें काहीं वेळानें त्याच्या मनाची जरा चलबिचल होऊन ते एकदम खुर्चीवरुन उठले व ह्मणाले "बस, ठरला बेत! असेंच करायचें!"

मनात आलेला विचार कदाचित् डळमळेल या भीतीनें अगदीं एका क्षणाचा सुद्धा विलंब न करिता लागलेच ते आपल्या कपाटाजवळ गेले खिशातील किल्ल्या काढून त्यानी एक खण उघडिला तो जरा लांब ओढून त्याचे आतले बाजूस एक चोरखण होता त्याला चावी लावून तो उघडला व त्यातून किनारीला सोनेरी फीत लावलेली अशी एक मोगली टोपी काढली व ती आपल्या डोकीवर ठेवून समोर भिंतीला आरसा टांगला होता त्यात आपण कसे दिसतो ते पाहिले मिशीवरुन हात फिरवून ते आपल्याशीच जरा हसले अमळशानें त्याचा चेहेरा जरा काळवंडलेला दिसला आणि खरोखर मनातील विचाराचें प्रतिबिंब दाखविणारा चेहेरा हा एक आरसा आहे हे जर खरें असेल तर पूर्वी मनात आलेल्या दुष्ट विचारापासून त्याचें मन त्यास मागें ओढित आहे असें त्या वेळच्या त्याच्या चेहेऱ्यावरून स्पष्ट दिसत होतें

पण गणपतराव असे डगमगणारे मनुष्य नव्हते पुन्हा त्या कपाटाजवळ जाऊन त्यानी त्यातून एक सहाबारी पिस्तूल काढलें व शेजारचा दुसरा खण उघडून त्यातून एक खोटी दाढी बाहेर काढली अंगावर एक पायघोळ अंगरखा चढविला व त्याचे आतील खिशात त्या तिन्ही वस्तु ठेवून अगदी गुप्तपणें स्वारी बाहेर पडली

"अगदीं वेळेवर मला आठवण झाली हे केवढे सुदैव! जर हेंच एक तासानें उशिरा आठवलें असतें, तर काहींएक उपयोग झाला नसता! आपल्याला काय? काहीं झालें तरी प्राण मिळून कुणाचाहि घ्यावयाचा नाहीं"—

याप्रमाणें आपल्याशी गुणगुणत गणपतराव थोडीशी शेतें ओलांडून मोठ्या सडकेवर आले व सुमारे एक तासात ते पाचसहा मैल लांब गेले फार जलद

चालल्यामुळे ते एकसारखे धापा टाकित होते. सडकेच्या बाजूला झाडाच्या खाली अंधारात उभे राहून त्यानी खिशातील टोपी काढून ती डोकीवर ठेवली व दाढी काढून ती हनवटीवरून कानावर अडकवित होते, इतक्यात गाडीच्या चाकाचा आवाज त्याचे कानी आला व आपली शिकार जवळ आली असें त्यानी ताडलें.

सूर्य मावळल्याला बराच वेळ झाला होता बाहेर गर्द अंधकार पडला होता. एक दोन हातापुढचा पदार्थ ओळखिताहि येत नव्हता गणपतराव अगदी डोंगराच्या पायथ्याजवळच उभे असल्याकारणाने ते उभे राहिले होते तेथ-पासूनच सडकेच्या चढणीस सुरुवात झाली होती त्यानी मागे वळून आपल्याला पाहिजे होती तीच ही गाडी आहे अशी आपली खात्री करून घेतली व ते उभे होते तेथपर्यंत गाडी येऊ दिली

"ए, हरामखोरा! गाडी उभी कर! एक पाऊलतर पुढे टाक ह्मणजे बघ आताच्या आता कशा तुझ्या डोक्याच्या चिंधड्या उडवितो त्या!" असें ह्मणून आमच्या दरवडेखोर बॅरिस्टरसाहेबानी आपले पिस्तूल एकदम त्या गाडीवाल्यावर रोखिलें

सडकेला चढण लागलेली, दरवडेखोराच्या हातात बार भरलेले पिस्तूल, आपल्याला मनुष्याची मदत मुळीच नाहीं, या सर्व गोष्टी गाडीवाल्याच्या मनात येऊन त्याने एकदम गाडी उभी केली व भीतीने गांगरून जाऊन पुढे काय होते तें पहात स्तब्ध बसला

" काय गडबड आहेरे?" असें ह्मणत एका ह्मातार्‍या मारवाड्याने गाडीबाहेर डोकें काढलें. पण आमच्या दरवडेखोराच्या हातात भरलेलें पिस्तूल पाहून तोसुद्धां एकदम चपापला

"जय गोपाळ शेटजी!"

" कायरे, ए, मादर— तुझ्या मनात काय मला लुटायचे आहे?"

"चूप बस थेरड्या ! मला तुझेबरोबर बोलायला वेळ नाहीं ! ट्र– काट कुठे आहे ती काढी पिशवी ! नाहींतर पहा मग तमाशा!"

या बोलण्याने शेटजीहि जरा दबकले पण मोठे अवसान आणून ह्मणाले "आणि समज मी नाहीं काढली तर तू काय करशील?"

" काय करशील? या पिस्तुलातल्या एकदोन गोळ्या हळूच या कुचक्या डोक्यांत ठेवून देईन" असें ह्मणून दरवडेखोराने पिस्तुल किंचित् दुसरीकडे फिरवून एक बार काढला "हें पहा शेटजी, या अशा उगाच बकवा करण्यात अर्थ नाहीं, तुमचा आमचा धंदा सारखाच ! तुह्मी दिवसाढवळ्या राजरोस रीतीने दरवडे घालतां,

आह्माला जरा एका बाजूला अंधारातला मार्ग पतकरावा लागतो या वेळीं तुह्मी आहा श्रीमंत, मी आहे गरीब पण माझ्या हातात आहे पिस्तूल व तुमच्या मद्द डोक्याशिवाय तुह्माला सावरून धरायला तुमचेजवळ कांहींसुद्धा हत्यार नाहीं तुमचेजवळ जें कांहीं असेल तें सर्व माझे स्वाधीन केल्याशिवाय इथून जिवंत जाण्याची आशा करण्यात काहीं अर्थ नाहीं तर काढा लवकर काय आहे तें-"

"हें पहा, मी तुला अर्धें देतो—"

"त्या तुमचेजवळ दोन काळ्या पिशव्या आहेत त्या दोहोंत मिळून आहेतरी किती ऐवज?"

"एकेकात हजार मिळून दोन हजार रुपये आहेत-"

"बरें, चल, कबूल काय ह्मातारा लोभी आहे हो! हं चल, काढ एक आणि हो चालता कसा"

अगदी नाखुषीनें त्या ह्मातान्यानें एक पिशवी दरवडेखोराचे स्वाधीन केली व त्याचे तोंडाकडे जरा निरखून पाहून पुटपुटला "बरें आहे बच्चाराम! तुला तुरुंगात घालीन तरच माझें नाव—"

"हो हो! नको उगाच ह्मातारच्या मनात मांडे खाऊं! तू नशिबाचा ह्मणून जिवंत सुटलास" असें ह्मणत आमच्या दरवडेखोरानें आपलें तोंड त्या शेटच्या अगदीं कानाशी नेलें व हलकेच "मला बरोबर पाहून ठेव व तुला कुणी लुटलें त्याच्या चेहेऱ्याची चांगली ओळख धर जय गोपाळ!" असें ह्मणून पटकन् सडकेच्या बाजूस जाऊन स्वारी दिसेनाशी झाली

गणपतरावांना पक्कें माहीत होतें कीं, हा ह्मातारा शेजारच्या गावाला जाण्याचा अवकाश, कीं, दरवड्याबद्दल जिकडेतिकडे बोभाबोंब उठून जाईल ह्मणून त्यांनी जलदीनें धावतधावत कसेंतरी आपलें घर गाठलें परत येत असता वाटेंत सडकेच्या बाजूला एका शेतकऱ्याचें घर लागलें त्याचे कुंपणाचे आत त्यांनीं आपल्या डोकीवरची टोपी काढून फेकून दिली व याप्रमाणें घराहून गेल्यापासून सुमारें दोनतीन तासात स्वारी सुखरूपपणें परत आली

दुसरे दिवशीं उजाडावयाचा अवकाश, ज्याचेत्याचे तोंडीं रात्रीच्या दरवड्याची गोष्ट! कोणी ह्मणाले "सरकारी खजीना लुटला!" कोणी ह्मणाले "दरवडेखोराची सुमारें पन्नास असामींची टोळी आहे" कोणी ह्मणाले "गाडी-वाल्याचा खून झाला व शेटजवळचे सुमार पन्नास हजार रुपये गेले आपले जवळ होतें नव्हतें ते सर्व चोराच्या निमूटपणें स्वाधीन केल्यामुळे शेटचा कसा

तरी जीव वाचला!" याप्रमाणें ज्याला जें वाटेल तें तो बोलत सुटला. नगरातील बाजारपेठेंत अशी वदता उठली होती कीं "दरवडेखोराची टोळी आज दिवसा बाजार लुटण्यास येणार आहे!" आणि त्या भीतीनें बाजारात एकसुद्धा दुकान उघडलें नव्हतें! सर्व रस्ताभर लोकांचे थवेच्या थवे निरनिराळ्या ठिकाणीं बसून रात्रीच्या दरवड्याच्या गोष्टी करीत होते शहरातील वर्तमानपत्राचे त्या दिवशीं जादा अंक निघाले पोलिसाची चौकशी जारीनें सुरु झाली व संशयावरून बऱ्याच ठावीस लोकास पकडलें

त्या दिवशीं आमचे गणपतराव शहरात रोजचेप्रमाणें रस्त्यातून जात असता आपल्या गेले रात्रीच्या धाडसाबद्दलची हकीगत तिखटमीठ लावून त्याच्या कानावर आलेली ऐकून त्याचें मनच त्याना खाऊ लागलें "आपल्याला त्या मारवाड्यानें निरखून पाहिलें आहे. तेव्हा कदाचित् तो आपल्यास ओळखणार नाहींना? मजजवळ ती दाढी व टोपी असल्याबद्दलची गोष्ट अद्याप कुणालाहि माहीत नाहीं हें केवढें माझें सुदैव! माझ्या बायकोलाहि ह्या जिनसा मजपाशी असल्याबद्दल माहीत नाहीं ह्मणून बरें, नाहींतर तिलासुद्धां शंका यायला कारण झालें असतें!"

[ २ ]

दुसरे दिवसाची गोष्ट शिवलालशेटला ज्यानें लुटला तो इसम सापडला, अशी बातमी शहरात पसरताच जिकडेतिकडे एकच चळवळ उडून गेली व पोलिसाचे बंदोबस्तांत शेजारच्या गावच्या जानवा पाटलाचा मुलगा जेव्हा रस्त्यातून जाताना दिसला तेव्हातर सर्वास मोठेंच आश्चर्य वाटलें जानवा पाटील ह्मणजे मोठा अब्रूदार माणूस व घरचा चांगला खाऊनपिऊन सुखी तेव्हा त्याचा मुलगा ह्मणजे असलें वाईट कृत्य करील, असें कोणाचेंहि मन सांगेना. शिवाय इतकी रकम चोरीस गेली असून पोलिसतपासात एक पैसुद्धा सापडली नाहीं फक्त शिवलालशेटनीं मात्र त्याला ओळखून ह्याच तो चोर, असें खात्रीनें सांगितलें

आमचे बॅरिस्टरसाहेब त्या दिवशीं आपले खोलींत आरामखुर्चीवर पडले असता जानवा पाटलाच्या मुलाला त्या चोरीच्या वहिमावरून पकडल्याची त्यास बातमी लागली व ते मोठ्या विचारात गढून गेल्यासारखे दिसले "हे मोठें लचाड झालें. खरा चोर सुटून संन्याशाला उगाच सुळावर चढण्याची वेळ येणार. ह्या किटाळातून तो बिचारा कसा सुटेल तो सुटो! आपण पोलिससमोर जाऊन सर्व कबूल करावें असें मला वाटू लागलें आहे" याप्रमाणें ते आपल्याशींच बोलत आहेत, इतक्यात कोणीं दार ठोठावल्याचा आवाज झाला.

" कोण आहे ?" बॅरिस्टरसाहेबांनीं दार उघडून विचारताच जानबा पाटील आत येऊन उभे राहिले

" राम राम, सरकार–"

" राम राम पाटीलबोवा या, बसा या खुर्चीवर "

" सरकार, माझेवर काय प्रसग आला आहे हें आपल्याला समजलेंच असेल " जानबा पाटील डोळ्यात पाणी आणून ह्मणाले

" होय, ऐकिले आणि खरोखर मलासुद्धा फार वाईट वाटले पण काहो पाटील, यात काहींतरी चूक झाली असली पाहिजे असें नाहीं तुह्मांला वाटत ?"

" चूक नाहींतर काय ! त्या रात्रीं माझा मुलगा मुळी घराबाहेरच पडला नव्हता पण हें पहा साहेब! आता खटला गेला आहे कोर्टात, तेव्हा गुन्हा केला नाहीं ही गोष्ट तेथे जाऊन शाबीत केली पाहिजे "

" पण, काय हो पाटील, त्या टोपीबद्दल—"

" हो, साहेब, तें मी आपल्याला सागण्यास अगदीच विसरलों दरवडा पडला त्याचे दुसरे दिवशीं सकाळी आमच्या कुपणाच्या आत घरापासून सुमारें वीसपचवीस पावलावर ती टोपी त्या पोराला सापडली व त्यानें ती तेव्हापासून आपल्या डोकीवर ठेविली होती ती बहुधा त्या खऱ्या चोराने तेथें टाकिली असावी काल सध्याकाळीं पोलिसचे शिपाई आजूबाजूस तपास करित असताना माझा मुलगा जवळच शेतात काम करित असता त्याना ती त्याचे डोकीवर दिसली व त्यावरून माझ्या पोराचा वहीम येऊन पोलिसानी त्याला पकडलें."

" बरें आहे, खटल्याच्या चौकशीची तारीख लागली कीं मला कळवा दरम्यान तुमच्या मुलाला सोडविण्याची काहीं युक्ति सुचल्यास पाहू तुह्मी काहीं काळजी करू नका, समजला माझ्याकडून होईल तितकी मेहेनत करण्यात मी कसूर करणार नाहीं "

बॅरिस्टरसाहेबाकडून पक्षकारास इतकी खात्री मिळाली कीं त्याने आपलें काम फत्ते झालें ह्मणून समजावेंच, इतकी त्याच्या कामाच्या बाकबगारीसबधानें चोहोंकडे ख्याती होती ह्मणून बॅरिस्टरसाहेबाच्या तोंडचे हे वरील शब्द ऐकताच त्या ह्मातान्या पाटलास इतका काहीं गहींवर आला कीं, त्याचे डोळे एकदम आनदाश्रूनीं भरून आले व तशा डोळ्यानी एकवार त्यानें आपल्यावर उपकार करणाराकडे पाहिलें व कठ दाटून आल्यामुळें त्याला पुढें बोलवेना, ह्मणून तसाच उठून त्यानें बॅरिस्टरसाहेबाच्या पायावर एकदम लोटांगण घातलें, आणि उठून

डोळे पुसून सद्गदित स्वरानें ह्मणाला "सरकार! माझ्या वयाला कांहीं नाहीं तरी निदान साठपासष्ट वर्षे झालीं इतक्या वयात मी कुणाचेंसुद्धा वाईट बोलून घेतलें नाहीं; आणि आता ह्मातारपणीं माझ्या पोरावर असा प्रसंग आल्याकारणाने विनाकारण माझी अब्रू जाईल व माझा पोरहि नाहक मला व संसाराला मुकेल. यातून वाचविणारे तुह्मी माझे मायबाप आहा व परमेश्वराखालीं एक तुमचाच काय तो मला आधार आहे ! " बोलतावोलता पाटलाचा कंठ पुन्हा भरून आला आणि आमच्या बॅरिस्टरसाहेबाचीसुद्धा तीच अवस्था झाली. त्यानीं त्यास हातानेंच जाण्यास खूण केली व जानबा पाटील तेथून निघून गेले

जानबा पाटलाचे हे शेवटचे शब्द आमच्या गणपतरावजीच्या काळजाला अगदीं झोंबून गेले त्याची ती त्या वेळची स्थिति पाहून गणपतरावाना असें वाटलें कीं, तो प्रसंग नजरेनें पहाण्यापेक्षा मरण आलेलें पतकरलें गणपतरावाचा चेहेरा इतका आनंदी दिसे कीं, त्याच्यावर कितीहि दुर्घट प्रसंग येवो ते ह्मणून सदा हसतमुख असावयाचे, परंतु ते सर्व यावेळी नाहींसें झालें त्याचा चेहेरा अगदीं काळाठिक्कर पडला ते तसेच कपाळावर दोन्ही हात घेऊन कांहीं वेळ खुर्चीवर बसले पुन उठून खोलीभर इकडूनतिकडे खेपा घालू लागले मध्येच कांहीं आठवल्यासारखे करून उभे रहात पुन्हा यांत कांहीं अर्थ नाहीं, अशा मुद्रेनें खेपा घालण्यास सुरुवात करीत मध्येच एकदा ते कपाटाजवळ गेले, खिशातील चाव्याचें जुडगें काढून एक खण उघडिला व आतील एक काळ्या रंगाच्या पिशवीला हात लावून क्षणभर विचार करीत व कावऱ्याबावऱ्या मुद्रेनें चोहोंकडे पहात उभे राहिले पुन्हा तोहि विचार पसंत नाहीं असें त्याच्या चेहेऱ्यावरून दिसलें नंतर त्यानीं तो खण माघारा लोटून त्याला किल्ली लावून दोनतीन वेळा ओढून पाहून तो बंद झाल्याबद्दल आपली खात्री करून घेतली व किल्ल्यांचें जुडगें कोटाचे आतील चोरखिशात ठेवून कोटाची बटणें काळजीपूर्वक लावून व किल्ल्या ठेविलेल्या ठिकाणीं दोनतीन वेळा हातानें चापट्या मारून त्या वाजविल्या, व नंतर त्याचा जीव किंचित् थाऱ्यावर आल्यासारखें दिसलें त्यानीं एक मोठा सुस्कारा टाकिला व पुन्हा पूर्ववत् फेऱ्या घालण्यास आरंभ झाला. ते आपल्याशींच बडबडू लागले " काय चमत्कार आहे ! दरवडा घालतो कोण व त्याबद्दल प्रायश्चित्त मिळणार कुणाला ? बरें यदाकदाचित् तो सुटला तर त्याबद्दलचें सर्व श्रेय [illegible] त्याच्या बापाला मी नुसतें तोंडदेखली खटपट [illegible] [illegible]

कृत्याचें प्रायश्चित्त आज त्याला विनाकारण भोगावें लागणार तो अटल चोर आग लागो त्या टोपीला व दाढीला ! ती जर आज माझेजवळ नसती तर मला कधींहि तशी बुद्धि झाली नसती आता त्या पाटलाचे पोरास सोडविण्याला उपाय एकच आहे खटल्याचे दिवशीं खाद्यावर ती काळी पिशवी घेऊन जावें व आपलें कृत्य सपशेल कबूल करावें, याशिवाय आपल्यालातर दुसरी युक्ति दिसत नाहीं आह्मीं खुशाल मजा मारित उजळ माथ्यानें राजरोस चोहोंकडे फिरावें व त्या बिचाऱ्या निरपराधी पोरानें तुरुंगात शिक्षा भोगावी, याबद्दलची नुसती कल्पनाहि आपल्याला सहन नाहीं होणार, मग प्रत्यक्ष पहाण्याच्या प्रसंगाची गोष्ट कशाला पाहिजे ! ”

याप्रमाणें ते आपल्याशींच बोलत खेपा घालित होते इतक्यात त्याचे मनात आपल्या बायको व मुलाबद्दल विचार आले ते आल्याबरोबर पूर्वी केलेले सर्व बेत ढासळल्यासारखे दिसले व पहिल्याप्रमाणें अगदी शून्य मुद्रेनें त्यानीं पुन्हा खेपा घालण्यास सुरुवात केली थोड्या वेळानें त्याच्या तोंडावर जरा रंगेलपणाची झाक मारु लागली व ते पुन्हा आपल्याशीच ह्मणाले “ बस ठरला बेत! काहींतरी जबरदस्त धाडस केल्याशिवाय तो पोर सुटण्याची आशा नाहीं. ( जरा थांबून ) मी जर कोर्टांत गेलों तर ह्मातारडा शिवलाल मला ओळखील काय ? मग मात्र भयंकर ! पण नाहीं, जर आपण चोरीचें धाडस करताना मागचापुढचा विचार केला नाहीं तर त्या पोराला सोडविण्याची अमूल्य संधी आली असता हे बायकी विचार काय कामाचे ? ”

या वेळीं मात्र त्याच्या चित्ताला स्वस्थता आलीसें दिसलें चेहऱ्यावर पूर्ववत् तजेला आला, ते पुन्हा खुर्चीवर पडले व वेळ जाण्यासाठीं समोरचे टेबलावरील चिरूट काढून तो त्यानीं पेटविला व तोंडात धरून धुराचे लोट सोडित दोन्ही हात मानेच्यामागें एकात एक घालून वर छताकडे पहात ते स्वस्थ पडले

[ ३ ]

आज खटल्याचे चौकशीची तारीख सकाळी नऊ वाजल्यापासूनच लोकाचे थवेच्या थवे कोर्टाकडे जाताना दिसत होते जिकडे जावें तिकडे दरवड्याच्या गप्पा बरोबर साडे अकरा वाजता न्यायाधीशसाहेब न्यायासनावर विराजमान झाले खटल्याचे काम सुरू झालें शिवलाल शेटजीची साक्ष पहिल्या प्रथम झाली

“शहरापासून सुमारें पाचसहा मैल आमची गाडी गेली असेलनसेल इतक्यात आरोपीनें गाडी अडविली व ठार मारण्याची भीति दाखवून आपलेजवळून एकदर

रकमेपैकी अर्धी रकम त्याने घेतली" वगैरे वाचकास माहीत असलेली इत्थंभूत माहिती शेटजींनीं आपल्या जबानींत सांगितली नंतर गाडीवाल्याची साक्ष झाली त्यानेंहि आपल्या जबानींत शेटजींप्रमाणेच मजकूर सांगितला

दोघांच्या जबान्यांवरून व चोराच्या डोकींतील टोपी आरोपीच्या डोकींत सांपडली यावरून आरोपीविरुद्ध अनुमान काढण्यास चांगला मजबूत पुरावा झाला, असें सर्वांस वाटलें.

आरोपीतर्फे आमचे बॅरिस्टरसाहेब उभे राहिले सर्वांचे डोळे आतां हे काय बोलणार याच्याकडे लागले होते कोर्टांत अगदी सामसूम झालें बॅरिस्टर उठले ते जरा कावऱ्याबावऱ्यासारखे दिसू लागले. परंतु ते आतां काय युक्ति काढतात याजकडेच सर्वांचें लक्ष्य असल्याकारणानें त्याच्या चेहेऱ्याकडे कोणी पाहिलें नाहीं.

"काय शेटजी ! तारीख २६ मे रोजी शहरापासून सुमारे ६ मैलावर तुमची गाडी गेली इतक्यांत तुह्माला लुटलें, असेंच तुमचे ह्मणणें नव्हे ?"

"होय, असेंच"

"आपलेजवळ एकदर रकम किती होती ?"

"दोनहजार रुपये—"

"त्यापैकीं गेले किती?"

"एक हजार—"

"तुह्मी असें सांगितलें कीं, तुमचेजवळ हजार हजाराच्या दोन पिशव्या होत्या ह्मणून ?"

"होय— "

"तुमचेजवळ एक पिशवी शिल्लक राहिली ही गोष्ट त्या चोराला माहीत होती काय ?"

"होय, त्याला माहीत होती, कारण त्यानें—"

"बस, पुरे! मला तुमचें कारणविरण नको !"

वरील सर्व प्रश्न अगदी फुकट होते व ही गोष्ट आमचे बॅरिस्टरसाहेब समजून नव्हते असें नाहीं फक्त आपला चाप कधीं लागू करावा याचीच संधी ते पहात होते आणि ह्मणून उगाच वेळ दवडण्यासाठीं कांहींतरी प्रश्न विचारित होते. आतां चाप लागू करण्याचें धाडस करावें असें त्याच्या मनानें घेतलें ते किंचित् हसले

व शेटजींस ह्मणाले " काय हो शेटजी ! तुह्माला कुणीं लुटलें याची तुह्माला मुळींच माहिती नसावीसें वाटतें ? "

" उलट त्याबद्दल माझी पूर्ण खात्री आहे ! "

"खरें कीं काय ! अगदीं पक्की खात्री, की या आरोपीनेंच तुह्माला लुटलें ह्मणून?"

" अगदीं पक्की—"

" शेटजी! ह्मातारपणामुळें तुह्माला चांगली आठवण रहात नाहीं, असें वाटतें, ह्मणून तुह्मी कदाचित् काहीं वेळानें या मंडळीपैकीं एखाद्या इसमाचें किंवा ही माझ्याशेजारी इतर वकील मंडळी बसली आहे त्यापैकीं एखाद्याचें, किंवा प्रत्यक्ष जजसाहेबाचें, किंवा फार लांब कशाला माझें जरी नांव घेतलेंत तरीहि मला फारसें आश्चर्य वाटावयाचें नाहीं ( शिपायाकडे वळून ) सीपॉय्, ती टेबलावरची टोपी इकडे आण पाहू !"

शिपायानें ती टोपी वकीलसाहेबाचे हातीं देतांच त्यानीं ती हातात घेऊन खालींवर करून चोहोंकडून चांगली तपासून पाहिली व आपल्या डोक्यावर चढवून शेटजीकडे वळून किंचित् हसून ह्मणाले " वारे वा ! माझ्या डोक्याला चांगलीच बसते ही !" ते आपल्या जागेवरून जेथें शेटजी उभे होते तेथें गेले व शेटजींच्या कानाशी तोंड करून जरा हलक्या आवाजानें व निराळाच स्वर काढून ह्मणाले " शेटजी ! चांगलें स्मरण करून शपथेवर सांगा, कीं ज्या चोरानें तुह्माला लुटलें ( जास्त हळू ) तो जाता जाता ( अगदीं कानांत ) मला बरोबर पाहून ठेव, व तुला कुणीं लुटलें त्याच्या चेहेऱ्याची चांगली ओळख धर, जयगोपाळ ! असें बोलला नाहीं काय ? "

त्या ह्मातान्या मारवाड्यानें त्या आवाजानें उच्चारलेले ते ओळखीचे शब्द ऐकल्याबरोबरच तो भीतीनें अगदीं गांगरून गेला. तारीख २६ मे रोजीं रात्रीं आपले कानांत बोलणारा हाच इसम, अशी त्याची आतां चालचाल खात्री झाली तो रागानें एकदम लाल झाला व पटकन् मागें वळून दातओठ खाऊन मोठ्या त्वेषानें त्यानें आमच्या वकीलसाहेबाची मानगुटी धरून " तूच रे तो चोर !" असें मोठ्यानें ओरडला. शिपायी जवळ उभे होतेच त्यांनीं मोठ्या शिकस्तीनें त्या ह्मातान्याच्या कचाटींतून बॅरिस्टरसाहेबास सोडविलें. नंतर तो ह्मणाला " सरकार माझी चूक झाली जानचा पाटलाच्या मुलानें ती टोपी घातल्यामुळे मला भूल पडली, पण आतां अगदीं खात्रीनें सांगतो कीं, मला लुटणारा चोर हाच ! ( मॅजिस्ट्रेटाकडे वळून ) वकीलसाहेब ! नामतर मोठ्या शिताफीनें केलें

होतेंत, पण शेवटीं सापडलेत ! मीतरी त्या वेळीं तुला सांगितलेंच होतें कीं, वच्चाजी तुला तुरुंगात घालीन तरच शिवलाल नावाचा होईन ह्मणून !"

आमचे बॅरिस्टरसाहेब कोर्टाकडे वळून ह्मणाले "मी नुकतेंच दयाळु कोर्टाला कळविलें आहे कीं, या शेटजींला खरोखर लुटलें कुणी, याची याना बरोबर माहिती ना–"

शिवलालशेट मध्येंच ओरडून ह्मणाले " नाहीं नाहीं ! मला अगदीं खात्रीने पक्केपणीं आठवते ( कोर्टाकडे वळून ) मी अगदी पाहिजे तसली शपथ घे—"

परंतु त्याचें बोलणें पुरें ऐकून न घेता जज्जसाहेब ह्मणाले " शेटजी, आता पुरे करा तुमच्या साक्षींची आता जास्त जरुरी नाहीं तुह्माला खरोखर लुटलें कुणी याची तुह्माला माहिती नाहीं, असें जें आताच या बॅरिस्टरनी सांगितलें तेंच खरें तुह्मी जरा भावावला आहा व ज्याचे डोक्यात ती टोपी दिसेल तोच तुह्माला चोर दिसू लागला आहे."

शिवलालशेट बोलण्याचा प्रयत्न करित होते परंतु शिपायानें त्याला बाहेर नेलें

जानवा पाटलाचा मुलगा सुटला आमच्या बॅरिस्टरसाहेबाची चोहोंकडे कीर्ति पसरली त्याना कामे फार मिळू लागलीं व कांहीं दिवसानीं नगरात ते पहिल्या प्रतीचे वकील बनले

* * * * * *

चोरीनतर सुमारें ६ महिन्यानी शिवलालशेट एके दिवशी सकाळीं निजून उठून बाहेर ओटीवर येतात तों एक काळी पिशवी तेथें पडलेली त्याच्या नजरेस पडली ती उघडून पहातात तों आत बरोबर एक हजार रुपये होते ती तेथें कोणी व कधीं ठेविली, याबद्दल त्यानीं बराच तपास केला, परंतु कांहीं थाग लागेना शेटजीच्या हजार रुपयापैकी एक रुपयाहि कमी झाला नव्हता, इतकेंच नव्हे तर ती पिशवी मुळीं उघडलीसुद्धा नव्हती वकीलसाहेबानी ती त्या रात्रीं घरीं आणल्यापासूनच त्याचें मन त्यास खाऊ लागलें होते सरस्वतीबाईसतर ही गोष्ट मुळी समजलीदेखील नव्हती !

प्रिय वाचक हो! " ती दाढी व टोपी माझ्या कपाटात असल्याबद्दलची मला आठवण होऊन तो दुष्ट विचार प्रथमत माझे डोक्यात आला," असें आमच्या गणपतरावजींचें ह्मणणें आहे व या कृत्याबद्दल त्याना आपण क्षमा करावी, इतकीच त्याच्यातर्फे आमची तुह्माला विनंति आहे.

दुष्कृतिसाधनदर्शन बहुधा चोखाळितेच पापपथ,
सुज्ञहि चळतो पळ तो, ढळतो सुपथांतुनी सुचित्तरथ

# मोहन–तारा.

विक्रमादित्य या नांवाचा एक राजा होता त्याला तारा नावाची एकुलती एक कन्या होती. तिचें मन मोहनावर जडलें. मोहनाचा बाप शान्तशील हा राजाचा फार विश्वासू सेनापति होता. तो व त्याची पत्नी सत्यवती, मोहन लहान असताच मरण पावल्यामुळें मोहनाचें पालनपोषण राजालाच करावे लागलें. राजकन्या तारा व मोहन हीं एकाच ठिकाणीं वाढलीं असल्यामुळें त्याचें एकमेकावर अतिशय प्रेम जडलें होतें, इतकें कीं, त्यानीं परस्पराला वरण्याविषयीं आणाभाकाहि घेतल्या होत्या तारा उपवर होताच विक्रमादित्यानें राजपुत्र रिपुंजय याच्याशीं तिचा विवाह करण्याचा विचार चालविला. तारेला ही गोष्ट कळताच ती फारच खिन्न व उदासीन झाली, व यामुळे बरेच वेळा तिचें मोहनाशी चमत्कारिक वर्तन झाले. परतु मोहनाला त्याचें वास्तविक कारण न समजून राजकन्या आपला धिःकार करित आहे असा त्यानें आपल्या मनाचा समज करून घेतला व एकाएकीं आशेचा भग झाल्यामुळें त्याच्याठायी वैराग्य उत्पन्न होऊन तो अरण्यात तपाला चालता झाला इकडे कर्मधर्म सयोगानें राजा एकाएकीं मरण पावला व तारा सर्व राज्याची अधिकारिणी झाली. पुढें तारेने मोहनाचा शोध करून परत येण्याविषयीं त्याला बोलावणे पाठविलें. त्याला उत्तर ह्मणून मोहनानें लिहिलेली प्रेमपत्रिका, तिचें तारेकडून गेलेलें उत्तर व शेवटीं त्या दोघाचा सगम, इतका प्रसग पुढील कवितेत 'मदाक्राता' वृत्तात वर्णिला आहे

## प्रेमपत्रिका.

स्त्रीजातीची निरुपम खरी ईश्वरी होशि लोकीं,
चातुर्याची असासि खनि तू, जाणते हे त्रिलोकीं;
लावण्याची ललित लतिका, सत्य तू कोमला गे!
श्री लीना त्वचरण-कमला-सेवनीं पूर्ण जागे १

ती कोठें तू गुणकुलवती मानिनी राजकन्या,
पाहोनी यद्वदन-कमला लाजते गोत्रजन्या,
कोठें मी हा अधन भणगप्राय कान्तारवासी,
त्त्तातानें करुण मतिनें पुष्ट केलें जयासी ! २

नाना दासी तुज रमविती बोलुनी रम्य वाचा,
प्रेमोल्लासें नृपगण तुला सेविती नित्य साचा;
लीलांमध्यें निरत असशी सुंदरी! सर्वदा गे!
या दीनाची स्मृति तुज कशी जाहली आज सांगे. ३

पूर्वी ज्यातें अवगणुनिया पूर्ण धिःकार केला!
तत्स्नेहा का गुणवति! तुझा जीव आता भुकेला?
होतों जेव्हां निकट वदशी शब्द तेव्हां न कांहीं!
आता का गे प्रणयसरसा धाडिली पत्रिका ही? ४

धिःकारोनी प्रणयविषया, जिंकुनी वासनास,
वैराग्यातें धरुनि वरिला घोर कान्तारवास,
वाटे सारा विषमय खरा हा पसारा जयाशी
का गे! त्याला प्रणयवचनीं गोंविशी प्रेमपाशी? ५

होतों जेव्हां तुजजवळ मी काम हा दुर्निवार
दुर्वृत्तात्मा मजवरि करी तीव्र शस्त्रप्रहार;
सोडोनीया म्हणुनि नगरा सेविलें काननातें,
की याद्योगें स्मरण न तुझें अल्प होओ मनातें ६

आलों जेव्हां गमनसमयीं घ्यावया मी निरोप,
तेव्हां का गे! सुमति ! वरिली स्तब्धता तू उमोप ?
औदासिन्य प्रगट करुनी तुच्छ केलेंस मातें !
आता का गे ! मधुर वचनीं मोहिशी या जनातें ? ७

धिःकारोनी विषमय खरा संसृतीचा पसारा
ब्रह्मानंदीं मुनिगण सदा लीन हा होय सारा,
बाले ! येथें कधिं नच करी पंचबाण प्रवेश,
नाहीं नाहीं प्रणयविषया योग्य हा अल्प देश ८

झाली याची तनु सुकुनिया काष्ठशी, कृष्ण वर्ण,
वित्तक्षोभा हरुनि पठती हे सदा वेदवर्ण,
प्राशोनीया मधुर सलिला, सेविती कंदमूला,
आहे सारें अनुचित खरें स्थान हें आत्मभूला. ९

वैराग्याचें व्रत कठिण हे साध्य व्हावें मलाही
यासाठीं मीं वनवसति ही सेविली शीघ्र पाहीं;
धाडोनीया प्रणयलिखिता विघ्न केलेंस का गे !
आहे पीडाविमुखहृदया योग्य हें काय सांगें ? १०

सत्कुल्याचें सदन, गुणवान्, धर्मसा धर्मशील,
सद्वृत्तात्मा, जनक मम तो शान्तधी, शान्तशील,
पृथ्वी ज्याच्या अनुपम यशें शुभ्र संपूर्ण झाली,
लोकीं, त्याच्यासम कधिंतरी जन्मती वीरशाली! ११

स्वतातातें रणशिरिं सदा जाहला तो सहाय,
त्यायोगानें बहु निजमनीं तोषला भूपराय,
आपत्कालीं नरपतिस तो होय साहाय्यकर्ता,
ठेवी त्याचा म्हणुनि सुमती ! थोर सन्मान भर्ता १२

दुर्दैवानें जननसमयीं होय नष्टा सुमाता !
त्यायोगानें अतितम अहा ! जाहला शोक ताता,
दुःखावेगें त्यजुनि मजला होय तो स्वर्गगामी,
हा हा ! बाले ! शिशुपणिं असा जाहलों पोरका मी ! १३

मानोनीयां मग निज-सुतातुल्य मातें नृपाळें
चित्तीं प्रेमा बहु धरुनियां पाळिलें सत्य बाले!
केली तेव्हा उपकृति महाथोर जी जी नृपानें,
हा हा! मातें कृपणमतितें फेडवे ती कशानें! १४

केली क्रीडा बहु शिशुपणापासुनी एक जागीं,
सर्वावस्थान्तरिं तव सदा जाहलों मी विभागी;
झालों तेणें प्रिय बहुपरी सुंदरी! एकमेकां,
होता मातें असुख करिशी तूंहि बाष्पांबुसेका! १५

बाले! तेव्हा प्रगट करिशी तूंतडित्प्राय लीला,
मुग्धा वाचा वदुनि हरिशी सर्वदु खावलीला,
किंचित्किंचित्स्मितविकसिता फुल्लवक्त्राबुजा ते,
त्या कालींची प्रणय मधुरा आठवे मूर्ति मातें! १६

त्या मूर्तीतें हृदिं शिशुपणापासुनी सांठवीलें,
आपत्कालीं तिज,-न इतरा दैवता,-आठवीलें;
केलें तीचें दिवसरजनी ध्यान मीं भक्तिभावें,
जोडाया सत्कृति मज तिनें सर्वदा धैर्य द्यावें. १७

या देहाची खचित सुमती! तूं तदा आत्मभूता
ज्योत्स्नाधारासम सुखकरा लोचनाते प्रभूता,
केलें नाहीं अनुमतिविना मी तुझ्या कार्य कांहीं,
त्वत्तेजानें गमत मजला व्याप दिग्भाग दाही. १८

आह्मा दोघा बघुनि वदती आप्त साश्चर्य सारे
'धन्य ब्रह्मन् निरतिशय हें होय कौशल्य बारे!
जोडा याचा अनुपम तुवा निर्मिला सत्य लोकीं!'
हें ऐकोनी मुदित हृदयीं तात आह्मा विलोकी. १९

बाल्याचे ते सुखकर दिन स्वप्नसे शीघ्र गेले,
देहामध्यें मग रतिवरें आपलें स्थान केलें;
चार्वंगी, तूं रुचिरवदना, पक्वबिंबाधरोष्ठी,
माझ्यासंगें करिशि चतुरे! सर्वदा रम्य गोष्ठी. २०

प्रेमा माझ्यावरि विमल तू ठेविला राजकन्ये !
माझ्यावीणे क्षणभरि पडे चैन तूतें न धन्ये !
जाता कोठे, पतिविण जशी चक्रवाकी विचारी
होशी तैशी सुमति ! हृदयी घावरी तूंहि भारी ! २१

जेव्हा पृथ्वी अमृतकिरणीं सारवी चद्रमा हे,
रम्योद्यानी कुसुम-सुरभी वात आमद वाहे,
कारजाचे हिमजल यदा देत अत्यन्त तोष,
प्रेमालापें किति दवडिले सूभ्रु ! रम्य प्रदोष ! २२

त्या प्रेमाचा सुरुचिर असा योग वेगें घडावा,
तैसा माझा हृदयगत तो हेतु सिद्धीस जावा,
ऐसें ईशा सविनय तदा प्रार्थि मी सर्वकाल,
हा हा ! झालें परि विफल तें पातला वक्र काल ! २३

प्रेमा तेव्हा मजवरि तुवा आपला व्यक्त केला,
आशापाशी दृढ जखडुनी जीव हा बाधियेला,
प्रेमोल्लासें मज वरुनिया धन्य तू या जनाते
ताताज्ञेनें करशिल अशी लालसा मन्मनातें ! २४

एके कालीं वनिं विहरता एकली, पजराते
भगोनीया भयकर महाव्याघ्र दुष्टाभिचारें
एकाएकी मुख पसरुनी धावला तो कृतान्त
त्या दुष्टाते बघुनि तुजला आलि मूर्च्छा नितान्त ! २५

त्याकाली मी जवळ नसतो दैवयोगे सुगात्री !
होती सारी खचित विफलालोक ही भूतधात्री !
शृगाराची सुभग तटिनी शुष्क होती क्षणात !
स्त्रीजातीचें स्मृतिगत शिरोरत्न होतें जनात ! २६

किंकाळी जी करुणमय तू फोडिली ऐकता ती
आलों वेगें निकट सुमती ! घेउनी खड्ग हाती,
क्रोधानें जो तुजवरि महाक्रूर तो झेंप घाली
धावोनी मी निज सदसिनें पाडिलें त्यास खालीं. २७

ज्याची काया बघुनि हृदयीं मृत्युनें त्रस्त व्हावें,
पोटामध्ये शिरुनि असि तो व्याघ्र पंचत्व पावे,
सिंचोनीया जल तनुवरी घालिता शीत वात,
होशी ती तू भयविगलिता मोहमुक्ता क्षणांत २८

ठेवोनीया उरिं निज शिरा मन्मुखासक्तदृष्टि,
केली तेव्हा मजवरि तुवा वाक्सुधासारवृष्टि;
स्वप्रेमाविष्करण करिशी तेधवा तू विचित्र,
मातें त्याचें अजुनि दिसते सुंदरी! स्पष्ट चित्र २९

तेव्हा मातें स्खलित–वचना शब्द जे बोललीस
बाले! त्याचा विसर कधिंही होइना मन्मतीस।
'केले मातें अतुल कृतिनें सत्य जें प्राण दान
ते हे तूतें विनत मतिनें अर्पिलें आज जाण!' ३०

ब्रह्मानंदीं तव वचन हे ऐकुनी मग्न झालों,
पाहोनीयां तव सदयता अन्तरीं फार धालों;
त्या सौख्यातें अधिक गणिलें दिव्य सौख्याहिपेक्षा,
नाहीं तेव्हा धरिलि दुसरी मी कशाची अपेक्षा ३१

दुर्दैवाचें अवचित परी कृष्णवर्णाभ्र आलें,
मत्सौख्याचे रविकिरण ते सर्वथा नष्ट झाले;
वंचोनीया शरदिं तृषिता चातका वारिवाह
गेला तैसा तव सुकुनिया प्रेमवारि–प्रवाह! ३२

होशी पूर्वी परम विकला मी जरा दूर जातां,
पाहोनीया मग करिशि तू वाकुडी भ्रू सुजाता!
एकाएकीं हृदय फिरलें ते कशानें कळेना!
आशाभंगोद्भव निज मनस्तापही आकळेना ३३

मिथ्याप्रेम प्रगट करुनी मोहिलें मन्मनातें,
कापट्यानें परि फसविलें शेवटी सत्य मातें;
स्त्रीजाती ही कपटचतुरा होय मोठी जगांत,
विश्वस्तातें फसवुनि सदा लोटिते संकटात. ३४

होते पूर्वी मजवरि खरें चित्त जे प्रेमपूर्ण
कैसें अन्यावरि तरि तुवा योजिलें तेंच तूर्ण!
आहे लोकीं खरि युवतिची चचला प्रेमवृत्ति,
त्यापासोनी ह्मणुनि निपजे साधुलोका निवृत्ति! ३५

केल्या पूर्वी मजसह किती सुदरी! आणभाका
एकाएकीं विसर पडला हाय! त्याचा तुला का?
होतें पूर्वी अमृतमय जें चित्त सपूर्ण बाले!
हा! हा! तेव्हा गरलमय तें जाहले वक्र-काले! ३६

जाणोनीया अधन मजला, केलि माझी उपेक्षा,
हा! हा! झाली कशितरि तुला वैभवाची अपेक्षा!
आहे का गे! सुमति! विमल प्रेम विक्रेय वस्तु?
बाले! आता कितितरि वदू 'हन्त तत्सर्वमस्तु' ३७

झझावातें नयन-सुभगा मेघमाला नभःस्था
झाली तैशी हृदयगत ती मत्सुखाशा निरस्ता,
शोकावेगें मम हृदय हें तेधवा दग्ध झाले,
का दुर्भाग्या मज नच तदा ग्रासिलें वक्रकाले? ३८

झाला तेव्हा मजशि तिमिराकीर्ण दिग्भाग सारा,
मर्मोच्छेदी विषमय खरा ससृतीचा पसारा,
वाटे मोठा असुखकर हा देहही भारभूत,
स्त्रीजातीचा मम मनिं तिरस्कार आला प्रभूत ३९

'ज्या बालेनें कपट करुनी वचिलें दुष्टभावें,
तीच्यापाशीं न पळभरही सत्य आता वसावें,
भोगायातें असुख जगतीं जन्मलों मी अधन्य!'
आणोनीया निजमनिं असें सेविलें हें अरण्य ४०

पचप्राणा नियमुनि सदा, भक्षुनी वातमात्र,
आत्मारामीं निशिदिनिं लया लावुनी शुष्कगात्र,

जागोजागीं मुनिगण वनीं आचरी हा तपाते,
मानोनीया निज मनि तृणप्राय दुर्वासनातें. ४१

आहे मोठे सुखकर तपोरण्य हें रम्य फार,
जेथेंतेथे वनतरुलता शोभती या अपार;
जागोजागीं फुलुनि कुसुमे तोषवी तत्सुगंध,
सायंकाली श्रमहर असे वाहती वात मंद. ४२

भक्षोनीया मृग खगतती सस्यनीवार मोदें,
मार्गांमध्ये अपगतभया क्रीडती या विनोदें;
सारंगाचे गण विहरती आलवालाबुपायी,
तैशा येथें वनिं विचरती वत्सला वन्य गाई. ४३

येथे सारे मुनिजन तपोनिष्ठ हे ज्ञानराशी,
ब्रह्मानंदामृतरस सदा पाजिती साधकांशी;
बाले! व्हावे अनुपम सुख प्राप्त तें आपणातें,
चित्ती हेतू धरुनि दृढ हा सेविले या वनातें. ४४

दुर्भागी मी परि नृपसुते! जन्मलो सत्य लोकीं,
अतर्ध्यांना स्मर करि सदा विघ्न येथें विलोकीं;
धैर्यानेंही मज न करवे या खलाचा निकार,
आहे लोकी खचित मनुजा दुष्ट हा दुर्निवार ४५

च्छेदोनीया परम दृढ ते पाश दुर्वासनाचे,
लावोनीया लय हरिपदी चिन्तिता ध्यान त्याचे,
एकाएकी दिसत मजला ती तुझी मूर्ति चारु
हा! हा! दैवा प्रबल हृदयक्षोभ हा केवि वारु! ४६

आमोदाने कुसुमितलता व्यापिती भूतलाला,
जागोजागी विलसति अशा रम्य उद्यानमाला,
तेथोनी हे कुसुमसुरभी वाहती वात मंद,
हा! हा! तेणें स्मरत मजला त्वन्मुखोच्छ्वासगंध! ४७

कस्तूरीचा तिलक करुनी भालदेशी सुरेख,
रात्रौ सौधावरि विहरसी सूभ्रु ज्या कालि देख
तेव्हाचें ते वदन मजला आठवे पाहता हा—
बाले! राकापति, मम मना देतसे फार दाहा! ४८

आकाशस्था नयन–सुभगा ज्या असख्यात तारा,
त्यामध्ये तू द्युतिवलयिता क्रीडसी रम्य **तारा**!
आनदानें बघत तिजला मी निशाकाल लोटी,
तत्तेजाने दिपतिल नभी सत्य चद्रार्क-कोटी! ४९

बाले! जेव्हा निरसुनि निशा होय रम्य प्रभात,
आनदाने तरुवरि अहा! कोकिला गीत गात,
**तारा तारा** मधुर रव हा ये तदा स्पष्ट कानी,
अन्तर्मोहाकुल मग फिरें भ्रान्त मी घोर रानी! ५०

वाहे एक द्रुमततितुनी निर्झर स्वच्छवारी,
हा! हा! ज्याचे मधुर सलिल क्लेशसतान वारी,
तत्तीरीं मी बसुनि दवडी कौमुदीवत्प्रदोष,
**तारा तारा** अविरत असा तो करी फार घोष. ५१

**तारा** येथें निकट दिसते–तेंवि दूर प्रदेशी,
आकाशस्था गिरितटगता तीच **तारा** सुकेशी!
**तारा** नेत्रान्तरि वसतसे, ती हृदस्थाहि **तारा**!
सारा **तारा**मय दिसतसे हा जगाचा पसारा! ५२

विघ्नें ऐशीं बहुत करिशी सर्वदा तू तपाला,
वैराग्यातें खचित मुकलों काय मी हा कपाला!
ज्यासाठीं मीं त्यजुनि नगरा सेविलें काननातें,
वैराग्याचें व्रत मम खरें केविं सिद्धीस जातें! ५३

झाली आहे जरि मम दशा सर्वथा दीनवाणी,
चित्तक्षोभें अहह! वदलों काय ही दीन वाणी!

केला आता दृढतर मनीं हाच निर्धार पाहीं,
दुष्टाशेला वश कधिं पुन्हा सत्य होणार नाहीं! ५४

ज्या दुष्टानें अनुचित दशा आणिली स्पष्ट मातें,
त्या कामातें नियमुनि निजाधीन ठेवीन त्यातें,
धैर्योत्साहें नियमुनि मन क्षोभ आतां विकारी,
वैराग्याचें व्रत अनुदिनीं सेवितो सौख्यकारी. ५५

चित्तीं ज्याचा अनुभव खरा लेशही ज्यास आला,
सांगे होई पुनरपि कसा लुब्ध तो वासनाला!
आता वेगें मजविषयिंचा सर्वही छंद सोडी,
प्राणान्तींही सुमति! निज हा मी न निर्धार मोडीं! ५६

वाचोनी हें लिखित तुजला कोप येईल फार,
येओ येओ बहु, मज नको अल्प त्याचा विचार!
राहो चित्तीं न मजविषयीं अल्प राग-प्रवृत्ति,
होओ द्वेषाकुल कलुषिता सुंदरी! चित्तवृत्ति! ५७

झालें जें जें, विसर तुजला पूर्ण त्याचा पडावा,
माझा तूतें गुणवति! तिरस्कार अत्यंत यावा;
एकाएकीं तुज फसविलें सत्य ज्या वंचकानें,
ऐकें त्याचें नच कधिं पुन्हा नावही सत्य कानें! ५८

आह्मामध्ये शतगुणित हें होउदे अन्तराल,
जागोजागी क्षितिवर मधें आड येओ कराल;
किंवा व्यापो उदधि सलिलें सर्व हा प्रान्त साचा,
कीं ज्यायोगें पुनरपि न ये योग तो दर्शनाचा! ५९

देओ तूतें शिव शिव सदा, नाशुनी आपदांतें,
सेवो सर्वा प्रणतवसुधानाथराजी पदांतें,
आनंदानें वसुमतिवरी राज्य अक्षय्य भोगीं,
तारे! तूतें परि न कधिं हा आठवो दीन योगी! ६०

## उत्तर.

प्रेमोल्हासें लिखित मज जें धाडिलें मोहनानें
मर्मोद्भेदी त्वरित हरिलें सर्वही शल्य त्यानें;
दीनावस्था विरहजनिता वाचिता हाय नाथ!
दु खावेगें हृदय भरुनी जातसे हे अनाथ! ६१

या हृत्कोशीं वहु जपुनि तो ठेविला प्रेमलेख,
देई धीरा विधुरहृदया एकला तोच देख,
जेव्हाजेव्हा विरहजनिता यातना होय मोठी,
वाचोनी तो फिरुनिफिरुनी हाय! मी काल लोटी! ६२

त्वन्मूर्ता जी हृदिं शिशुपणीं बिंबली एकवार,
तेथें रात्रदिन करितसे ती मनोज्ञा विहार!
मत्प्रेमातें क्षितितलिं खरी काय ती एक जागा!
तध्यानीं मी दिवसरजनी कामुकी सानुरागा ६३

प्रात कालीं विकसित करी भानु अंभोजिनीतें,
देशी तेव्हां वहुपरि तसा तूहि आनंद ईतें,
सोडोनीया क्षणभरि मला दूर जाताच कोठें,
दु खावेगें विकल हृदय भ्रान्त हे होय मोठें! ६४

आहे माझें तुजशिं अचल प्रेम हें पूर्ण ठावें,
सोडोनीया मग मज कसें वाटलें दूर जावें?
प्रेमानें मीं नरवर! तुला अर्पिला सत्य काय,
हा हा! त्याचा विसर पडला त्वन्मना सांग काय? ६५

नाथा! कैसा तव अविरतस्यंदि तो प्रेमपूर
एकाएकीं स्मृतिगत असा होय अत्यन्त दूर?
होशी तेव्हां विकल वहु तू पाहुनी खिन्न मातें,
आतां कैसें मरणशरणा टाकिलें या जनातें! ६६

आहे माझी विदित तुजला निर्मला चित्तवृत्ति,
झाली कैशी मग तव मनीं संशयाची प्रवृत्ति!
नाहीं माझा गमनसमयीं घेतला तू निरोप,
केला कां हा मजवरि असा व्यर्थ अत्यन्त कोप! ६७

ठावें आहे हृदय मजला ते तुझें सानुराग,
एकाएकीं मजवरि असा काय होईल राग!
वाटे कोणीं कपटविधिनें **मोहना**! हाय तूर्ण,
केलें आहे कलुषित तुझें चित्त तें प्रेमपूर्ण ६८

प्रेमाकांक्षी हृदय मदनें आमुचें एक केलें,
अन्यप्रेमा कधिंहि नच तें होय आता भुकेलें!
यावत्काल प्रियतम! वसे प्राण हा सत्य देहीं,
स्वामी याचा तुजविण अहा! होइना अन्य-देही! ६९

प्राणापेक्षा अधिक गणिलें ज्यास मी एकवार
त्याच्याशीं हा करिन कशि मी हाय! नीच प्रकार!
नाहीं नाहीं, प्रिय तुजविणें अन्य कोणी विलोकीं।
या देहाचा खचित असशी जीवनोपाय लोकीं! ७०

वाहे माझा विमल किति हा प्रेमगंगौघ याची
नाहीं नाहीं, अजुनि तुजला कल्पना पूर्ण साची!
होती तेव्हां जरि तुज खरी मत्परीक्षाहि अल्प,
नाथा! तूतें न मजविषयीं स्वल्प येता विकल्प! ७१

ते सौख्याचे दिवस सरुनी पातला वक्र-काल,
एकाएकी तव मनिं शिरे ही कुशंका विशाल!
त्वच्चित्तातें विषम गमली सर्वही कामलीला,
भोगायातें असुख मजला टाकिलें एकलीला! ७२

प्राणेशा! मी जरि अनुभवी श्रेष्ठ राज्ञीपदातें
भूपालाचे गण निशिदिनीं सेविती मत्पदांतें—

नाहीं नाहीं, तरि मम मना अल्पही सौख्य नाहीं ।
भेदी मर्मा विरहजनिता यातना सर्वदाही । ७३

जेव्हां कोपें त्यजुनि मजला मेविलें तू वनातें,
झालें सारें विजनविपिनप्राय हे विश्व मातें ।
गेलें वेगें तुजसह मला सोडुनी सौख्य सर्व ।
आशाभंगोद्भव पसरलें सर्वत दु खपर्व । ७४

मत्सौख्याचें सदन हृदयस्वामि ! तू दूर जाता
वाटे कैसा विविधविषयास्वाद हा गोड आता ?
ईशप्राप्तिस्तव वनिं सदा सेविसी तू तपातें,
नाथप्राप्तिस्तव नृपगृही आचरीं मी तयातें । ७५

पुष्पामोद–भ्रमरविरुतामागुनी हा वसन्त
आला भूमीवरि, गमत जो भाग्यवन्ता पसन्त,
या मच्चित्ता विरहविधुरा वाटलो तो कृतान्त,
वेळोवेळीं विविध कृतिंनी ताप देई नितान्त. ७६

सायंकाळी स्फुटितकुसुमामोदि तो वात आला,
संतप्ताची निरसन करी सर्व संताप–माला,
केलें त्यानें परि मम मनी हा ! स्मरोद्दीपनातें,
आता कैशी युगशतसमा दीर्घ ही रात्रि जाते । ७७

शय्या येथें कुसुमरचिता रम्य ही सज्ज केली,
हा हा ! नाथा ! परि तुजविणें सर्व ती व्यर्थ गेली ।
झाली काया मदनदहनोद्दामतापाकुला ही,
हा हा ! कैशी सुकुनि मग ही शुष्क होणार नाहीं ! ७८

रात्रौ येथे ललित ललना मांडिती नृत्यलीला,
हा हा ! देई परि मज खरी तीव्र दु खावलीला !
पूर्वी रात्रौ क्षितितलिं करी जो सुधासार–वृष्टि,
का तो आता हिमकर करीं जाळि ही जीवसृष्टि ! ७९

क्रीडाशैलावरि उपवनी जो लताकुंज आहे,
सायंकाली सुखकर असा ज्यास्थली वायु वाहे,
केल्या जेथें वसुनि तुजशी रम्य विश्रंभवार्ता,
आता तेथे हृदय फुटुनी होय मी फार आर्ता ! ८०

नाथा ! तूतें मम सविनया हीच विज्ञप्ति आता,
येओनीया झडकरि मला होइ तू प्राणदाता !
सामंताचे गण निशिदिनी सेविती यत्पदासी,
ती मी वेगे तवपदरता सत्य होईन दासी ! ८१

चित्तक्षोभें अशिव अथवा बोललें हाय काय !
दुःखावेगें त्वरित जरि हा नष्ट होईल काय
नाहीं नाहीं, तरि तव तपा आड येणार नाहीं !
आनंदाने व्रतनिरत तू काननी सत्य राही ! ८२

त्रैलोक्याचा पति तुजवरी तो कृपादृष्टि ठेवो,
तैसे वेगे तव सकलही हेतु सिद्धीस नेओ !
चित्सौख्याचा अनुभव खरा घेउनी प्रेमभावें,
प्राणान्तीं तू विमलकृतिंनी ब्रम्हसायुज्य पावें ! ८३

झाली माझी तनु कृशतमा दीप्तकामानलानें,
त्यामध्येंही परम छळिलें माधवानें खलानें !
आता माझा मरणशरण प्राण जाईल जेव्हां
या दुःखाचा खचित सदया ! अन्त होईल तेव्हां ! ८४

आले माझें मरण जवळी यांत शंका न कांहीं,
हा हा ! त्याचा मज तिळभरी **मोहना** ! खेद नाहीं !
दुर्वार्ता ही सहन करण्या येउदे धैर्य तूतें
वेळोवेळी मम सविनया प्रार्थना ही प्रभूतें ! ८५

## संगम.

झाला संध्यासमय, भगवान् भानु अस्तास जात,
बिंबोनी तत्कर दिसतसे रम्य शोभा जलात;
वाहे वारा कुसुमसुरभी तापहारी सुरेख,
तों त्याला तो प्रणयवतिचा पोंचला प्रेमलेख. ८६

आनंदानें फिरुनिफिरुनी लेख तो पूर्ण वाची
झाली तेव्हा अतितर मनोवृत्ति तल्लीन त्याची;
पाहोनी तें विनयवतिचें प्रेम अत्यंत शुद्ध,
झाला वेगें निरतिशय तत्कंठ बाष्पावरुद्ध. ८७

जागोजागीं पुसट दिसला लेख तो अश्रुपातें,
तें पाहोनी बहुत गमले क्लेश तेव्हा तयातें,
मुग्धाक्षीची विरहजनिता यातना प्राणहारी,
वाचोनीया अविरत तदा वर्षला बाष्पवारी ८८

दुःखावेगें प्रगट वदला तो तदा "हाय हाय !
पंकामध्यें समजुनि खरी लोटिली दीन गाय,
माझ्यासाठीं विमलचरिता क्लेश अत्यंत भोगी,
रानोरानीं भ्रमण करितों मी तपोभ्रष्ट योगी! ८९

दुष्टात्मा मी बहुपरि तिला जाहलों दुःखदाता,
माझ्यासाठीं प्रणयसरिता शुष्क होईल आता,
हा! हा! कोठें ललितललनारत्नभूता असेल,
केव्हा आता नयनसुखदा चंद्रिका ती दिसेल!" ९०

गाढोत्कंठा तृषितनयना प्राणनाथा पहात
होती तेथें वरतनु उभी ती लतामंडपात,
वाणी ज्याची परिसुनि अशी ती तडित्प्राय येई,
प्रेमोल्लासें दृढ निजकरीं त्यास आश्लेष देई! ९१

बोले "झालों मुनिसम तपें धन्य या लोकिं मीही,
धावोनीया मरणसमयीं येत सजीवनी ही।
एकाएकीं सुचरितफलें येइ अंधास दृष्टि,
किंवा रानीं तृषित फिरतां होय पीयूष-वृष्टि! ९२

केलें येथें वसुनि तप जें काननीं या विलोकी,
झालें त्याचें अनुपम फल प्राप्त हें याच लोकीं;
मातें तू ही खचित गमसी सिद्धि साक्षात् तयाची!
त्वत्प्राप्तीनें सखि! निरसली आपदा सर्व याची! ९३

सोडोनीया नरपतिसुते! दिव्य ती राजधानी,
या दुर्भाग्या हुडकित अहा! केविं आलीस रानीं!
निर्द्रव्याचें गृह सुरलता काय शोधीत आली!
एकाएकीं परमपतिता स्वर्धुनी प्राप्त झाली! ९४

सायंकालीं वनिं परभृता पंचमालाप घेई,
संतापातें हरुनि सकला-तोष अत्यन्त देई;
आता कोठें लपुनि बसली-मूक का पूर्ण झाली!
ऐकोनीयां तव कलरवा दूर हा हा पळाली! ९५

बाले! येथें जवळ नसतां तू सखी प्राणभूता
हा हा! दीर्घा युगशतसमा रात्र होई प्रभूता,
गे! आतांही तशिच सुमती! दीर्घ होईल का ही!
ज्या योगानें अविरतसुखा विघ्न येणार नाहीं!" ९६

तें ऐकोनी विमलचरिता जोडुनी शीघ्र पाणी
प्राणेशातें मग सविनया बोलली गोड वाणी —
"आलें येथें अनुमतिविना सत्य मी प्राणनाथा!
याची आता झडकरि करीं तू क्षमा या अनाथा! ९७

आलें होतें असुखकर जें अभ्र मध्यतरीं तें
मद्भाग्यानें अजि निरसलें, ये दया श्रीहरीते!

ठावी नाहीं विरहजनिता यातना अल्प ज्याला
या सौख्याची मग कशितरी कल्पना येइ त्याला! ९८

हा हा! आज प्रभुवरवरें सपला हा वियोग,
जाणों झाला बहुत दिवशीं रोहिणीचंद्रयोग!
नाथा! आतां मम सविनया हीच विज्ञप्ति देवा,
त्वत्पादांची मम करिं घडो सर्वदा पूर्ण सेवा! ९९

कंदर्पाचा प्रियतम सुहृत् पातला पुष्पकाल
सृष्टिस्त्री ही परम नटली नेसुनी रम्य शाल
घालोनीया सुखकर गळां चारुपुष्पोपहार
रम्योद्यानीं करु बहुपरी प्राणनाथा! विहार!" १००



# अंक ४ था.

## प्रवेश १ ला.

[ स्थळ—पडुप्रासाद कृपी व अश्वत्थामा प्रवेश करितात. ]

**कृपी**—अजून अश्वत्थामा आला नाहीं ! याला काय करावं ? सदान्कदा आपला याचा पाय वाड्यात तिकडूनहि घरी असायचं नाहीं. नेहमी राजकुमाराना घेऊन आपलं क्रीडोद्यानात जायचं इथ मला एकटीला करमत नाहीं. इथ दासदासी पुष्कळ आहेत, पण त्याच्याशी मी कसलं हितगुज करूं ? ( इतक्यात अलंकारानी विभूषित होऊन अश्वत्थामा येतो त्यास दुरुन पाहून) कोण दुर्योधन ! छे, हातर माझाच लाडका अश्वत्थ ! कारे अश्वत्था ! आज अगदी नटूनथटूनसा आला आहेस ? दृष्ट काढली पाहिजे बाई आज माझ्या बाबाची ! मला वाटलं कीं दुर्योधन नाहींतर दुःशासन आला आहे !

**अश्वत्थामा**—इतका ओळखू येईनासा दिसतो मी ?

**कृपी**—हो हो, इतका ओळखू येईनासा दिसलास बाळा ! हा पोषाख आणि हे अलंकार कुणीं दिले तुला ?

**अश्वत्थामा**—दुर्योधनानें

**कृपी**—ते का ?

**अश्वत्थामा**—मी त्याला कांहीं नवनव्या अस्त्राचे प्रयोग शिकविले ह्मणून.

**कृपी**—पण तू का घेतलेस हे ? उद्या राजवाड्यातून कांहीं बोभाटा आला ह्मणजे ?

**अश्वत्थामा**—मी हे घेतच नव्हतो, पण त्याने मला आपला बंधू ह्मणून बळेंच हे माझ्या अंगावर घातले, तेव्हा माझा नाइलाज झाला

**कृपी**—तरीच, तू आताशा थोरल्या वाड्याकडे फार असतोस !

**अश्वत्थामा**—दुर्योधनासारखा दिलदार आणि उदार सगळ्या राजपुत्रात दुसरा नाहीं.

**कृपी**—पण कायरे, शिकण्यासवरण्यात राजकुमारात कोण हुशार आहे ?

**अश्वत्थामा**—अग, अमुकच ह्मणून कसें सांगता येईल ! जो तो आपआपल्या परीनें हुशारच आहे

**कृपी**—पण तिकडूनतर नेहमीं अर्जुनाची प्रशंसा होत असतेना ? आणि मग तू असें कसें ह्मणतोस ?

**अश्वत्थामा**—अग, अर्जुनाच्या संबधानें ताताचा थोडा पक्षपात आहे, असें दुर्योधनकर्णादि मडळी नेहमी ह्मणत असतात, आणि त्याचें हे ह्मणणे अगदीच खोटे नाही, असे मलाहि पण वाटू लागलें आहे आता.

**कृपी**—ह्मणजे! परवाच तुलादिखील नाहीका सागायच झाल, की, अर्जुन फार बुद्धिवान् आहे, त्याच्याशी ऐक्य ठेवून अत्यत प्रेमान आणि स्नेहान वागत जा ह्मणून

**अश्वत्थामा**—हो नाहीं कुणी ह्मटले! अग तो बुद्धिवान् आहे खरा, पण जरासा गर्विष्ठ आहे

**कृपी**—अरे, पण काल तूच ह्मणत होतासना, कीं, अर्जुनाइतकी तिकडच्यावर कुणाचीहि भक्ति नाहीं ह्मणून! आणि काल गगेवर स्नानाला जाण झाल आणि तिथ सुसरीन पायाची पोटरी धरली तेव्हा त्यानच पाण्यात बाण टाकून सुसरीला वेध करुन तिच्यापासून तिकडची मुक्तता केली आणि प्राण वाचविले, आणि त्यामुळच त्याच्यावर प्रसन्न होऊन त्याला ब्रह्मशिर अस्त्र द्यायच झाल, आणि मग आजच का अस ह्मणतोस?

**अश्वत्थामा**—अग, असें नव्हे, अर्जुन धनुर्विद्येत सर्वापेक्षा प्रवीण आहे पण इतर राजकुमार इतर विद्येत प्रवीण आहेत बरें पण मला तू काहींतरी थोडें उपाहाराला दे राजकुमाराचें शिक्षण सपल्यामुळें त्याची आता भीष्माचार्य, धृतराष्ट्र, याच्यापुढे परीक्षा व्हायची आहे त्याकरिता जी नवीन रगभूमी निर्माण केली आहे, ती काय पण शृगारली आहे! तात आज तिकडेच गुतले आहेत, आज दिवस आणि नक्षत्र हीं दोन्हींहि चागली आहेत करिता आज भूमि-दैवताची शाती करुन बलिदानें द्यावयाची आहेत, ह्मणून सर्व राजकुमार तिकडे इतक्यात येतील, यासाठी मलाहि तिकडे लौकर गेले पाहिजे तर चल लौकर, उपाहाराला दे पाहू

[ जातात

---

## प्रवेश २ रा.

[ स्थल–रगभूमीजवळचें उपाहारगृह वल्लव प्रवेश करितो ]

**वल्लव**—मनुष्याला भाकरीकरिता चाकरी करावी लागते आणि भिक्षेची झोळी चुकविण्याकरिता पोळी भाजण्यासारखे नादान कामहि पतकरावे लागते ही पोटाची होळी नसती ह्मणजे ती झोळीहि नको होती आणि या पोळीचीहि गरज नव्हती!

पण जोंपर्यंत हें पोट पाठीच्या मागच्या बाजूला चिकटून राहिलें आहे, तोपर्यंत त्याची खोट पडून कसें होणार? या रंगभूमीत इतका रंग चालला आहे, भीष्माचार्य, कृपाचार्य, राजे धृतराष्ट्र, विदुर, कुंती, गांधारी आदिकरून राण्या, पौरस्त्रिया आणि हस्तिनापुरचे सारे नागरिकजन, राजपुत्रांची विद्या कशी काय झाली आहे ते पहाण्याकरितां जमले आहेत पण मी घटकाभर स्वस्थपणानें जाऊन पाहीन ह्मटलें, तर मला कुठें फुरसत आहे! हे दुर्योधन, शकुनीमामा वगैरे कांहीं घोटाळा करवितील ह्मणून अर्जुनानें माझी ह्या उपाहारगृहावर नेमणूक केली आहे इथून मधूनमधून मला काय पहावयास मिळेल तेवढेंच पण मी ह्मणतो, मला जर डोळेच नसते तर अगदी पुढें बसूनतरी मी काय केलें असतें! धृतराष्ट्रराजाला डोळे नाहींत तो बिचारा अगदी पुढें बसला आहे तरी बघणार काय? जवळ बसलेले विदुर जें काय पाहून सांगतील तेंच तो ऐकणार! गांधारीनें जरी डोळे बांधून घेतले आहेत, तरी तिची दृष्टी शाबूत आहे तिच्या मनांत पहावयाचें आलें तर चोरूनतरी एखादवेळ तिला पहातां येईल (इतक्यांत भीमसेन गदा घेऊन येतो.) हे आलेच कोणसे—हेतर भीमदादा!

**भीमसेन**—वल्लवा, वल्लवा! कायरे, तिथें उभा राहून काय करतोस? चल झटपट मला थोडें दूध दे पाहूं! (वल्लव दूध देतो) अरे, यांत शर्करा आणि मसाला घातला आहेस कीं नाहीं?

**वल्लव**—आपल्यास शर्करा जास्त लागते ह्मणून हें निराळें आटवून मसाला विसाला घालून मुद्दाम तयार करून ठेवलें आहे पण अगोदर थोडें फराळाचें घ्यावें. (स्वगत) याला थोडें ह्मटलें तरी दहाजणांचें एकट्यालाच पाहिजे!

**भीमसेन**—अरे, आतांच फराळ उपयोगाचा नाहीं आतां नुसतें दूधच बस्स फराळाला वेळ लागेल (दूध पिऊन झटपट निघून जातो.) माझे आणि दुर्योधनाचे दोन हात झाले, ह्मणजे मग फराळ, मध्ये नाहीं

**वल्लव**—जरा कुठें पहावयास उभें राहिलें, कीं कुणीतरी येतेंच! (पुन खिडकींत तोंड घालून उभा रहातो इतक्यांत दुर्योधन येतो)

**दुर्योधन**—कोण आहे, वल्लव! मला दूध दे पाहूं झटपट. नुसतें दूध हं

**वल्लव**—हं, हें दूध.

**दुर्योधन**—(प्यावयास लागतो, त्यांत साखर नाहींसें पाहून पेला फेंकून देतो) मूर्खा, यांत साखर कुठें आहे?

**वल्लव**—नुसते दूध मागितलें म्हणून दूध दिलें

**दुर्योधन**—अस्सें! नुसते दूध मागितलें म्हणून दूध दिलें, मग पेला कशाला दिलास? नुसतेंच दूध द्यायचें होतेंस मूर्ख नाहीतर!

**वल्लव**—( स्वगत ) याला नुसते दूध कसें द्यायचें? नुसते दूध जमिनीवर पडले आहे ( उघड ) तरमग साखर टाकून देऊं का?

**दुर्योधन**—छे, तिखट टाकून दे! ( एक पात्र घेऊन ) हे यांत काय आहे?

**वल्लव**—ते भीमदादाकरिता अधिक साखर घालून मुद्दाम तापवून ठेविलें आहे

**दुर्योधन**—भीमदादाकरिता का मुद्दाम तयार केलें आहेस? ( पितो. ) मलाहि जास्तच गोड लागते! ( पिऊन वेगानें निघून जातो )

**वल्लव**—जो येतो तो झटपट आणि चटपट! पण मला खटपट पडते तिच्याकडे कोण बघतो! ( दूध तापत ठेवून पुन खिडकीतून पाहूं लागतो, इतक्यात अर्जुन येतो )

**अर्जुन**—वल्लवा, वल्लवा! भीम इथें येऊन दूध घेऊन गेला काय?

**वल्लव**—दूध घेऊन नाहीं गेले, पिऊन गेले!

**अर्जुन**—अरे, भलत्याच वेळी काय थट्टा! केव्हा गेला?

**वल्लव**—दुर्योधनरायाच्या पुढेंच

**अर्जुन**—तर चल, मलाहि दे थोडे नुसतेंच दूध झटपट

**वल्लव**—( स्वगत ) झटपट, झटपट, जो येतो तो झटपट!

**अर्जुन**—काय, पुटपुटतोस काय?

**वल्लव**—काहीं नाहीं, जे येतात त्याना झटपट पाहिजे अमळ लटपट नाहीं सोसत, बरें, पण थोडें फराळाचें देऊं का?

**अर्जुन**—नुसतें दूध

**वल्लव**—नुसते दूध? ते मला साफ देता येत नाहीं पेला आणि दूध दोन्ही देतो पाहिजेतर

**अर्जुन**—अरे, भलत्याच वेळेला विनोद कसला? चल, तुझ्याच म्हणण्याप्रमाणें होऊंदे, पेला आणि दूध दोन्ही आण

**वल्लव**—तसें नव्हे, नुसतें दूध दिलें म्हणून दुर्योधनराय रागावले आणि त्यानीं पेला फेंकून दिला, म्हणून विचारतों, की, नुमते-साधें दूध पाहिजे की साखर आणि मसाला घातलेलें पाहिजे?

**अर्जुन**—चल, कसलेंहि दे पण झटपट दे (वल्लव दूध देतो व अर्जुन पिऊन त्वरेनें निघून जातो )

**वल्लव**—जो येतो तो झटपट झटपट म्हणत वटवट करीतच येतो आणि दूध घटघट पिऊन चालता होतो मला मात्र खटपट पडून माझी लटपट उडते, अन् ही कर्मकटकट चुकत नाहीं ! गीच दणकट आहे म्हणून बरें, नाहींतर याची ही झटपट मला लटपटायलाच लावती कोण त्रास ! आता असें नाहीं उपयोग ! तो पडदा आड सारून आपण खिडकींत त्याच्या आड उभे रहावे, आणि कुणी आलें तरी हू की चूदेखील करू नये शागीर्दपेशाची ही अशी स्थिति असते ! कोण तावेदारी ही ! ( रंगभूमीकडे पाहून ) ह, दुर्योधनाची आणि भीमदादाची ही गदायुद्धाची झटपट सुरु व्हावयाची होती, आणि म्हणूनच दुधाची इतकी झटपट ! अगोदर दुधाशीं झटपट आणि मग हाताची झटपट ! अगोदर तनाना अन् मग अनाना, असातर सगळ्या जगातलाच न्याय आहे ! अहाहा ! काय शिताफी ! शावास, शावास ! दोघेहि कसलेले आहेत, कुणी कुणास हार जात नाहीं; याचें हे युद्ध पाहून मलाहि पण हुरुप येतो मी जर गेलो तिथें गदेऐवजी हा पळा घेऊन, तर काय गम्मत उडेल ! पण माझा हुरूप हें दूध ढवळून अटीव करी तोपर्यंत टवळण्यातच विरून जातो ! मघाशी धर्माचें आणि अश्वत्थाम्याचे ते शस्त्रयुद्ध झालें ते पाहून मला कोण अवसान आलें होतें ? त्या वेळेस मला वाटलें कीं, आपणहि मारे झारे आणि उलथनी घेऊन सगळ्या लोकाच्यापुढें घुसून आपलें हस्तलाघव दाखवावें ! पण इतक्यात जेव्हा नकुल, सहदेव फराळ करायला आले, तेव्हा अर्थातच ते अवसान सारें जिथल्या तिथें थंडगार झालें ! हें कोण आलें आणखी पुन्हा झटपटी करायला ? आलें असेल कुणीतरी ! ( इतक्यात दोन आचारी प्रवेश करितात )

**लड्डुक**—वल्लवा, ए वल्लवा ! अरे गेला कुठे हा ? स्वारी बहुतेक भीमदुर्योधनाचें गदायुद्ध पहायला गेली असेल !

**पुंडलीक**—नाहींतर फराळावर ताव मारून इथेच कुठेतरी डारडुर करीत लोळत पडली असेल ! हे बघ लड्डुका, आता असें नाहीं उपयोगी, हाका मारण्यात अर्थ नाहीं तो निजला असेल तर निजूदे विचाऱ्याला स्वस्थ आपण थोडा फराळ करू आणि पुन जाऊ पहायाला

**लड्डुक**—पुंडलीका, तसें नको बाबा ! तो मोठा कर्दनकाळ आहे त्याच्या परवानगीशिवाय आपण जर इथें फराळ केल्याचे त्याला कळलें, तर तो उभ्याचे उभे

निरून खाईल आपल्याला त्याने आपल्याला पहायला जाण्यास परवानगी दिली, हेच त्याचे उपकार समज

**पुंडलीक**—परवानगी दिली ! पण का दिली, हें ठाऊक आहे का तुला ? अरे आह्मी गेलों ह्मणजे आपल्यास हवेतसें यथास्थित चापायला मिळावे, यापेक्षा दुसरा काय त्याचा उद्देश आपल्याला परवानगी देण्यात ? त्याच्यासारखा खादाड, झोपाळू, तोंडाळू, (वल्लव उभ्याउभ्या घोरतो ते ऐकून) लड्डुका, हें ऐकलेस घोरणें ? वल्लवाचेच घोरणें हे ! कुठून ऐकू येत आहे हें ? ( पडदा बाजूस करतो ) अरे ह्यातर इथे उभ्यानेंच झोप घेत आहे मी ह्मटलें नाहीं तुला, कीं, स्वारी कुठेंतरी डारडुर करित पडली असेल ह्मणून ?

**लड्डुक**—अरे मोठ्यानेंतरी बोलू नकोस, तो जागा होईल एखादा. थाब, उभ्याउभ्या निजला तर तो पडेल एखादा आपण त्याला आडवा करू ( वल्लव डोळे मिटून मोठ्यानें हसतो )

**पुंडलीक**—अरे हा झोंपेंतच हसतोय वाटते ! हा उभ्याने निजण्याचा आणि झोंपेंत असताना एवढ्या मोठ्याने हसण्याचा विलक्षण प्रकार नव्हता आपण कधी पाहिला ! ही एक विचित्र मूर्तीच आहे ह्मणायची !

**वल्लव**—(पुंडलीकाचे श्रीमुखात देतो ) अरे, श्रीमुखात कुणी दिली कुणाच्या ? ही ऐकल्यावरोवर मी जागा झालों ! मी जसा झोपाळू आणि तोंडाळू आहें, तसा हाताळूहि पण आहें कारण अधिक प्रसग करणाराच्या श्रीमुखात भडकवायला माझा हात नेहेमीं खुरखुरत असतो !

**लड्डुक**—तर मग तू जागा होतास कीं काय ?

**पुंडलीक**—( गाल चोळीत ) हा खास जागा होता

**वल्लव**—जागा होतों ह्मणजे ! तर तुह्माला तिकडे पाह्यला पाठवून देऊन मी इथें झोंप घेत पडलो असेन, असें वाटलें तुह्माला? इथें माझी काय झटपट चालली होती, तुह्माला काय ठाऊक ! तुह्मी गेल्यापासून हा गेला तो आला, तो गेला हा आला, असा प्रकार चालला होता एकसारखा आता मीहि पण जाणार आहे थोडा वेळ पाह्याला, या आधाशी पुंडलीकाला बसूदे इथे एकट्यालाच आणि ते दुर्योधन, भीम हौद्यातून वर चढले, कीं, आपण हे लाकडाचे पळे घेऊन कुणाला न समजता एकदम जाऊन आत उतरू, आणि आपल्या युद्धाचा थोडा मासला दाखवू लोकाना चल, हा घे पळा पुंडलिका! अरे तू अजून काय गाल चोळित उभा? मीं आपलें तें सहज

विनोदानें मारिलें (त्याच्या कानाशीं पुटपुटून) एवढे लक्ष्यात ठेव, ते भीमदादा आले, कीं, तें फराळाचें आणि ते दूध त्याच्यापुढे ठेव. आता तू आणि ती झटपट, समजल ?

[ जातात.

---

## प्रवेश ३ रा.

[ स्थल–रंगभूमी भीम व दुर्योधन याचें
गदायुद्ध चाललें आहे असा प्रवेश. ]

**द्रोण**—अश्वत्थाम्या ! जा जा, आवर आवर त्या दोघानांहि ते दोघेहि महावीर्यवान् आणि प्रतापी आहेत ह्यापैकीं कुणी कुणाला हार जाईलसें दिसत नाहीं; त्याना आता आवरलेंच पाहिजे नाहींतर हे याचे युद्ध रङ्ग–प्रकोपाला कारण होऊन प्रेक्षकाच्याहि सतापाला कारण व्हावयाचे ?

**अश्वत्थामा**—( पुढे होऊन ) थावा, थांबा ! पुरे करा, पुरे करा ! छे, हा भीमाचा आघात दुर्योधनाच्या पोटरीवर बसला (अश्वत्थामा एका हातानें दुर्योधनास धरून दुसऱ्या हाताने भीमाचें निवारण करून त्यास थावबू पहातो. )

**दुर्योधन**—ए अश्वत्थाम्या ! या वेळी तू मध्ये येऊ नकोस मला या प्रहाराचे उट्टे काढले पाहिजे.

**अश्वत्थामा**—यापुढे युद्ध चालू ठेवण्याची आचार्यांची आज्ञा नाहीं (त्यास धरून आचार्यांसमीप नेतो )

**द्रोण**—( त्याच्या पाठी थोपटून ) शावास, शावास ! तुह्मीं दोघानींहि आज मोठें नैपुण्य दाखवून प्रेक्षकाना आनदित केलेत त्या आनदाचा—भलताच एखादा प्रकार ओढवून—भग होऊ नये, ह्मणून तुह्माला आवरलें, यावद्दल कोणीहि विषाद मानू नये तुमची इच्छा असल्यास तुह्मा दोघाना आणखी एकदा फिरून युद्ध करण्याची सधी मिळेल आता जरा विश्रांति घ्या (अश्वत्थाम्यास) आता धनुर्धर अर्जुनाला पुढे येऊ द्या !

( इतक्यात वल्लव आणि लडुक एकदम पळे घेऊन हौद्यात
उतरतात व प्रेक्षकास प्रणाम करून पवित्रे करितात. )

**द्रोण**—( साश्चर्य ) अरे हे कोण !

( दोघे पळ्यानें युद्ध करितात )

**द्रोण**—अश्वत्थाम्या, त्याना इकडे जवळ बोलाव पाहू कोण हे ?

**अश्वत्थामा**—(हसून) तात! हा आपला वल्लव आणि हा वाड्यातला लड्डुक! (एकच हशा पिकतो)

**द्रोण**—वल्लवा! तू भलतेंच काय हे साहस केलेंस?

**वल्लव**—आचार्य, क्षमा असावी आह्मांला हे भीमदादाचे आणि दुर्योधन-रायाचे गदायुद्ध पाहून मला विलक्षण अवसान आले आणि मग माझ्याने राहवेना ह्मणून या लड्डुकाला घेऊन येऊन मी हें साहस केले याची क्षमा असावी

**द्रोण**—अरे अशा वृद्धावस्थेत तुला असें हे अवसान आले हा मोठाच चमत्कार! काय तुझ्या मनातून या लड्डुकाशी मल्लयुद्ध करायचे आहे? करित असलास तर तुला परवानगी देतो पण तू वृद्ध आणि हा तरुण! तुला हा केव्हाच लोळवील!

**वल्लव**—मी वृद्ध झालो ह्मणून काय झाले? या पोराला का मी हार जाईन! आचार्य, आपणहि वृद्ध आहात, पण आपल्यापुढे या राजकुमाराचे काहीं चालेल का?

**द्रोण**—अरे, मल्लयुद्धात केवळ शक्तीचें काम असते

**वल्लव**—होय, पण आचार्य, मी जितका वेळ दूध आटवित उभा राहीन, तितका वेळ याच्याने कढईजवळ नुसते उभेंहि राहवणार नाही!

**द्रोण**—बरेंतर, हा अर्जुन आपलें हस्तलाघव दाखवून गेला ह्मणजे मग तुह्मी दोघे या मग पाहू तुमचें युद्ध

**वल्लव**—ठीक आहे, जशी आचार्यांची आज्ञा (वल्लव व लड्डुक बाजूस जातात) लड्डुका, चल, आपण आता दूध पिऊन येऊ

[ जातात.

---

## प्रवेश ४ था.

[ स्थल-उपाहारगृह ]

**वल्लव**—लड्डुका, आपल्याला दोघानाहि या युद्धाने फार श्रम झाले आहेत नाही बोआ? तर चल आपण उपाहारगृहात जाऊन थोडा फराळहि करु आणि मग अर्जुनाचें हस्तलाघव पहायला जाऊ.

**लड्डुक**—चल तर (उपाहारगृहाकडे जातात)

**वल्लव**—हे फेटे आपल्याला आता काढून ठेविले पाहिजेत, आणि मल्लयुद्ध करिताना नुसत्या चड्ड्या नेसून गेलें पाहिजे, समजलें?

**लड्डुक**—ठीक आहे.

**वल्लव**—अरे, आत जाऊन पुंडलीकाची आपण जरा आता गम्मत करू (पुंडलीक फराळ चापित बसला आहे आत जाऊन निराळ्या स्वराने ) वल्लवा, ए वल्लवा, चल, थोड दूध दे पाहू मला झटपट ! अगदी झटपट, झटपट, झटपट ! अरे पण इथे आहे कोण? कुणीच दिसत नाहीं इथे ! तो वल्लव, लड्डुक, आणि तो खादाड पुंडलीक हे सगळे गेले तरी कुठें ?

**लड्डुक**—(हलक्या स्वराने) ती पाहिलीस पुंडलीकाची स्वारी, एका कोपऱ्यात, पडद्याचे आडोशास फराळावर यथास्थित हात मारित बसली आहे !

**वल्लव**—( हलकेच लड्डुकास ) चप्प्, जरा थाव मी खूण केल्यावरोवर तो पडदा बाजूला कर. ( उघड मोठ्याने ) वल्लवतर बोलूनचालून म्हातारा, लड्डुकतर किडकिड्या आणि अशक्त ते वसूनवसून कटाळून आडवे झाले असतील विचारे ! पण तो पुंडलीक कुठे गेला? स्वारी वुटकी पण यथास्थित गुब्ब आणि गल्लेलठ्ठ आहे. खाऊनखाऊन आडवा माजला आहे त्याच्याने जागचे हालवायचेसुद्धा नाहीं ! त्यातून तो आळशी, खादाड, द्वाड, मुरदाड, झोपाळू, हाताळू ! (एकीकडे लड्डुकास ह अशी खूण करितो तोच लड्डुक पडदादूर करितो ) तोंडाळू—तोंडाळू असल्याचेतर हें प्रत्यक्षच पहा शिवाय वरती गालफुगाळू (त्याच्या गालावर वुक्या मारतो) आणि ओकाळूहि आहे ! अरे पुंडलीका, आम्ही इथून गेल्यापासून फराळावर हात मारायला जी सुरुवात केलीस, तो अजून तुझा हात थावला नाहीं वाटते ?

**पुंडलीक**—वावानो ! एखाद्याच्या पाठीवर मारावे, पण पोटावर मारु नये ! पोटावर मारलेलेदेखील एक वेळ पत्करेल, पण तुम्ही माझ्या तोंडातला घास देखील काढता, तेव्हा तुम्हाला काय म्हणावे ? तुम्ही गेल्यापासून इथे मला फराळ मागायला येणारानी वेजार केले ! जो येई तो 'झटपट, झटपट' म्हणत येई; भूक लागली म्हणून नुकता कुठे फराळाला वसलो, तो तुमची तोंडाची, हाताची दुहेरीतिहेरी झटपट सुरु झाली !

( इतक्यात दुःशासन येतो )

**दुःशासन**—अरे कोण आहे इथे ' वल्लवा, लड्डुका, पुंडलिका ' मला कुणी थोडे सरवत द्या पाहू झटपट

**पुंडलीक**—ही पहा आणखी एक झटपट आली !

( बल्लव सरवत देतो तें दु शासन पीत आहे इतक्यात शकुनी येतो. )

**शकुनी**—अरे पुडलीका, दुधाचा एक झटपट पेला आण पाहू. दु शासना, तूहि इथेंच ?

**दुःशासन**—( पिता पिता ) मी हा तुमच्याच पुढें आलों

**पुंडलीक**—( एकीकडे ) पाहिलेंत, पुन्हा ही झटपट ! ( दूध देतो ) मामासाहेव हें दूध (एकीकडे) पाहीलेंत ह्या झटपटीचा इथें कसा एकसारखा कहर उसळून जात आहे तो ! आपल्यालातर ही झटपट नको, आणि कटकटहि नको !

**शकुनी**—(पिऊन झाल्यावर) अरे लड्डुका, तावूल दे पाहू ! (तावूल खातखात) दु शासना, कर्णानें एकून वहार केलीन् कीं नाहीं आज ? अर्जुनानें जें अगदी अपूर्व आणि अदृष्ट ह्मणून करून दाखवावें, त्याच्या तोडीस तोड करुन कर्णानें अर्जुनावर कडी करावी ! आजपर्यंत कर्ण अर्जुनावर कडी करील, असें कुणालाहि वाटलें नव्हते, अर्जुनाला द्वद्वास धर्षण करण्याविषयीं त्याला मी चढीला देऊन आलों आहें

**दुःशासन**—मामा, तुह्मी काहीं ह्मणा, पण अर्जुनाची सफाई काही कर्णांत नाहीं कर्णानें एकदोन गोष्टी अर्जुनापेक्षा जास्त करून दाखविल्यान्, पण अर्जुनाचा यन्त्रभेद, पक्ष्याचा नेत्रच्छेद, भ्रमण करणाऱ्या लोहवराहाच्या दंष्ट्रा आणि चपलजिव्हा यावर पाच शर एकसारखे टाकून त्याचा केलेला भेद, फिरणाऱ्या घटेतील लोळीवर बाण टाकून उठविलेला विजयनाद, दोरीला टागलेल्या गव्याच्या शिगाच्या चल अशा अभिषेकपात्राच्या अलत सूक्ष्म मुखात रुतविलेले वीस बाण, पुढे पाहून मागें वेध आणि खाली पाहून वर भेद, हे शतश केलेले चमत्कार यापैकीं कर्णाच्याने कितीसे करवले ?

**शकुनी**—अरे, इतके सूक्ष्मच्छेदाचे प्रकार जरी कर्णाचे हातून झाले नसले, तरी इतर चमत्कार दाखवित असता मधूनमधून टागलेल्या दुदुभीवर बाणाचा प्रयोग करून त्याचा एकसारखा प्रहरभर वीरनाद चालू ठेवणें, आणि तोहि दुदुभीवरील चर्माचा भेद न होता, हें आश्चर्यजनक नव्हे काय ?

**दुःशासन**—जाऊदे, आपण रगभूमीसनिध येऊन पोहोचलों आता कशाला उगीच ही वाटाघाट ! चला, आपण कर्णाच्या मागें जाऊन उभे राहू.

[ जातात.

## प्रवेश ५ वा.

[ स्थल—रंगभूमी. भीष्म, द्रोण, कृपाचार्य व कौरव, आणि पांडव व कर्ण, शकुनी इत्यादि प्रवेश करितात. ]

**दुर्योधन**—( कर्णास ) चल, मला दृढ आलिंगन दे पाहू. आज तू अर्जुनावरहि कडी केलीस, हें पाहून माझा आनंद उभ्या गगनात मावेनासा झाला आहे! तर मी तुझें आज काय प्रिय करावे, तें सांग

**कर्ण**—माझें प्रियच करणार तर ऐक एक तुझ्याशी चिरकाल सख्य; आणि दुसरें अर्जुनाशी या ठिकाणीं आज द्वंद्वयुद्ध करण्याचा योग यावा.

**दुर्योधन**—हे अरिंदमा कर्णा! अशी जर तुझी इच्छा आहे, तर आजपासून माझ्या बरोबरीनें या राजवैभवाचा तूहि स्वामी आहेस, असें समज तू माझ्या बंधूचा प्रियकर्ता हो, आणि आपल्या पदाघातानें आमच्याशी द्वेष करणारांची मस्तकें एकसहा तुडवून टाक!

**कर्ण**—दुर्योधना, मी जरी इतक्या मानाला पात्र नाहीं, तरी ज्याअर्थी तू माझा इतका बहुमान करितोस त्याअर्थी तुझी आज्ञा मला शिरसा वंद्य आहे. तर आता मी अर्जुनाला द्वंद्वाकरिता आव्हान करितों

**शकुनी**—बेलाशक कर

**कर्ण**—हे गर्विष्ठा कुंतिपुत्रा अर्जुना! आपणच एक धनुर्धर वीर आहों असा तुला गर्व झाला आहे, तर तुझ्यांत जर पराक्रम असेल, तर माझ्याशीं द्वंद्वास उभा रहा! ह्मणजे हा तुझा गर्व आणि अहंकार या दोन्हींसहि मी आपल्या पदाघातानें पायाखाली दडपून टाकतों!

**अर्जुन**—( त्वेषानें ) अरे मूढा वाचाळा कर्णा! निरर्थक किती जल्पना करतोस? अरे, पाचारण न करिता जल्पना करणाराना आणि अनाहूत अशा आगंतुकाना जी गति प्राप्त होते, ती गति मी तुला जिवंतपणींच देतो! चल, युद्धास तयार हो! अरे मूर्खा, जो यत्किंचितहि प्रयोजन नसता दुसऱ्याचा उगीच द्वेष संपादन करतो, त्याला ज्ञाते पुरुष महामूर्ख ह्मणतात, हें तुला ज्ञात नाहीं काय? अथवा तुझ्यासारख्या महामूर्खाला हें कसें ठाऊक असावें? अरे वाचाळा, प्रच्छन्न अग्नीवर झडप घालू पहाणाऱ्या पतंगाची, सिंहापुढें तोऱ्यानें आपल्या गंडस्थळांतील मुक्ताफळें दाखविणाऱ्या हत्तीची, आपल्याजवळच्या कस्तूरीच्या दिमाखानें व्याधास हिणविणाऱ्या हरणाची कशी दशा होते, आणि रामाशीं व परशुरामाशीं

स्पर्धा करणाऱ्या त्या प्रमत्त रावणाची आणि कार्तवीर्यांची कशी दशा झाली यांची तुला कांहीं कल्पनातरी आहे काय ? अथवा तुझ्यासारख्या मागमूर्गाला ती कुठून असणार ? तर चल ये—त्याची तुला कल्पनातरी व्हाला पाहिजे—त्याची जी अवस्था झाली ती प्रत्यक्ष तुझ्या प्रत्ययास आणून देतो पण या पवित्र रंगभूमीवर तुझ्यासारख्या मशकाशी द्वंद्व करण्यास प्रवृत्त होऊन हिला तुझ्या अशुद्ध रक्ताने स्नान घालणें, म्हणजे हिचा अवमान करून हिला अपवित्र केल्यासारखें होणार आहे तर अन्यत्र चल, म्हणजे तीच तुझी निधनभूमि करून सोडतो

**कर्ण**—( क्रोधाने ) हे फाल्गुना ! बस्स, पुरे झाला हा तुझा वाचाळपणा ! वाचाळ कोण ते हे द्रोण, कृप आदिकरून गुरुजनच ठरवितील अथवा यापुढें मी आपल्या धनुष्यासच वाचाळ करून त्याजकडून वाचाळ कोण तें ठरवीन ! ही रंगभूमी सर्वसामान्य आहे तुझेच असें इचे काय आहे ? राजाचा श्रेष्ठपणा वीर्यावर अवलंबून असतो, आणि वीर्यवान् आपल्या सामर्थ्याने जे करितील तो धर्म दुर्बलांनीं भागूबाईसारखी बोटें मोडून व्यंगोत्तरें बोलून शिव्याशाप द्यावेत ' अर्थ काय यात ? तुला जर कांहीं बोलावयाचें असेल, तर बाणांनी बोल, म्हणजे आताच गुरुजनासमक्ष तुझा शिरच्छेद करतो !

**अर्जुन**—मी व्यंगोत्तरें बोलतो ! स्वत दुसऱ्याला घालूनपाडून बोलून कपटी आणि मर्मभेदी शब्दांनी प्रहार करणाऱ्या नराधमाना शरम वाटली पाहिजे असे शब्द उच्चारताना ! ठीक आहे, यापुढें माझे बाणच तुझ्याशीं बोलतील ! ( द्रोणाचार्यांस ) आचार्य, यापुढं असले हे अवमानकारक शब्द मला सहन होत नाहींत, तेव्हा याच्याशी युद्ध करण्याला मला आपली अनुज्ञा असावी

**द्रोण**—युद्धास आव्हान केल्यावर अनुज्ञा कशाला ?

**भीम**—यापुढं स्तब्ध रहाण्याची वेळ नाहीं ! वाचाळा राधेया ! तुझ्या व तुझ्याशी कानगोष्टी करणाराच्या मस्तकाचे माझ्या गदेने इथल्याइथेच चूर्ण करून टाकतो

( पुढें सरसावतो व इतर पांडव व कौरवहि सज्ज होतात धनुष्याचे टणत्कार, गदाप्रहार, नौबतीचे निनाद व शस्त्राचे आवाज होतात. )

**कृपाचार्य**—हं हं, थांबा थांबा ! भरतवंशीय राजकुमारांनी द्वंद्वयुद्धास आरंभ करण्यापूर्वी कुलाकुलविचार हा पाहिलाच पाहिजे हा अर्जुन सोमवंशी विजयध्वज कुरुकुलावतंस पंडुनृपति आणि यादवकुलोत्पन्न कुंतिभोज राजाची कन्या कुंती याचा पुत्र आहे याप्रमाणे याची दोन्ही कुळें जगविख्यात आहेत आता हे

म्हाभागा कर्णा, तू ज्या राजकुलाचें भूषण आहेस त्या दोन्ही कुलाचा उच्चार कर, ह्मणजे अर्जुनानें तुझ्याशी द्वंद्वयुद्ध करावें अथवा न करावें, हें ठरविता येईल. कारण राजकुमारांनी हीनकुलजाशी युद्ध करूं नये, अशी राजनीति आहे

( हें ऐकून कर्ण तेजहीन होऊन खालीं मान घालतो )

**दुर्योधन**—( एकीकडे ) कर्णा ! तू असा खिन्न होऊं नकोस थांब, यालाहि माझ्याजवळ तोड आहे हे काय समजले आहेत ! ( कृपाचार्यांस ) अहो आचार्य, तुह्मी वडील व गुरुस्थानीं असून जेव्हा ही विलक्षण राजनीति सांगता, तेव्हा हा मोठाच चमत्कार आहे ह्मणायचा! अहो, जे जे स्वत विद्यायुत आणि शूर रणाग्रणी वीर आहेत, त्यांना कुलाचार कशाला आणि राजवंश कशाला? ते आपल्या विद्याबलानें आणि वीर्यानेंच सर्वांहून श्रेष्ठ आहेत. तेच असल्या कुलांना उत्पन्न करीत असतात आता, कर्ण हा राजकुमार नाहीं एवढ्यामुळेंच जर अर्जुन त्याच्याशी द्वंद्वयुद्ध करण्यास माघार घेत असेल, तर या प्रसंगीं इथल्या इथें मी त्याला अंगदेशच्या राज्याचा राजा करितो दु शासना, आताच्या आता जा आणि कुलगुरूंना अभिषेकाची तयारी करण्यास सांग आणि तू स्वत छत्र, चामर, सिंहासन आदिकरून सर्व सामग्री सिद्ध कर (कृपाचार्यांस) आपण काय समजलां आहात? अर्जुन केवळ राजकुमार आहे, पण माझा कर्ण आताच अभिषिक्त राजा होऊन याच्यापासून अर्जुनासारखे शतश· राजकुमार निर्माण होतील ! मग याच्यापुढें अर्जुन राजकुमार आहे ह्मणून सांगण्यात प्रतिष्ठा काय ?

**कृपाचार्य**—दुर्योधना, तू अजून पोर आहेस, तुला राजनीति ठाऊक नाहीं; ह्मणून ईर्षेला पेटून तू हे असें बोलतोस श्रेष्ठ भीष्माचार्यांना आणि विदुरांना विचार पाहिजेतर तू या सवधानें

**दुर्योधन**—अर्जुनासंबधानें तुह्मी सर्व पक्षपाती आहां, तेव्हा या संबधानें तुमचा सल्ला अनुकूल असा कधींच पडणार नाहीं, हें सर्व मी जाणूनच आहें. कर्णालातर मी अंगदेशचे राज्यावर बसविणारच मग अर्जुन त्याच्याशी द्वंद्वास उभा राहो अथवा न राहो ! कर्णा, चल, कडकडून भेट मला तुला मी आपला सहोदर असें समजतों अंगदेशचें राज्य आजपासून तुझें आहे

(राज्याभिषेकाचा समारंभ होतो दुर्योधन आपल्या हातानें कर्णास अभिषेक करतो द्विज तीर्थोदक घालितात दुर्योधन कर्णावर राजकिरीट घालतो व दक्षणा व गोदानें देतो. दु शासन वगैरे छत्रचामरें धरितात.)

**दुर्योधन**—हे मांडलिकहो! यापुढें कर्णाला माझ्याप्रमाणेंच मानून त्याला मस्तकानी भूमिस्पर्श करून प्रणाम करित जा (ते तसे करितात)

**कर्ण**—हे राजशार्दूला दुर्योधना, तू मला या राजपदाला पोंचविलेस, तेव्हा आता हे तुझे उपकार मी कसे फेडू, तें मला सांग

**दुर्योधन**—उपकार कसे फेडू? छे छे छे! हे शब्दसुद्धा तू मुखातून काढू नकोस तुझ्यासारख्या वीराचा केलेला उपमर्द मला सहन झाला नाही, म्हणून यांची तोंडें बंद करण्याकरिता मला जें कर्तव्य तेंच मी केलें जिवांतर्जीव असे तोंपर्यंत तुझीमाझी अक्षय्य मैत्री रहावी, यापेक्षा माझी दुसरी काहीएक अपेक्षा नाही.

**कर्ण**—एवढेंच? तर हें घे वचन! माझ्या जिवांतजीव आहे तोंपर्यंत मी तुला अंतर देणार नाहीं

(इतक्यात हातात चाबूक घेतलेला व वस्त्राच्या पदरानें
पाय झांकलेला आणि अंगवस्त्र गळून पडत आहे असा
अधिरथ सूत धामाधूम होऊन कांपतकांपत पुढें येतो)

**अधिरथ**—हा पुत्रा कर्णा! (कर्ण धनुष्य खाली ठेवून त्यास वंदन करतो व सूत त्याचे मस्तकाचें अवघ्राण करतो) आजचा माझा आनंद गगनात मावत नाहींसा झाला आहे रे बाबा! तुला राज्याभिषेक झाल्याचें ऐकून घरात किती आनंद होईल आज?

**भीम**—(हसून) हे मांडलिकहो, आपली मस्तकें भूमीपर्यंत लववून तुह्मी आज कुणाला प्रणाम केलात, हें तुह्माला आता कळून चुकलें असेल। हा राधेय कर्ण तर उघडउघड सूतपुत्र आहे तेव्हा याच्या उच्च कुलशीलासंबधानें जास्त कशाला सांगितलें पाहिजे!

**दुर्योधन**—वृकोदरा, आपली जीभ आवरून धर

**भीम**—अरे वेड्या, तू अजून भ्रमात आहेस! परंतु आज या अधिरथ सूतानें आपल्या प्रतोदानें या मांडलिकाचा सर्व भ्रम दूर केला आहे तू या कर्णासारख्या सूतपुत्राना आणि दूतपुत्राना राजपदावर बसविल्याचें या मांडलिकानां कळल्यावरहि त्याचेपुढें आपलीं डोकीं नमवितील इतके तेजहीन आणि मूर्ख ते खास नाहींत!

**दुर्योधन**—तुला एकदा सांगितलें की, तुझी वटवट पुरे कर नाहींतर पहा—(गदा उचलतो.)

**भीम**—अरे, तुझ्या गदेशी भिडायला ही पहा इथेंहि एक गदा तयार आहे! पण या प्रसंगीं तुझ्याशी भाषणच कर्तव्य नाहीं मला मला या सूतपुत्राशींच बोलायचें आहे हे सूतपुत्रा कर्णा! हीं राजभूषणें, ते धनुष्य आणि तो राजवेत्र तू टाकून दे आणि आपल्या पित्याच्या हातातील तो चाबूक हातीं घे कारण तुझा पिता आता अगदी वृद्ध झाला आहे अर्जुनाशी द्वंद्व करण्याची नुसती इच्छा धरणेंहि तुझ्यासारख्याला युक्त नव्हे तू हातात दोऱ्या धरून, दासकर्म स्वीकारून, सारथ्यकर्मच करावेंस! अरे सूतपुत्रा, कुंतीपुत्र अर्जुनाचे हातून रणांगणीं मृत्यु येण्याइतकीहि तुझी योग्यता नाहीं! अरे, असे पहा, यज्ञाचे ठिकाणी अग्निसन्निध असलेल्या पुरोडाशाला स्पर्श करणे त्या लाळघोट्या श्वानाला जर युक्त असेल, तर अंगदेशच्या पवित्र सिंहासनाला तुझ्यासारख्या सारथिपुत्राने स्पर्श करणे उचित होईल!

**दुर्योधन**—अरे वाचाळा वृकोदरा! तू कुठे आणि कुणाला श्वान म्हणतो आहेस याची तुला काही कल्पनातरी आहे काय? ( कर्ण करकरा दात खाऊन सूर्याकडे पहातो व त्याचे ओंठ स्फुरण पावतात ) अरे, वडिलांच्या आणि गुरुजनांच्या सन्मुख कुणाला काय बोलावे हे ज्याला कळत नाहीं, तो मनुष्य कसला? अरे मूढा, ज्याच्यात शौर्य असेल तो क्षत्रिय; आणि एका क्षत्रियाने दुसऱ्या क्षत्रियाला युद्धास पाचारावें, हेंतर विहितच आहे क्षत्रिय, ऋषि आणि नद्या यांचे प्रभवस्थान सर्वदा दुर्विद असते मग ते कोणते म्हणून विचारण्यात अर्थ काय? अग्नीची उत्पत्तितर उदकापासूनच आहेना? पण त्याचा प्रताप केवढा आहे? दधीच ऋषीची एक अर्धदग्ध अस्थि, पण इंद्राने तिच्यापासूनच असुरघातक असे महावज्र निर्माण केलें नाहीं काय? स्कंदाचे जनकत्व कितीजणाकडे जाते याची तुला कल्पनातरी आहे काय? हे सर्वच गुह्यतर आहे फार लांब कशाला? हे आपले गुरु श्रेष्ठ द्रोणाचार्य, यांचे जन्मवृत्त तुला ठाऊक आहे काय? तसेच मोठी राजनीति सांगणाऱ्या आणि कर्णासारख्या धनुर्धारी वीराग्रणीच्या कुलशीलाचा विचार करू पहाणाऱ्या या कृपाचार्यांची उत्पत्ति कशी झालेली आहे, ते कुणाला बरें ज्ञात नाहीं? पण ज्ञाते पुरुष अशा गोष्टींची पृच्छाच करीत नाहीत असे असता माझ्या वीर कर्णाचा जाणूनबुजून असा अवमान करणाऱ्या तुझ्यासारख्या मूर्खाला काय म्हणावे! दगडाचीदेखील परीक्षा नसणारानी रत्नाची परीक्षा करू लागावे, त्यातलाच हा प्रकार आहे! अरे, तू काय समजला आहेस? या धनुर्धर कर्णाला नुसते अंगदेशाचेच राज्य काय पण—

याचे हे अलौकिक व अतुल बाहुवीर्य आणि मी याचा सखा याच्या पाठीस याच्या आज्ञेत वागायला तयार असता, ही समुद्रवलयांकित सगळी पृथ्वी याच्या नुसत्या एका नखावरून ओंवाळून टाकावी ! मग य कश्चित् एका अग-राज्याची ती कथा काय ? इतकेंहि असून याच्याशी द्वंद्वयुद्ध करण्याची जर अर्जुनाची इच्छा नसेल, तर त्याला आह्मी भ्याड समजू, आणि खरे रणशूर आहेत तेहि असेंच समजतील ज्याची छाती असेल त्यानें आपलें धनुष्य सज्ज करावें आणि द्वंद्वास उभे रहावे

**अर्जुन**—( पुढे होऊन ) हे सज्ज आहे माझे धनुष्य !

**भीम**—आणि माझी ही गदा !

( इतक्यात एक भाट ललकारतो )

**बंदि**—हे राजकुमारहो ! हा हा, थांबा थांबा ! श्रेष्ठ भीष्माचार्यांची अनुज्ञा आहे कीं, आता सध्याकाळचा समय झाला आहे तेंव्हा आज यापुढे द्वंद्वास आरंभ करणें इष्ट नाहीं करिता आज सभा विसर्जन करून पुन सर्वांनी उदईक या रंगस्थलीं येण्याची कृपा करावी

**दुर्योधन**—( कर्णादिकास ) हे बरें झालें नाहीं पण उपयोग काय ? श्रेष्ठ भीष्माचार्यांची अनुज्ञा आणि त्यात सध्याकाळहि झाला चल कर्णा—

**शकुनी**—शाबास, दुर्योधना शाबास ! छान केलेंस ! सगळ्याच्याबरोबर त्या पक्षपाती कृपाचार्यांचेदेखील आज तू तोंड बंद केलेंस !

[ सर्व जातात

---

## प्रवेश ६ वा

[ स्थल—रंगभूमी लड्डुक व बल्लव प्रवेश करितात ]

**लड्डुक**—हं, चल, सामर्थ्य असलें तर चल ये द्वंद्वास उभा रहा !

**बल्लव**—तुझ्याशीं द्वंद्वयुद्ध ! अरे मूर्खा ! पाढऱ्या केंसाचें आणि काळ्या केंसाचें युद्ध ! लठ्ठ आणि किडकिड्या माणसाचें युद्ध ! डोळसाचें आणि अंधाचे युद्ध ! प्रकाश आणि अंधकार याचें युद्ध ! अशा प्रकारचीं युद्धें कुणी स्वप्नातहि पाहिलीं नसतील अथवा ऐकलीं नसतील ! तरी पण तुझ्यात द्वंद्वाची खुमखुमच असली तर तुझे काळे केंस आहेत आणि माझे पाढरे आहेत ह्मणून मी माघार घेईन, ही गोष्ट मात्र कालत्रयींहि होणार नाही ! माझ्या या पिंजारलेल्या पाढऱ्या केसाना पाहून तुझे हे काळे केंस निर्जीव होऊन कसे दबून राहिले आहेत,

रे कुणीहि सांगेल असे असता तुझ्याशीं द्वंद्व करण्यास मी माघार खाईन ही गोष्ट तू स्वप्नातहि आणू नकोस ! मात्र तुझ्याशीं हात करण्यास उद्युक्त होण्यापूर्वी मला तुला एकदोन गोष्टी विचारल्या पाहिजेत

लड्डुक—विचार, माझी कुठे ना ना आहे ?

वल्लव—मग ठीक आहे हे पहा, तुझा बाप कोण होता ?

लड्डुक—माझा बाप शागीर्द होता

वल्लव—शागीर्द होता ?

लड्डुक—हो, शागीर्द होता.

वल्लव—आणि आजा ?

लड्डुक—आजा ? तो भिक्षुक ब्राह्मण होता

वल्लव—भिक्षुक ब्राह्मण ? आजा भिक्षुक ब्राह्मण, बाप शागीर्द, आणि लेक आचारी ! तुला मुलगाबिलगा आहे की नाही एखादा ?

लड्डुक—हो आहे

वल्लव—तो काय करतो ?

लड्डुक—तो माझ्या हाताखाली पाणी आणण्याचे खटपट्याचे काम करतो.

वल्लव—आजा भिक्षुक ब्राह्मण, बाप शागीर्द, खुद्द आपण आचारी आणि चिरंजीव पाणक्या आणि खटपट्या ! यवरे कुल !! आणि मूर्खा, मी तुझ्याशीं द्वंद्व करावे ह्मणून इच्छा करतोस ? पण हें शक्य नाही कारण तू हीनकुलज आहेस. तुझा आजा भिक्षुक ब्राह्मण होता ह्मणतोस, पुढे तोच तुझा बाप शागिर्दी करु लागला, पुढे तू हा आचाऱ्याचा धंदा करु लागलास आणि आपल्या पोराला पाणक्या आणि खटपट्या बनविलास, यावरून काय होते ? तुझा नातू आणि पणतू हे बैलाच्या आणि लवकर्णाच्या योनीत जन्म घेणार, हे उघड होत नाहीं काय ? अरे, आपले कुल एक एक पिढीला असें हीन हीन करून घेणे ह्मणजे काय ? याचा शेवट कुठे होणार ?

लड्डुक—अहो वल्लवाचार्य ! मला सतरापचराशे गोष्टी समजत नाहींत. तुह्मी माझ्याशी द्वंद्व करायला तयार आहात का ?

वल्लव—तुझ्यासारख्या हीनकुलोत्पन्नाशीं द्वंद्वयुद्ध ?

लड्डुक—मग आपलें कुलतरी काय असें मोठे आहे ? आपण काय राजवंशात निर्माण झाला आहा, का देववंशात झाला आहात, तेंतर सांगा पाहू ?

बल्लव—अरे बावा, मी पिढीजाद आचारी आहे माझा खापर–निपणजा ज्याने मूळ अन्नाचा पाक करण्याची कल्पना काढिली त्या श्रीमत् सिद्धान्न महापाकाचार्य गुरुवर्यांचा पट्टशिष्य होता पुढें निपणजा एका वनिकाच्या अन्न-छत्रावर आचारी होता पणजा एका अग्निहोत्र्याच्या इथे आचाऱ्याचे काम करुन होता आजा पडुराजाच्या प्रधानाच्या घरी आचाऱ्याचे काम करित असे बाप खुद्द पडुराजाच्या राजवाड्यात आचारी होता, आणि खुद्द मी या राजकुमाराच्या प्रीतींतला महाराजाचारी आहे माझ्या कुळात मी एकेक पायरीने वर चढत आलो आहे, आणि तू तुझ्या कुळात एकेक पायरीने उतरत आला आहेस अन्नछत्राचारी, अग्निहोत्राचारी, प्रधानाचारी, राजाचारी, महाराजाचारी, आणि महाराजाधि-राजाचारी, अशी माझी उच्च कुलपीठिका आहे ! आणि तुझे निपणजे, पणजे, आजे, बाप आणि तुह्मी भिक्षुक ब्राह्मण, शागीर्द, आचारी, पाणके, कावडे आणि खटपटे—असे तुझे हीन कुल आहे माझी चढती कमान तर तुझी उतरती कमान ! माझ्या कुलाचा मान तर तुझ्या कुलाचा अवमान, असा प्रकार आहे, आणि धडधडीत आणि उघडाउघड तुझ्यामाझ्या कुलाचा इतका विलकुल मेळ नसता, मी तुझ्याशी द्वद्वयुद्ध करु ? मूर्खा, क्षुद्रानी मोठ्याशी सामना करण्याची हाव धरु नये, त्याचे परिणाम फार वाईट होतात अहो रणधुरधर ! इतका वेळ उन्हात उभे राहून तुह्मी फार दमला आहात, तर आता राजवाड्यात चला आणखी भाताशी आणि पोळीशी द्वद्वयुद्ध करा ! दुसऱ्याच्या माना तोडण्याची तुह्माला खुमखुमच आली असेल तर विळी घ्या आणि तिच्यावर वागी आणि भोपळे खसाखस चिरा ! याशिवाय दुसरे द्वद्व तुमच्यासारख्या राधणझुझाराना योग्य नाहीं !

लड्डुक—वल्वा ! तू इतका वेळ जें जें बोललास, ते मुकाट्याने ऐकून घेतो आहे हीन कुल माझे कीं तुझें, हें तुझ्या तोडानेच तू कबूल केलेस मीतर उच्च भिक्षुक ब्राह्मणाच्या कुलात जन्माला आलो आहे, आणि तू भाकऱ्या थापटणाऱ्या य कश्चित् आचाऱ्याच्या कुलात जन्मला आहेस ! या एका गोष्टीवरूनच हीनकुल कुणाचे त्याचा निकाल लागतो तेव्हा तुझ्यासारख्या हीनकुलोत्पन्नाशी द्वद्वाला उभें रहाणे ह्मणजे तुला वाजवीपेक्षा फाजील मान देणे होय पण तुझें कुलशील विसरुन जाऊन केवळ तुझे हे रुपेरी केंस पाहून तुला मी हा मान दिला पण माझ्याशीं द्वद्वयुद्ध करण्याची तुझी छाती नाहीं, हेच खरें माझ्यापुढून आपले प्राण घेऊन झटपट निघून जा पाहू कसा मुकाट्याने, नाहींतर व्यर्थ प्राणाला मुकशील इथें ! शस्त्राने युद्ध करण्याच्या योग्यतेचा तू खास नाहींस तुला वुद्धीच्या

कढईंत तापलेल्या तुपात टाकून तळून काढला पाहिजे तेव्हाच—बुंदीच्या कळ्या-सारखे—तुझे डोळे उघडतील, एरवी नाहीं !

वल्लव—लड्डुका ! वाचाळता किती करतोस? अरे, तू अजून पोर आहेस तुझा हा नुसता ओंठ पिळला (त्याचा ओंठ धरतो) तर दहा माणसांना दोन दिवस पुरवता येईल इतक्या विरजणापुरतें दूध निघेल यातून—

लड्डुक—मग गाईंची खिल्लारें बाळगण्याची कांहीं जरुरच रहाणार नाहीं !

वल्लव—(त्याचा कान धरून) आणि मूर्खा, हा तुझा कान पिरगळला तर एक महिनाभर फोडणीला पुरेल इतकें तेल निघेल यातून—

लड्डुक—बाबा थांबा, माझा कान असा पिरगाळूं नका इतक्यातच बुधला आणतों एखादा आतून लहानसा–नाहींतर अनायासें मिळणारें तेल वाया जायचें उगीच ! (कान सोडवून घेऊन) एकून यापुढे तेलाचे घाणे बंद पडण्याचा रंग दिसतो !

वल्लव—अरे बृहस्पती ! तुझें हे तोंड इतकें चुरचुर करतें, हीच गोष्ट पुरी आहे तुझ्या पोरपणाची साक्ष पटवायला ! अन् मग तुझ्यासारख्या अशा पोराला उच्च कुलाची आणि हीन कुलाची कल्पना ती कुठून असणार ! अरे, आमच्या खापर–निपणजाच्या गुरुवर्यांनी अर्थात् सिद्धान्न महापाकाचार्यांनी, अन्नाचा पाक सिद्ध केला असतां तें जास्त रुचकर होऊन मनुष्याच्या पचनक्रियेवर त्याचा अत्यंत हितकर परिणाम होतो अशी मूळ कल्पना काढिली, त्यापुढे आमच्या कल्पक खापर–निपणजापासून तो माझ्या पिढीपर्यंत ह्या सूपशास्त्रांत कसकसे नवेनवे शोध निघाले व नव्यानव्या सोई कसकशा होत गेल्या आहेत याची तुला कल्पनादेखील नसेल !

लड्डुक—ती कशी काय ?

वल्लव—ती कशी काय ? अरे, हा सूर्य रोज उगवतो आणि मावळतो, पण हा अलौकिक चमत्कार काय आहे व तो कसा घडून येतो, याचा कुणी कधीं विचार तरी करतो आहे का ?

लड्डुक—नाहीं, मग त्याचें काय ?

वल्लव—त्याचें काय ? अरे, आजपर्यंत तुझे बापदादे, आजेपणजे, हे सुग्रास अन्न खात आले आणि प्रत्यक्ष तूंतर चुलीजवळ बसून भाकऱ्या बडवण्याचा धंदा करतो आहेस, आणि ह्या सगळ्या जगालाहि पहिल्यांदा चुलीचीच आराधना करावी लागते आहे, पण ही चुलीची कल्पना प्रथमतः कशी निघाली ? हिच्या मूळ शोधकांनीं हिची जी योजना केली ती किती कल्पकता, किती बुद्धिमत्ता आणि किती

पृथ्वी पोनवून केली आहे याची कुणाला कल्पनातरी आहे काय ? किंवा याबद्दल कुणी कधी विचारतरी करतो आहे काय ? अरे, जगातली पहिली चूल प्रथमत दोन दगड मांडून झाली पुढे दोन दगडावर पात्रें बरोबर बसेनात ह्मणून तिसरा दगड आला यापुढे हे दगड तापून प्रसगीं हातास चटके बसण्याचे प्रसग आले ह्मणून दगडाऐवजीं मृत्तिकेची योजना झाली मातीच्या चुली झाल्या-बरोबर हातास चटके बसायचे राहिले त्याबरोबर या नव्या शोधाचा प्रसार आमच्या दापर-निपणजानी सर्व भरतखडभर करून टाकिला याबद्दल या भरतखडातील प्रत्येक स्त्रीने आणि प्रत्येक आचाऱ्याने या वल्लवाच्या कुळाचे आभार मानायाला नको काय ? यापुढे या चुलीला वैल जोडण्यात आला व पुढे या एका वैलाचे दोन वैल झाले, आणि हे जोडण्याचा हेतु हाच कीं, थोडक्या वेळात दोनदोन, तीनतीन पदार्थांचा पाक एकदम करिता यावा आणि पोटार्थी, क्षुधित आणि बुभुक्षित मडळींना फार वेळ व्यर्थ तिष्टत बसावे लागू नये ! यावरून तन पहा की, या वल्लवाच्या कुळाचे ह्या सगळ्या जगावर किती उपकार आहेत ! मध्यान्हकाळी क्षुधित, पोटार्थी आणि बुभुक्षित होत नाहीं, असा कोण आहे या जगात ?

लट्टुक—बरोबर आहे, कोणीच नाहीं !

वल्लव—आणि ह्मणूनच मी ह्मणतों कीं, या वल्लवाच्या कुळाचे या चुलीच्या शोधाबद्दल सगळ्या जगाने उपकारच मानिले पाहिजेत ! अरे, अन्नदानासारखें दुसरे दान नाहीं, हें सगळ्या जगाला कबूल आहे, आणि या पाकशास्त्राच्या युक्तीने आमच्या कुळाकडून ते आजवर होत आहे याबद्दल आह्माला अभिमान का नसावा ? हे एक झाले पण दुसरी एक गोष्ट तुला सागितली, ह्मणजेतर तू माझ्या पायावर डोके ठेवून लोळणच घेशील

लट्टुक—ती कोणती ?

वल्लव—अरे, या सुलभ पाकसिद्धीला आमचे पणजे, खापरपणजे गुतले असता गुप्त [illegible] जे आविष्कार त्याला ते विसरले नाहींत त्यानीं या चुलीला [illegible] आकार दिला, तो या ओसरीनाच दिला आहे ! अशा रीतीने गुप्तधर्मरहस्य [illegible] मरेपर्यंत [illegible], याबद्दल त्यानी किती सावधगिरी आणि [illegible] ठेविली आहे ! या गुप्तरहस्याचा बाहेर स्फोट होऊ यायचा नाही तू मूढ [illegible] गुप्त हे रहस्य सागितले

लट्टुक— [illegible] माझ्या डोक्यात आली नाहीं ! खरेंच, [illegible] पाहिजेत, नरन

कुठे आपल्या कुळाच्या या चुलीच्या अलौकिक योजनेबद्दल मी थोडासा उतराई होईन, एरवी नाहीं ( नम्रपणें पाया पडतो ) मी आपला अधिकार आणि योग्यता न जाणून आपल्याशी द्वंद्व मांडलें, याबद्दल मला क्षमा असावी

**वल्लव**—अरे, हें काय ! चल, ऊठ, तुला क्षमा आहे अरे, जोपर्यंत अज्ञान असते तोपर्यंत मनुष्य उद्दाम असते खऱ्या ज्ञानाने मनुष्याची दृष्टी एकदा साफ झाली म्हणजे त्याच्या ठिकाणी शांतता येते ही एक चुलीची कल्पना तुला सांगितली, त्याबरोबर तुझी वृत्ती इतकी पालटली, पण मी ह्या सूपशास्त्रातल्या एकेक गोष्टी जर तुला सांगितल्या, तर तू आश्चर्यानें अगदी थक्क होऊन जाशील ! अरे, लवण, तिक्त, आम्ल, मधु, शर्करा इत्यादिक द्रव्यांच्या योगानें मूळ एकच पदार्थ पण त्यापासून सहस्रश. निरनिराळे पदार्थ करण्याचे आमच्या वाडवडिलांनी कसकसें हुडकून काढले, याची तुला कल्पनाहि नाहीं ! कडबोळी, चकल्या, जिलब्या आणि तारफेण्या हे चारच पदार्थ घेऊन जर तू विचार करु लागशील, तर हे पदार्थ मूळ निर्माण करणाराच्या विशाल कल्पकतेबद्दल आणि बुद्धिसर्वस्वाबद्दल आश्चर्यभरित होऊन तू थक्क होऊन जाशील ! शेतात धान्ये उत्पन्न झाल्यापासून तो त्याची पाकसिद्धि होऊन त्यापासून भिन्नभिन्न पक्वान्नें होत तोपर्यंत मध्यंतरी किती स्थित्यंतरातून त्यांना जावे लागते, याची तुला कल्पनादेखील नसेल ! अरे, चाळणीची रचना, जात्याची योजना, तसेंच उखळमुसळ, पाटावरवटा, पोळपाटलाटणे, झारेपळ्या, उलथनी, ओगराळी, भिन्नभिन्न द्रव्ये निरनिराळ्या प्रमाणानें मिसळण्याची कल्पकता, या व अशाच सहस्रश वस्तु जर या वल्लवाच्या वाडवडिलांनी हुडकून काढल्या नसत्या, तर आज यच्चावत् मनुष्यांना शेतात उगवणाऱ्या धान्याच्या उभ्या कणसाकडे नुसते टक लावून पहातच उभे रहावे लागले असते !

**लड्डुक**–आणि हीं मनुष्ये अशी टक लावतालावताच डोळ्यात प्राण येऊन शेवटी जमिनीवर पटापट आडवी होऊन पोटाकडे हात दाखवित गतप्राण होऊन पडतीं.

**वल्लव**—अरे, ऋषीचें कुळ आणि नदीचें मूळ हीं पाहू नये म्हणून म्हणतात; पण तसला लपडाव अथवा गोंधळ ह्या वल्लवाच्या कुळासबधानें अथवा मुळासबधानें बिलकुल नाही

( इतक्यात पुंडलीक हातात एक झारा घेऊन प्रवेश करतो )

**पुंडलीक**—वल्लवा, वल्लवा ! किती वेळ—किती वेळ ? बुंदीचें पीठ तयार करुन कढईत तूप घालून धूमधडाक जाळ करुन मी तुझी आणि या लड्डुकाची वाट

पहात आहे, आणि अजून तुह्मी दोघेहि इथेच ? अरे, ते श्रेष्ठ गुरु द्रोणाचार्य आज राजकुमाराकडे गुरुदक्षणा मागणार आहेत ह्मणून पचपक्वान्नें करायची आज्ञा झाली आहे, आणि तुह्मी दोघेहि अझून इथे ! मी एकट्यानें तिथें जीव द्यावा की मरावे ! आतातरी तुह्मी येता कीं नाहीं बोला ? का मी जाऊ, फरारी होऊ कुठे ? माझ्या कुळाची अब्रू जायचा प्रसग आहे आज ! लौकर आलात तर ठीक आहे, नाहींतर आजच्या फजीतीला पारावार नाहीं ! आह्मा आचाऱ्याची त्या आचार्याशी गाठ आहे आज ! तो काय लाडवाची गुरुदक्षणा मागतो, का जिलबीची, का घिवराची, का दशमीची, का थालीपिठाची अथवा कडबोळ्याची, काहीं अदमासच नाहीं लागत ! आज त्याला इच्छाभोजन आहे जर हवा तो इच्छेचा पदार्थ आह्मासारख्या पिढीजाद आचाऱ्याकडून त्या आचार्यांना मिळाला नाहीं, तर आपल्या धद्याची अब्रू नाहीं का जाणार ? ह्मणून ह्मणतों, आपल्या धद्याची अब्रू राखायची असेल, तर लवकर चला ! ब्राह्मणानी आपल्या दर्भाची, क्षत्रियानीं आपल्या तलवारीची, वैश्यानी आपल्या तराजूची, शूद्रानी आपल्या नागराची आणि आपल्यासारख्या आचाऱ्यानीं आपल्या झाऱ्याची, उलथन्याची, पळ्याची आणि लाटण्यापोळपाटाची अब्रू वचाविली पाहिजे चला, येणार तर लौकर चला, गुरुदक्षिणेची वेळ होत आली

**वल्लव**—लड्डुका, चल, हा पुडलीक फार बहुभाषी आहे याच्या तोंडाला कान देऊन उपयोगी नाहीं करणें थोडे आणि मचमच फार, अशातली आहे ही स्वारी आपले द्वद्व आपण इथेच विसरून जाऊ आणि सारे आचारी एकजूट होऊन आज या आचार्यांचा मोड करू चल चल, हेंच आपलें आज द्वद्व, प्रतिद्वद्व आणि महाद्वद्व ! यात जय आला तर आपण विजयी होऊ, आता उशीर करून नाहीं उपयोग एकीशिवाय कोणाचीहि बाजू बळकट होत नसते, आणि आपली बाजू बळकट नाही झाली, तर आपल्या हातून विरुद्ध पक्षावर सरशी होऊन शत्रूचा मोडहि होणार नाहीं तर चल, अगोदर गुरुभक्षणा आणि मग गुरुदक्षणा !

[ जातात.

---

## प्रवेश ७ वा.

[ स्थल—पडुप्रासाद द्रोण व कृपी प्रवेश करितात ]

**कृपी**—हे पत्र आल्यापासून असे विचारात काय बाई बसायच इतक ?

**द्रोण**—विचारात ? विचारात कोण बसतेय ? द्रुपदानें माझा अपमान केल्याबद्दल त्याला शातनव भीष्माचार्यांनी एक माझी क्षमातरी माग, नाहींतर युद्धासतरी

उभा रहा, ह्मणून मला न कळविता परस्परच पत्रिका पाठविली होती, त्याचें त्याच्याकडून आलेले उन्मत्तपणाचें प्रत्युत्तर त्यांनीं मला पहायला पाठवून दिलें आहे.

**कृपी**—अगबाई ! अन् त्यान अस लिहिल आहेन्तरी काय ?

**द्रोण**—ऐक, तो काय लिहितो तें.—तुमच्या द्रोणाचार्यासारखे आचारी या द्रुपदाच्या राजवाड्यांतल्या शागीर्दपेशात पत्रावळी आणि द्रोणे लावित गतश पडले आहेत—

**कृपी**—अगबाई ! कोण मस्तीच अन् उन्मत्तपणाच लिहिण हें !

**द्रोण**—पुढे तर ऐक –त्याजपेक्षा तुमच्या आचार्यांची किमत मी यत्किंचितहि जास्त समजत नाहीं—

**कृपी**—ह्मणजे ! रत्नाची किमत आधळ्यानींच करायची की नाहीं ?

**द्रोण**—पुढें तो लिहितो –आणि अशा आचार्यांचा अपमान झाला ह्मणून शरण या ह्मणून तुमच्याकडून पत्रिका येते, हेच मला मोठे आश्चर्य वाटते—

**कृपी**—हो, मोठ्याच आश्चर्याची गोष्ट !

**द्रोण**—पुढे ऐक –शरण ही अक्षरेंदेखील माझ्या तोंडून कदापि निघणार नाहीत, मग प्रत्यक्ष शरण येण्याची तर गोष्टच राहू द्या—

**कृपी**—कोण पण बाई घमड ही !

**द्रोण**—पुढे ऐक –युद्धाचीच जर अपेक्षा असली, तर वाटेल तेव्हा मी एका पायावर तयार आहे आपलें धनुष्य सज्ज करून पण दर्भ आणि ईषिका हातात धरून निरर्थक वल्गना करणाऱ्या भिक्षूशी युद्ध करायला उभे राहून क्षत्रिय वशीयाना अनुचित असें कृत्य करण्याची मात्र माझी बिलकुल इच्छा नाहीं—

**कृपी**—त्यापेक्षा युद्ध करण्याच आपल्यास सामर्थ्य नाहीं, अस स्पष्ट का नाहीं ह्मणत हा ?

**द्रोण**—तो पुढे लिहितो –युद्धच करायचे तर ते एक क्षत्रियाशीच करायचें. असा माझा पूर्ण निर्धार आहे इतकेंच नव्हे, पण हा युद्धाचा मानदेखील आमच्या, कडून सर्वांना मिळणार नाहीं आमच्याबरोबरीचे असतील त्यानाच मिळेल-आता, माझ्या स्त्रीनें आपल्या हातातील रत्नजडित अमोल्य वीरकंकणें आमच्या राजहर्म्यापुढील जलाशयाच्या मध्यभागी उभ्या केलेल्या वैडूर्यांनी खचित अशा स्फटिकाच्या पुतळीच्या हातात एक व राजवाड्याच्या चारी कोपऱ्यावर उभ्या केलेल्या चार पुतळ्याच्या हातात चार अशी शत्रूना अर्पण करण्याकरिता ह्मणून

नग्गर फिरत ठेवली आहेत तीं जो कोणी बाण लावून हरण करील, त्याला मात्र हा मान मिळेल मग तो क्षत्रिय असो अथवा एखादा क्षुद्र ब्राह्मण असो म्हणावे, या द्रुपदाच्या राज्यातल्या बायका शत्रूंना युद्धास धर्षण करित असतात! जर हिंमत असेल आणि माझ्याशी युद्धास येण्याची छाती असेल, तर म्हणावे माझ्या स्त्रीच्या या चल वीरकङ्कणाचे अगोदर हरण करा, तरच माझ्याशी युद्ध करणाराच्या स्त्रीला वीरांगनत्व प्राप्त होईल—

कृपी—तर मग हे कार्य अश्वत्थाम्यावर आणि अर्जुनावरच सोपवावं, म्हणजे ते दोघे तें तेव्हाच उरकून येतील द्रुपदाला म्हणावं, तुझ्यासारख्या क्षत्रियराजाच्या ठिकाणीं जो रणोत्साह नाहीं, तो कुरूच्या आचार्यांच्या बायकाच्या अंगी आहे मग पुरुषासबधान प्रश्न कसला?

द्रोण—आणि हे पत्र माझ्या अवलोकनार्थ पाठवून देऊन शांतनव भीष्म मला लिहितात की –द्रुपदाचे पत्र वाचून विषादहि मानू नये, आणि चित्तविक्षेपहि होऊ देऊ नये! कारण, हे पत्र पहाताच त्याच्यावर पाठविण्याकरिता सैन्याची वगैरे सर्व व्यवस्था करून ठेविली आहे—

कृपी—पण मी म्हणतें, इकडूनहि त्याच्याकडे चार दर्भ आणि ईषिकाच पाठवून द्यायच्या होऊन त्याला युद्धास बोलवायच व्हाव

द्रोण—हो, अगदी–अगदी योग्य सुचविलेंस त्याच्याकडे दर्भ आणि ईषिकाच पाठवून देऊन त्याला धर्षण करतो म्हणजे जशास तसें होईल ( विचार करून ) आणि त्याला असाहि पण निरोप पाठवितो की, माझ्याशी युद्ध करण्याची तुझी योग्यता आहे असें मला यत्किंचित्हि वाटत नाहीं करिता तुला प्रत्यक्ष माझ्याशी युद्ध करण्याचा बहुमान देणे योग्य नव्हे, आणि एवढ्याचकरिता तुझ्या मणिबधात चार अडकवून तुला बद्ध करून आणण्याकरिता धनुर्विद्येत प्रवीण झालेल्या माझ्या शिष्यांनाच पाठवित आहे ( इतक्यात अर्जुन येऊन वदन करितो त्याम ) का, अर्जुना या वेळीस कुणीकडे इकडे?

अर्जुन—[illegible], मातोश्रींचे दर्शन घ्यायला आलों होतो कारण आचार्यांनी गुरुदक्षिणा मागण्यापूर्वी आपले काय प्रिय करावे म्हणून त्यांना विचारण्यासाठी [illegible] आलो आहे

कृपी—[illegible] ' [illegible]–(द्रोणाचार्यांचे हातातील पत्र त्याचे हातात देऊन) [illegible] पत्र अगोदर वाच आणि मग मी तुला काय सांगायचं ते सांगते

( [illegible] पत्र वाचतो [illegible] त्रास दाखवतो [illegible] द्रोणाचार्यांशी कुजबुजते )

**अर्जुन**—किती उन्मत्तपणाचें पत्र आहे हें ?

**कृपी**—वाचलस? सगळ वाचलस? तर अर्जुना ' तू जा आणि द्रुपदाला कैद करून नीं तेवढी फिरती वीरकंकण माझ्याकरता घेऊन ये, ह्मणजे मी सर्व भरून पावल्ये !

**अर्जुन**—हें करायचेंतर मी हें पत्र वाचित असतानाच आपल्या मनाशी ठरविलें आहे याशिवाय दुसरें कांहीं आपलें प्रिय करण्याजोगें असल्यास सांगा द्रुपदाला ह्मणावें, दर्भ ईषिकाच्या पुण्याईचा प्रभाव कसा आहे तोच दाखवतो तुला आता कुरुवंशीय राजकुमाराच्या आचार्यांचा अवमान ! ह्मणजे काय य:कश्चित् गोष्ट आहे !

**कृपी**—त्यापेक्षा दुसरं माझं काय प्रिय असणार ?

**अर्जुन**—ठीक आहे तर आचार्य, मी याच घटकेला द्रुपदावर स्वारी करण्यास निघतो आणि द्रुपदास जिंकून आलो ह्मणजे मगच आचार्यांनी गुरु-दक्षणेची आज्ञा करावी आजचा गुरुदक्षणा देण्याकरिता केलेला राजसभेचा बेत श्रेष्ठ भीष्माचार्यांना सांगून रहित करवावा

**द्रोण**—अर्जुना, द्रुपदाला जिंकून आणण्याची तू जी आपली इच्छा दर्शविली आहेस, त्यापेक्षा अन्य गुरुदक्षिणा ती मी काय मागणार ?

**अर्जुन**—आई, आचार्यांचा प्रसाद ह्मणून मला चार दर्भ आणि ईषिका द्या

**कृपी**—( दर्भ ईषिका आणून ) हा घे तुला प्रसाद ( दुसऱ्याने दर्भ आणि ईषिका देऊन ) आणि हे दर्भ आणि ह्या ईषिका त्या द्रुपदाला युद्धाला पाचारण करताना पाठवून दे, आणि त्याला माझा असा निरोप पाठीव कीं, हे दर्भ आणि ह्या ईषिका आचार्यांची वीरांगना कृपी, हिने पाठवल्या आहेत ह्मणाव तुमच्याकडे आणखी त्याला असं कळवा कीं, धनुर्धर ब्राह्मणाच्या बायकोचा रणोत्साह क्षत्रिय राजाच्या उत्साहापेक्षाहि काकणभर अधिक असतो, हें तू पक्कं समजून ऐस !

**अर्जुन**—आज्ञा ( द्रोणाचार्यांस व कृपीस वंदन करून ) द्रुपदानें असें लिहिलें ह्मणून विषाद मानण्याचें कारण नाहीं या दर्भ ईषिकाच्या प्रसादानेच मी मातोश्रींचें आणि आचार्यांचे इच्छित कार्य उरकून येईन आणि याचा प्रभाव काय आहे तो द्रुपदाच्या प्रत्ययास आणून दाखवीन

**कृपी**—जा, यशस्वी होऊन ये

**द्रोण**—पार्था ये, तू नि:संशय विजयी होऊन येशील ! तुझ्याबद्दल मला शंकाच नाहीं वाटत

**अर्जुन**—येतो तर [ अर्जुन वंदन करून जातो.

द्रोण—श्रेष्ठ भीष्माचार्य लिहितात कीं, विषाद मानू नका आणि चित्तविक्षेप होऊ देऊ नका ? पण म्हणावें अशा तऱ्हेचा अवमान झाल्यावर विषाद वाटल्याशिवाय आणि चित्तविक्षेप झाल्याशिवाय राहील कसा ? द्रुपदाच्या हातात बधनें पडलेलीं पाहिल्याशिवाय हा चित्तविक्षेप आणि हा विषाद कधींहि नाहींसा होणार नाहीं ! मला एक वेळ वाटत होतें कीं, आपण कुरुसैन्य घेऊन जावें आणि या गर्विष्ठ आणि मदोन्मत्त द्रुपदाचा गर्व आणि मद हरण करावा पण त्याचें हें पत्र पाहून मलासुद्धा आता असें वाटू लागलें आहे कीं, एवढ्या मानाला हा नराधम पात्र नाहीं याला आपल्या शिष्याकडूनच धरवून कैद करवून आणावें

[ जातात.

---

## प्रवेश ८ वा.

[ स्थल—राजसभा भीष्म, द्रोण, कृपाचार्य इत्यादि आणि कौरवपांडवादि राजकुमार प्रवेश करितात ]

भीष्म—हे श्रेष्ठ धनुर्धर द्रोणाचार्य ! राजकुमाराची विद्या तुमच्या हस्तें पूर्ण झालेली पाहून मला अत्यानंद होत आहे, आणि थोड्याच कालात त्याना या धनुर्विद्येत, शस्त्रास्त्रविद्येंत आणि इतर अनेक प्रकारची जी युद्धें तुह्मीं त्यास शिकविलींत त्यात, याना जें प्रावीण्य आलें आहे तें अत्यत आश्चर्यजनक आहे कर्णार्जुनाचें धनुर्धारित्व व अचुक शरसधान, भीमदुर्योधनाचें मल्लयुद्ध व गदायुद्ध, धर्माची शल्ययुद्धातील प्रवीणता, दुःशासनाची रणझुंझारता, वगैरे पाहून आह्मी अगदीं थक्क होऊन गेलों व राजनगरींतील सारे प्रेक्षकजन आश्चर्यानें चकित होऊन आचार्यांच्या शिक्षणपद्धतीची प्रशसा करित राहिले आहेत अन्य देशाहून जे जे राजकुमार आणि इतर क्षत्रिय इथें शिक्षणाकरिता आले होते तेहि आपल्या कीर्ति-दुदुभीचा ध्वनी फार लाबपर्यंत नेऊन पोंचवितील, आणि त्याच्याबरोबरच आमच्या सार्वभौमत्वाचा दराराहि पण सर्वत्र गर्जून राहील एकंदरीत या कुरुकुलावर आचार्यांचे महत् उपकार झाले आहेत तर आता या उपकारऋणातून आह्माला अशत उत्तीर्ण करण्याकरिता आचार्यांचें आह्मीं काय प्रिय करावें, तें आचार्यांनीं कथन करावें विद्यार्थ्यांची विद्या परिपूर्ण झाली, आता गुरुदक्षिणा मागण्याचा योग्य समय आला आहे तेव्हा महाभागानीं आपली जी इच्छा असेल ती यत्किंचितहि सकोच न धरिता प्रगट करावी

शकुनी—( स्वगत ) अरे हे बोलूनचालून ब्राह्मण ! भोजनाशिवाय दुसरें शिरें हे काय मागणार ?

**दुःशासन**—फार झालें तर एखादें गाव अग्रहार मागतील, आणखी काय?

**शकुनी**—गाव कशाला मागतात म्हणा! नसती किटकिट ब्राह्मणाच्या मागे! गंगातीरावर स्नानसंध्येला एखादी पर्णकुटिका मागतील झालें!

**दुर्योधन**—मामा, जरा हळू बोला हे काय! केवढ्या मोठ्याने तुम्ही बोलता? हें जर अश्वत्थाम्यानें ऐकलें तर त्याला काय वाटेल? जरा चूप रहा. श्रेष्ठ भीष्माचार्य आणखी काय म्हणतात तेंतर ऐका अगोदर

**भीष्म**—आता, द्रुपदराजा आमचा संबंधी असून त्यानें आमच्या पत्रास उद्धटपणाचें उत्तर पाठवून आचार्यांचा आणि आमचा असा दोघांचाहि अपमान केला आहे, हें या राजकुमाराना द्रुपदराजाच्या पत्रावरून कळून चुकलेंच असेल. त्यावद्दल त्याच्यावर कुरुसैन्य पाठवून त्याला कैद करवून आणण्याची व्यवस्था केलीच आहे तेव्हा याबद्दल उद्वेग मानण्याचे आता प्रयोजन नाहीं.

**द्रोण**—हे कुरुकुलावतंस महाभाग श्रेष्ठ भीष्माचार्यहो! आपल्याकडेतर मला कांहींच मागायचें उरलें नाहीं. कारण मी राजनगरींत आल्यावेळीच आपण जो माझा बहुमान आणि आदर केलात, त्यात मी सर्वस्व भरून पावलों आहें. आजपर्यंत जसें आपलें मजवर प्रेम आहे तद्वतच यापुढेंहि असू द्यावे, म्हणजे मला सर्व प्राप्त झाल्यासारखेंच आहे

**भीष्म**—असें आचार्यांस वाटणे हें आचार्यांस उचितच आहे पण आमचें कर्तव्य आम्हास केलेंच पाहिजे, आणि तदनुसार आम्हाला जें कर्तव्य ते आम्ही करूंच पण आचार्यांनी आपल्या शिष्यवर्गाकडून जी काय गुरुदक्षिणा मागायची तीतरी मागावी

**द्रोण**—हो, तीतर मला मागायचीच आहे कारण त्याशिवाय ज्या हेतूनें मी हस्तिनापुरास आलों, तो हेतु साध्य कसा होणार! हे कुरुनंदनहो, तुमच्या शिक्षणास आरंभ करण्यापूर्वीच मीं तुम्हाला सांगितलें होतें कीं, तुम्हाला शिकवण्याचें हातीं घेण्यात माझा कांहीं उद्दिष्ट हेतु आहे म्हणून आता तुमची विद्या पूर्ण झाली आहे माझ्या विद्यादानाबद्दल गुरुदक्षिणा देण्यास कोण कोण तयार आहात ते सांगा

**धर्म**—आमच्यापैकीं प्रत्येकजण तयार आहे (कर्णदुर्योधनाकडे पाहून) का, असेंच की नाहीं दुर्योधना? आचार्यांनी आज्ञा मात्र करावी (सर्वजण आपापल्या उद्गारांनीं हुंकार देऊन उत्साह दर्शवितात)

**अश्वत्थामा**—जशी ताताची आज्ञा.

**द्रोण**—हा तुमचा सर्वांचा सारखा उत्साह पाहून मला अत्यंत आनंद आणि संतोष होत आहे तर ऐका, हे तडिद्वनु मी इथे ठेवित आहे द्रुपदराजानें माझा केलेला अपमान तुह्मा सर्वांना श्रेष्ठ भीष्माचार्यांनी विदित केलाच आहे तर आजपासून पंधरा दिवसांचे आत पांचाळ देशचा राजा द्रुपद याला रणांगणी जिंकून, त्याला इथें माझ्यासमीप जो बांधून आणील त्यानें मला यथार्थ गुरुदक्षिणा दिली असें मी समजेन आणि जो ही गुरुदक्षिणा माझ्या झोळीत आणून घालील त्याला आशीर्वादरूपी हे तडिद्वनु मी प्रेमपूर्वक देईन

**अश्वत्थामा**—तातांनी यांना आज्ञा करण्यापेक्षा मलाच हे कार्य उरकण्याची आज्ञा करावी ह्मणजे दर्भ आणि ईपिका धरणाऱ्या ब्राह्मणाच्या पुत्रांत कसा काय पराक्रम असतो, ते मी त्याला शिकवून येईन.

**द्रोण**—वत्सा, तुझ्याकडे मला गुरुदक्षिणा मागावयाची नाहीं नाहींतर मी तुझीच योजना केली असती द्रुपद, युद्धाचा मान ब्राह्मणांना देण्यास इच्छित नाहीं तेव्हा त्याच्यावर क्षत्रियाचीच योजना करणें उचित होय आता त्याच्याशीं युद्ध करण्याचीच जर तुझी इच्छा असली, तर अर्जुनाबरोबर जा आणि त्याच्या नगराच्या चारी कोपऱ्यावर चार स्फटिकाच्या पुतळ्या उभ्या केल्या आहेत त्याच्या हातातील चल वीर-ककणे आपल्या मातेकरिता काढून आण कारण अर्जुनानें तीं आणण्याचे तिला आश्वासन दिलें आहे ह्मणजे मग अर्थातच तुझ्याशी द्रुपदास युद्ध करावे लागेल

**अर्जुन**—(द्रोणास वंदन करून) मीतर यापूर्वीच प्रतिज्ञा करून चुकलो आहे आचार्यांच्या आशीर्वादाने हें कार्य सहज संपादीन असें मला वाटते !

**भीम**—(वंदन करून) माझ्या गदेच्या संचाराबरोबर आचार्यांचे आशीर्वाद मात्र पाहिजेत ह्मणजे याहूनहि दुर्घट कार्य मी उरकून येईन ! मग याची ती काय प्रतिष्ठा !

**दुर्योधन**—( द्रोणास वंदन करून ) मी आपल्या बाहुबलाच्या योगानें आणि आचार्यांच्या कृपाप्रसादानें सैन्यासह जाऊन पंधरा दिवसांत द्रुपदाला बांधून आणून गुरुवर्यांच्या चरणावर लोळण घालावयास लावतों

**द्रोण**—दुर्योधना, शत्रूचें आपलें बलाबल न जाणता कोणतीहि प्रतिज्ञा करणे इष्ट नव्हे द्रुपदराजा महा बलवान् आणि तसाच शस्त्रास्त्रविद्येंत आणि धनुर्विद्येंत फार प्रवीण आहे मीं ज्या गुरुजवळ अध्ययन केलें आहे त्याच गुरुजवळ त्याचेहि अध्ययन झालें आहे तेव्हा त्याजवर तुह्मी सर्व एकसहा जरी चाल करून गेलात, तरी तो एकाकी असूनहि तुह्मांला सहसा हार जाणार नाहीं.

**कर्ण**—आचार्यांनींच असें म्हटल्यावर आमचा नाइलाज आहे पण मी एवढी प्रतिज्ञा करतों कीं, प्राणदेखील वळी देईन, पण द्रुपदाला कैद करून आचार्यांच्या चरणारविंदीं लोळावयास लावीन

**द्रोण**—शाबास! कर्णा, तुझा हा उत्साह पाहून मला अत्यानंद होत आहे.

**अर्जुन**—( एकीकडे धर्मभीमास ) इण्ण इलाच टिपाद् रिजान्न रिण्ण गिण्ण ज्दि किल तिरे? ( आणि यालाच द्रुपदराजानें रणांगणी कैद केला तर ?)

**धर्म**—इर्जान, शिरान्न प्रित्त स्पिर्र विघ्र सिद्द इहात्त चित्त निय्य ( अर्जुना, शूरानीं प्रतिस्पर्ध्याचेंसुद्धा अहित चिंतू नये )

**कर्ण**—असें गुजगुज का करिता आपल्याशींच ? अन् हसता का ? खास हे माझी हेटाळणी करताहेत

**भीम**—हो हो, हेटाळणीच करतो आहो ! 'बोलेल तो करील काय आणि गर्जेल तो पडेल काय ?' म्हणून तूच सांगत होतासना ? अरे वीरानी करून दाखवावें, बोलून दाखवू नये !

**दुर्योधन**—वृकोदरा ! असें लावून बोलण्यात काय अर्थ ? तुझी धमक काय आहे ती सारी कळून चुकली आहे मला तुझ्या साऱ्या उड्या अर्जुनाच्या धनुष्यावर—स्वत· तुझी हिंमत अशी काय आहे ?

**भीम**—माझी हिंमत मी या गदेत आणि माझ्या या बाहूत साठवून ठेविली आहे तुझ्यासारखी ती कर्णाची लाळ घोटण्यात नाहीं खर्च केली—

**धर्म**—(हलकेंच एकीकडे) वृकोदरा, चप्प रहा गुरुजनाच्या पुढें अशीं भाषणें करणें युक्त नव्हे ज्याच्यात पराक्रम असेल त्यानें तो आचार्यांना गुरुदक्षिणा देण्यात प्रत्ययास आणून दाखवावा

**दुर्योधन**—कर्णा, या घटकेला आपण प्रस्थान ठेवून नगराबाहेर पडू इथे यापुढे आता एक क्षणभरसुद्धा रहावयाचें नाहीं जेव्हा द्रुपदाला जिंकून आणू तेव्हाच परत येऊ आचार्य ! मी आपल्याला प्रणाम करतो आणि याच घटकेला मी, कर्ण आणि माझे बंधु प्रस्थानभेरी ठोकून पांचालपुरास द्रुपदराजाकडे दूत पाठवून त्याला युद्धास आव्हान करितों

**द्रोण**—थांबा, त्याजकडे दूताबरोबर हे दर्भ आणि या ईषिका पाठवा आणि त्याला युद्धास आव्हान करा.

**दुर्योधन**—( दर्भ ईषिका घेऊन ) आज्ञा येतोंतर आम्ही. आचार्यांचा आशीर्वाद असावा [ कौरव वंदन करून जाऊ लागतात.

द्रोण—वीरपुत्रहो, जा, विजयी होऊन या

शकुनी—(जाताना एकीकडे) दुर्योधना, कर्णा, हे भीमार्जुन पाचाळपुरास जाऊन पोंचण्याचेपूर्वीच आपल्यास द्रुपदराजाला जिंकून कैद करून आणलें पाहिजे त्याशिवाय यांचीं नाकें चागलीं ठेवली जाणार नाहींत आणखी, हे जर जाऊ लागले तर ते बेसावध असता त्याना गाठून त्याना वाटेंत कैद करून ठेवण्याची जर काहीं योजना झाली, तर फार उत्तम होईल!

कर्ण—(सकोप) मामा, या वेळीं ही गोष्ट बोललात ती बोललात, पण पुन असली अनुचित गोष्ट—वीराना अत्यत निंद्य आणि शरम आणणारी गोष्ट—काढलीत तर मला साफ पुरवणार नाहीं! आपल्या प्रतिस्पर्ध्यांना गुप्तपणें—आणि ते बेसावध असता—कैद करणें हें खऱ्या वीराना नि सशय लाछनास्पद आणि मोठ्या शरमेचें आहे!

दुर्योधन—(शकुनीस दाबून) कर्णा, मामाच्या कुत्सित बोलण्याकडे कोणचा खरा शूर लक्ष देईल?

शकुनी—कर्णा, शत्रूचा पाडाव करण्याचे जे भिन्नभिन्न मार्ग आहेत ते तुला ठाऊक नाहींत म्हणून तू असें बोलतोस, एरवी तू असें बोलतासना! ते भीमार्जुन भयकर सर्प आहेत—दुर्योधनाच्या वाटेंत ते महा काळसर्प आहेत—त्याचीं तोंडें ठेचून कोणच्याहि रीतीने त्याचे दात पाडून टाकल्याशिवाय आपला मार्ग कधींहि सुरक्षित होणार नाहीं!

कर्ण—(त्वेषाने) भल्त्या वीराना अनुचित असे उद्गार आहेत हे! हे काढणाराच्या नीच मनाची साक्ष मात्र पटवतात तुमच्या अगात जर सामर्थ्य असेल, तर त्यांच्याशीं गाठ सामना करा आणि त्यात त्याचा पाडाव करून त्याना कैद करा पण ह्या अशा कुटिल आणि नीच मार्गाचे अवलबन करून हा गळेकापूपणा आणि [illegible] वृत्ती करू नका! आणि मी इतकेंहि सांगितलें असता असें करताना तुमचा जर बेताच असेल, तर ह्या तुमच्या नीच बेताबद्दल मी भीमार्जुनाना आता [illegible] सूचना दिल्याशिवाय स्वस्थ रहाणार नाहीं!

दुर्योधन—कर्णा, तू असा उतावळा का होतोस? मी तुझ्या वचनाच्या बाहेर जाईन असें का वाटतें तुला? चल, जो कुत्सित बुद्धीचा आहे त्याच्या बोलण्याकडे लक्ष [illegible]! आपल्याला करायचें तें आपण करू

दुःशासन—(एकीकडे) मामा, कर्णाच्या तोंडापुरतें दुर्योधनदादाला तसें बोलावें लागलें त्याच्या बोलण्याकडे लक्ष देऊन उपयोग काय? चला, त्याना करायचें तें त्याना करूं द्या, आणि आपल्याला करायचें तें आपण करू [जातात.

द्रोण—या अर्जुना ! द्रुपदासारख्या धनुर्विद्येत आणि शस्त्रास्त्रविद्येत अत्यंत निपुण अशा बलवान् आणि सरावलेल्या राजाशी युद्ध करायला तुह्मी जाता आहा, एवढी गोष्ट लक्ष्यात ठेवा. तुह्मी नवशिके आहात, आणि तो आहे युद्धात कष्टलेला दुर्योधन कर्णादिमंडळी गर्वाने फुगून जाऊन शत्रूच्या बलाबलाचा अथवा त्याच्या सामर्थ्याचा विचार न करिता पांचाल नगरीवर चाल करून जात आहेत

अर्जुन—आणि त्याचे जे कांहीं शब्द माझ्या कानीं पडले त्यावरून मला असें वाटतें की, त्याचा बेत आमच्यापुढें जाऊन आपणच विजय संपादन करावा असा आहे !

द्रोण—हे धर्म, भीमार्जुनादि पंडुनंदनहो ! व्यर्थ गर्व आणि अभिमान कुणीहि धरू नये, कारण तो धरणाराचें घर सदासर्वदा खालीं असतें तुमच्यापुढें धार्तराष्ट्र जरी चाल करून गेले, तरी त्यांत त्यांना हटकून जयच येईल, असें मला वाटत नाहीं कारण द्रुपदराजा माझ्या बरोबरीचा धनुर्धर आहे त्याच्यापुढें त्यांचा टिकाव लागणार नाहीं. शिवाय हे अभिमानास पेटून अंध होऊन त्याजवर चालून जात आहेत मागचापुढचा पोंच यांचे हातून ठेववेल हें संभवत नाहीं

अर्जुन—मग आपली आज्ञा असेल तर आह्मी असें करितों की, ज्याअर्थी ते आमच्या साह्याची अपेक्षा न करिता एकटेच पुढे जात आहेत त्याअर्थीं आह्मी अहिच्छत्र नगरीच्या बाहेर अर्धकोसावर उभे रहातों, आणि प्रसंग पडला तरच आह्मी द्रुपदावर चालून जाऊं

धर्म—अशा प्रसंगाची वाट पहाण्यापेक्षा आपण अगोदरच त्याच्या साह्यास जावें हेंच उत्तम

भीम—उत्तम खरें, पण अशानें गर्विष्ठ लोकांचा गर्व कसा नाहींसा होणार ?

द्रोण—मीदेखील तुह्माला हेंच सुचविणार होतो पण तुह्माला योग्य दिसेल तें तुह्मी करा मात्र द्रुपदाशीं युद्ध करण्यांत फार धोरण आणि पोंच मात्र ठेवा जा, विजयी होऊन या [ पांडव वंदन करून जातात.

द्रोण—( कांहीं ऐकल्यासारखें करून स्वगत ) 'विजयी होऊन या,' ह्मणून मी यांनां आशीर्वाद दिला पण हाच आशीर्वाद मलाहि कुणी अंतरिक्षातून देत असल्याचा भास होतो ( कांहीं ऐकल्यासारखें करून ) पुनः तेच शब्द ! हा आशीर्वाद मला कोण बरें देत असावे ? कुणीहि असोत ( त्यास उद्देशून ) हे अंतरिक्षस्थ अदृश्य पुण्यपुरुषहो ! मजविषयक तुमच्या प्रेमाबद्दल मी तुह्माला

विनयपूर्वक अभिवादन करितो ( स्वगत ) अथवा, याचा असा तर आशय नसेल, कीं, मीच द्रुपदावर चाल करून जावें पण कुरुनंदनानाच त्याजवर पाठवून देण्यात माझा विशेष हेतू आहे कुरुसेना घेऊन आपण स्वत द्रुपदाला जिंकण्यापेक्षा तेच कार्य जर आपण तयार केलेल्या शिष्याकडून करविलें, तर त्यात नि संशय काहीं विशेष पराक्रम आहे राजमदाने धुद, आणि वैभवाने अंध झालेल्या द्रुपदाला माझ्या शिष्यानीं जिंकिलें तर तेंच त्याला जास्त मर्मभेदक होऊन तीव्र शल्यासारखें टोंचून राहील, आणि मग अर्थातच त्याची धुंदी एका निमिषात उतरून जाईल (विचार करून) पण न जाणों, द्रुपदापुढे त्या धृतराष्ट्रपुत्राना आणि या पडुपुत्राना दोघानाहि जर हार खावी लागली तर ! मग मात्र मोठा चमत्कारिक प्रसग ओढवेल ! तेव्हा असें नाहीं उपयोगी ! आपण या धर्मार्जुनाच्या मागोमाग जाऊन अर्धकोशाच्या अतराने रहावें, आणि प्रसग पडल्यास धनुष्यास हात घालावा यात अपयश येणें शक्यच दिसत नाहीं कारण द्रुपदासारख्या आपल्या ब्राह्मण गुरुबधूचा बुद्धिपुर सर अवमान करणाऱ्या राजावर त्याला योग्य शासन करण्याच्या पवित्र हेतूनें मी जात आहे, विश्वास दाखवून मागून गळेकापूपणा करणाऱ्या नरपशूवर मी शस्त्र उचलित आहें, प्रथमत वचन देऊन मागून वचनभग करणाराला त्याच्या वचनभगाबद्दल योग्य प्रायश्चित्त देण्याकरिता मी आपलें धनुष्य सज्ज करित आहें, आणि एका ब्राह्मणाचा निष्कारण मानभग करून त्याचा क्रोधाग्नी भडकवून सोडणारावर सूड उगविण्याकरिता मी जात आहे ( पुन काहीं ऐकल्यासारखें करून ) पुन तेच शब्द ! माझ्या सहानुभूतीला अतरिक्षात सचार करणाऱ्या या महाभागाचे हे आशीर्वाद मला उत्साह देत आहेत, तेव्हा यात अपयश येईल ही कल्पनासुद्धा नको ! पवित्र हेतु असल्यावर पराजयाची भीति कुठली ! ब्राह्मणाशीं विश्वासघात, वचनभग आणि त्याचा जाणूनबुजून अवमान आणि मानभग करून जयाशा ! हातात धनुष्य धरणाऱ्या आणि शस्त्रविद्या जाणणाऱ्या ब्राह्मणाचा—आपल्या गुरुबधूचा—मानभग करून जयाशा ! छे , ती स्वप्नातसुद्धा आणू नकोस ह्मणावें ! [ जातो.

[ पडदा पडतो. ]

Reg. No. B. 165.

## मनोरंजक ग्रंथप्रसारक मंडळी, गिरगांव–मुंबई.

[ मंडळीनें प्रसिद्ध केलेलीं विक्रीस तयार असलेलीं पुस्तकें. ]

| | | किंमत | टपालखर्च |
|---|---|---|---|
| १ | धाकट्या सूनबाई (कापडी बांधणी) | ०–१२–० | ०–१–० |
| २ | संसारांतल्या गोष्टी | ०–६–० | ०–१–० |
| ३ | गुणसुंदरी † | ०–१२–० | ०–१–६ |
| ४ | नवयुग. † | ०–१२–० | ०–१–६ |
| ५ | सरस्वती † | ०–८–० | ०–१–० |
| ६ | द्रोणसकोप | ०–६–० | ०–१–० |
| ७ | रमा आणि माधव. | ०–४–० | ०–०–६ |
| ८ | मुरारराव. | ०–४–० | ०–०–६ |
| ९ | हंसदूत | ०–२–० | ०–०–६ |
| १० | मोहन–तारा. | ०–२–० | ०–०–६ |
| ११ | स्त्रियांचीं कर्तव्यें. ( कापडी बांधणी ) | १–०–० | ०–१–६ |
| १ | महिला वर्ष १ लें, पूर्वार्ध | १–४–० | ०–२–० |
| २ | महिला वर्ष १ लें, उत्तरार्ध | १–४–० | ०–२–० |
| ३ | मनोरंजन पुस्तक ४ थें | १–८–० | ०–२–६ |
| ४ | मनोरंजन पुस्तक ५ वें | १–८–० | ०–२–६ |
| ५ | मनोरंजन पुस्तक ६ वें. | १–१२–० | ०–३–० |
| ६ | मनोरंजन पुस्तक ७ वें | २–०–० | ०–३–० |
| ७ | मनोरंजन पुस्तक ८ वें | २–८–० | ०–३–६ |
| ८ | महाराष्ट्र महिला (मासिक पुस्तक ) वार्षिक वर्गणी ट ह सह | | २–८–० |
| ९ | मासिक मनोरंजन (मासिक पुस्तक ) वार्षिक वर्गणी ट ह सह | | २–८–० |

### बाहेरील पुस्तकें

| | | | |
|---|---|---|---|
| १ | बालरामायण | ०–३–० | ०–०–६ |
| २ | बालभारत | ०–५–० | ०–० ६ |
| ३ | भारतातील सोप्या गोष्टी | ०–१०–० | ० [illegible]–० |

† कापडी बांधणीचें पुस्तक हवें असल्यास चार आणे जास्त पडतील

Printed at the 'Nirnaya Sagar Press' & Published by K R Mitra, at Girgaon, BOMBAY, for the 'Manoranjak Granth Prasarak Mandali'

नम्र जाला भूतां । तेणें कोंडिलें अनंता ॥ —तुकाराम.





वार्षिक वर्गणीः—मुंबईत २–४–०. बाहेरगावीं २–८–०.

दर अंकास ट. ह. सह ०–४–६

मनोरंजन वर्ष ९, अंक ९ वा, माहे मार्च १९०४.

## विषयानुक्रम.



## मनोरंजनाच्या आश्रयदात्यांस विनंति.



# READY FOR SALE.

*Highly spoken of by the English Press.*

# Lord Curzon in Indian Caricature.

EDITED BY

## H. A. TALCHERKAR, B. A.,

BEING A BRIEF AND RAPID SKETCH OF HIS LORDSHIP'S RULE IN INDIA PRESENTED IN A SERIES OF STRIKING CARTOONS —QUAINT, INTERESTING AND ORIENTAL—ALL CAREFULLY SELECTED FROM THE HUMOROUS JOURNALS OF INDIA IN ALL OF WHICH THE VICEROY APPEARS AS THE CENTRAL FIGURE

**The hidden purport of the several Cartoons, Skits and Parodies is lucidly explained in the body of the work,—in His Lordship's own eloquent utterances where possible**

---

**Price Rs 1-4-0 Postage As 2**

---

## IMPORTANT TO STUDENTS OF FRENCH

*The only book which dispenses with the need of a French Teacher.*

HIGHLY COMMENDED BY THE FRENCH EXAMINERS OF BOMBAY UNIVERSITY

# A GUIDE TO FRENCH PRONUNCIATION,

BY

## H. A. TALCHERKAR, B. A.,

Being a practical and easy method of learning the correct French pronunciation, with an exhaustive Appendix containing in Gujerati, and Marathi (Devnagri) characters, pronunciations of lessons from M Henri Bués' First French Book

---

*Crown 8vo*, (**Price Rupee one only**) *Pages 150*

APPLY TO— K. N ATHAVALE, CLERK,

Aryan Education Society's High School, Girgaum, **BOMBAY**



Please mention 'The MANORANJAN' while ordering.

# अनाथ बालिकाश्रमास मदत.

**मनोरंजना**च्या आश्रयदात्याकडून अनाथ बालिकाश्रमाला मदतीदाखल मच्याकडे आलेल्या रकमेची पोच **मनोरंजना**च्या मे व जून महिन्याच्या कात प्रसिद्ध करण्यात येईल

**काशीनाथ रघुनाथ मित्र, संपादक 'मनोरंजन'.**



युवराज्ञी श्री. सौ. पद्मावतीबाईसाहेब गायकवाड

प्रीतीचिया बोला नाहीं पेमपाड ।
भलतेंही गोड करूनी घेई । —तुकाराम.

# मनोरंजन.



## राष्ट्रीय प्रार्थना.

हे दयाळू जगचालका! आह्मांला सुबुद्धि दे, दृढनिश्चय दे. हे करुणामय प्रभो! पुष्कळ वेळां आह्मांला भले काय, वाईट काय, कळत नाही. बरें, जेव्हां तें कळतें तेव्हां जे चांगलें, जे प्रशस्त त्यालाच धरून रहाण्याचें आमच्यानें होत नाही आमचें राष्ट्र एका काळीं पृथ्वीच्या सर्व राष्ट्रांचे मुकुटमणी होतें त्या उच्च पदापासून ढांसळून आजच्या अपेष्टांमध्यें लोळत पडलें आहे, याचीं कारणें काय हे आमच्या लोकांनां कळत का नाहीं? परंतु ज्याप्रमाणें दुर्व्यसनी मनुष्याला त्याचे कर्म वाईट हें कळत असूनहि दुर्व्यसनाचे अमलामुळें त्याचें वर्तन सुधरत नाही, त्याचप्रमाणे आमच्या लोकांची स्थिति झाली आहे हे दयाळू परमेश्वरा! आपलपोटेपणानें सत्याची उपेक्षा, आपलपोटेपणानें दुसऱ्याचे सद्गुणाची उपेक्षा, आपलपोटेपणानें देशकार्य बुडवून स्वार्थ साधण्याची हांव, आळसामुळें व सुखाळूपणामुळें खरोखर आपल्या देशाला भये आहेत की नाहींत व असल्यास त्याचें शमन कसें करावें याचा विचारहि करण्याचा कंटाळा, स्वताला व राष्ट्राला आपल्या कर्मांनी पुढें भयंकर दिवस येतील हा विचार न करितां तत्कालिक क्षुद्र लाभांला भुलून दीपावर झडप घालणाऱ्या पतंगांसारखें देशकार्यधुरा वहाणारांचें वर्तन, या गोष्टींमुळें आमच्या राष्ट्राचा अद्यापवर विनाश झाला व पुढें होत आहे. देवा! हे हाल आमच्यानें सोसवत नाहींत. आमच्या देशांत प्रत्येकजण शहाणा काय तो मी, असें आपणास समजत असल्यामुळें देशस्थिति सुधारण्याची आशाहि कमी दिसते! तुझी कृपा झाल्यावांचून आमची राष्ट्रस्थिति सुधारण्याची आशा दिसत नाहीं ह्मणून हे कृपाकरा! आमच्या राष्ट्रांतील लोकांचे दुर्गुण जातील अशी त्यांनां सुप्रेरणा दे, व त्याप्रमाणें त्यांनां वर्तन करण्याचा दृढनिश्चय दे, एवढेंच मागणें मागतों.



## युवराज श्रीफत्तेसिंगराव गायकवाड यांस

# मनोरंजनाचा प्रेमाचा आहेर.

शुभमगल समयाला युवराज–विवाह जाहला साचा;
साधू वधूवराला चिरोपभोग प्रभो ! विलासाचा ! १

मगल विवाह–दिवशीं आलों आहेर घेउनी आजी,
पद्मावतीप्रिया ! हा घ्या फत्तेसिंह ! बाळराजाजी. २

सच्छिक्षण बोधाच्या दिधलें तातें अमूल्य आहेरा
आम्हीहि यथाशक्ती अर्पितसों भक्तिपूर्व हा, हेरा. ३

गुणहीन हा परि नसे, प्रेमगुणी बद्ध सर्व जन साचा,
कटक बहि स्थ केवळ, परि अतर्भाग जेंवि पनसाचा ४

अनुराग–तिलक भाळीं लावू, त्यावरति अक्षता निष्ठा,
युवराजा ! भूषण हें श्रेष्ठा तैसें सम–प्रिय कनिष्ठा. ५

जनता–सतोषाचा चढवा जरतार अगराखा, या,
हेंचि कवच राजाचें साचें दृढशक्ति अग राखाया ६

बाधा हा सुयशाचा दिव्यद्युति शुभ्रवर्ण मदील,
शोभाल भास्करासम, समस्त जन मुदित–चित्त वदील. ७

हा अभिमान–सुखाचा चतुरा ! सुदर तुरा वरी खोंवू,
जे सद्रोही त्याची दृष्टि कधीं या न घातकी होऊ ८

सद्वृत्त–वर्ण–मौक्तिक दे शोभा मधुर विपुल कानातें,
यातें सेवुनि, लावो वपु तुमचें हर्ष-ज-पुलका नातें ९

सैत्कविसुवर्णपदका कठीं घाला वरी उजळ कठी,
ही दे प्रकाश त्याला, जो अधारीं निजायुला कठी १०

---

१ वृत्त= वार्ता, ( पक्षीं ) गोलदारपणा. वर्ण= अक्षर, ( पक्षीं ) रग.
२ हर्षानें उद्भवणाऱ्या रोमाचाला ३ सुवर्णपदका–चागल्या अक्षराचीं पदें ( शब्द ) आहेत जींत, ( पक्षीं ) सोन्याचें पदक आहे जिला

सुविचारसुमांची ही हृदयीं माळा सलील कवटाळा,
शीतलगुणें इच्या या दाहिल न मनास दु:खज-ज्वाळा. ११

पसरू निश्चयगुणपट, कुलजा ! लागो न दुष्ट-रज पाया,
हा मोह नित्य मोही यास्तव लागे सदा बहु जपाया. १२

ही न्याय-बुद्धि हातीं देतों सादर सतेज तरवार,
ताराया सुजन, कुजन वाराया ही तयार खर-धार १३

सुक्षत्रियास साजे, तसला केला तुम्हांस आहेर;
हा लेवुनी सदाही विलसा शुभकान्ति आत-बाहेर. १४

बहु रोषणाइ चमके, तरि ओंवाळीन सत्य-दीपातें,
श्रीफळ देती लोकीं जन सादर रत्ननिधि नदी-पातें. १५

युवराज ! आज उघडे कर्तव्य-दिशा पुढें दुहेरी ती,
कर्तव्य चुकविणें ही सुज्ञ-जनाची कधी नव्हे रीती. १६

मनु म्हणतो 'गृहिणी गृह, गृहिणी-हीनें गृहेंहि कान्तारें'
नृप-तनया ! झालासी गृहस्थ लाभूनि उचित-कान्ता रे ! १७

श्रीसूर्यवंशभूषण-रामासम व्हाचि एक-पत्नीक;
नीतिप्रकाश साडुनि, नयनी न भरा अनीतिचा चीक. १८

गृह-नीति-सौख्य आहे राष्ट्रहिताचा बरा खरा पाया,
दुर्वृत्त महीपतिला त्रस्त जन न सोडितील शापाया. १९

अबलोन्नती कराया युवराया ! या पुढेंच पाऊल;
जो बुध विमृश्य-कारी त्याला होईल का दिशा-भूल ? २०

सद्बुद्धीच धरावी, विफल दुराशा नको महत्वाची;
श्रमकर मृगजळ, न हरी तृष्णा; ही गोष्ट मुख्य तत्त्वाची. २१

सत्ता, इच्छा, याची सागड घडवील अघडहि क्रान्ती;
म्हणुनि सदिच्छा-महती जाणा, हृदया न या शिवो भ्रान्ती २२

प्राचीस सूर्य उगवुनि गेलासे पश्चिमेस मावळता;
परि दृढ चित्ती ठेवा होइल पूर्वेस तो पुन्हा वळता. २३

शनि-दृष्टि-समा ज्याची कविनें अशुभा कुदृष्टि टाळावी,
त्या दुष्ट अहंकारें युष्मन्मति पळहि ना विटाळावी. २४

पर–रूढि स्वीकरणें पूर्ण विचारातिं सर्वथा पटुनी,
अविचारें धावावे तिमिरी का भुज सगर्व थापटुनी ? २५

सोडावे सत्व तरी मान–धनाने कशास वाचावे ?
अचळाने काय मरुल्लहरीसह डळमळून नाचावें ? २६

सर्वत्र 'यतो धर्मस्ततो जय' असें रहस्य सिद्धीचे,
हें कळता, अन्य कशा उपाय व्हावेत आत्मशुद्धीचे ? २७

राजकुळी दैवगती केवळ देणार जन्म, पाहा, ती.
सुयशस्कर पौरुष परि राहे अपुल्याचि युवनृपा ! हाती. २८

राजकुळीं जन्म नसे केवळ भोगार्थ, हे खरें वदतों,
घालील जागरूक–क्षितिपतिवरि फार भार हे पद तों. २९

'देतो सुज्ञ–सहाया सुज्ञाहि सुराज्यभार ताप सदा'
हे श्रीमयूरवाणी का काप न देउ भारतापसदा. ३०

आहे गायकवाडी कुळ शुद्ध श्रुत मराठमेळ्यात;
त्या भूषणसे व्हावे, कुळदूषण नुचित– उचित देहान्त! ३१

युवराज ! आज चढता सत्स्तिचा दिव्यभव्य उमराठा,
गोधर्मद्विज पाळा, स्मरुनी कीं क्षत्रियोत्तम मराठा. ३२

कर्तृत्व दाखवोनी झिजता तनु, वृद्धि पावतें तेज,
पावे भूषोचितता मौक्तिक पडल्यावरी तया वेंझ. ३३

कर्तव्यमात्र करणें, पोकळ वटवट फुका कशाला ? हो !
युवराया ! तुमचा कर सत्कर्तृत्वीं महायशा लाहो ! ३४

नुसता दिमाख नलगे, होतो वर काय निवळ वाशिंगें ?
जूट असो, फूट नसो, जी सत्कार्यांहि पाडिते विंगें ३५

अभ्रकष तरु अभयद–शाखाकर पसरुनी भले दूर,
सोसुनि हिमातपातें, आघाताते जसा रणीं शूर ३६

परिपोषी अर्पुनिया आश्रय–फल–शातितें विहगास,
स्वच्छा स–च्छायेला, पशु येती त्यास दे दल–ग्रास. ३७

---

१ नीच भारतीयास; कुमार्गी आर्यजनास.

ऐसाचि सुज्ञ नृपनी होतो जनता–हितामधें दग,
कष्टश्रम अनुभविता न पडे त्याच्या व्रतीं कधीं भग. ३८

जेंवि प्रत्यूषीं लघु वनस्पतिंस देइ पुष्टि हिम–सेक,
तेंवि दया वर्षुनिया दीनजना सुखवितो सुनृप एक. ३९

वर्ता फार विवेकें, सुटतां शर परतवी न त्या हेतू;
"पटु पथ्य गदापूर्वी, पूरापूर्वींच साधिती सेतू" ४०

सावध राहुनि करणें पारख वरवी सदा मनुष्याची,
त्या दूरवा लरें, जे धरिति कुटिलता मनीं धनुष्याची! ४१

अपरिचिताचा सहसा धरणें सुज्ञा! न योग्य विश्वास,
उतरेल कसाला, तो मित्र लजिणें न जोंवरि श्वास ४२

धैर्यपरीक्षार्थ सदा दावी भव–पथ नवेनवे गुते,
परि त्यास तोंड देतो, भ्रमुनी न ज्ञानि–जन कधीं कुथे. ४३

लक्ष्मीसरस्वतींचे वैर जुनें वर्णितात कवि मोठें,
तातानुकार करुनी त्वां दावि जगा समग्र तें खोटें. ४४

क्षोणी ह्मणती 'अस्थिर वृत्ती असते सदैव राजाची,'
ह्या सिद्धान्त करावा असत्य, ह्या मन्मतिप्रती जाची ४५

तुमची उदार सुकृती परिसुनिया स्तुति करोत नविच कवी,
राष्ट्रासह नृपतींचे क्षुद्रा मति काय दात न विचकवी? ४६

होओ समर्थ तव कर युवराया! भूभरा वहायास,
करिता प्रजाहितातें मानो न कधींहि हा महायास ४७

तव कर्ण रुसो न कधीं ऐकुनि निज दाविले परें दोष,
सुज्ञा! फत्तेसिंगा! दोषगणा वाढवी असा रोष ४८

सत्कृत्यें, सामर्थ्यें उजळो तव दंड–मुकुट–पद–तेज,
दुष्टां पविकठिन, परी सुष्टां तव हस्त होउ सुमसेज ४९

भक्त **मनोरंजन** हा देत असे फार अल्प आहेर,
आहे रसिका! परि हा युवराया! शुद्ध–भाव–माहेर. ५०

---

१ दहिवराचा वर्षाव.

# विविध वृत्त.

जगातील सर्व जमीन समप्रमाणानें विभागली तर प्रत्येक मनुष्य २३॥ एकराचा धनी होईल

---

साउथ अमेरिकेंतील वालपरेसो गावात ट्रॅम्वे कडक्टरचीं कामे बहुतेक स्त्रियाच करितात

---

अदमान बेटातील लोकाएवढे खुजे लोक साऱ्या जगात दुसरे कोठेहि नाहींत. अदमानीलोकाची उची सरासरी तीन फुट असते व त्याचें वजन सरासरीनें सत्तर रत्तल भरते

---

अत्यत कमी पर्जन्य साउथ आफ्रिकेंतील पोर्टनोलाथ गावीं पडतो तेथे मेघराजाची कृपा प्रतिवर्षी सारी एक इंचच—कधीकधीं त्याहूनहि कमती—असते.

---

अतिशय उच लोक पालिनेशिअन्स बेटातील—ज्यात सामोआ, न्यूझीलड, माक्विसस व हवाजी लोकाचाहि समावेश होत असतो ते—होत त्याच्या उचीची सरासरी काढल्यास पूर्ण वाढीस आलेले लोक ५ फूट, ९$\frac{1}{2}$ इच उच असतात

---

मनुष्याच्या जीवनास हवा ही सर्वांत अत्यत महत्वाची आहे पाण्याच्या थेंबालाहि स्पर्श केल्याविना मनुष्य आठ दिवस जगेल, एक क्षणाचीहि झोंप न घेता तो दहा दिवसपावेतों तग काढील, परतु हवेविना त्याच्यानें पाच मिनिटावर एक सेकंदहि काटवणार नाहीं

---

बालकाचीं नखें तरुणाच्या नखापेक्षा अधिक झपाट्याने वाढत असतात परतु तींच वयातीत माणसाचीं मदगतीनें वाढतात हिंवाळ्यातील दिवसापेक्षा उन्हाळ्यातील दिवसात नखें अधिक लवकर वाढतात त्याचप्रमाणें डाव्या हातापेक्षा उजव्या हाताचीं नखें अधिक त्वरेनें वाढत असतात

---

स्पेन देशामध्यें अशी चाल आहे कीं, ट्रॅममध्ये बसताना किवा ट्रॅममधून उतरताना प्रत्येकानें बाकीच्या उतारूना मोठ्या अदबीनें सलाम केलाच पाहिजे! त्याचप्रमाणें तेथें दुकानात शिरताच प्रारंभीं दुकानदाराला अदबीनें सलाम केल्याविना जर एखादें गिऱ्हाईक सौदा करावयास लागलें, तर स्पॅनिश लोक त्याला गावढळ म्हणतात

---

साऱ्या जगांत जेथें उष्णता अगदीं परमावधीला पोहोंचली आहे असा देश म्हटला म्हणजे आफ्रिका खंडांतील विशाळ अशा सहारा अरण्यांतील मध्य प्रदेश होय. तेथें शीतोष्णमापक यंत्रातील पारा १२२ अशापर्यंत चढतो त्याचप्रमाणें जगांतील अतिशय थंडीचा देश निकारागुआतील 'ग्रेलटाऊन' होय तेथे दरवर्षी अगदीं गेलाबाजार तरी २६० इंच पाऊस पडत असतो

---

आजमितीला १,५०,००,००,००० एक अब्ज पन्नास कोटी लोक पृथ्वीच्या पृष्ठावर आहेत. ३,८०,००,००० तीन कोटी ऐंशी लक्ष लोक दरवर्षी मृत्युमुखी पडतात. प्रत्येक दिवशी सरासरी १,००,००० एक लक्ष मनुष्ये मरण पावतात. प्रत्येक तासाला ४,००० चार हजार मरतात. प्रत्येक मिनिटाला ६७ मरण पावतात. परंतु एका मिनिटात ७० सत्तर जन्मास येतात.

---

बोलण्यापेक्षा गायनाच्या योगानेंच फुप्फुसें अधिक जोरदार होत असतात असा सिद्धांत कांहीं डॉक्टर लोकानी काढला आहे. गाण्याने नुस्ती फुप्फुसेंच जोरदार होतात असे नव्हे, तर त्याबरोबर शरीरकांती अधिक मोहक दिसू लागते सर्वसाधारणरीत्या नित्य गाणाऱ्या लोकाची शरीरसंपदा सुदृढ असते त्यांची अंगकांती गौर वर्णाची असते व शरीराच्या सुदृढतेला जितका अत्यावश्यक असतो तितका त्याचा श्वासोच्छ्वास चालत असतो.

---

अतिशय जवळ अशी ढगे पृथ्वीतलापासून साधारणपणें अर्ध्या मैलावर असतात वामळीची हवा असली म्हणजे हे धुक्याचे थरच्या थर क्षितिजाबरोबर आपल्या दृष्टीस पडतात. त्या ढगाची गति प्रत्येक तासाला तेवीस मैल असते अत्यंत उंच ढगें आपल्यापासून १० मैल उंच जातात गगनपथ स्वच्छ असताहि ती अगदी पांढरींपांढरी शुभ्र असतात सकृद्दर्शनी ती जरी अचल दिसतात तरी त्याची चलनगति दर तासाला ७५ पासून ९० मैलपर्यंत असते. ग्रीष्मकाळाच्या ऐन भरात तीं उंचचउंच असतात व हिमकालात ती अगदी जवळ असतात

---

मुलें एक वर्षापासून पाच वर्षापर्यंतच्या काळात अतिशय झपाट्याने वाढत असतात मुलगे व मुली याची वाढ पाच वर्षेपर्यंत जवळजवळ सारख्याच प्रमाणावर असते पाचपासून पधरा वर्षांपर्यंत मुलगे मुलींपेक्षा जास्त झपाट्यानें वाढतात दहापासून पधरा वर्षापर्यंत मुली मुलग्यापेक्षा अधिक लवकर वाढत

असतात मुलग्याची वाढ त्यांच्या तेविसाव्या वर्षी खुटते मुलींची वाढ त्यांच्या विसाव्या वर्षी खुटते मुलाचें शारीरिक बळ बारा वर्षांपासून एकोणिस वर्षांपर्यंत झपाट्यानें वृद्धि पावत असते, पुढे तिशीपर्यंत मंद गतीनें वाढत असते आणि तिशीच्या पुढें वाढीला उतरती कळा लागते

---

लंडनच्या कोर्टात नुकताच एका फिर्यादीचा पुढीलप्रमाणे निकाल देण्यात आला एका गृहस्थाने इ स. १८८६ साली एका सावकारापासून २० पौंड (३००रुपये) कर्जाऊ घेतले होते व्याजादाखल धनकोने रिणकोकडून आजपर्यंत १०० पौंड ( १५०० रुपये ) वसूल केले होते तथापि कर्जाची फेड न झाल्यामुळे त्यानें रिणकोवर सव्याज १५३ पौंडाचा (२२९५ रुपयाचा) दावा आणिला होता जज्जानें वादीच्या तर्फेच फैसला दिला आणि दरमहा १ फार्दिंग अर्थात् ३ पैंचा हप्ता ठरविला कर्जाची फेड करून घ्यावयाला धनकोला दहा हजारावर वर्षे वाचलें पाहिजे

---

इ स १७२९ मध्ये फ्रान्सदेशात आश्चर्यकारक रीतीनें जलद वाढ झालेल्या एका मुलाचें उदाहरण घडलें आहे तो सहा वर्षांचा झाला तेव्हा त्याची उंची साडे पाच फूट होती पाचवे वर्षीच त्याच्या आवाजांत फरक पडला सहावे वर्षी त्याला दाढी आली व त्या वेळीं तो तीस वर्षांच्या पुरुषासारखा दिसू लागला सात मण वजनाची गोण तो सहज उचलित असे जलद वाढीप्रमाणेंच त्याला वृद्धावस्थाहि तशाच त्वरेनें आली आठवे वर्षीच त्याचे दाढीचे व डोक्यावरील केस पांढरे शुभ्र झाले दहावे वर्षी चालताना पाय लटलटू लागले व दात गळून पडले, आणि बारावे वर्षीच पूर्ण वृद्धावस्था पावून बिचारा मरण पावला !

---

द्रवीभूत झालेल्या सुवर्णरसाचा महासागर आपल्या खालीं आहे असें म्हणतात पृथ्वीतलाच्या मध्यभागीं आपण जर एक चर खणला व तसेंच जर सुमारे बाराएक मैल सारखे खोलवर खणीत गेलों, तर खडक अर्धवट वितळलेले आपल्या दृष्टोत्पत्तीस येतील आणखी दहा मैल खोल खणल्यावर जिकडेतिकडे द्रवीभूत झालेल्या काचेच्या रसाप्रमाणें एक द्रव्य दिसू लागेल पन्नास मैलावर वितळलेल्या —रुप्याचे, शिशाचे, जस्ताचे थर दिसतील त्याच्या खालीं द्रवीभूत झालेल्या लोखंडाचे, तांब्याचे व निकल धातूचे थर आढळून येतील आणि त्याच्याहि खालीं सोन्याचे तप्तमय थर गोचर होतील

---

# सुबोध वचनें.

मनुष्यानें काय करावयाचें तें करून दाखवावें, बोलून दाखवू नये.

---

प्रत्येकानें आपल्या साऱ्या हयातींत एखादेंच सत्कृत्य जरी केलें तरी चालेल.

---

मनुष्याचा मुत्सद्दीपणा संकटकाळींच खरा दिसून येतो.

---

आपला आशाभंग झाला ह्मणून आपणहि लोकांनां आशाभंग करावे हा कांहीं न्याय नव्हे

---

लोकांनीं आपल्याशी ज्या रीतीनें वागावें असें आपण इच्छितो, त्याप्रमाणें आपण आधीं लोकांशीं तसें वागावें

---

चांगले दिवस येतील ह्मणून नुस्ती जपमाळ घेऊन स्वस्थ बसणाराला कधींहि चांगले दिवस येत नसतात. उद्योगाची कास धरील त्यालाच कांहींतरी साध्य होईल.

---

ईश्वरानें मनुष्यास जे जन्मास घातलें आहे तें त्यानें कांहींतरी सत्कृत्य करून लोकांना सन्मार्गाचा आदर्श होण्याकरिताच आहे हें प्रत्येकानें लक्ष्यांत वागवावें.

---

आपली गुप्त गोष्ट दुसऱ्याजवळ कधींहि सांगू नये कदाचित् दुसऱ्यानें आपलें गौप्य आपल्याला सांगितल्यास तें मनांत ठेवावें त्याची दुसऱ्याजवळ परिस्फुटता करणें ह्मणजे विश्वासघात करणें होय

---

रिणको अथवा धनको यापैकीं कांहींहि होऊं नका परंतु नाईलाजच झाला तर त्यांतले त्यांत रिणको व्हा कारण यदाकदाचित् तुह्माला पैसे जरी उसनवार मिळाले नाहींत तरी किमानपक्ष तुह्माला बहुमोलाचा उपदेशतरी मिळाल्याशिवाय रहाणार नाहीं

---

तुमच्या मनाला खरें समाधान व शांति पाहिजे असेल तर तुमच्यापेक्षा ज्याची उच्च स्थिति आहे त्याचेकडे न पहातां तुमच्याहूनहि ज्याची स्थिति अधिक कष्टकर आहे अशा लोकांकडेच नेहमीं पहात जा ह्मणजे तुमच्यावर दुःखाचे मेरुपर्वत जरी कोसळले तरी त्यांतहि तुमच्या जिवाला स्वास्थ्य लाभल्याशिवाय राहणार नाहीं

---

# जपानी मुलें.

जपानदेश म्हणजे लहान मुलांकरितां एक नंदनवनच आहे! जपानांत लहान मुलांचें संगोपन इतक्या ममतेनें आणि काळजीनें होतें कीं, तसें इतरत्र क्वचितच होत असेल जपानी लोक बालसंगोपन करणें हा आपला परमधर्म आणि पवित्र कर्तव्य समजतात

जपानी लोकांची आपल्या मुलांवरील ममता आणि आपल्या मुलाच्या संगोपनाची काळजी हीं फार ध्यानांत ठेवण्याजोगीं आहेत पुत्र जन्मास येवो अगर कन्या जन्मास येवो, जपानी मातापित्यास सारखाच आनंद होतो तथापि पुत्ररत्नप्राप्तीपासून जपानी मातापितरांस विशेष तऱ्हेचा आनंद होतो कारण कुटुंबाचें नांव, मालमत्ता आणि मान राखण्याची जबाबदारी पुत्रावरच असते जपानी लोक मूल जन्मास येतांच त्याची जन्मवार्ता नातलगांस आणि इष्टमित्रांस पत्रानें अगर मनुष्य पाठवून मुद्दाम कळवितात हें आनंदवृत्त कळतांच आप्तमित्र तावडतोब मुलास पहाण्याकरितां येतात येतांना ते मुलासाठीं कांहीं देणग्या घेऊन येतात मूल जन्मल्यानंतर सातवे दिवशीं त्याचें नांव जिल्ह्यातील सरकारी वहींत नोंदलें जातें जपानी लोक हा दिवस सणाचा समजतात. या दिवशीं मोठें पक्वान्नाची ( एकप्रकारचे खिचडीची ) सर्व आप्तइष्ट मंडळीस मेजवानी मिळते.

'मियामेरी' नांवाचा संस्कार मुलाचे ३१व्या दिवशीं व मुलीचे ३०व्या दिवशीं होतो गृहस्थ लोक या दिवशीं मोठ्या समारंभानें लहान बाळास देवदर्शनास नेतात जपानांत मुलांची वाढ फार जलद होते तिकडील मुलें जात्याच बळकट आणि मोठीं धीट असतात निस्तेज, मंद व दुबळीं मुलें तेथें फारकरून नाहींत लहान मुलास तंग व घट्ट कपडे घालून जखडून न टाकतां जपानी लोक त्यास अगदीं हलके आणि सुखावह असे कपडे घालित असल्यामुळें त्याच्या शरीराची वाढ जोमानें होते मुलें कुरकुर अगर रड न करितां हौसेनें कपडे घालूं देतात कारण मूळ कपडेच सुखावह असल्यामुळें ते घातल्यानें त्यास जखडून टाकल्यासारखें वाटत नाहीं

मुलानें अगर जेव्हां एकाहून जास्त कपडे घालावयाचे असतात तेव्हां जपानी लोक त्यावर एक कपडा चढवित नाहींत तर प्रथम एका कपड्यांत दुसरा कपडा घालून तो जमिनीवर पसरतात व मुलाला बिछान्यावर अगर मऊ जागीं निजवून

टल्कल त्याचे अंगावर कपडे चढवितात. यामुळें मूल बिलकूल किरकिर करित नाहीं. जपानीलोक लहान मुलांस अगदीं मोठ्या पहाटेस स्नान घालतात मुलांस न्हाऊ घालण्याचें पाणी इतकें कढत असतें कीं, तें इतर कोणत्याहि देशातील लहान मुलास सहन होणार नाहीं जपानांतील मुलांसहि तें पहिल्यापहिल्यानें फार असह्य होतें, पण संवयीनें तिकडील मुलें तें मोठ्या धैर्यानें सोसतात व यामुळे तीं पुढें फार काटक होतात.

मूल दोनतीन महिन्यांचें होताच त्यास बाहेर मोकळ्या हवेंत हिंडवितात. साधारण स्थितींतील व गरीब लोकात हें काम बहुतकरून वडील बहीणभावासच करावें लागतें. लहान मुलास जरा समजू लागताच तीं वडील बहीणभावडाच्या पाठकुळीस लटकलेलीं दृष्टीस पडतात. यामुळें त्यांच्यात नाजूकपणा न येतां काटकपणाच जास्त येतो.

मूल वयात येताच तें आपलीं खेळणीं बरोबर घेऊन इतर मुलाबरोबर ऊन्ह, वारा, पाऊस यामध्ये भटकत असतें त्याचा घरात त्रास बिलकूल नसतो फक्त जेवणापुरताच कायतो त्याचा त्रास आईबापास असतो; बाकी रात्र पडेपर्यंत तें बहुतेक बाहेरच हिंडत असतें.

श्रीमंत लोकाची लहान मुलें दायाच्या स्वाधीन असतात खरी, पण तीहि आपापलें अंग सांवरू लागतात दायाची त्यास फारशी मदत लागत नाहीं अशी मुलें आपल्या बागात बागडत असतात सरदार व राजघराण्यातील मुलाचें संगोपन त्याची आई स्वतः करते. यामुळें पुढें आपापल्या घराण्याच्या आनुवंशिक गुणानीं ती उदयास येतात

मूल वयात येताच जपानी लोक त्यास आपल्याप्रमाणें जोडे वापरण्यास न देता खडावा देतात या खडावा प्रथम मुलाचे पायास बांधतात. पण पुढें सवयीनें बांधण्याचें कारण उरत नाहीं या खडावा घालून ती पुढें पाहिजे तशी बागडत असतात

मोठेपणी बापाची नजर जर मुलांवर चागली नसेल तर मूल बहुतकरुन कोठेतरी भटकून बिघडण्याचा अगर वाईट छंदास लागण्याचा संभव असतो, ह्मणून प्रत्येक मुलास धातूचा तयार केलेला एक बिल्ला नेहमी वापरावा लागतो या बिल्ल्यावर मुलाचें पूर्ण नाव व पत्ता ही कोरलेलीं असतात तो बिल्ला न वापरणाऱ्या मुलास शिक्षा होते जपानी मुलास सर्व तऱ्हेचे मर्दानी खेळ खेळण्यास शिकवितात

———>o<———

# करमणूक.

मॅजिस्ट्रेट—तुझा धंदा काय ?

आरोपी—चोरी करण्याचा सरकार

---

ती—तुमचा हा बाहेरख्यालीचा नाद सुटणारतरी केव्हां ?

तो—पैसे सरताच

---

"काय बाई नवल तरी! जगातील सगळ्या पुरुषाची अक्कल चरायला का गेली!"

"असें खरें अविवाहिताची मात्र अद्यापि जाग्यावर आहे"

---

"जळल मेल्याच लक्षण तें! सगळा चहा गालीचावर सांडला—"

"नाय हो बायसाब, उगाच रागऊ नका थोडासा पेल्यात हाय की!"

---

ती—तुम्ही झोंपेंत काय काय बाई बोलता—

तो—पण मला बोलायला तीच वेळना सापडते?

---

यज्ञेश्वरभटजींनीं चिरंजीवाकडून बारा महिन्याचीं नावें पाठ करून घेतल्यावर त्याला तिथींची सथा दिली थोड्या वेळानें भटजी त्याला प्रश्न करितात "नान्या! दशमीचे पुढें काय, सांग पाहू ?"

नान्या—चालीपीठ

---

सुंदराबाई—तुमची गंगी मोठी चहाटळ पोर आहे हो! कारटीच्या जिभेला हाडच कस तें नाहीं! मला पाहून काय ह्मणते 'ही पहा त्राटिका आली—'

रमाबाई—चार वर्षांची पोर, तिला काय कळतें! दुसऱ्याच ऐकून तीहि ह्मणत असेल—त्या अजाण पोरीच्या बोलण्याकडे तुह्मी कशाला लक्ष्य देता सुंदराबाई?

---

"डाक्टरसाहेब! रोगी फक्त तासादोनतासांचाच सोबती आहे अशी तुमची पक्की खात्री झाली आहे ह्मणता, तर मग आता 'आपरेशन' करण्याची सल्ला कशाला देतां ?"

"शंभर रुपयासाठीं"

---

"जनू, आज घरीं यायला एवढा वेळ कारे लावलास ?"

"कनी आई, आमच्या मास्तराची माझेवर फारच मर्जा आहे. ते ह्मणाले 'घरीं काय काम आहे, इथच अभ्यास करीनास !' असें ह्मणून बाकीच्या मुलास रजा देऊन मला आपला त्यानीं आपल्या डोळ्यादेखत अभ्यास करायला ठेवून घेतला होता. माझेवर त्याच एवढ प्रेम आहे बरंका आई !"

---

तो—बातमी अति त्वरेनें पाठविण्याचीं साधनें कोणकोणती आहेत सांग पाहू?

ती—टेलिफोन, टेलिग्राफ—

तो—आणि तिसरें ?

"मला बाई नाहीं ठाऊक ! काय बरें ?"

"एखाद्या स्त्रीच्या कानात हळूच बोलावें—"

---

आई—येशा, तुला कितीदा सांगितल कीं कुणावरोबर भाडू नकोस ह्मणून ! तुझी कुणीं कळ काढली कीं मला सांगाव त्या शेजारच्या घरातील मुलान तुझ्यावर दगड फेंकताच तू पुन त्याच्यावर का फेकलेस ? द्वाड कुठला ! मला का नाहीं हाक मारली ?

येशा—माझ्या इतके तुला दगड फेकता आले असतेतरी उगीच हांक मारु?

---

चिंतोपंत आगबोटीतून उतरुन व्हिक्टोरियावाल्याशीं भाडें ठरवू लागले. चार आण्यांवरती एक कवडीहि मिळावयाची नाहीं, असे चिंतोपंतानी निक्षून सागताच व्हिक्टोरियावाला नम्रपणें ह्मणतो "साहेब, चारच आणे ? येथून गिरगाव फार लावच्या पल्ल्यावर आहे–"

"अरे लेका ! मग जवळचा पल्ला असल्यास मी चालत नसतो का गेलो ?"

---

"मूर्खाशी बोलण्यात मी कधीहि शब्द खर्च करित नाहीं—" रामभाऊ मोठ्या कुर्ऱ्यानें आपले मेहुणे नारायणराव यास ह्मणाले.

नारायणराव गभीरतेनें ह्मणतात "पण आपला हा क्रम ताई सागत असते त्याच्या अगदींच विरुद्ध दिसतो"

रामभाऊ रागानें विचारतात " ती काय सागते ?"

"ती सागते कीं, तुह्मी तासाचे तास स्वताशीच बोलत असता."

---

नऊ महिन्याच्या बाबूनें रडूनरडून आकात करून आईपासून घेतलेली पावली पहातांपहाता गट्ट केली आईनें धावऱ्याधावऱ्या डाक्टरास बोलावणें पाठविलें बाबूचे वडीलहि इतक्यात आफिसातून आले. एकदर प्रकार कळून येताच कृष्णराव कपाळावर हात मारित ह्मणतात "आतां या कर्मभोगाला काय करावे? पावली वाचविण्यासाठीं दोन रुपये खर्च करायचे? बायका कितीहि शिकल्या-सवरल्या तरी त्या अशा बेअकलीच रहायाच्या!"

---

गेल्या जान्युआरीपासून तारेचे दर स्वस्त झाले आहेत ४ आण्यात तार पाठविता येते मजकुराचे फक्त ४ च शब्द जातात. सदाशिवरावाचें कुटुंब परवा प्रसूत होऊन त्याना दोन जुळीं मुलें झालीं एकदम दोन पुत्ररत्नानी जन्म घेतलेला पहाताच आमच्या सदाशिवरावजीचा आनद काय विचारावा! ते एकदम तार-आफिसात गेले व त्यानीं आपल्या मेहुण्यास पुढील तार पाठविली —

"Twins today. More tomorrow."

---

मेडिकल कालेजांतील एक प्रोफेसर— समजा, एक मनुष्य धावतांधावता एकदम ठेच लागून एका खोल खाचेंत पडला, त्याच्या जगण्याची आशा फारच थोडी राहिली आहे, अशा वेळीं तुह्माला बोलाविलें तर तुह्मी काय कराल?

विद्यार्थी—आपणतर त्या अपघात झालेल्या मनुष्याच्या नातलगास अशी सल्ला देऊं कीं, त्याच्या दहनविधीपेक्षा त्या खाचेंतच माती लोटून त्याला मूठमाती देणें कमी खर्चाचें होईल

---

रात्रीं अकराचा समय दिनकरराव उशीचेअरवर पडून नुकीच प्रसिद्ध झालेली एक मराठी कादंबरी वाचित होते सुशीलाबाई जांभया देत पाळण्याची दोरी ओढित मधुकराला निजवित होत्या वाचतावाचतां दिनकरराव आपल्या प्रियतमेकडे सकौतुक पहात ह्मणतात "हें पाहिलेंसका येथें लिहिलें आहे 'जिच्याहातीं पाळण्याची दोरी, तीच जग उद्धरी—"

"मग घ्या ही दोरी— नी उद्धरा जग! मी निजतें आता"

---

कृष्णाबाई—( माहेराहून नुकत्याच आलेल्या आपल्या मैत्रिणीला ) गेल्या होळीला माधवराव भावजींना आमच्या घरीं जेवायला बोलावल होत. पुरणाच्या पोळ्या मोठ्या सुरेख झाल्या होत्या वरं का! भावजी तुमच्याजवळ बोलले होते का यावद्दल ?

अहल्याबाई—नाहीं.

"ह्मणजे ! जेवायला आल्याचसुद्धा नाहीं का बोलले ?"

"होय, तें सांगितल होत—"

---

रसायनशास्त्राचे प्रोफेसर कार्बनवर व्याख्यान देत होते. हिरा व कोळसा हे दोन्ही कार्बनचेच पदार्थ असल्यामुळें सजातीय आहेत ही गोष्ट मुलाच्या मनावर चागली ठसली आहे कीं नाहीं हें पहाण्याकरिता त्यांनीं विचारलें "हिऱ्याचें पृथक्करण करून पाहिलें असता काय आढळेल ?"

"कार्बन, सर."

"आणि कोळशात ?"

"कार्बन, सर."

"तरमग हिरा आणि कोळसा यांच्यात भेद काय ?"

"हिऱ्याला हजार रुपये किंमत येते व कोळशाला कुणी पैलाहि विचारित नाहीं"

---

भाऊराव कालेज स्टुडट आहेत. वडिलाकडून दरमहा ४० रुपये खर्चासाठीं येतात. नाटकवाले, इराणी, जान डिसोजा व दुसऱ्याहि गुणीजनाचे भाऊराव लाईफ (तहाहयात) मेम्बर असल्यामुळें स्वारीचे खिशे सदा खाली असतात नाना बहाणे करून वडिलाकडून पैसे काढण्यांत भाऊरावांसारखें कसव दुसऱ्या कॉलेज स्टुडटला क्वचितच साधेल परवां त्याना अशीच भारी निकट लागल्यामुळें पैसे पाठविण्याविषयीं त्यानीं वडिलाना तीनचार जरुरीचीं पत्रे पाठविलीं परंतु वडिलाकडून त्या पत्राचें उत्तरच येईना तेव्हा भाऊरावानीं वडिलाना पुढील प्रिपेड टेलिग्राम पाठविला.—

" Where is the money?" ( पैसे कुठें आहेत ? )

वडिलानी क्षणाचाहि विलंब न लाविता तारेंतून उत्तर पाठविलें —

" Here. " ( इकडे आहेत )

---

# हनुहंकार.

विजापुरच्या गोल घुमटावरील तोफ 'महाकाली' मनोरंजनाच्या वाचकांपैकीं कित्येकांनी स्वनेत्रांनी पाहिली असेल. पुष्कळांनी तिचें वर्णन ऐकिलें असेल. एवढी प्रचंड तोफ एवढ्या उंचीवर कशी चढविली, अशाविषयीं आज फारच आश्चर्य वाटत आहे! दुर्दैवानें आज या गोष्टी पाहून आम्ही थक्क होत आहों, परंतु आमच्या पूर्वजांच्या करामतींची, शौर्याची, पराक्रमाची हीं स्मारकें आहेत!

धोलपूर येथील हनुहंकार तोफ ही आमच्या वाचकांस प्रथमदर्शन फळ होय. आग्र्याच्या किल्ल्यापासून ३६ मैलांवर आणि ग्वाल्हेरपासून ३८ मैलांवर धोलपूर नावाचें एक लहानसें संस्थान आहे. धोलपूर हें रेल्वेचें स्टेशनही आहे. स्टेशनापासून सुमारें चार मैल अंतरावर जुन्या छावणीतील मैदानामध्यें ही हनुहंकार तोफ पडली आहे. हनुहंकार तोफ पंचरसी धातूची असून हिची लांबी २० फूट आहे. तोंडाकडे हिचा व्यास दोन फूट व मागच्या बाजूस तीन फूट असून तोफेचें तोंड साडे आठ इंच व्यासाचें आहे. हिचें वजन ६४ टन अर्थात् २५६ खंडी आहे. ही तोफ ओतल्यापासून फक्त एकच वेळ सोडण्यांत आली होती, परंतु त्या धडाक्यानें आसपासच्या बऱ्याच मैलांवरील गर्भिणी स्त्रियांचा गर्भपात झाला होता असें सांगतात! या तोफेवर पुढील लेख हिंदी भाषेंत दिला आहे —

## "श्री रामचंद्राय नमः

चीजकु तोपको सिद्ध श्री महाराजाधिराज श्री राजस्वारि रहि सुदौले सिपेह दारुल मुल्क सरामद राज हाय हिद श्री राना कीरतह लोहेंद्र वहादुर दलेरजग जुदचने अष्टधाती तोप हनुहकार चनचाई. वजन १४२५ मन, ११ शेर, पदरे छटाक बनाई सीताराम मिस्त्री. खाते केकी मिति चैत्र सुदि ७ मी श्री नृपति विक्रमादित्य राज्ये संवत १८८३ शाके शालीवाहने १७४८ सनि हिजरी १२४२ मुकाम छावनी धोलपुर."

वरील लेखावरून ही तोफ सुमारें ८० वर्षांपूर्वी धोलपूरचे महाराज महाराणा कीर्तिसिंह यांनी सिताराम मिस्त्री याचेकडून तयार करविल्याचें दिसून येतें. ही बिचारी हनुहकार तोफ साप्रत दिवसा सूर्याकडे आणि रात्रीं चंद्रनक्षत्रादिकाकडे दृष्टी रोखून पडली आहे.

——>o<——

# अजविलाप.

[ अज हा सूर्यवंशी राजा होता त्याची राणी इंदुमती ही मूळची अप्सरा असून शापानें भूलोकीं मानवी झाली होती पारिजातकाच्या फुलाच्या दर्शनाने तिचा शाप सरावयाचा होता एकदा अज व इंदुमती क्रीडोद्यानात एका मचकावर बसलीं होतीं. इतक्यात गगनात भ्रमणाऱ्या नारदऋषींच्या महतीवीणेवरील पारिजातसुमनमाळा इंदुमतीच्या अंगावर पडली. त्या मालादर्शनाने इंदुमती तत्काळ शापमुक्त होऊन तिचा देह निर्जीव होऊन पडला त्या वेळीं अजानें जो शोक केला तो पुढील पद्यात वर्णिला आहे हा प्रसंग रघुवंशातील आहे ]

अज साश्रु करी विलाप हा,
स्थिरधीरप्रकृती विरे पहा;
वपु मानुष काय आपलें ?
वितुळे लोहहि फार तापलें १

"जरि जीवन तत्क्षणीं शमे
कुसुमाच्या सखि ! गात्रसंगमें,
तरि काळ जिघांसु जों असे,
न तया होइल शस्त्र कायसें ? २

अथवा मृदुवस्तुनाशना
करि मृत्यू मृदुवस्तुयोजना;
कमला हिम मृत्युदायक,
मज दृष्टान्त गमेचि लायक. ३

जरि ही असुघातिनी स्रज,
मदुरःस्था वधिते न का मज ?
अमृत प्रखरा विषा करी,
अमृता वा विष सूत्र ईश्वरी. ४

अथवा मम पाप पाहुनी
विधि फेंकी अशनी नभाहुनी
तरु रक्षुनि, तो तदाश्रिता
निवटी केवळ कोमला लता ! ५

अपराध जरी करीं पुरा,
तरि झालीस कधीं न निष्ठुरा,
मग आज नसोन दोषही,
वससी काय मुकी सरोष ही ! ६

'शठ हा अज, सत्यभाव ना,'
तव चित्तीं अशि होय भावना;
म्हणुनी न मला विचारिता
परलोका वरिसी शुचिस्मिता. ७

क्षण मूर्च्छित होउनी, सखी-
सह तू जाउनि तीविणेंच की
परतें फिरलेंस का ? मना !
सह आता पविपातवेदना ! ८

सखि ! विप्रिय कल्पना नसे
मम चित्तीं, मग टाकिसी कसें ?
अज 'भूपति' नामधारि हा,
तव ठायीं दृढभाव हा पहा ९

कुरळे, अलिकान्ति, मोहक,
कुसुमोत्संचित त्वदालक,
मृदु चाळविता समीरण
पुनरुज्जीवन शंकितें मन ! १०

उठुनी सुदति ! त्वरें तरी,
मम अंतःस्थ विषाद सहरीं,
जशि ते तम दिव्य ओषधी
हिमशैलीं दडलें गुहेमधीं. ११

कच हालति ज्यावरी, तुझे
सुख हें नीरव टे मनोरुजे !
ध्वनती न अली जयीं रसें
निशि सुप्ताबुज काय हे असे ! १२

रजनी शशिला मिळे पुन्हा,
दयिता द्वंद्वचरा पतत्रिणा,
तरि सह्य वियोग त्या गमे,
विरहें शाश्वत मी तुझ्या भ्रमें १३

नवपल्लवतल्प ही भला
तनुला ज्याच कठोर लागला,
कशि तीच चिताधिरोहणा
सहणारी वद हत ! या क्षणा १४

मृत तूज बघूनि मेखला
तव एकात सरी ! सुमंजुला
गतिविभ्रमभंग पावुन
मृततुल्या पडलीच नि स्वन ! १५

कलमंजुळ शब्द कोकिला,
मदमंदा गति राजहंसिला,
हरिणींस कटाक्ष उत्तम,
पवनाधूत लताम विभ्रम, १६

गुण अर्पिसि हे मदर्थ कीं,
परलोकोत्सुक तू प्रिये ! सखी !
परि सावरती न ते मन
उलटे भ्रांतविती क्षणक्षण १७

फलिनी-सहकार जोडपें
जुळवोनी दयिते ! महाकृपे !
न करोनि विवाह मंगला
त्यजिसी, दटक हा न चांगला १८

सुम देइ अशोक हा यदा,
पुरवीलेंस यदीय दोहदा,
तव त्या कचभूषणा कसें
वद अपान निवापमाल्यसें ? १९

तव दुर्लभ नूपुरध्वनी
चरणानुग्रह आणुनी मनीं,
कुसुमाश्रुजला अशोक हा
वितरोनी करितोच शोक हा ! २०

वकुलस्रज अर्ध गुंफिली
तव नि श्वाससुगंधि चांगली,
तशि टाकुनिया अपूर्ण ती,
निजसी का करभोरु ! संप्रती ? २१

समदु खसुखी सखीजन,
प्रतिपच्चंद्रसमान नंदन,
दृढशुद्धरतीहि मी, परी
बहु तू निष्ठुर दाविसी 'परी २२

न रती, धृतिलेश हाय ! न,
कसला हा ऋतु ? काय गायन ?
न अलंकृतिचें प्रयोजन,
शयनादी मम होत निर्जन ! २३

गृहिणी, सुसखी, मनोबळ,
प्रियशिष्या, सचिवादि मंडळ,
हरितो यम सर्व, काय वा
न हरी तो तुज नेइ जेधवा ? २४

रसवन्मधु मन्मुखातलें
मृगशावाक्षि ! सदैव चाखलें,
तरि केविं मदश्रुकश्मल
परलोकीं जलदान पीशिल ? २५

जरि राज्यसुखादि दीसती,
अजसौख्यें सरलीं तरी, सती !
मति ही विषयीं न लोभली,
मम सच्छर्मनिधान तू भली !" २६

# उपयुक्त ज्ञान.

भाताला कड आला ह्मणजे त्यात थोडा लिंबाचा रस टाकल्यास भात अगदी मोगऱ्याच्या कळ्यासारखा पांढरा शुभ्र होतो.

---

काचेचीं भांडीं धुतेवेळी पाण्यात थोडा अमोनिया घालून नतर त्या पाण्याने तीं साफ करावी.

---

चाकूचें पात स्वच्छ करावयाचें असेल तेव्हा विटेची थोडी पूड घेऊन कच्च्या बटाट्याच्या तुकड्याने ते घासावे.

---

कपड्यावर पडलेला शाईचा डाग ओला आहे तोंच काढण्यासाठी डाग पडलेला तेवढा भाग दुधात भिजवावा नतर काहीं वेळाने कपडा साबूने धुवून टाकावा

---

जखम पडल्यावर आतून जे रक्त वाहू लागतें त्यावर तादुळाचे बारीक पीठ चोळल्याने बद होतें.

---

लिंबें तव्यावर घालून त्याना जरा माफक प्रमाणाने शेक द्यावा व नतर पिळावी ह्मणजे रस चागला निघतो.

---

निजावयाला जातेवेळी एक पेलाभर कढतकढत—सोसवेल त्या बेताचे—दूध प्यावे ह्मणजे स्वस्थ झोंप येते.

---

अळशीचे तेलात थोडीशी चुन्याची निवळी मिसळून ते मिश्रण बाटलीत भरून ठेवावें जरुर लागेल तेव्हा स्वच्छ कपड्याचा काकडा करुन तो या मिश्रणात बुडवून पेटवावा. या काकड्याने चूल लवकर पेटते

---

पितळेची भांडी लखलखीत करावयाची असतील तर पहिल्याने त्या भाड्याला लिंबाचा रस लावावा, नतर भाडें साफ करण्याची वीट मिळते त्या विटेची पूड साधारण ओलसर होईल इतक्या बेताचे त्यात पाणी घालून त्या मातीनें भाडे घासावे.

---

अगदीं सुकलेली वाळू घेऊन त्या वाळूत लिंबे पुरून ठेवावी, परतु तसे करतेवेळी एवढी गोष्ट विशेष लक्ष्यात ठेवावी की, एक लिंबू दुसऱ्या लिंबास लागता कामा नये अशा रीतीने व्यवस्थेने ठेवल्यास लिंबें बरेच महिने टिकतात.



# तुळजापुरची भवानी.

वृद्धपणीं नवसासायासानीं झालेली मी एकुलती एक मुलगी असल्यामुळें माझ्या आईबापाना अगदीं जीव की प्राण होऊन राहिलें होतें माझ्या प्रिय मातापितरानी पाचवे वर्षींच मोठ्या समारंभानें माझा विवाह करून कन्यादानाचें श्रेय घेतलें लग्नाच्या वेळीं तिकडचें वय अवघें आठ वर्षांचें होतें आपल्या डोळ्यादेखत एकदा मुलीच्या मस्तकावर अक्षता पडलेल्या पहाण्याच्या अनिवार इच्छेनेंच केवळ अगदी बाळपणी माझ्या आईबापानीं माझें लग्न केलें नव्हतें तर त्याना तसें करण्यास दुसरेंहि एक कारण झालें माझ्या बापाची एक बहीण होती या बहिणीवर बाबाचें पराकाष्ठेचें प्रेम असे ती चांगल्या घरीं पडली होती व तिचें सर्व प्रकारें बरें चाललें होतें परंतु बिचारीवर एकाएकी आकाशाची कुऱ्हाड कोसळून ती ऐन तारुण्यातच पति-सौख्याला अंतरली नवऱ्याच्या पश्चात् तिची फारच विपन्न स्थिति झाल्यामुळे ती आमच्या घरी येऊन राहिली होती पुढे वर्षसहा महिन्याच्या आंतच तीहि बिचारी वैकुंठवासी झाली मृत्युसमयीं माझ्या आतेनें आपल्या दोन वर्षांच्या अर्भकास माझ्या आईच्या स्वाधीन करून त्याचें पुत्रवत् पालन करण्यास सांगितलें माझ्या आईला त्या वेळी तीनचार महिने गेले होते "मुलगी झाल्यास ती मी तुझ्या मुलालाच देईन" असें बाबाकडून वचन घेऊन माझ्या आतेनें परलोकीं प्रयाण केलें पुढें मी जन्मास आलें बहिणीच्या पोरक्या मुलावर बाबाचा अगो-दरच पराकाष्ठेचा लोभ जडला होता शिवाय त्यानीं बहिणीला तिच्या अंतसमयीं वचन दिलें होतें अर्थात् माझ्या जन्मदिनीच लग्नाचा वाङ्निश्चय होऊन पुढे पांचवे वर्षी मोठ्या समारंभानें आमचें लग्न झालें

लहानपणी आह्मी उभयतां एकत्र खेळावे, एकत्र भोजन करावे, एकमेकां-बरोबर फिरावयास जावे—आणि लग्न झाल्यावरहि आमचा हाच क्रम सुरू होता नवऱ्याबरोबर असें वागू नये, त्याला पाहून लाजावे, ही कल्पनाहि माझे मनात कधीं आली नाहीं दिवसा भातुकलीचा खेळ खेळताना मी स्वयंपाक करून त्याना वाढावा नंतर त्याच ताटात बसून जेवावे, माझ्या बाहुलीचें तिकडच्या बाहुलीबरोबर लग्न लावावें, बाहुलीची मंगळागौर पुजवून उभयतानीं वऱ्याच रात्रपर्यंत जागरण करावें याप्रमाणें आमचे बाळपणचे दिवस मोठ्या आनंदात चालले होते.

आमच्यावरोवर खेळावयास दुसरें कोणी नसल्यामुळे परस्पराशिवाय आम्हाला कोणीच प्रिय नव्हते

लग्न झाल्यानतर तीनचार वर्षे याप्रमाणे निघून गेली या अवधीत आम्ही उभयतानीं एकमेकाला क्षणभरहि विसंवू नये, व पुढे केव्हातरी आपला वियोग होईल अशी कल्पनाहि आमच्या ध्यानीमनी कधी आली नाहीं

आम्हा दोघानाहि भाऊवहिणी कोणी नसल्यामुळें बाल्यावस्थेत उदय पावणाऱ्या आमच्या स्नेहाला दुसरें कोणीहि वाटेकरी नव्हतें यामुळें उभयताची एकमेकावर पराकाष्ठेची प्रीति जडली होती अहाहा! आयुष्यातील ते दिवस कितीतरी सुखाचे गेले ती बाळपणची आठवण झाली ह्मणजे अत करणात आनदाच्या लहरी उठतात. आमचें उभयताचें असें प्रेम पाहून आईबापाना जो आनद होत असे, त्यालातर सीमाच नव्हती

[ २ ]

सुखाचे दिवस एकसारखे जात नाहींत ह्मणतात, तें काहीं खोटे नाहीं मी चौदा वर्षांची झालें, तेव्हा आईबापानीं या दु खमय जगाचा त्याग करून शातिदायक परलोकचा मार्ग स्वीकारला या आकस्मिक विपत्तीमुळें मीचकेवळ मातृपितृहीन झाल्ये असें नसून मजबरोबर तिकडेहि तीच स्थिति प्राप्त झाली आम्हाला चोहीकडे अधकार दिसू लागला बाळपणात भातुकली खेळून भावी ससाराची जी आम्ही नक्कल करित असू, त्याच खऱ्या ससाराचें ओझे वहाण्याचें आता आमच्या नशिबी आलें

दु ख कितीहि बलवत्तर असलें तरी त्याचा वेग सर्वकाळ सारखा रहात नाहीं कालावधीने आमच्या शोकाचा वेगहि कमीकमी होत चालला व अश्रुमोचन बद करून आम्ही ससाराचें ओझे शिरावर घेतलें याप्रमाणे दु खकष्टात आमचीं आणखी सहा वर्षे गेली त्यानतर आम्हाला एक दिवस मोठ्या आनदाचा आला परमेश्वराने आमच्या निस्सीम प्रेमाचे आम्हाला पुत्ररत्नरुपी फळ दिलें. माता-पित्याच्या शोकाने आणि ससाराच्या तापाने त्रस्त झालेल्या आमच्या अत करणात पुन्हा आनदाचा वर्षाव झाला

[ ३ )

परतु हा आनदहि फार दिवस टिकला नाहीं मुलगा झाल्यानतर थोडेच दिवसानी तिकडची प्रकृति उदररोगानें एकदम बिघडली दिवसेंदिवस रोग वाढतच चालला एक वर्ष झालें, दीड झालें, आराम ह्मणून नाहीं मी रात्रदिवस तिकडच्या शुश्रूषेंत व औषधपाण्याच्या तजविजींत असें, यामुळें मुलाची योग्य

जोपासना न होता उपेक्षाच होत चालली विधात्यानें मजसाठीं सुख आणि दु ख जणूकाय बरोबरच वाटून ठेविलें होतें एकीकडे पाहिलें असता मनाजोग्या पतीचा व पुत्ररत्नाचा लाभ झाला होता आह्मा स्त्रियाच्या दृष्टीनें या लोकीं आणखी कोणते सुख पाहिजे? परतु दुसरीकडून पहावें तों माझे जीवनसर्वस्व असह्य वेदनामय रोगानें ग्रस्त होऊन अथरुणास खिळून पडले आहेत व माझी आधळ्याची काठी जो मुलगा त्याची हयगय होऊन राहिली आहे आह्मा स्त्रियाच्या दृष्टीनें यापेक्षा असह्य असें दु खतरी कोणतें असणार? ह्मणूनच मी वर ह्मटलें आहे कीं, ब्रह्मदेवानें माझ्या ललाटीं सुख आणि दु ख कसें बरोबर विभागून लिहिलें होतें!

तिकडे आराम व्हावा ह्मणून औपधोपचार करण्याची मी बाकी ठेविली नाहीं. तथापि कोणत्याहि प्रकारें रोगाचा उपशम ह्मणून होईना ग्रहशाति करविली, अनुष्ठानें करविलीं, देवाला नवस मागून घेतले, परतु काहीं फळ नाहीं! माझ्या प्राणदानानें जर तिकडची रोगापासून मुक्तता होण्याजोगी असती, तर तेंहि करण्यास मी एका पायावर तयार होतें तिकडच्यासमोर डोळ्यात पाणी आणलें असता तिकडे दु ख होईल ह्मणून एकातात जाऊन मी रुदन करावें आणि अहोरात्र आरोग्यासाठी परमेश्वराची करुणा भाकावी, यापलीकडे मी काय करणार!

एके दिवशीं सहज बोलताना शेजारच्या ठमाबाईकडून समजलें कीं, तुळजापुरची भवानी हें मोठें जागृत देवस्थान असून तेथें जाऊन एकनिष्ठपणें देवीची सेवा करून धरणें देऊन बसलें असता ती भक्ताचे मनोरथ पूर्ण करिते इतके दिवस निराशारूपी घोर अधकारानें माझ्या हृदयात ठाणें दिलें होतें, परतु हें वर्तमान समजताच तेथें आशेचा अकुर उद्भवला पूर्वींहि बरेच वेळा अशी एखादी गोष्ट ऐकून माझ्या मनात आशा उत्पन्न होत असे, परतु लगेच एकदोन दिवसानीं ती विलयास जाई परतु ह्या वेळेची तशी आशा नव्हती जणूकाय कोणी माझ्या कानात सागत होतें कीं "ही तुझी आशा खरोखर सफल होईल" आता माझ्यानें धीर निघेना मीं लगेच तुळजापुरास जाण्याची समति देण्याकरिता तिकडचे घट पाय धरिले

मी ह्मणालें "तुळजापुरीं जाऊन भक्तिभावें देवीची पूजाअर्चा करून धरणें धरून बसलें ह्मणजे देवी स्वप्नात दर्शन देऊन रोगावर औषध सागते व याप्रमाणें पुष्कळ लोकाना गुण आला आहे आपण मला परवानगी द्यावी मी जाऊन तिला माझें रक्त अर्पण करिते आणि इतकेंहि करून ती प्रसन्न न झाली तर तिच्या समोर

देहत्याग करून तिजवर हत्त्या घालते इतकें केल्यावरतरी तिला आपली दया येते कीं नाहीं पाहू ”

हें बोलतांना माझ्या डोळ्यांतून सारखें पाणी चाललें होतें तिकडेतर मजकडे सारखें टक लावून पहाणें होत होतें. बरेच वेळाने बोलणें झालें “सावित्री—”

या हतभागिनीचेंच नाव सावित्री यानतर तिकडच्या तोंडातून एकहि शब्द निघेना मीं वर तोंड करून पाहिलें, तों नेत्रातून सारख्या अश्रुधारा चालल्या आहेत माझेहि नेत्र भरून येऊन अत करण सद्गदित झालें मोठ्या कष्टानें मी ह्मणालें “ आपण का रुदन करिता ?”

“हें पहा सावित्री ! आता मजबद्दल तू व्यर्थ त्रास करून घेऊ नकोस. मी बरा व्हावयाचा असतों तर आजपर्यंत केलेल्या इतक्या उपायानीं झालों नसतों का ? या त्रासाने तू मात्र आपल्या शरीराची खराबी करून घेशील माझा अतकाळ आता समीप आला आहे, अशा वेळीं मी तुला मजपासून दूर होऊ देणार नाहीं ”

[ ४ ]

परंतु तिकडे आराम वाटावयाला एक तुळजापुरच्या भवानीचीच कृपा पाहिजे, अशी माझ्या मनाची ठाम समजूत झाली असल्यामुळें तिकडची परवानगी नसतांहि मीं तिकडे नकळत तुळजापुरास जाण्याचा निर्धार केला टमाबाईचें जाऊन पाय धरले व मी तुळजापुराहून येईपर्यंत तिकडच्या पेजपाण्याची व्यवस्था पहाण्याचें त्याचेकडून कबूल करून घेतलें. तिकडच्या अशा आणीबाणीच्या स्थितींत तिकडे एकटें टाकून जाताना माझ्या केवढे जिवावर आलें ह्मणून सागू ? परंतु दोन दिवसाचे आत देवीचा प्रसाद घेऊन येईन, व नतर आपलें सर्व सकट दूर होईल, अशी माझ्या मनाची खात्री झाली असल्यामुळें त्या वेळीं दगडासारखें घट्ट मन करून मी तुळजापुरीं जाण्याचा माझा बेत कायम केला व दुसरेच दिवशीं मोठ्या सकाळीं तुळजापुरास जाण्याच्या उद्देशानें गाव सोडिलें. आमच्या गावाहून तुळजापुरास जाण्याकरिता जी आय्. पी रेल्वेनें जावे लागे. परतु जवळचें स्टेशन आमच्या गावाहून सहा कोस दूर होतें आह्मी सर्व पायींच निघालों काळजीनें जरी माझी शक्ति अगदीं क्षीण झाली होती, तरी आशेनें माझ्या अगीं दुप्पट अवसान आलें होतें व मी इतक्या वेगानें चालू लागलें कीं, बरोबरीच्या बायका मागें राहूं लागल्या असो.

आह्मी सर्व यात्रेकरू रात्रीचे साडेआठ वाजतां स्टेशनावर येऊन पोहोंचलों गाडी यावयाला अजून अर्धा तास अवकाश होता गाडीची वाट पहात आह्मी स्टेशनावर

वसलो असता मधूनमधून स्टेशनमास्तर आह्मी वसलो होतो तेथे येऊन मजकडे निरखून पाहून जाई मी आपली माझ्या बाळाला माडीवर घेऊन खालीं मान घालून स्वस्थ वसल्यें होते परतु काहीं वेळानें पहातें, तों स्टेशनमास्तर माझ्या बरोबरच्या एका बाईला मी कोण, कुठली, कुठे जाणार वगैरे विचारू लागला हा अपरिचित पुरुष मजबद्दल इतकी चौकशी का करितो, हें काहीं मला समजेना गाडी येण्यास दहा मिनिटे राहिलीं, तशी तिकिटे देण्यास सुरुवात झाली माझ्या बरोबरच्या सर्वांनीं तिकिटे घेतली परतु मी तिकीट घेण्यास जाताच एकदम खिडकीचें दार धाडकन् वद झालें पहातापहाता गाडीहि स्टेशनावर येऊन उभी राहिली! मला तिकिट मिळाले नाहीं याचे कारण काय असावे, हे मला काहींकेल्या समजेना वरोवरीच्या वायका गडबडीने एका डब्यात जाऊन वसल्या मीहि त्याच्यावरोवर जाऊन वसू लागल्ये परतु स्टेशनावरचा एक मनुष्य येऊन "तुमचे जवळ तिकीट नाहीं, गाडींत वसू नका " असा अडथळा करून त्याने मला गाडीत वसू दिलें नाहीं लवकरच गाडी चालू झाली माझी कवर खचल्यासारखी होऊन मी मटकन् खाली वसल्ये

माझ्या वाळाला माडीवर घेऊन मी मोठ्याने रडू लागलें माझ्या वरोवरच्या वायकाना मजवद्दल फार वाईट वाटलें परतु त्या विचाऱ्या काय करणार? गाडी भप्भप् करित त्वरेनें निघून गेली मला वाटलें, जणू माझ्या छातीवरूनच गाडी चालली आहे! एकतर माझ्यावरोवर दुसरें कोणी मनुष्य राहिलें नाहीं शिवाय तुळजापुरास जाण्यावद्दल मी फारच उत्कठित झालें होते यामुळें गाडी चुकली व मी कोणच्या भयकर विपत्तीत येऊन पडलें, हें पाहून माझ्या मनाची काय अवस्था झाली असेल याची कल्पना करणें वाचक भगिनींवरच सोंपवितें.

[ ५ ]

आता स्टेशनावर कोणी माणूस नव्हते फक्त तो स्टेशनमास्तर व त्याचे आज्ञांकित स्टेशनावरचे तीन हलके नोकर, एवढीच कायतीं माणसें होती मघा मजविषयीं मास्तरने केलेली चौकशी व तिकीट देण्याचें एकदम वद होणें, या गोष्टी आता माझ्या लक्ष्यात येऊन माझें चित्त अस्थिर झालें व आता मजवर कोणतें सकट येणार, याची मी विवचना करु लागलें इतक्यात स्टेशनमास्तर मजजवळ येऊन ह्मणतो "वाई, तुह्मी काहीं भिऊ नका तुळजापुरची तिकीटें सपली ह्मणून तुह्माला तिकीट मिळाले नाहीं उद्या सकाळी दुसरी गाडी येईल त्या गाडीने तुमची रवानगी करुन देऊ आता तुह्मी रात्रभर वेटिंगरूममध्ये खुशाल रहा "

त्या गोरट्यानी धैर्य न सोडतां परमेश्वराचें मनात स्मरण करून मी वेटींग-रूमचें दार बंद केलें, परंतु गोळीने पाय टाकतान माझ्या अंगाचा थरकांप झाला व मजवर गहीं. मी आतां संकट येणार असें वाटूं लागलें मी अनन्यभावानें श्री तुळजादेवीची प्रार्थना करूं लागलें अशा रीतीनें अर्धा अधिक तास गेला नंतर एक मोठा आवाज होऊन वेटिंगरूमचें दार मोडून उघडलें व पुढें स्टेशनमास्तर व त्याच्या मागें हातांत मोठ्या तीक्ष्ण सुऱ्या घेतलेले त्याचे तीन नोकर मोठीने शिरले! हे पहातांच माझी मनानें अगदीं गाळण उडून गेली मला माझी चांगली अंधारी दिसू लागली मला माझ्या जिवापेक्षां मुलाची फार काळजी वाटू लागली तो नराधम स्टेशनमास्तर मला म्हणाला "तुझ्या व मुलाच्या अंगावरचे सर्व दागिने काढून गुपचूप दे. नाहींतर दोघाचेहि तुकडेतुकडे करून टाकू!"

हें ऐकतांच मी भयानें थरथर कांपू लागलें व काय करावें हें सुचेना मुलाला घट्ट पोटाशीं धरून मी स्तब्ध बसल्ये हें पाहून ते तीन यमदूत सुऱ्या उगारून मजवर धावून आले मी निरुपाय जाणून माझ्या व मुलाच्या अंगावरचा एकएक दागिना काढून फेंकू लागलें मला वाटलें कीं, दागिने दिले, आतां मजवर दुसरें काहीं संकट येणार नाहीं. परंतु तो माझा भ्रम होता, हें मला लवकरच दिसून आलें ते सर्व अलंकार गोळा केल्यावर त्या नरपिशाच स्टेशनमास्तरानें आपला नीच हेतु प्रगट केला ते शब्द ऐकून मला वाटलें कीं, मघा उगारलेल्या सुऱ्यानीं माझें मस्तक द्विखण्ड करून टाकलें असतें, तर बरें झालें असतें। त्या वेळी माझ्या जिवापेक्षा मौल्यवान् असें जें माझें पातिव्रत्य त्याचें रक्षण कसें होईल, या विचारानें माझें मन व्याकुळ होऊन गेलें व मी मनात सर्व शक्तिमान् परमेश्वराचा धावा आरंभिला भीति, लज्जा व जिवाची आशा हीं सर्व सोडून देऊन मुलाला पोटाशीं घट्ट धरून मी उभी राहिलें व मोठ्यानें आरडाओरड करूं लागलें हें पाहून त्या दुरात्म्याच्या मनातहि थोडेंसें भय वाटल्यासारखें दिसलें नतर तो दुष्ट स्टेशनमास्तर नानातऱ्हेचे लोभ दाखवून माझी विनवणी करूं लागला मी असहाय, एकटी अबला, त्या कृतांतवत् चार काळपुरुषाच्या हातात सापडलेली, आता या ठिकाणी काहींतरी युक्ति लढविल्याविना पातिव्रत्यरक्षण होत नाहीं, हें मला समजून चुकलें. मी ह्मणालें "मला एकदा बाहेर बसायला जाऊन येऊद्या नतर तुमच्या ह्मणण्याचा विचार करीन"

हें ऐकताच तो नराधम स्टेशनमास्तर एकदम ह्मणतो "या वेळी मी तुला मुळींच बाहेर जाऊं देणार नाहीं तू बाहेर पडताच पळ काढून पोलिसस्टेशनावर वर्दी देशील"

मी ह्मणालें "पोलिसचौकी इथून दोन मैल लांब आहे या अंधाऱ्या रात्री मी एकटी कशी पळून जाऊं शकेन ?"

तो नरपिशाच यावर ह्मणाला "बरें आहे, जा, पण हा मनुष्य तुजबरोबर येईल"

मी ह्मणालें "मी बायको माणूस बरोबर पुरुषमनुष्य असल्यावर मला संकोच वाटेल माझा जर तुह्मांला इतका विश्वास नसेल तर मी माझ्या मुलाला इथेंच तुमच्याजवळ ठेवून जातें मगतर झालें ना ?"

या गोष्टीला तो नराधम कबूल झाला तत्क्षणीं मी पाषाणहृदयी बनलें पुत्र-वत्सलतेला अंतःकरणांतून एकदम रजा दिली आणि निर्दय होऊन प्राणापेक्षां प्रिय असलेला माझा बाळ त्या यमस्वरूपी नरपिशाचाच्या हातांत दिला या वेळीं माझ्या अंतःकरणाला जे कष्ट झाले, तसे, जरी मी माझें काळीज हातानें काढून दिलें असतें तरी होतेना ! त्यानंतर एक मोठा सुस्कारा सोडून मी हळूहळू बाहेर आलें आणि [illegible] व्हेटिंगरूमचा दरवाजा लावून घेऊन बाहेरून कडी घातली

हे होतांच मीं चारी बाजूला पाहिलें, परंतु कोठें कोणीच नव्हतें खोलींत अड-कून पडलेल्या चार मनुष्यांनीं मीं दार लावून घेतांच मोठ्यानें आरडाओरड केली [illegible] त्यांना माझा उद्देश समजून मीं फसविलें हें कळून चुकलें आरडण्या-[illegible]ओरडण्यानें कांहीं होत नाहीं हें जाणून त्या नीचांनीं माझी विनवणी करण्यास आरंभ केला "तुझे सर्व दागिने देऊन तुला व मुलाला सुखरूप तुळजापुरास पोंचवून देऊं" असे ते ह्मणू लागले परंतु या त्यांच्या ह्मणण्याकडे मीं बिलकूल लक्ष्य दिलें नाहीं. शेवटीं "दार उघडलें नाहींस तर तुझ्या मुलाला आह्मी ठार मारूं" ह्मणून भय दाखवूं लागले हे ऐकतांच पुत्रप्रेमानें माझें चित्त क्षणभर चलविचल होऊं लागलें परंतु [illegible] पुत्रप्रेमापेक्षां पातिव्रत्यप्रेमाचाच अंतःकरणांत जय झाला व मी दगडा-सारखें मन करून स्वस्थ राहिलें

[ ६ ]

त्यानंतर जो प्रकार घडला तो वर्णन करण्यास मी असमर्थ आहें माझ्या मुलाच्या [illegible] आरोळ्यांच्या हृदयभेदक आक्रोशानें चारी दिशा दणाणून राहिल्या परंतु [illegible] अंतःकरण असूनहि अचल व दगडापेक्षां कठीण होतें !

[illegible] प्रकार ! माझ्या त्या प्राणापेक्षांहि प्रिय बाळाचा एकएक [illegible] व रक्तबंबाळ होऊन खिडकीच्या गजांतून माझ्यापुढें येऊन [illegible] प्रथम मस्तक, नंतर हातांचे तुकडे–पायांचे तुकडे येऊन पडले [illegible] अंगांतून मारक्या रक्तप्रवाह चालला होता हें पाहून

माझ्या अंत:करणाची जी स्थिति होऊन गेली, त्याची कल्पनाहि कोणाला करिता येणें शक्य नाहीं पुत्रशोकानें मी अगदी वेडी होऊन गेलें परंतु माझा प्राण किती तरी कठीण ! माझ्या प्रियपुत्राची हत्त्या समक्ष डोळ्यांनीं पहात असून अद्याप मी जिवंत राहिले होतें परंतु असें किती वेळ सहन होणार ? डोळ्यापुढे अंधारी आली व तत्क्षणीं मूर्च्छा येऊन मी धाडकन् जमिनीवर पडल्यें.

[ ७ ]

जेव्हा मी शुद्धीवर आलें त्या वेळीं मी एका खोलीत बिछान्यावर निजलें आहे असें मला आढळून आलें त्या खोलीत बरेच लोक होते व त्यामध्ये काहीं पोलिस शिपाईहि दिसले शुद्धीवर येताच मला एकामागून एक आठवण होऊं लागली व "बाळा ! मला टाकून कुठरे गेलास ?" ह्मणून मी मुलासाठी मोठ्यानें शोक करूं लागल्ये.

पुष्कळ लोक माझें समाधान करूं लागले आता शोक करणें व्यर्थ आहे, हें समजून मीहि आपलें सांत्वन करून घेतलें व तुळजापुरास जाण्याविषयीं इच्छा दर्शविली. इतक्यात एक संभावित मनुष्य मजजवळ येऊन ह्मणाला "बाई, तुह्मांला येथें भिण्याचें काहींच कारण नाहीं मी तुमच्याबरोबर मनुष्य देऊन जेथें इच्छा असेल तिकडे तुमची रवानगी करून देतो तुमच्यावर त्या नीच मनुष्यांनी जो प्रसंग आणिला आहे, त्यासंबंधी मला चौकशी करणें असून त्यामध्यें तुमची थोडी जरूर आहे त्यानंतर तुह्मांला जाण्यास काहीं हरकत नाहीं. शिवाय तुळजापुरास गाडी जाण्यास अद्याप बराच अवकाश आहे"

नंतर मला समजलें कीं, हा संभावित मनुष्य जवळच्या तालुक्याचा मामलेदार असून मजवर आलेल्या प्रसंगाची चौकशी करण्याकरिता स्वत: आला आहे आता ह्या खटला चालून त्या नराधमांना शिक्षा होईल परंतु त्यापासून मला काय लाभ? माझें सर्वस्वधन जें पुत्ररत्न तें तर मला सोडून गेलेंच तें आता मला कोठून मिळणार? ह्मणून मी पुत्रशोक आवरून तिकडच्या प्राणरक्षणाच्या तजविजीसाठी लवकर निघून जाण्याविषयीं उत्कंठित झाल्यें.

मामलेदारसाहेबांनीं हळूहळू मजजवळून सर्व हकीगत समजून घेतली व मीं सांगितलें तें सर्व त्यांनी कागदावर लिहून घेतलें. त्यानंतर एका रेल्वेच्या साहेबाची साक्ष झाली! त्यानें जें सांगितलें त्यातील सारांश हा होता.—

"मी नंबर २१ गुड्स्ट्रेनचा गार्ड आहें —च्या स्टेशनावर गाडी उभी करण्याची काहीं आवश्यकता नव्हती, परंतु स्टेशनाजवळ येताच रीतीप्रमाणें सिग्नल मिळाली नाहीं ह्मणून मला गाडी थांबविणें भाग पडलें बऱ्याच शिट्या दिल्या,

तरी काहीं उत्तर मिळालें नाहीं तेव्हां मला वाटलें की, स्टेशनावर कोणी मनुष्य नसावे, ह्मणून मी गाडी सोडून एक मनुष्य वरोबर घेऊन स्टेशनावर येऊन पहातों तों तेथें कोणीच मनुष्य नाहीं. ह्मणून मी विस्मित होऊन चोहींकडे तपास केला, तेव्हां ह्या बाई मूर्च्छितावस्थेंत असलेल्या आढळल्या व एका लहान अर्भकाचे छिन्न विच्छिन्न व रक्तबंबाळ झालेले अवयव इकडेतिकडे पडलेले दिसले त्यानंतर जवळच वेटिंगरूममध्ये अडकून पडलेले स्टेशनमास्तर व दुसरे तीन मनुष्य आढळले ह्या देखावा पाहून मला फारच वाईट वाटलें व काय प्रकार घडला असावा हे माझ्या लागलेंच लक्ष्यात आलें नंतर मी गाडीवरून फायरमन वगैरे चौघा इसमांना बोलावून आरोपींना पकडले व लगेच आपल्यास येण्याविषयी तार दिली ह्या बाईनी जी हकीगत सांगितली ती चौघा आरोपींनीं मजजवळ पूर्वींच कबूल केली आहे असो

यानंतर फायरमन वगैरे तीनचार इसमांच्या साक्षी झाल्या त्यांत विशेष काहीं नसून गार्डसाहेबाच्या जबानीचेंच समर्थन केलें होतें.

[ ८ ]

पुढें त्या दयाळू मामलेदारानें तिकीट काढून देऊन माझी तुळजापुराला रवानगी केली पुत्रशोकानें पोळून गेलेल्या अंतःकरणानें डोळ्यांतून सारखा अश्रुवर्षाव करीत माझ्या पतीला जीवदान देण्याविषयीं मी देवीच्या चरणापाशीं धरणें घेऊन बसलें मी रडतरडत देवीला ह्मणालें "माते भवानी! तू स्त्री असून एवढी कठोर कशीग झालीस? तुझ्या दर्शनाला धावून आलें ह्मणून तू माझ्या बाळाचा वध केलास काय? तुला हृदय आहे की नाहीं?"

अन्नपाणी वर्ज्य सतत तीन दिवस मी देवीची आराधना केली देवीच्या मस्तकावर आपली हत्या घालाची ह्मणजे त्या पातकाला भिऊनतरी ती मला चुडेदान देईल, या आशेनें मी देवळा[illegible] धरणें देऊन बसलें होतें परंतु त्या पाषाणाला काहीं माझी दया [illegible] इतक्यात आमच्या गावची एक बाई तुळजापुरीं आली व तिनें [illegible] कपाळ फुटल्याची भयंकर बातमी मला सांगितली तिकडची अत्यवस्थ स्थिति असतांना मी दगडासारखें घट्ट हृदय करून तिकडे एकटे टाकून तुळजापुरी गेलें, हें कळताच आपल्या अंतसमयीं जवळ कोणीहि नाहीं असें पाहून तिकडे अपरिमित दुःख झालें त्या दुःखांत आणखी आपल्या प्रिय बाळाचा त्या राक्षसांनीं निर्दयपणें वध केल्याची व मी संकटात

सांपडल्याची भयंकर बातमी कळतांचतर तिकडे जो धक्का बसला, त्या धक्क्या-सरशी तिकडचा प्राण निघून गेला !

शेजारणीच्या तोंडून ही दुष्टवार्ता ऐकताच मी मूर्छितच झालें काहीं वेळानें शुद्धीवर येताच त्या देवीला मीं जे शिव्याशाप दिले आणि तिचा जो उद्धार केला, त्याचें काय वर्णन करूं?

* * * * * * *

माझ्या फुटक्या नशिबाचें मी त्या मूर्तीच्या डोक्यावर काय म्हणून खापर फोडावें? ती बिचारी पाषाणमूर्ती! मीच जर पाषाणाहूनहि पाषाण बनून भलत्याच मार्गाला लागलें, तर त्याचें फळ शेवटीं असें भोगावें लागावें, यात काहींच विपरीत नाहीं! या तुळजापुरच्या भवानीवरच मी सर्व भार घालून राहिलें नसतें, मृत्युशय्येवर पडलेल्या पतीची अंतकाली मनोभावानें सेवाचाकरी केली असती, आपल्या बायका मुलाकडे पाहून त्याचे प्राण शांततेनें जाऊं दिले असते, तर आज रात्रदिवस माझ्या हृदयाला जे विंचू डसत आहेत ते कशाला डसते? माझ्या लाडक्या बाळाचा त्या निर्दयाच्या हातून कशाला वध होता? आणि पुत्रघातिनी—पतिघातिनी अशी भयंकर संज्ञा मला कशाला प्राप्त होती? अहो माझ्या प्रिय मातापित्यानों! तुह्मी मोठ्या प्रेमानें माझें लालनपालन केलें, हजारो रुपये खर्च करून मोठ्या समारंभानें माझें लग्न केलें, त्या तुह्मी मला योग्य शिक्षण दिलें असतें, बाळपणीच माझें अज्ञान दूर केलें असतें, तर माझा असा घात कां होता? व माझ्या हातून जे परमघोर पातक घडलें—ज्याची भरपायी जन्मोजन्मींहि व्हावयाची नाहीं—व ज्याबद्दल मला आज रात्रदिवस असें धायधाय रडावें लागत आहे तसा प्रसंग मजवर कशाला येता?



# बहादर मिचल.

सांप्रत जपान आणि रशिया यांचें घनघोर युद्ध सुरू आहे हा रणसंग्राम किती दिवस चालेल, या रणकुंडांत किती मानवी प्राण्यांच्या आहुती पडतील, आणि या युद्धाचे भावी परिणाम काय घडतील, याची आज कांहींच अटकळ करतां येत नाहीं जपानरशियाच्या या लढाईच्या परिणामाकडे संपूर्ण जगाचे डोळे लागून राहिले आहेत आज फक्त जपान आणि रशिया हे दोन देशच परस्पराच्या नरडीचा घास घ्यावयास उठले आहेत कांहीं कालानें कदाचित् दुसऱ्याहि कित्येक राष्ट्रांना वीरश्री चढून तींहि या युद्धांत सामील होतील व एकमेकाचें रुधिरप्राशन करण्यास उद्युक्त होतील कदाचित् जगभर रक्ताच्या नद्या वाहतील पण आपल्यास त्याचें काय! 'जें जें होईल तें ते पहावें!' तथापि घरातल्याघरांत बसून युद्धस्थ रम्य कथा ऐकण्याची आह्मांला पूर्ण स्वतंत्रता आहे आणि त्या स्वातंत्र्याचा लाभ घेऊन अशा रम्य कथांपैकीं एक रमणीय कथा आमच्या वाचकांस विदित करण्याचें आह्मीं योजिलें आहे

फ्रान्सचा दिग्विजयी बाहशहा नेपोलियन बोनापार्ट यानें इ स १८१२ सालीं रशिया देशावर स्वारी करून संपूर्ण रशियन प्रजेस त्राहि भगवान् करून सोडलें होतें या स्वारीच्या वेळीं फ्रेंच शिपायांनी जे अत्याचार केले, निरपराधी, असहाय रशियन प्रजाजनांचा जो भयंकर छल केला त्याचें वर्णन करण्याचें हें स्थळ नव्हे फ्रेंच शिपाई गावाचेंगाव उध्वस्त करित, घरादाराची राखरांगोळी करित, आणि निरपराध प्रजेची क्रूरपणें कत्तल करित चालले असतां एके दिवशीं संध्याकाळच्या वेळीं ते एका खेड्यांत येऊन पोंहोचले आल्याबरोबर त्यांनी खेड्यास आग लावून दिली, प्रजेस गावाबाहेर हाकून लाविलें व आणखीहि कांही अनन्वित कृत्यें केल्यावर रात्रीं विश्रांतीसाठीं ह्मणून त्यांनीं गावांतीलच एका विस्तीर्ण देवळामध्यें आपल्या पथारी सोडल्या या राक्षसाच्या तावडींतून जिवंतपणें सुटून प्राण वचावण्यासाठीं पळून गेलेली कांहीं मंडळी या खेड्यापासून पांचसहा मैलावर असलेल्या एका डोंगराच्या पायथ्याशीं येऊन लपून राहिली होती मध्यरात्र टळून गेलेली, डोळ्यांत बोट घातलें तरीदेखील दिसणार नाहीं एवढा बाहेर निबिड अंधकार पसरला आहे, थंडीतर मी ह्मणत आहे, आणि त्यांत सोसाट्याचा गार वारा सुटलेला, अशा वेळीं भुकेनें कावलेल्या, घरादारास आंचवलेल्या, जिवलग आप्तस्वकीयांच्या मृत्यूमुळें अंतःकरणें होरपळून गेलेल्या व प्राणरक्षणासाठीं पळत असतांना शत्रूच्या शिपायांकडून झालेल्या भयंकर जखमांच्या दुःसह वेदनांनीं

तळमळणाऱ्या त्या दुर्दैवी रशियन प्रजेची कोण विपन्न स्थिति झाली होती! त्या प्रसंगाचें यथार्थ चित्र रेखाटण्याचें लेखकाच्या कमकुवत लेखणीच्या अंगी सामर्थ्य नाहीं. तेव्हां त्या भानगडीत न पडतां वाचकहो! चला आपण त्या समोरील झाडाच्या बुध्यापाशी विव्हळत पडलेल्या एका बावीस वर्षांच्या तरुणीची काय हकीगत आहे ती पाहू. ही तरुण आणि रूपसंपन्न युवती क्रूर फ्रेंच शिपायांच्या अत्याचाराला भिऊन पळत असताना तिलाहि मर्मावर एक गोळी लागल्यामुळें असह्य वेदनांनी व्याकूळ होऊन आपल्या नवऱ्याच्या मांडीवर मस्तक ठेवून ती माशासारखी तळमळत आहे. प्रतिक्षणी तिच्या आयुष्याची दोरी क्षीण होत चालली आहे. पहा–त्या तरुणीला एकाएकीं अवसान येऊन ती क्षीणस्वरानें म्हणते " मिचल! माझी मरण-समयींची एक इच्छा पूर्ण कराल का? तेवढी इच्छा पूर्ण होऊन जर मला मरण येते—"

पुढें तिच्यानें बोलवेना. पत्नीची ही हृदयद्रावक स्थिति पाहून मिचलचें अंतःकरण भरून येऊन तो आवेशानें म्हणाला "सांग सांग, तुझी काय इच्छा आहे ती सांग— ती कितीहि दुष्कर असली तरी मी ती पूर्ण करीन. माझ्या लाडकीची काय इच्छा आहे? मला लवकर कळू दे—"

आगीनें धडधड पेटत असल्यामुळें त्या काळोख्या रात्रीहि दुरून स्पष्ट दिसणाऱ्या आपल्या गावाकडे बोट दाखवून ती तरुणी म्हणाली "आमच्या गावातील देवळामध्ये भिंतीवर टांगलेली आपल्या पूज्य महंताची तसवीर जर माझ्या एकवार दृष्टीस पडेल तर मी सुखानें मरेन—"

वेळ अगदीं थोडा उरलेला, क्षणाचाहि विलंब उपयोगी नाहीं, असें पाहून मिचलनें कठीण हृदय करून आपल्या मांडीवरील पत्नीचें मस्तक जमिनीवर ठेविलें आणि पूर्ण प्रेमानें तिच्या मुखाचें एक चुंबन घेऊन तीराच्या वेगानें तो देवळाकडे धावला.

धावत, धडपडत, अडखळत, ठेंचा खातखात बहादर मिचल गावाच्या सीमेपर्यंत आला. परंतु आता त्याचा तो पूर्वीचा वेग राहिला नाहीं. अगदी जपून व चोहींकडे नजर देऊन तो हळूहळू देवळाच्या रस्त्याला लागला. सुदैवानें या वेळीं त्याला अडथळा करण्यास कोणीहि आलें नाहीं. कांहीं वेळानें तो देवळासन्निध येऊन पोहोंचला व पत्नीनें सांगितलेली भिंतीवर लटकत राहिलेली ती महंताची तसवीरहि त्याच्या दृष्टीस पडली. ती तसवीर पहाताच त्या पत्नीप्रेमी मिचलला केवढा आनंद झाला, केवढें स्फुरण चढलें! ती तसवीरतर त्याला पाहिजेच होती. परंतु ती प्राप्त होणें किती दुर्घट होतें! तसवीर पाहिजे तर प्राण गमावले पाहिजेत,

ही गोष्ट अगदीं निर्विवाद होती आपल्या जिवलग पत्नीची मरणसमयीची इच्छा पूर्ण करण्यास्तव तसबिरीसाठीं तो आपले प्राण खर्ची घालण्यास तयार होता, परंतु प्राण गमाविल्यावर ती तसबीरतरी त्याच्या प्रियेकडे कोण नेणार होता? परंतु मिचलला हा विचार करण्यास अवकाशच नव्हता ज्या धाडसानें त्यानें एवढी मजल मारिली होती त्याच धाडसाच्या जोरावर तो खिडकीवाटे एकदम देवळात शिरला व अगदीं हळू, पाऊलहि न वाजविता तसबिरीपाशी गेला

त्या प्रशस्त देवालयातील उज्वल दीपप्रकाशात ती तसबीर आणि अस्ताव्यस्तपणे घोरत पडलेले पन्नास साठ कृतांतस्वरुप फ्रेंच शिपाई एकदमच मिचलच्या दृष्टीस पडले परंतु त्या राक्षसास पाहून बहादर मिचल यत्किंचितहि डगमगला नाहीं जणू काय आपण आपल्या घरातील एकांत स्थळींच आहों, अशा शांत आणि गंभीरपणानें त्यानें ती तसबीर यत्किंचितहि आवाज केल्याविना खुंटीपासून सोडविली आणि ती बगलेंत घेऊन तशाच धिमेपणानें तो मागें फिरला

परंतु अरेरे! त्याच वेळी शेगडीमध्यें जळत असलेल्या एका लाकडाच्या ओंड्यातून कार्‌दिशीं आवाज होऊन त्यातील एक ठिणगी एका फ्रेंच शिपायाच्या अंगावर उडताच त्यानें कोकलत उठून आपल्याबरोबर सर्वांस जागें केलें

"काय-काय-कोण-कोण-पकडा पकडा-" असा एकच हलकल्लोळ होऊन बिचारा मिचल शेवटीं शत्रूच्या तावडींत सापडलाच! सर्व खडबडून जागे झाले दुष्मनाकडून आलेला हेर समजून फ्रेंच शिपायानीं त्याला पकडलें सर्वांनी आपापल्या तरवारी म्यानातून काढिल्या क्षणार्धांत मिचलचे राईराई एवढे तुकडे उडाले असते! इतक्यात त्या टोळीचा क्याप्टन ओरडून ह्मणाला " सबूर-सबूर—"

खुनावर चढलेल्या त्या शिपायास क्याप्टनच्या या हुकुमाचा मनस्वी संताप आला व ते त्याच्याकडे दातओंठ खात पाहू लागले क्याप्टन सर्वांस शांत करून मिचलपाशीं येऊन ह्मणाला " तू बगलेंत काय लपवून पळत होतास बोल? खोटें बोललास तर क्षणाचाहि विलंब न लागता प्राणास मुकशील! "

मिचल यत्किंचितहि डरला नाहीं त्यानें धीटपणें आपलें देवळात येण्याचें कारण सांगून ती तसबीरहि दाखविली मिचलची ती हर्दिगत ऐकून व त्याच्या हातांतील ती तसबीर पाहून सर्व शिपाई खो खो हसत सुटले त्या पापाणहृदयी राक्षसांपैकीं एकालाहि त्याच्या त्या हृदयद्रावक वृत्तांताची करुणा आली नाहीं व [illegible] मनावर [illegible] तसबिरीनें श्रद्धा किंवा भक्तिभाव उत्पन्न केला नाहीं [illegible] ते त्याला वध [illegible] उद्युक्त झाले शत्रुपक्षाकडील असहाय, निरपराधी

आणि केवढाहि दुःखीकष्टी का प्राणी असेना, त्याचें शीर धडापासून वेगळें करतांना विजयी सैन्यांतील राक्षसहृदयी शिपायांच्या वीरश्रीला विलक्षण स्फुरण चढत असतें, हें आपण इतिहासावरुन पहातोंच! परतु त्या टोळीचा क्याप्टन हा तशा शूरमालिकेतील नव्हता आणि ह्मणूनच मिचलचें पत्नीप्रेम आणि मिचलची देशभक्ति, राजभक्ति जगनिदर्शनास आली. दानवकुलातहि कधीकधी देव जन्म घेतो ह्मणतात, तें अशाच प्रसगी अनुभवास येतें. असो

ते राक्षस मिचलचा शिरच्छेद करण्यास अगदी उत्कठित झाले होते परतु क्याप्टनने त्याचे मोठ्या युक्तीनें निवारण करून तो मिचलला ह्मणाला " मिचल! तू पहातच आहेस कीं, मृत्यु तुझ्यापुढें उभा आहे तू माझा हुकूम मान्य करुन मी सागेन त्याप्रमाणें वागशील तर तुला जीवदान मिळेल. तू आमच्या तुकडीबरोबर राहून आह्मांला मदत कर आमची अन्नसामुग्री खलास झाली आहे, ती कुठे मिळेल ते दाखविण्यास व त्याप्रमाणे आह्माला जवळपासची अडीअडचणीची ठिकाणें दाखविण्यास व दुसरीहि हरएक प्रकारची मदत करण्यास तुझ्यासारख्या वाटाड्याची फार आवश्यकता आहे तू आमचा वाटाड्या होऊन आह्मांला साह्य कर, ह्मणजे आह्मालाहि मदत होईल व तुझेहि प्राणरक्षण होईल."

परतु मिचल दातओठ खात इगळासारखे डोळे लाल करून ह्मणाला "नीच! मला निमकहराम होण्यास सागतोस? ही माझी मान तयार आहे—माझी गर्दन खुशाल उडवा. परतु असले नीच कर्म प्राणातीहि माझ्या हातून होणें नाहीं मला माझ्या प्राणाहून—सर्वांहून माझा देश प्रिय आहे. माझ्या देशाशी मी कधीहि दगलबाज होणार नाहीं महाराजाधिराज अलेक्झाडर बादशहाची मी प्रजा आहें; आणि माझ्या जीवात जीव असेपर्यंत मी झारचीच प्रजा राहीन माझ्या राजाच्या दुष्मनाला मी केव्हाहि—यत्किंचितहि मदत करणार नाहीं!"

" शाबास! शाबास!" क्याप्टनाच्या तोंडातून शब्द निघाले परतु इतर शिपायांच्या म्यानातील तरवारी खणखणू लागल्या यावेळीहि क्याप्टनने मोठ्या निकराने शिपायाचे निवारण केलें परतु त्याच्या पुढील इच्छेस शेवटी त्याला वश होणे भागच पडलें. त्या शिपायातील एकाने N हे अक्षर असलेला एक धातूचा शिक्का जवळच धडधडत असलेल्या शेगडींत टाकून तो बाकीच्यास उद्देशून ह्मणाला " याला हवीतेवढी मिजास करू द्या, आपणतर याला आपल्या नेपोलियन बादशहाची प्रजा बनविणार काय पाहिजे तें होओ, याच्या हातावर N चा शिक्का ठोकून याला आपण नेपोलियनची प्रजा बनविणार "

आमरणांत अलेक्झांडरचीच प्रजा रहाण्याचा दृढ निर्धार असलेल्या मिचलच्या कानीं हे शब्द पडतांच आणि शेगडीमध्यें तें लाल झालेलें N अक्षर पहातांच त्याचें सर्व शरीर कंपित झालें. आपल्या पवित्र देहाला हा कलंक लावून घेण्यापेक्षां देहाचा तावडतोब सोक्षमोक्ष करून घ्यावा, अशा विचारानें कमरेस लटकत असलेल्या कुऱ्हाडीला त्यानें एकदम हात घातला. आतां तो आपला अंत करून घेणार, इतक्यांत मिचल एकदम देहभानावर आला. कारण आणखी कांहीं वेळ त्याच्या देहावर त्याची सत्ता नव्हती. आपल्या प्रियेच्या आदेशानुरूप तो महत्वाची तसबीर नेण्यासाठीं आलेला होता. तें काम पुरें केल्याविना त्याला आपण होऊनच आपला नाश कसा करतां येईल? मूढ होऊन तो जागच्या जागीं थबकला. इतक्यांत शेगडीपाशीं बसलेला शिपाई ह्मणाला "चला, सर्व तयारी झाली."

त्याबरोबर मिचलला चारचौघांनीं घट्ट पकडून धरलें. मिचलनें या वेळीं यत्किंचितहि गडबड केली नाहीं. तो शांतपणें आलेल्या प्रसंगास सादर झाला. एकानें त्याचा डावा हात डाग देण्यासाठीं पकडला. मिचलनें आपलें मनगट पुढें केलें. परंतु कांहीं शिपाई ओरडले "नाहीं नाहीं, मनगटावर नको, हाताच्या बाहेरच्या भागावरच डाग, कीं सगळ्या जगाच्या दृष्टीस पडेल."

मिचलचा हात कापूं लागला. यावेळीं त्यानें जराशी धडपड केली व असंमतिहि दर्शविली. परंतु ते रानटी शिपाई आपली इच्छा पूर्ण केल्याविना राहिले नाहींत. लवकरच जळक्या मांसाचा वास आला व त्या निर्दयांनीं आपलें काम पुरें केलें. लगेच पुनः विकट हास्यध्वनि ऐकूं आला व मिचलला आतां नेपोलियनची प्रजा समजून त्याच्याशीं ते फ्रेंच शिपाई प्रेमभावाचें वर्तन दाखविण्यास उद्युक्त झाले.

मिचलनें हा सर्व प्रकार शांतपणानें सहन एवढावेळ केला. काय करील बिचारा! शिपायांनीं आपलें काम संपूर्ण करतांच तो तेथें जवळच असलेल्या एका टेबला-जवळ गेला व डाग दिलेला हात टेबलावर ठेवून त्याकडे पाहूं लागला. क्षणार्धांत त्याच्या उजव्या हातांतील कुऱ्हाड एकदम वर झाली व डोळ्याची पापणी लवते न लवते एवढ्या अवकाशांत खाड्दिशीं आवाज होऊन N अक्षराचा छाप उठलेला मिचलचा हात कोपरापासून अलग झाला! आश्चर्यांत दंग झालेल्या त्या फ्रेंच शिपायांच्या अंगावर तो फेंकून मिचल आवेशानें ह्मणाला "तुमच्या नेपोलियनचा भाग घ्या. मी रशियन आणि रशियनच आहें!"

हा अद्भुत प्रकार पहातांच ते मनुष्यदेहधारी राक्षस दगडी मूर्तिप्रमाणें टकटक पहातच राहिले! क्याप्टन मोठ्यानें ओरडून ह्मणाला "शाबास शाबास! हे बहादरा, तुझी धन्य असो!"

नंतर तो आपल्या शिपायांकडे वळून म्हणाला "खबरदार, आतां कोणी त्याच्या केसालाहि धक्का लावाल तर ! त्याच्या शौर्याला कसा मान द्यावा हें फ्रेंच लोकांना ठाऊक आहे, हें जगाला कळूं द्या. ह्या वीर मिचलला सन्मानानें पोंचवा."

फ्रान्सच्या हुकमाप्रमाणें त्याच्या शिपायांनीं मिचलला सन्मानपूर्वक निरोप दिल्यावर ते मदतानें निघ घेऊन तो पुन: त्वरेनें आपल्या इच्छित स्थळाकडे परतला आपल्या प्रियेकडे येईपर्यंत वाटेंत श्वास घेण्यासुद्धां तो थांबला नाहीं आपल्या वेदनांना त्यानें जुमानिलें नाहीं.

एका प्रहराचे आंत तो पूर्वस्थळीं येऊन पोहोंचला. पतीच्या वाटेकडे डोळे लावून प्राण कंठीं धरून बसलेल्या आपल्या तरुण पत्नीच्या नेत्रांसमोर मिचलनें ती मातृभूची तसवीर धरली. तिची मरणसमयींची ती इच्छा पूर्ण झाल्यामुळें तिला झालेल्या आनंदाचें वर्णन करणें अशक्य आहे परंतु ही इच्छा पार पाडण्यास मिचलला केवढें संकट सोसावें लागलें होतें, याची त्या बिचारीला कल्पनाहि नव्हती ! अत्यंत समाधानाचे आणि आभारदर्शक एकदोन अस्पष्ट शब्द उच्चारून आणि प्रियकराला एक अंतिम चुंबन देऊन त्या श्रद्धाळू आणि पतिव्रता तरुणीनें आपले प्राण प्रभूच्या हवालीं केले तो करुणप्रसंग वर्णन करण्याचें लेखकाच्या लेखणीच्या अंगीं सामर्थ्य नाहीं

काहीं दिवसांनीं मिचलच्या ह्या कृत्याची गोष्ट अलेक्झांडर झारच्या कानीं गेली. झारनें मिचलला सन्मानपूर्वक बोलावून आणून त्याचा गौरव करून त्याला तहाहयात मोठें पेनशन करून दिलें. अशा देवहृदयी वीराची दासी होऊन त्याची पदसेवा करण्यास रशियांतील अनेक रूप, यौवन, धन, कुलसंपन्न तरुणींनीं पुष्कळ प्रयत्न केले, परंतु मिचलनें नंतर पुनर्दारपरिग्रह केला नाहीं मिचलसारखे उदारहृदयी, पत्नीव्रतपरायण, वीर, देशभक्त ज्या देशांत जन्म घेतात तो देश धन्य होय !



# डा० आनंदीबाई जोशी.

[ ३ ऱ्यावरून चालू ]

मागील खेपेस सांगितल्याप्रमाणें कार्पेन्टरबाईंच्या सहवासात सुमारे चार महिने घालविल्यानंतर, त्यांच्याच सल्ल्यानें आनंदीबाई फिलाडेल्फिया येथील वैद्यक शिकण्याच्या विद्यालयात सामील होण्याकरिता त्या शहरी निघून गेल्या त्यांच्या-बरोबर, त्यांना पोंचविण्याकरिता व कॉलेजात त्यांची रहाण्यासवरण्याची सोय करण्याकरिता कार्पेन्टरबाईहि गेल्या होत्या तेथे गेल्यावर कॉलेजची डीन बॉडले या बाईनीं त्यांचें चांगलें आगतस्वागत केलें त्यांच्याकरिता त्यांनी विद्यालया-पासून थोड्या अंतरावर दोन खोल्या घेऊन ठेविल्या होत्या, तेथेंच आनंदीबाई जाऊन राहिल्या तेथें कांहीं दिवस त्या हातानें स्वयंपाक करित असत परंतु अभ्यासाच्या दगदगीमुळे व प्रकृतीच्या अस्वस्थतेमुळें त्यांना लवकरच बॉडलेबाईंच्या खानावळींत जावें लागलें. तथापि तेथेंसुद्धा त्यांनी डाळ, रोटी, दूध, लोणी, बटाटे, याशिवाय अन्य भक्ष्य अथवा अपेय पेय कधींहि सेवन केलें नाहीं. आनंदीबाई वर सांगितलेल्या विद्यालयात अभ्यास करित असतां त्यांना अनेक प्रकारच्या शारीरिक व मानसिक—विशेषत मानसिक—यातना भोगाव्या लागल्या कधीं कोणा नरपशूच्या अत्यंत गर्हणीय अशा पत्रामुळें, तर कधी प्रत्यक्ष नवऱ्याच्या विक्षिप्त वर्तनामुळें, व कधींकधी मिशनरीलोकांच्या त्रासामुळे त्यांच्या कोंवळ्या मनाला वारंवार धक्का बसे परंतु परमेश्वरावर भरंवसा ठेवून त्यांनीं अशा स्थितीसहि पाठ दिली व आपलें शिक्षणाचे काम पुरें केलें ! परक्या देशांत एकटे राहून अशा प्रकारच्या अडचणींत इष्ट हेतु सन्मार्गानें सिद्धीस नेणें (त्या काळात) किती कठीण होतें, याची ज्यास थोडीशीतरी माहिती असेल तो आनंदीबाईंस धन्यवाद दिल्यावाचून रहाणार नाहीं असो

अमेरिकेंत असतां आनंदीबाईंची प्रकृति सुधारली तर नाहींच, उलट बिघडत चालली अभ्यासाच्या नादात त्यांना त्याचे भान राहिलें नाहीं इतकेंच तथापि श-नन रून जेव्हां दुराणी येत, तेव्हां मात्र त्यास आपल्या प्रकृतीची काळजी वाटे त्यांना एक प्रकारची कायमची अशक्तता आली होती यामुळें कोणत्याहि वैद्यकीय प्रयत्नानें त्यांची प्रकृति निर्दोष होणें अशक्य होतें तथापि वर सांगितलेला श्रम जर त्यांना झाला नसता तर कदाचित् त्यांच्या प्रकृतीचा इतका बिघाड झाला नसता अमेरिकेंत असतां आनंदीबाईंनी आपल्या शरिराची जरी उन्नति

करुन घेतली नाहीं तरी तेथें त्याचें मन अत्यत उन्नतावस्थेस जाऊन पोंहोंचलें होते. आणि शरीरसामर्थ्याच्या मानानें पहातां त्यांच्या मानसिकशक्तीचा व बुद्धीचा जो फाजील विकास झाला होता तोच त्याच्या शारीरिक ऱ्हासास एक मदतगार झाला, असें प्रो गोळे याच्या '**ब्राह्मण आणि त्यांची विद्या**' या पुस्तकांतील विचारसरणीवरुन ह्मणावें लागते अमेरिकेत वैद्यक शिकत असता आनदीबाईचें वय केवळ १९ ते २२ वर्षांचें होतें या इतक्या अल्पवयात त्याच्यावर जी अनेक सकटे आली त्यांमुळें त्याचें शारीरिकबल, साधारण सुस्थितीत व बेफिकिरींत वाढलेल्या त्यांच्याच वयाच्या कुमारिकेपेक्षा पुष्कळ पटीनें कमी असणें अगदीं साहजिक आहे. तशात ज्ञानार्जनाच्या विलक्षण लालसेमुळें अभ्यास व दीर्घोद्योग या द्वयीची भर पडलेली. मग काय विचारतां ? बुद्धीचा मात्र विशेष विकास झाला व शरीर लगडें पडलें.

आनदीबाई १८८३ च्या अखेरीस 'डिफ्थेरिया' नामक रोगाने फार ग्रस्त झाल्या होत्या व ह्या दुखण्यातून त्या फारच कष्टाने वाचल्या ह्या दुखण्यातून त्या नुकत्याच कोठे उठताहेत, तोच त्याच्या पतिराजाचें त्यास एक मर्मभेदक पत्र येऊन पोहोंचलें ते पत्र मूळ चरित्रग्रथात दिलेलें नाहीं परतु त्यास आनदीबाईनीं लिहिलेलें उत्तर छापलें आहे त्यातून काहीं त्रोटक उतारे येथे देतों, ह्मणजे गोपाळरावाच्या पत्राची वाचकास सहज कल्पना होईल; व अशाप्रकारचे पत्र प्रकृति अस्वस्थ असता आनदीबाईच्या हाती पडल्यानें त्याचा त्याच्या मन स्थितीवर काय परिणाम झाला असेल हेंहि वाचकास अजमावता येईल.

"माझ्या पोपाकावर आपण केलेली टीका फारच खोंचून लिहिलेली आहे ...'लोक आपण काय बोललों अगर काय लिहिले हें कसे विसरतात, याचे मला फार आश्चर्य वाटतें! जरूरच वाटल्यास 'तूं मडमांसारखा पोपाक कर' असा आपण उपदेश केल्याचे मला पक्के आठवते; व मिसेस कार्पेन्टरला आणि मला असें लिहिलेत कीं, अवश्य वाटल्यास मी मास देखील खावें. .....परंतु...... मी ते केले नाहीं. ... . ........ ... आपल्या अत करणास त्रास झाला, त्याबद्दल दंड देण्यास अश्रूदेखील मजजवळ राहिले नाहींत. तसेंच एखादा उसासा टाकीन ह्मटले, तर त्याला देखील मी समर्थ नाहीं आपल्या गरम अथवा थड अशा बोलण्यानें, वितळणारें किंवा थिजणारें असें फक्त काळीज मात्र मजजवळ उरलें आहे. मजबद्दल मला दु:ख कधीं होत नाहीं, तर आपणास मजपासून सुख

अथवा समाधान मुळींच मिळत नाही, याबद्दल मात्र मला दुःख होतें, हें मी आपणास अगदीं अंतःकरणापासून सांगते ........ ...... ..
हिंदु स्त्रीस आपल्या नवऱ्यास एक चकार शब्द बोलण्याचा, अगर उपदेश करण्याचा कोणताहि अधिकार नाही तर उलट नवऱ्याला काय वाटेल ते करू देऊन गप्प बसण्याचा आहे शांतवृत्ति ही प्रत्येक हिंदु नवऱ्यास आपल्या बायकोपासून शिकायला उत्तम मार्ग आहे (आतां मी जी काय झाले आहे, ही जर आपण नसतां तर कधींच झाले नसतें, हे मला समजत नाहीं असें नाहीं व त्याकरितां सदोदित मी आपली ऋणी आहे, परंतु मी शांत होतें हे आपणास नाकबूल करता येणार नाही )"

"आपण मजवर बेइमानीपणाचा आरोप ठेवाल, असें मला वाटलें नव्हतें हा आरोप सहन करणें फारच कठिण! .... हल्ली मजमध्ये अथवा आपल्यामध्ये बदल झाला आहे, असे ह्मणण्याचा माझा मुळींच उद्देश नव्हता आपली मजवर देखरेख असावी व मी ज्या ठिकाणीं चुकेन, त्या ठिकाणीं आपण मला मार्ग दाखवावा, हें चांगले मी आपणास खात्रीपूर्वक सांगते कीं, जेव्हा आपला व आपल्या बायकोचा वियोग झाला, तेव्हा जशी ती होती, तशीच व त्याच स्थितींत अद्यापहि ती आहे. तिचा पोषाक मात्र थोडासा बदलला आहे व तिच्याभोंवतालची स्थिति बदलली आहे." (पृ.२४३ ते २४७).

या उताऱ्यावरून पहातां आनंदीबाईस या समयास आलेली गोपाळरावांचीं पत्रें फारच मर्मभेदक होतीं असें दिसतें अशीं पत्रें लिहिण्यास गोपाळरावास कांहीं सबळ कारण होतें असें दिसत नाहीं वरें हीं पत्रें लिहिण्यात गोपाळरावाचा उद्देश [illegible] होता ह्मणावें, तर तसें मुळींच नव्हतें, असें चरित्रलेखक [illegible] गोपाळरावांनी हीं जीं पत्रें लिहिलीं तीं त्याच्या, [illegible] स्वभावाचींच केवळ उदाहरणें आहेत, असें ह्मणावे [illegible] गोपाळरावाच्या हातीवरून [illegible] आहे ती [illegible] आहे, असें सिद्ध होतें.

[illegible] विचार करितां त्या एक असाधारण [illegible] पती त्याच्या [illegible] [illegible] आपल्या [illegible] पत्रान [illegible]

प्रसंगी जरी रागाचे शब्द लिहिले आहेत तरी एकंदरीत त्याजबद्दल आपले मनात पूज्य भावच धारण केलेला दिसतो वरील उताऱ्यात आनंदीबाईच्या लेखणीतून रागाच्या सपाट्यात कित्येक गैर शब्द पडले आहेत, परंतु त्याच्या त्या वेळच्या स्थितीचा व एकंदर आचरणाचा विचार केला म्हणजे त्याबद्दल त्यास क्षमा करावीशी वाटते वरील पत्र लिहिल्यावर थोड्याच दिवसानंतर गोपाळरावास लिहिलेल्या एका पत्रात त्यांनी त्याबद्दल खेद प्रदर्शित केला आहे व माफी मागितली आहे आनंदीबाईच्या हातून आपल्या नवऱ्याशी जसें उत्तम वर्तन घडलें, असें इतर चार साधारण उच्चप्रकारचें शिक्षण मिळालेल्या स्त्रियांच्या हातून घडेलच, असें विधान करणें हल्लींच्या स्थितींत आह्मास धाडसाचे वाटतें. तेव्हां पुरुषाच्या स्त्रीवरील स्वामित्वाबद्दल मूळ ग्रंथकर्त्रींनें केलेली टीका चुकीची असून अपायकारक आहे, असें आह्मास वाटतें सामान्यतः स्त्रीवर पुरुषाचें पूर्ण स्वामित्व असणें व तिने त्याच्या धाकात रहाणें हेंच आवश्यक व हिताचे आहे. त्यापासून उभयतांचेंहि कल्याण आहे. दुर्दैवाने जर एखाद्या स्त्रीस अयोग्य पती मिळाला तर त्याची अवहेलना न करिता त्यास पूर्णपणें पूज्य मानणे व परमेश्वरावर भरवसा ठेवून सत्कृत्यात आयुष्य घालविणें हे हिंदु स्त्रीधर्माचे मुख्य ब्रीद आहे. त्याविरुद्ध आचरण करणें ह्मणजे स्त्रीने आपली अवनती करून घेणे आहे, यात शंका नाहीं व्यावहारिक, धार्मिक व तात्विक ह्या तिन्ही दृष्टीने पाहिले तरीहि वरील ब्रीद पाळणें हें समाजाचा गाडा सुनियन्त्रित चालण्यास अत्यावश्यक आहे

धर्मासारख्या गहन विषयाचाहि आनंदीबाईंनी चांगला विचार केला होता. गोपाळराव हे बहुतेक धर्मलंडच होते त्यांनीं धर्मावर काहीं विक्षिप्त प्रकारची टीका करून आनंदीबाईस एक पत्र पाठविलें होते त्यास आनंदीबाईंनी एक बरेच लांबलचक परंतु मुद्देशीर असें उत्तर दिलें आहे. त्यातील काहीं त्रोटक भाग येथे देतों ह्मणजे त्यावरून त्याच्या धर्मसंबंधी कल्पना वाचकास माहीत होतील.

"जर आजपर्यंत मला कधीं दु:ख झाले असेल, तर ते आज या आपल्या धर्मावरील टीकेपासून झाले.........आपण आपल्या धर्मासंबंधाने जे कांहीं ह्मणतां ते मात्र सर्व चुकीचे वाटते !.... कोणताच धर्म खोटा अगर दगलबाजीचा ह्मणतां येणार नाहीं. आपणच त्याच्या खरेखोटेपणाचा विचार करित नाही, याचा दोष आपणांवर आहे......... धर्म काय आहे? सत्य हेच धर्म त्याचा पाया सत्यावर रचला आहे. तसाच जगाचा पायादेखील सत्यावर आहे. ईश्वर सत्यमय आहे, कोणताहि लोक-पंथ, अगर राष्ट्र,

हीं कांहीं धर्म नव्हत मानवी कायदाहि धर्म होत नाहीं. तर ईश्वराचा कायदाच सर्व जगाचा धर्म, व तोच एक फक्त धर्म. सत्य हा सर्वत्राचा धर्म होय लहरीपणा अथवा लोभीपणा ह्याला धर्माचें नांव देतां येणार नाहीं सत्यात धर्म येतो व धर्मात पवित्रपणा, प्रीति व न्याय हीं येतात आपल्या मनाची व सत्याची ओळख घालून देऊं या आपल्या आत्मारूपी माशास सत्य हे एक सरोवरच आहे मासा जसा पाण्यावाचून टिकत नाहीं, तसें आपण त्यावाचून टिकणार नाहीं ..... जर लोक आपल्याकरितां काहींएक करतात, तर आपणहि त्याच्याकरितां जें आपल्याच्यानें होईल, ते निर्मळ अंतःकरणानें करावें अगदीं थकेपर्यंत प्रीति व सत्य या दोन हातानीं एकमेकाकरिता खपूं या हाच काय तो धर्म!" (पृ० २५३).

उत्क्रांती, या विषयावरहि आनंदीबाईंनी काहीं विचार प्रगट केले आहेत त्याचाहि काहीं मासला पुढें देतों —

"हें जग सदोदित मूलस्थितींतच असावें, असा परमेश्वराचा उद्देश नाहीं, तसेंच हें जग सत्याला बहुत दिवस अंतरावें, असाहि त्याचा हेतू नाहीं. मनुष्याची बुद्धि आजपर्यंत विकास पावत आली आहे, व ती पूर्णदशेप्रत पोहोंचेपर्यंत अशीच विकसित होत जाणार वस्तुमात्रांत बदल होणें हा सृष्टिक्रमच आहे ज्याला नवीन जीवदशा प्राप्त झाली, त्यास उत्तरोत्तर उन्नतावस्था प्राप्त होत जाणार जसजसा काळ लोटत जातो, त्या मानानें प्रत्येक गोष्टींत बदल होत जातो, ही गोष्ट प्रत्यक्ष आपल्याच अनुभवावरून सिद्ध होते हा बदल किंवा फेरफार आपण केला पाहिजे असें नाहीं तो सृष्टिक्रमानेंच होत असतो. आपले दशावतार हे कशाचे दर्शक आहेत? उत्क्रमणाचे मत्स्यापासून मनुष्यप्राण्यापर्यंत ही उत्क्रांती होत आली. ती जिन्याच्या अगदीं खालच्या पायरीपासून अगदीं शेवटल्या पायरीपर्यंत एकदम गेली नाहीं हिंदुपुराणांपासून हीच गोष्ट प्रत्येक देशानें शिकली पाहिजे हिंदुशास्त्रातील ही प्राचीन कल्पना, या एकोणिसाव्या शतकात खरी ठरली, ही केवढी महत्वाची व आश्चर्याची गोष्ट आहे!!! जी गोष्ट पाश्चिमात्यांना आज आपण शोधून काढली असें वाटत आहे, ती त्यांच्याकरिता आमच्या पूर्वजानीं अगोदरच शोधून ठेवली होती! 'ती खरी आहे व ती मान्य केली, एवढेंच कार्यतें आम्हीं केलें' असें त्यानीं पक्कें समजलें पाहिजे, व कबूलहि केलें पाहिजे.... ..... मनुष्यात तीन प्रकारचे धर्म-

होतो, त्याप्रमाणेच आपल्या पत्ररूप छायेपासून जी थकली भागलेली प्रवासीण त्या मला होत आहे, व त्या छायेत झरा कोणता ह्मणाल, तर आपल्या अंत करणापासून निघालेला त्या पत्रांत येणारा मजकूर हाच. आणि तोच माझे जीवित धारण करितो आपल्या भेटीची मला अति उत्कट इच्छा झाली आहे, व आपणाविषयीं विचार नेहमी माझ्या मनांत इतके घोळत असतात कीं, आपण इतक्या दूर या प्रचंड सागराच्या पलीकडे आहां याचे देहभान मला मुळींच रहात नाहीं!" (पृ० २५७).

"रीतीभातींत वगैरे जसे आपण हिंदु आहों, तसेच हिंदु राहून आपल्याला सुधारणा केली पाहिजे." हे जे आपण दोन शब्द लिहिले, ते फार चांगले व स्तुत्य आहेत परंतु कांहीं गोष्टींचा आपण तिरस्कार करितां असे मात्र ह्मणूं नका त्यापासून आपली कोणतीहि सुधारणा होणें नाही. याच द्वेषामुळे आपण जगाच्या बंधुत्वांतून उठलों आहो! यानेच आपली प्रीति वएकमेकांतील संबध तुटला! हा द्वेषच विस्तवाप्रमाणे राष्ट्रांचीं राष्ट्रे जाळून भस्म करितो!! दुसऱ्याचा द्वेष करून आपणास काय फायदा होणार? जर आपण हिंदुस्थानांतील काहीं गोष्टींचा द्वेष करित असलां तर मग मजबद्दलचा प्रश्नच नाहीं. हिंदु लोक जसे ईश्वराची लेकरे आहेत, तसेच फ्रेंच, आयरिश अथवा इंग्लिश हेहि आहेत. तेहि जर ईश्वराचे प्राणी आहेत, तर मग उगीच त्यांचाच द्वेष काय ह्मणून करावा? त्याचा द्वेष केल्याने आपला कांही नफा होण्याचा संभव आहे काय? याकरितां, ज्या द्वेषाने या मोठ्या घराण्यांत तंटे उत्पन्न करून फाटाफूट केली, त्याचाच आपण द्वेष करूं या तो अति दुष्ट प्राणी आहे, तो लाखों मनुष्यांच्या मनांत थोडाबहुततरी असतोच. आपण द्वेष केला, व करूनहि घेतला. हा स्पर्शजन्य रोग हिंदुस्थानाततर हल्ली फारच पसरला आहे पुरे, त्याचा कटाळा आला. द्वेष करणे पुरे झाले! कारण, त्यामुळे आपल्या पुढील क्रमाला व्यत्यय येतो (पृ० २६५)

"आपण जर खरे व इमानाने वागतों तर ईश्वर आपणास कधीं सोडणार नाही परतु अरेरे!! आमचा भरंवसा किती थोडा व त्याच्या शक्तीचा व मोठेपणाचा आह्मी किती अव्हेर करितों! आह्मांस आमच्या सोयीप्रमाणे धर्म पाहिजे. फार लाजिरवाणी गोष्ट!! धर्म हा सोयिस्कर नसतोच आह्मी आपल्या सावधगिरीला बट्टा आणतो व भलत्याच मार्गाने जातो! विचार करा व निश्चयाने ठरवून मग काय करणें ते करा. जेथपर्यंत आपल्याच्याने

याबद्दल त्यांनी मोठ्या गोड शब्दांनी गोपाळरावांस उपदेश करून त्यांचे मन वळविण्याचा प्रयत्न केला आहे आनंदीबाई अमेरिकेंत असतां गोपाळरावांची त्यांस जीं पत्रें गेलीं आहेत त्यांपैकीं बहुतेक पत्रांत गोपाळरावांची कांहींना कांहींतरी कुरकुर आहेच कधीं हिंदुस्थानचा कंटाळा, तर कधीं हिंदूविषयीं व त्यांच्या कांहीं समजुतींविषयीं तिरस्कार, कधीं कांहीं विवक्षित लोकांच्या वर्तनाबद्दल संताप, तर कधीं खुद्द आनंदीबाईसंबधानेच गैरसमजामुळे केलेली टीका, असा प्रकार त्यांच्या पत्रांत असावयाचा ह्या पत्रांवरून गोपाळरावांच्या उच्छृंखल व चंचल स्वभावाची चांगलीच साक्ष पटते या सर्व पत्रांस आनंदीबाईंनीं जीं उत्तरें दिलीं आहेत तीं फारच सुंदर आहेत हीं पत्रें आनंदीबाईच्या मनाच्या प्रगल्भतेची व शांत आणि आर्द्र स्वभावाचीं स्मारकेंच आहेत, असें ह्मटलेंतरी चालेल त्यांतील कांहीं निवडक उतारे येथें देतों —

"माझ्या कर्तव्याकडे मी कधींहि दुर्लक्ष्य करणार नाहीं जर आपणास वाटलें तर हिंदुस्थानाशिवाय दुसऱ्या कोणत्याहि देशाचें हित करितां येईल, परंतु आपल्यासमोर उत्तम भरलेलें ताट सोडून देऊन आसपास भिक्षा मागायला कां जावें हें मला कळत नाहीं ·········· "परक्या राष्ट्रापेक्षा मी हिंदुस्थानांतच अधिक उपयोगी होण्याचा संभव आहे आपल्या स्त्रियांची चालरीत परक्यापेक्षा मला अधिक माहित आहे तसेंच त्यांच्या धर्माच्या अडचणीहि मला ठाऊक आहेत. त्यांची व माझी भाषा एकच आहे जेथें वैद्यशास्त्राचें ज्ञान होईल असें कॉलेज हिंदुस्त्रियांकरितां नसावेंच असा जर ईश्वरी नेमानेम असला, तर त्यांना निदान आरोग्यरक्षणाचीतरी माहिती शिकविण्याचा माझा निश्चय झाला आहे मी त्यांना जरूर वाटल्यास वेळ, पैसा खर्च करून, उघडउघड व खासगीहि व्याख्यानें देईन जर कोणाचा मला त्रास देण्याचा निश्चयच झाला असला, तर त्यांनीं तसें खुशाल करावें मी स्तुति किंवा निंदा यांची मुळींच परवा करित नाहीं माझें करणें पसंत पडत नाहीं म्हणून मला दिलगिरी वाटेल, तरी मी आपलें काम मध्येंच सोडून देणार नाहीं लोकांविषयीं जितक्या ह्मणून गोष्टी विरुद्ध ऐकेन तितकी माझी त्यांजबद्दल निष्ठा अधिक वाढत जाईल." (पृ० २६३)

"आपल्या गेल्या आठवड्यांतील पत्रानें बरीच काळजी उत्पन्न झाली होती परंतु ती सर्व ह्या पत्रानें दूर झाली. ज्याप्रमाणें भर दोनप्रहरीं उन्हांत धावतभागत आलेल्या प्रवाशास गर्द छाया पाहिली ह्मणजे आराम

होतो, त्याप्रमाणेंच आपल्या पत्ररूप छायेपासून जी थकली भागलेली प्रवासीण त्या मला होत आहे, व त्या छायेत झरा कोणता ह्मणाल, तर आपल्या अंतःकरणापासून निघालेला त्या पत्रांत येणारा मजकूर हाच आणि तोच माझें जीवित धारण करितो. आपल्या भेटीची मला अति उत्कट इच्छा झाली आहे, व आपणाविषयीं विचार नेहमी माझ्या मनांत इतके घोळत असतात कीं, आपण इतक्या दूर या प्रचंड सागराच्या पलीकडे आहां याचें देहभान मला मुळींच रहात नाहीं ! "(पृ० २५७).

"रीतीभातींत वगैरे जसे आपण हिंदु आहों, तसेच हिंदु राहून आपल्याला सुधारणा केली पाहिजे." हे जे आपण दोन शब्द लिहिले, ते फार चांगले व स्तुत्य आहेत परंतु कांहीं गोष्टींचा आपण तिरस्कार करितां असे मात्र ह्मणूं नका. त्यापासून आपली कोणतीहि सुधारणा होणें नाहीं याच द्वेषामुळे आपण जगाच्या बंधुत्वांतून उठलों आहों ! यानेंच आपली प्रीति व एकमेकांतील संबंध तुटला ! हा द्वेषच विस्तवाप्रमाणे राष्ट्रांचीं राष्ट्रे जाळून भस्म करितो ! ! दुसऱ्याचा द्वेष करून आपणास काय फायदा होणार ? जर आपण हिंदुस्थानांतील कांहीं गोष्टींचा द्वेष करित असलां तर मग मजबद्दलचा प्रश्नच नाहीं. हिंदु लोक जसे ईश्वराचीं लेकरें आहेत, तसेच फ्रेंच, आयरिश अथवा इंग्लिश हेहि आहेत. तेहि जर ईश्वराचे प्राणी आहेत, तर मग उगीच त्यांचाच द्वेष काय ह्मणून करावा ? त्याचा द्वेष केल्याने आपला कांहीं नफा होण्याचा संभव आहे काय ? याकरितां, ज्या द्वेषाने या मोठ्या घराण्यात तंटे उत्पन्न करून फाटाफूट केली, त्याचाच आपण द्वेष करू या. तो अति दुष्ट प्राणी आहे, तो लाखों मनुष्यांच्या मनांत थोडाबहुततरी असतोच आपण द्वेष केला, व करूनहि घेतला. हा स्पर्शजन्य रोग हिंदुस्थानांततर हल्ली फारच पसरला आहे पुरे, त्याचा कंटाळा आला. द्वेष करणे पुरे झाले ! कारण, त्यामुळे आपल्या पुढील क्रमाला व्यत्यय येतो (पृ० २६५).

"आपण जर खरे व इमानानें वागतों तर ईश्वर आपणास कधीं सोडणार नाहीं परंतु अरेरे ! ! आमचा भरंवसा किती थोडा व त्याच्या शक्तीचा व मोठेपणाचा आह्मी किती अव्हेर करितों ! आह्मांस आमच्या सोयीप्रमाणे धर्म पाहिजे फार लाजिरवाणी गोष्ट ! ! धर्म हा सोयिस्कर नसतोच आह्मी आपल्या सावधगिरीला बट्टा आणतो व भलत्याच मार्गाने जातो ! विचार करा व निश्चयाने ठरवून मग काय करणें ते करा. जेथपर्यंत आपल्याच्याने

करवेल तेथपर्यंत शोध करा, परंतु फाजील उशीर होईंपर्यंत मात्र वाट पाहूं नका अज्ञानी लोकांना धर्म खोटा व ढोंग आहे, असें खुशाल ह्मणूं द्या तसेंच ढोंगी लोक कांहींहि ह्मणोत, परंतु मला जें काय बरोबर वाटतें तेंच मी सांगणार. हिंदु असो, अगर मुसलमान असो, अगर ख्रिस्ती असो; जीवंत असो, अगर मेलेला असो, मोठ्या भव्य राजवाड्यांत असो, अथवा ल्हानशा झोंपडींत असो, ह्या गजबजलेल्या जगांत असो, किंवा एकांत अरण्यांत असो, परंतु ईश्वराचा मोठेपणा वर्णूं या आपण त्याची लेकरें आहों. मग आपल्या बांधवाच्यासंबंधानें असा भलताच ग्रह व द्वेष कशाकरतां? सत्यापुढें अशी डोळेझांक कां?" ( पृ० २७१ ).

"अलीकडे आपली समदृष्टि नाहीं हें पाहून मला दुःख होतें आपण ह्मणतां कीं, 'मला हिंदूंचा तिरस्कार वाटतो' आपला ग्रह त्यांच्याविषयीं फारच वाईट झाला व आपण आपलें मत देण्यासहि फार घाई करतां हें असें कां? मला खरोखर कांहींच कळत नाहीं मला कोणी शत्रु नाही, व मला वाटतें कधीं होणारहि नाहीं मी सर्व लोकांवर सारखी दया करतें ( मला जें वाटतें त्याच्याविरुद्ध मी कधीं वागत नाहीं मी जें काय बोलतें, तें माझे लक्ष्यात असतें ) तो हट्टवाद आहे व मला आवडत नाहीं त्या कोत्या समजुतीबद्दल मला दया वाटते तो अन्याय व अप्रामाणिकपणा, त्याचा मला तिरस्कार वाटतो . . सत्याचें काय पाहिजे तें करण्यास त्याला अधिकार आहे परंतु मला मात्र खऱ्याचें खरें व्हावें, हेंच आवडतें. ..." "खरें जें काय आहे तेंच सांगितल्याबद्दल मला आनंद वाटतो आणि सत्य व खरें याशिवाय दुसरें कांहीं बोलण्याची मला इच्छा होणार नाहीं अशी आशा आहे जर माझ्याविरुद्ध कांहींहि केलें असलें, तर मला त्याबद्दल माझ्या मनात कांहीं नाहीं" ....लोक त्यांना, वाटेल तर आपल्या शत्रूसारखें समजोत परंतु मी समजणार नाहीं " ( पृ० २७२ )

" ..... आपण होईल तितके करून इकडे येण्याचें करावें आतां फार दिवस दूर राहून निभाव लागणें कठीण!" आपणापाशीं एक पैसा नाही तर असें करूनये मजपाशीं दोन दागिने ठीक आहेत, ते मागितल्यास पाठवून देतें रुपये मागितल्यास येथें विकून रुपये पाठवितें दोन्हीं जिनसा मिळून आपल्या भाड्यापुरतें मिळेल यांत संशय नाहीं " ( पृ० २७८ )

वरील शेवटचें पत्र फार महत्वाचें असून आनंदीबाईचें चारित्र्य विशेष खुलविणारें आहे. शिकलेल्या स्त्रियांत नवऱ्यासंबधानें जिला इतकी कळकळ आहे, अशा स्त्रिया फारच थोड्या-किंबहुना बोटानें मोजण्याइतक्या-सांपडतील, असें कित्येकांचें मत आहे. परंतु विचार करून पहातां तें बऱ्याच अंशीं बरोबर आहे, असें ह्मणावें लागतें. आणि शिकलेल्या स्त्रियांतच असा प्रकार आहे असें नाहीं तर इतर चांगल्या स्त्रियांचीहि हीच स्थिति आहे. अशिक्षित स्त्रीस आपले दागिने काढून देण्याची वेळ आली तर लाजेकाजेस्तव ती मोठ्या नाखुषीनें (कदाचित् ही नाखुषी ती बाह्यात्कारी दिसू देणार नाहीं) स्वतः होऊन देण्यास तयार होईल, किंवा नवऱ्याच्या धाकानें अथवा जुलमानें भिऊन देण्यास तयार होईल, व शिकलेल्या स्त्रीवर जर असा प्रसंग आला तर ती स्पष्टपणें पण मोठ्या शिताफीनें आपल्या दागिन्यांचें रक्षण करून नवऱ्यास वाटेस लावील, एवढाच काय तो उभय वर्गांत फरक दिसून येईल; बाकी दोघांचीहि मनीषा पाहिली तर एकच. आतां यावरून असा एक प्रश्न उत्पन्न होण्यासारखा आहे कीं, वरच्यासारख्या प्रसंगीं शिक्षित आणि अशिक्षित स्त्रियांची मनोवृत्ती जर सारखीच असते, तर मग स्त्रियांस शिक्षण दिल्याचा काय उपयोग? सकृद्दर्शनी हा प्रश्न आपणास गोंधळून टाकतो. परंतु थोडा सूक्ष्म विचार केला तर त्याचें समाधानकारक उत्तर देतां येतें. मनुष्याच्या अंगांत उपजत गुण ह्मणून जे असतात, त्यांत स्वार्थदृष्टीचीहि गणना आहे. कोणी कितीहि विद्वान झाला, मोठा झाला, उदार झाला, तरी स्वार्थापासून तो अलिप्त आहे, असें कधींहि आढळून यावयाचें नाहीं. असें होणें मनुष्यस्वभावाच्या अगदीं विरुद्ध--अतएव बहुधा अशक्य आहे ह्मटलें तरी चालेल. सुशिक्षण, औदार्य, बंधुप्रेम, मातृप्रेम अथवा प्रणयिप्रेम ह्यांच्या साह्यानें मनुष्य स्वार्थास कमजास्त प्रमाणानें आळा घालूं शकतो; परंतु त्याचें अस्तित्व अजिबात नाहींसें करण्यास वरील साधनें असमर्थ आहेत, असाच अनुभव जगांत सर्वत्र ठिकाणीं आढळून येईल. अमुक एक मनुष्य स्वार्थत्यागी आहे असें जेव्हां कोणी ह्मणतो, तेव्हां त्याचा अर्थ इतकाच समजावयाचा कीं, त्यानें आपल्या स्वार्थदृष्टीस बराच किंवा पुष्कळसा आळा घातला आहे. स्वार्थापासून तो पूर्ण अलिप्त आहे, असें केव्हांहि आढळून येणार नाहीं. इतर सामान्य लोकांपेक्षां त्याचा स्वार्थ उदात्त प्रकारचा असेल व तो साधण्याचा प्रयत्न करीत असतां त्याच्याबरोबर इतर जनांचेंहि कल्याण होण्याचा संभव असेल परंतु त्याचेठायीं स्वार्थाचा पूर्ण अभाव कधींहि असूं शकणार नाहीं. स्वार्थपरायणतेमुळें मनुष्याच्या हातून अनेक पातकें घडतात, असत्य [illegible]

गणना नीच मनोवृत्तींत केली आहे तथापि ती मनुष्याचे ठायी स्वभावत च प्रवल असल्यामुळें तिला आळा घालण्याचें काम फार कठिण असतें तें साधण्यास मनुष्याचें मन चांगलें सुसंस्कृत बनलेलें असावें लागतें नाहींतर त्या मनोवृत्तीपुढे त्याचें कांहीं चालावयाचें नाहीं मन सुसंस्कृत बनविण्यास सुशिक्षणावाचून चांगलें असें अन्य साधन नाहीं मात्र त्या साधनाचा नीट उपयोग करता आला पाहिजे, नाहींतर तेच अनर्थास कारण होतें त्या साधनाचा उपयोग करणारी स्त्री असो वा पुरुष असो, दोघावरहि त्याचा परिणाम सारखाच व्हावयाचा आणि तसा झालेला आपण नेहमीं पहातोंहि परंतु या बाबतींत पुरुषापेक्षा स्त्रीवर आपला फार कटाक्ष असतो कदाचित् असें करणें समाजहिताच्या दृष्टीने बरोबरहि असेल, परंतु नुसता कटाक्ष ठेवून काय उपयोग? एखाद्या वस्तूचा आपणास नीट उपयोग करता आला नाहीं म्हणून ती वस्तूच वाईट, असा ग्रह करून घेणें हें मूर्खपणाचें लक्षण नव्हे काय? आमच्या देशात स्त्री व पुरुष या दोघासहि हल्ली जें एकतर्फी पाश्चात्य शिक्षण मिळते, तें त्याची मनें सुसंस्कृत करण्यास फारच थोडें उपयोगी पडतें त्यातून ज्याना अशा प्रकारचें शिक्षण अर्धवटच मिळते त्याचीं मने सुसंस्कृत होण्याऐवजीं बेताल मात्र होऊ लागतात. जोंपर्यंत अशी स्थिति आहे, तोंपर्यंत वर सांगितल्याप्रमाणें शिक्षित व अशिक्षित स्त्रीच्या स्वार्थपर मनोवृत्तीत फारसा फरक पडला नाहीं तर त्यात आश्चर्य कसलें? पुरुषामध्येंहि हाच प्रकार आढळून येईल एकाच कारणामुळे जो दोष स्त्री व पुरुष या उभयतामध्यें बहुतेक सारख्याच प्रमाणानें वास्तव्य करीत आहे, त्याबद्दल एकट्या स्त्रीवर्गावरच कटाक्ष का ठेवावा हे आह्माला समजत नाहीं सुधारणेचा खरा मार्ग म्हटला म्हणजे स्त्रीशिक्षणाच्या नावानें अनुकूल व प्रतिकूल वाचालपचविशी न करिता हल्लीच्या शिक्षणपद्धतींत असलेल्या उणीवा दूर करून स्त्रीपुरुषाचीं मने सुसंस्कृत होऊन त्याची सन्मार्गाकडे प्रवृत्ति होईल अशा तऱ्हेचें वळण त्यास लावण्याचा प्रयत्न करणें हाच होय आणि जों जों हा प्रयत्न यशस्वी होईल तों तों स्त्रीपुरुषाची स्वार्थपरायणता कमीकमी होत जाऊन तीं आपली उन्नति करून घेतील, यात शंका नाहीं. सारांश, शिकलेल्या स्त्रियाच्या कांहीं प्रमादाकडे लक्ष्य देऊन शिक्षित स्त्रीपेक्षा अशिक्षित स्त्री बरी, असें म्हणण्यात फारसा अर्थ नाहीं निर्दोषपद्धतीनें जर स्त्रीला शिक्षण मिळेल तर अशिक्षित स्त्रीपेक्षा ती खरोखरच फार मोठ्या योग्यतेची व सन्माननीय अशी होईल, यात शंका नाहीं चांगल्या व वाईट ह्या

दोन्ही मनोवृत्ती पुरुषाप्रमाणे स्त्रियांचेहि ठायीं मुग्धावस्थेंत—परंतु जागृत असतात. आणि त्यांनां ज्या प्रकारचें शिक्षण व वळण दिलें जातें त्यास अनुसरूनच वरील मनोवृत्तींचा विकास होत जातो आरंभापासूनच जर वळण चांगलें लागलेलें असलें व त्यांत जर उत्तम प्रकारच्या शिक्षणाची भर पडली, तर चांगल्या मनोवृत्तींचा उदय कां होणार नाहीं? चांगल्या-सात्विक-मनोवृत्तींचा मनावर जों जों जास्त पगडा बसतो, तों तों नीच मनोवृत्ती अस्तास जाऊं लागतात व कालांतरानें त्या अजिबात जरी नाहीं तरी बहुतेक अंशीं नाहींशा होतात. सत्कृतींची वृद्धी व दुष्कृतींचा क्षय होऊं लागला ह्मणजे दुष्ट मनोवृत्तींचा जो कांहीं थोडा अंश राहिलेला असतो त्याचा मनावर अमल चालेनासा होतो. आणि असें झालें ह्मणजे मनुष्य उन्नतिपथाच्या जवळ आला असें समजावें. असो

आनंदीबाईनीं गोपाळरावांस दागिने अथवा रुपये पाठवून देतें ह्मणून जें लिहिलें आहे तें केवळ खुषीनेंच होय. गोपाळरावांनीं त्यांना कसलीहि मागणी केली नव्हती यावरून पतीविषयीं स्त्रीचें कर्तव्य काय आहे हें त्यास पूर्णपणे अवगत होते, असें ह्मणण्यास हरकत नाहीं आनंदीबाईसारख्या विद्वान व बहुगुणी स्त्रीनें गोपाळरावांसारख्या विक्षिप्त नवऱ्यासबधानें इतकी काळजी दाखवावी हें—यांत कर्तव्यापलीकडे जरी तिनें जास्त कांहीं केलें नाहीं तरीहि—तत्कालीन परिस्थितीचा विचार करितां फारच अभिनंदनीय आहे. ह्या त्यांच्या एकाच उदाहरणावरून, सुशिक्षणाचा स्त्रियांवर अनिष्ट परिणाम न घडतां उलट उत्तम परिणाम घडतो, हें सिद्ध होण्यासारखें आहे.

# जगाविषयीं मतभेद.

[पौर्वात्य विचार]

नसे सार संसारिं मिथ्या पसारा,
सुखानंदशांती नसे येथ थारा,
सदा क्लेश दुःखें, मनीं घोर चिंता,
सुखाचा नसे लेश, व्याधी अनंता १

जगीं जें दिसे तूजला सर्व कांही,
नसे सत्य तें, भास हा मात्र पाहीं,
सुखें स्वप्नि तू राजवाड्यात राहें,
परी होइ जागा, पहा झोंपडी हे ! २

न काका, न मामा, सुता, पुत्र, मित्र,
प्रसंगीं न कामीं पडे तें कलत्र,
झणीं तोडुनी टाक संसारपाशा,
अरे बापरे व्यर्थ तूझी सुखाशा ! ३

इथें कामक्रोधादि शत्रू अनंत,
जयां पाहुनी भीति घे ज्ञानवंत,
परी तूज येथें बहू सौख्य वाटे,
खरें तें नसे, जाण बा सर्व खोटें ! ४

कधीं ना तुवां ईश तो चिंतियेला,
कधीं ना तुवां प्रार्थियेलें तयाला,
असारे कसा मत्त तू जाहलास ?
उगा शीणवीलें तुवां माउलीस ! ५

नकोरे नको घालवूं जन्म वाया,
झणीं लाग तू पुण्यकर्मे कराया,
जयानें तुला स्वर्गप्राप्ती घडेल,
खरें सौख्य तेथें तुलारे मिळेल. ६

[पाश्चात्य विचार.]

नको मानवा ! तूं करूं खेद व्यर्थ,
पहा सृष्टि ही सर्व तूझ्या सुखार्थ
असे निर्मियेली प्रभूनें गड्या ! ही
नसे जाण तू यांत संदेह कांहीं १

रवी उष्णता देतसे त्वत् शरीरा,
शशी वर्षतो कीं सुधेच्याच धारा,
निधी, अद्रि, रानें, लता, वृक्ष, नाले,
तुझ्यासाठिं हें विश्व निर्माण झालें २

सुखाचीं अशीं साधनें तीं अनेकां,
दयाळू प्रभूनें दिलीं तूज एकां
जरी यावरी तूज ना सूख लाहे,
तरी दोष, तो सर्व तूझाच आहे ! ३

मिळो स्वर्ग मेल्यावरी तू म्हणून
बहू त्रास जीवास घेशी करून,
अशानें कसा स्वर्ग तो प्राप्त होई ?
अरे कल्पना सर्व खोटी असे ही ! ४

जरी लक्ष्य लावून तू पाहशील,
तरी स्वर्ग येथेंच तूतें दिसेल,
सुकांता तुझी ती असे प्रेममूर्ति,
तुझे पुत्र मजूरचें हर्षवीती ५

जशी पाहसी तू दिसे सृष्टि तैशी,
महा भासुरा सौख्यराशीहि तैशी !
दिसे राजवाडा तसाही तुरुंग,
तुला पाहिजे त्यासवें होइ दंग ६

पौर्वात्यपाश्चात्य विचारसार, म्यां ठेविलें आज तुम्हां समोर;
जें ग्राह्य स्वीकार करा तयाचा, घेई निरोप प्रिय वाचकाचा !

# अंक ५ वा.

## प्रवेश १ ला.

[ स्थल—द्रुपद राजाचें शयनमंदिर ]

**द्रुपद**—( स्वगत ) कुरूंच्याकडून युद्धास उभे रहाण्याविषयी काल जेव्हा दर्भ आणि ईषिका घेऊन आव्हान आले, तेव्हाच माझ्या डोक्यात आले की, सत्यजिताला शिकविण्याकरिता श्रेष्ठ भीष्माचार्यांकडून पत्र आले होते तेव्हा त्याना उत्तर पाठविताना मी त्यात द्रोणाचार्याला जे लावून लिहिले होते त्याचाच परिणाम हा हा ब्राह्मण कुरुनंदनाना धनुर्विद्या शिकवायला जो राहिला तो माझ्याकडून त्याचा अवमान झाल्यावर त्याने प्रतिज्ञा केल्याप्रमाणें माझ्यावर सूड उगविण्याकरिता तर नसेल ! नित्याप्रमाणें झोंप येईल ह्मणून निजलो, पण माझ्या डोळ्यापुढे एकसारखी ती द्रोणाचार्यांची मूर्ति दिसू लागली आणि 'विश्वासघात, वचनभंग आणि ब्राह्मणाचा-आपल्या गुरुबंधूचा अवमान आणि मानभंग' हे शब्द माझ्या कानाशी कुणी उच्चारित आहे आणि नेत्रापुढे द्रोणाचार्यांच्या कुटुंबाने पाठविलेले ते दर्भ आणि त्या ईषिका उभ्या आहेत असा भास होऊ लागला ह्मणून मी उठून बसलो. पण काय? जागा झालों तरीदेखील त्या त्याच गोष्टी, ते दर्भ आणि त्या ईषिका दिसू लागतात; आणि त्याच त्याच शब्दाचे प्रतिध्वनि कानाशी घुमू लागतात माझ्या दरबारी पूर्वी तो आला असता माझ्याशी त्याने फार लगट केली ह्मणून मी त्याला ओळखहि दिली नाहीं, आणि त्याला बोलू नये ते बोलून त्याचा उपमर्द केला ह्मणूनतर ही ब्रह्महत्या—हा मूर्तिमंत ब्राह्मण—माझ्या पाठीस लागला नसेल !

( इतक्यात द्रुपदपत्नी ऑ-ऑ-ऑ करित भिऊन जागी होते. )

**द्रुपद**—का, अशी ओरडलीस का! भ्यालीस कीं काय ? काहीं स्वप्नबिप्नतर नाही पडले ? घामाने किती डबडबली आहेस ही ?

**राणी**—(द्रुपदास घट्ट मिठी मारून) अगबाई,आपण युद्धाला गेला आहात, अन् आपल्याला शत्रूंनी धरून बांधून चालविले आहे,हे पहाताच मी अगदी भयाकुल होऊन किंकाळी फोडणार—पण ती बाहेरच पडेना—आणि इतक्यात मला जाग करायच—

**द्रुपद**—( स्वगत ) ह्या पहाटच्या वेळचे हे स्वप्न काहींतरी ठोकताळ्याचेंतर नसेल ! कुणी सांगावे ? मला मोठी भीति वाटते ! पण हिला ही भीति दाखवून नाही उपयोगी! (उघड) वेडीकुठली ! अग, अशीं स्वप्ने खरीं होऊं लागलीं तर—

राणी—तें कांहीं असो, आज मी काहीं राजमहाल सोडून बाहेर नाहीं जाऊ द्यायची! मला धडकी भरली आहे बाई अगदीं जशी!

द्रुपद—छत्, वेडी नाहींतर! वीरस्त्रियानींच अशी भीति घेतली, तर मग भटभिक्षुकाच्या बायकानीं काय करावें! (इतक्यात नौवत होते) ही पाहिलीस ठरल्या-प्रमाणे कुच करण्याची नौवत झाली, ही ऐकून खरे वीर महालात रहात नसतात—

राणी—(द्रुपदाच्या वस्त्राचा पदर धरून गयावया करून) एवढ दिखील ऐकायच नाहीं माझ?

द्रुपद—मीच राहिलों तर सत्यजिततरी जाईल असे तुला वाटतें? मग राजवाड्यातल्या राजवाड्यातच शत्रूनी येऊन आह्मा सर्वांना खुशाल कैद करून न्यावे! (दुसरी नौवत होते) तूच अशी घाबरलीस तर सत्यजिताच्या बायकोनें किती घाबरावे? तिला तू धीर दिला पाहिजेस-ती तूच अशी घाबरतेस, तेव्हा या वेडाला काय ह्मणावे? धीर धर, धीर धर, तू वीरकन्या, वीरपत्नी आणि वीरमाता आहेस (तिसऱ्यादा नौवत होते) ही ऐकलीस नौवत-ही तिसऱ्यादा झडते आहे या वेळेला मी आपल्या सेनेला जाऊन मिळायला पाहिजे होते, आता निदान हिचा प्रतिध्वनि घुमत आहे तोच मला या महालाच्या बाहेरतरी पडलेंच पाहिजे

राणी—इकडून त्या ब्राह्मणाचा अवमान करायचा झाला तेव्हादिखील मला अशींच अभद्र स्वप्न पडली होतीं!

द्रुपद—पण त्याचा कांहीं दाखला आला का? मग का भीति? जशी तीं, तशीच हीं (स्वगत) शस्त्रागाराकडे जाऊन सज्ज होऊन एकदम बाहेर पडावे ही मला आपल्या पूर्वीच्या स्वप्नाची आठवणहि याच वेळेला देते आहे,याला काय करावें! (जातो) मी इथून निघून जात आहें, पण हिची पूर्वीची तीं अशुभ स्वप्नें, हे आजचे भयकर स्वप्न, आणि रात्रभर मला होणारे हे भास, आणि तसेच युद्धास पाचारण करण्याकरिता कुरुकुमाराकडून आलेले ते दर्भ, त्या ईपिका आणि द्रोणस्त्रीचा तो निरोप, हीं सर्व मला वाटते माझी पाठ धरून माझ्यावरोवर येत आहेत, आणि हींच माझ्या अत करणात विलक्षण भीति उत्पन्न करून माझे पाय जागचे जागी गाडून टाकित आहेत! तरीपण माझ्यासारख्या क्षत्रियकुलात उत्पन्न होणाराला ही भीति उपयोगी नाहीं, या दुदुभीच्या निनादात, शस्त्राच्या खणखणाटात, आणि धनुष्याच्या टणत्कारात, तिला मी आता पार गाडून टाकतो! मला वाटतें, पुरुष स्त्रीच्या मदिरात असले ह्मणजे त्याच्यात मार्दवपणा घुसतो आणि रणदुदुभींचा आवाज त्याच्या कानात भरला ह्मणजे वीर्यानें त्याच्या छातीत

विलक्षण दार्ढ्य येऊन रणमदाचा त्याच्या अगात सचार होतो द्रोणाचार्याला ह्मणावें पक्कें लक्ष्यात ठेव, कीं, इथे शस्त्रधारी क्षत्रियाशीं गाठ आहे दर्भधारी ब्राह्मणाशीं नाहीं! क्षत्रियाच्या शस्त्रातून झडणाऱ्या प्रखर अग्नीपुढें ब्राह्मणाचा कोपाग्नि कितपत टिकाव धरणार? मी जातों आणि एका क्षणात तो जाळून खाक करून टाकतो

[ जातो

---

## प्रवेश २ रा.

[ स्थल—अहिच्छत्र नगरीतील देवालयापुढील दीपमाळ.

वल्लव आणि लड्डुक उभे आहेत असा प्रवेश. ]

**वल्लव**—लड्डुका, चल, पळ वावा इथून आता. इथे उभे रहाण्याची सोय नाहीं! दुर्योधन आणि कर्ण यानी आज प्रचड युद्ध केले खरे, पण त्याना द्रुपदाच्या सैन्यानें चारी वाजूनी घेरुन टाकल्याचें दिसतें हे पहा नागरिकलोकानी हातात मुसळे, सोटे आणि काठ्या घेऊन पळणाऱ्या कौरवसेनेला पिटितपिटित नटापर्यंत नेऊन खेंचलें तो कर्ण मात्र एकटाच तिथे उभा राहून एकसारखा शत्रूवर वाणाचा वर्षाव करित आहे. अरे अरे, त्यालाहि शत्रूकडील एका बाल-वीरानें वाणानी जर्जर करुन घेरून टाकून सभोवतीं सेनेचा गराडा दिला—

**लड्डुक**—ते पहा दुर्योधन आणि दु शासन धनुष्ये खाद्यावर टाकून, हातात गदा घेऊन कर्णास सोडविण्याकरिता परत फिरले, आणि तो शकुनि आणि विकर्ण नगराचे वाहेर धावत जाऊ लागले आहेत शावास! शावास! मला वाटतें, आता रणागणाचें वारे फिरलें ते नागरिक लोकहि पहा कसे सैरावैरा पळू लागले

**वल्लव**—पण इकडे वघ काय प्रकार ओढवला! त्या कर्णाला त्या वालवीरानें वाणानी विद्ध करून, त्याचे धनुष्य तोडून, त्याला आपल्या रथालाच वाधून टाकिला! आता मात्र कठीण प्रसग आल्याचे दिसते. ते पहा नागरिकलोक पुन्हा परतले दुर्योधन, दु शासन कर्णाला वद्ध केल्याचे पाहून त्या वालवीराकडे रोख धरून जात आहेत अरेरे! त्या वालवीरानें ह्या दोघानाहि आपल्या वाणानी विद्ध केलें तेपहा नागरिकलोक त्याच्यावर तुटून पडत आहेत, तर चल वावा इथून आपल्याला आता इथें रहाणे सुरक्षित नाहीं या नागरिकलोकातच जर हलकेच जाऊन आपण घुसलो तरच आपला निभाव लागेल, एरवीं नाहीं.

(पड्यात "हे धर्मा, हे भीमार्जुन हो! धावा धावा, या द्रुपदसेनेपुढे आमचे आता प्राण वाचत नाहीत–" असा शब्द होतो ) अरे हा कुणाचा रथ आला पहा 'द्रुपदमहाराजकी जय!' म्हणून हे नागरिक लोक ओरडत आहेत, तेव्हा हा राजा द्रुपदचतर नसेल! हे पहा याने दुर्योधनदु शासनावर बाण टाकले

लड्डुक—अरे वल्लवा, इकडे पहा; हा भीमसेन हातात गदा घेऊन शकुनि आणि विकर्ण यासह इकडेच धावत येत आहे तो पाहिलास, अर्जुनाचा रथ कसा घडघड शब्द करित राजवाड्याकडून इकडेच येत आहे! मला वाटते, नकुल सहदेव त्याचे चक्ररक्षक झाले आहेत, आणि तो आचार्यपुत्र अश्वत्थामा द्रुपदाला दर्भईपिकाची ओळख देऊन मोठमोठ्याने गर्जून युद्धास पाचारण करित आहे.

वल्लव—होय, नकुलसहदेवच ते आणि ही आचार्यपुत्राचीच गर्जना पण, इकडे पहा काय प्रकार ओढवला तो! त्या द्रुपदराजाने त्या दुर्योधनदु शासनाला कैद करून आपल्या रथावर बांधलें, आणि तो विजयघोष करित परत फिरला

लड्डुक—हा पहा अर्जुन अश्वत्थाम्यासह तीं वीरकंकणे हरण करून सिंहनाद करित द्रुपदराजाला युद्धास पाचारण करित आहे

वल्लव—तो बघ, द्रुपदानेंहि आपला रथ फिरविला आता मात्र दोघाचें भयंकर युद्ध होईलसा रंग दिसतो.

लड्डुक—तिकडे बघ, भीमाने त्या बालवीराच्या रथाचे चक्रावर गदाप्रहार करून त्याचें अगदीं चूर्ण केलें तें बघ, त्याने कर्णास सोडविलें, कर्ण आपलें धनुष्य घेऊन शत्रूच्या सेनेवर बाण टाकून भीमास पुढं घुसण्यास मार्ग करून देत आहे

वल्लव—अरे, पण इकडे बघ काय चमत्कार झाला तो! अर्जुनाला द्रुपदराजानें बाणांनीं आच्छादित करून गाढ अंधकार पाडला ऐक तो काय म्हणतो तें —

द्रुपद—( पड्यातून ) हे कुरुनंदनहो! हे पहा तुमच्यांपैकी दुर्योधनादिक [illegible] राजपुत्रांना कैद करून मी आपल्या रथावर बांधून घातलें आहे! [illegible] मिळविण्याची आशा सोडा, आणि द्रोणाच्या ठिकाणीं [illegible] आपली [illegible] टेकून कुशाग्र्यानें प्रणाम करून शरण या, [illegible], नाहीं तुम्हाला पुन्हा हस्तिनापुर दिसणारहि नाहीं! तुम्ही [illegible] आहात [illegible] तुम्हीं मला दंडवत घालावेत हेंच उचित [illegible] दिसतें, मला मरण आल्यास मी ती पुरी करीन.

अरे अर्जुना ! माझ्या बाणवृष्टीनें तुलाहि या अश्वपुत्रासारखेच अंध केलें आहे ! तर चल, ते धनुष्य ठेव आणि मला शरण ये, म्हणजे यातून कसें निभावून जावयाचें तें तुला आताचे आताच शिकवितों चल, खाली उतर, उगीच जयाशा धरून या गुरुची अवज्ञा करून व्यर्थ महादोषास पात्र होऊ नकोस !

**अर्जुन**—हे गुरुवर्य! माझ्या चर्मचक्षूना जरी आपण दिसत नाहीं तरी आपल्या शब्दावरून माझ्या बाणाच्या अग्राना आपण खास दिसाल! मी या बाणानीच आपल्यास प्रणाम करितो ( बाणाचा टणत्कार ऐकू येतो )

**द्रुपद**—(स्वगत) शाबास ! मी जर स्थान बदललें नसते तर हे बाण माझ्या पायास विद्ध करिते ! याच्यात कांहीं पाणी दिसते खरे ! शत्रु असावा तर असा धनुर्धर असावा ! ( उघड ) ठीक आहे, अर्जुना, सभाळ !

( ज्याच्यात रक्तानें रक्तवर्णें झालीं आहेत असा भीम गदा घेऊन येतो. )

**भीम**—अर्जुना, आलों आलो, भिऊ नकोस

**वल्लव**—अरे हा कोण ! आग्यावेताळ का रणवेताळ हा ? लड्डुका, हा बघ किती भयकर आणि क्रुद्ध दिसत आहे ! याला विलक्षण रणमद चढला आहे. याचे डोळे आरक्त होऊन फिरून गेले आहेत !

**भीम**—अर्जुना, थाब. मी या गदेच्या प्रहाराने द्रुपदाचे अश्व ठार करितो.

**अर्जुन**—( पडद्यातून ) भीमा, तेवढे साहस करु नकोस ते काम मी बाणानेच करितों मी द्रुपदाच्या धनुष्याची मौर्वी बाणानें तोडून टाकिली आहे, आणि त्याचा ध्वजहि पृथ्वीवर पाडून त्याच्या सारथ्याला बाणानी वेधून टाकलें आहे.

**भीम**—छे , तर मग त्याच्या अश्वाना ठार करायला हीच वेळ उत्तम आहे.

[ वेगाने धावत जातो.

**अर्जुन**—( पडद्याबाहेर येऊन रथाखाली उतरून हातीं शस्त्र घेऊन ) सूता ! माझा रथ इथेच उभा कर मी द्रुपदाला पकडून इथेंच घेऊन येतो.

**नकुल**—रणात असें एकाकी घुसणें चागले नव्हे, थाब मीहि आलों.

**सहदेव**—आणि मीहि पण येतों.

**अर्जुन**—तू येऊ नकोस तू रथावरच रहा फीर, मागे फीर या वेळी रथावर कुणीतरी पाहिजेच ( अर्जुन व नकुल द्रुपदावर खड्गें घेऊन धावून जातात )

**वल्लव**—लड्डुका, लड्डुका! ते पहा, भीमसेनाने द्रुपदाच्या अश्वाना ठार केलें आणि इकडे अर्जुननकुलहि जाऊन पोंचले तिथें

अर्जुन—(द्रुपदाचे रथावर चढून द्रुपदास पकडतो द्रुपद शस्त्र उचलतो तोंच नकुल त्याचा हात धरतो )गुरुवर्य ! ही आपल्यास गुरुदक्षिणा, हिचा स्वीकार करावा, आणि हे एवढें शस्त्र आपल्या शिष्यास पारितोषिक ह्मणून द्यावें ! ( शस्त्र काढून घेतो नकुल द्रुपदाचे हात बांधू लागतो ) छे छे नकुला, ह्याचे कर बद्ध करणें आपल्याला युक्त नव्हे हे आपल्या गुरूच्या ठिकाणी आहेत आचार्यांच्या समीप आपण जाऊन पोंचलों ह्मणजे मात्र याचे हस्त त्यांच्या आज्ञेप्रमाणें आपल्यास बद्ध केले पाहिजेत दुर्योधनास आणि दु शासनास यानीं आपल्या रथात बांधले आहे वाटते त्यांना तेवढे मुक्त कर ह्मणजे झालें ( नकुल त्यांस मुक्त करितो ) गुरुवर्य! आता आमच्या आचार्यांच्या आणि आपल्या गुरुवधूच्या भेटीस चलावें, इतकीच आपल्यास या शिष्याची नम्र विनति आहे

( इतक्यात अश्वत्थामा प्रवेश करितो. )

अश्वत्थामा—अर्जुना, तुह्मीं कुणाला बद्ध केलेंत ? कुणाचा रथ हा ? आजेकरिता चुंबक शराचा प्रयोग करून हीं चारी वीरकंकणें प्राप्त करुन घेऊन मी एकसारखा द्रुपदराजाला युद्धार्थ पाचारण करित आहें, पण त्याच्याकडून अद्यापपर्यंत मला प्रत्युत्तर नाही !

अर्जुन—अरे, द्रुपदराजे ते हेच !

अश्वत्थामा—तर त्यांना तू बद्ध कसें नाहीं केलेंस ? बद्ध करून आणण्याबद्दल आचार्यांनी आज्ञा आहे ना? अथवा बद्ध नाहीं केलेंस तेच बरें आहे त्याचा हात [illegible] त्यांना रथाखालीं उतर या त्याच्याशीं युद्ध करण्याची माझी इच्छा आहे [illegible] द्रुपदराजा या दर्भावर ब्राह्मणाच्या पुत्रानें हीं तुमचीं वीरकंकणें काढून [illegible], आतातरी युद्ध करायचा मान ब्राह्मणाला याल काय ? देणार [illegible] उभे रहा माझ्या पित्यासारखे आचार्य तुमच्या राज[illegible] आणि पत्रावळी लावित लोळत पडले आहेत ह्मणून लिहून पाठवून [illegible] जो मोठा अपमान केला आहे, त्याबद्दल सूड उगविण्या[illegible] निश्चिंत नाहेत ! तुह्मी द्रुपद आहात हे ऐकिल्याबरोबर क्रोधानें [illegible] मनास [illegible] गोडलें आहे आणि आता तुह्माला [illegible] माझा संताप शमेल, एरवीं शमणार नाही ! [illegible] इच्छा असली तर धनुर्युद्ध करायाला सज्ज व्हा, [illegible] तर [illegible] माझें [illegible] तयार आहे, अथवा [illegible] सिद्ध असेल, [illegible] करावें

अवसान असेल तर हे पहा माझे बाहू माझ्या पित्याचा उपमर्द आणि अधिक्षेप करणाराशीं झुजायला विलक्षण स्फुरण पावत आहेत! अर्जुना बघतोस काय? सोड त्यांचा हात, आपल्या हातांत कशाला धरला आहेस?

**अर्जुन**—( अभिमानानें व विषादानें द्रुपद उत्तर देत नाहींसें पाहून ) आचार्यपुत्रा! जित मनुष्याला असें लावून बोलण्यांत अर्थ काय?

**अश्वत्थामा**—पण मी त्याना अजून जित असें समजत नाहीं

**द्रुपद**—एकदा पराजित झाल्यावर अशा रीतीनें मुक्त करून घेऊन तुझ्याशीं युद्ध करण्याची माझी इच्छा नाहीं

**अश्वत्थामा**—असें असेल तर हें पहा मी आपलें शस्त्र कोशबद्ध केलें अर्जुना, चल याना घेऊन आतां आपण तातांच्या सन्निध जाऊ अथवा मी पुढे होतों, तुह्मी माझे मागोमाग या. [ जातो.

**अर्जुन**—ठीक आहे, चला, आह्मीहि मागोमाग आलोंच!

( भीम रथ ओढू लागतो )

**अर्जुन**—भीमसेना, अरे, रथ ओढून नेण्याचें प्रयोजन नाहीं; यानाच धरून नेऊन आपल्याच रथावर घालू ह्मणजे झालें. शक्तीचा व्यर्थ व्यय करण्यात अर्थ काय?

**भीम**—तर मग यांना उचलून घेऊ? कारण हे आपल्याला आचार्यांच्या ठिकाणी आहेत.

**द्रुपद**—इतकी तसदी नको हा मीच येतों तुमच्याबरोबर चला.

**दुर्योधन**—आता मी आणि दु शासन सैन्य घेऊन जातों आणि ह्या सगळ्या अहिच्छत्र नगरीचा विध्वस करून टाकतों

**अर्जुन**—छे छे, असें करणे उचित होणार नाहीं. कारण राजाला जिंकल्या-नतर प्रजाजनाना कोणत्याहि प्रकारे त्रास अथवा पीडा देणें अत्यत निंद्य आणि अश्लाघ्य आहे. शिवाय आता हे सर्व राज्य, ही राज्यलक्ष्मी आणि हे सारे प्रजाजन द्रोणाचार्यांचे झाले आहेत. तेव्हा आता आपण अशी नुसती इच्छा धरली, तरीदेखील दोषी होऊ!

(इतक्यात कर्ण द्रुपदपुत्र सत्यजिताला कैद करून घेऊन येतो)

**द्रुपद**—(स्वगत)अरे, यानी माझ्या पुत्रालाहि कैद करून आणिलें! आतां काय? मी पूर्ण गतवैभव आणि आशाहीन झालों!

**कर्ण**—( अर्जुनास ) हा द्रुपदपुत्र सत्यजित हा फार रणशूर आहे!

**सत्यजित**—हो, मी तुला आपल्या रथावर तुझे हात घट्ट केल्याशिवाय घातला, त्याचे हे उपकार फेडलेस वाटतें!

**अर्जुन**—खऱ्या वीराला हें अनुचितच होय

**कर्ण**—तर मग मीं काय याच्या कैदत रहावें? बरें, मी पदाती असता या रथ्यानी मला एकाकी पाहून माझ्याशीं युद्ध करावे, आणि मी धनुष्यविहीन झालों असता मला कैद करावे, हेंतरी याला उचित होतें काय?

**अर्जुन**—तर मग दोन्ही बाजूनेंहि हे जशास तसेंच झालें आहे! चला तर, आपण याना घेऊन आचार्यांकडे जाऊ दुर्योधना, नागरिकाना आश्वासन देऊन अमात्याना आचार्य नगराबाहेर आहेत तेथें घेऊन ये [ सर्व जातात

**वल्लव**—लड्डुका, हीं पाहिलीस इथे किती एकावर एक प्रेतें पडलीं आहेत! मला वाटतें, हे इकडे राजमार्गातून रक्ताच्या नद्याचे चाललेले प्रवाह जणू काय समुद्राचीच वाट विचारताहेत, आणि त्यातून वहात जाणारीं हीं मुडकीं जणू काय त्याना त्या समुद्राचीच वाट दाखवित चाललीं आहेत!

**लड्डुक**—मला वाटतें, की डाळ-वाग्याचें पातेलें साडून त्यातल्या ह्या फोडी वहात चालल्या आहेत!

**वल्लव**—वा रे वा! युद्धाच्या ठिकाणी येऊन चुलीपुढल्या गोष्टी सागणारा रणशूर-नव्हे सयपाकशूर-तुझ्यासारखा तूच! अरे, अर्जुन, भीम आणि कर्ण यानी द्रुपदराजाला आणि त्याच्या मुलाला कैद करुन आचार्यांकडे चालविलें आहे, आपणहि या प्रेतापैकीं एखादें हातात शस्त्र असलेलें प्रेत उचलून घेऊन जाऊ आणि सागू की, आपण युद्धात याला ठार केलें ह्मणून!

**लड्डुक**—एखाद्या जिवत मनुष्याला धरुन नेलेलें पुरवेल, पण मेलेल्या मनुष्याला नेणें फार अवजड कारण मेल्यावर तोच मनुष्य दसपट जड होतो.

**वल्लव**—लड्डुका, तू ह्मणतोस ते खरे आहे; पण मेलेल्या मनुष्याला उचलून नेत असता तो आपल्यावर तरवारीचा हात उचलील ही भीति नसते, तोच जिवत मनुष्य आपल्यावर केव्हा वार करील आणि केव्हा नाहीं ह्याचा काहीं नेम नाहीं सागता येणार!

**लड्डुक**—बरें, पण तो मेलेला मनुष्य एकदम भूत अथवा समंध होऊन आपल्या खाद्यावरच्या खाद्यावर हलकेच उठून बसला ह्मणजे मग कसें होईल?

वल्लव—अरे हो, तेंहि खरेंच ! त्यापेक्षा जीवत मनुष्यच पुरवेल बोआ ! तर मग या विव्हळत पडलेल्या मनुष्यापैकीं एखादा नि:शस्त्र मनुष्यच पहा. ( विव्हळत पडलेल्या एकास ) अरे ए, तुझें नाव काय ?

विव्हळणारा —( खोल स्वराने ) माझें नाव ? मी ध्रुपद

वल्लव—(एकीकडे) अरे, हा द्रुपदाच्या राजघराण्यातीलच दिसतो आहे ! तर यालाच उचल् आपण, चल (उघड) अरे ए ! तुला आह्मी आमच्या खांद्यावरून उचलून नेऊन औषधपाणी देऊन बरा करितो तुला जगण्याची इच्छा असली तर मुकाट्याने आमच्या खांद्यावर उगीच पडला रहा, समजलास? (एकीकडे लड्डुकास) बरें पण लड्डुका, आपल्याला साजेल अशी हीं वस्त्रे रक्ताने लाल करून घेतलीं पाहिजेत. त्याशिवाय आपण याच्याशीं युद्ध केल्याचे खरेहि वाटणार नाहीं कुणाला ( वस्त्रावर रक्त शिंपडून घेतो व हात व इतर शरीर रक्ताने माखून द्रुपदाला ह्मणतो ) ह चल, ये रे

विव्हळणारा—चला, न्या बावानो, तुमचे माझ्यावर शतश उपकार होतील !

वल्लव—लड्डुका, याला माझ्या पाठुंगळीवर देऊन तू ती पडलेली तरवार घे आणि माझ्या मागून याचे पाय उचलून धरून हळूहळू चालत ये, समजलास ?

[ ध्रुपदास उचलून घेऊन जातात.

---

## प्रवेश ३ रा.

[ स्थल—अहिच्छत्र नगरीचा बाह्यप्रदेश
द्रोण, अश्वत्थामा, दूत इत्यादि प्रवेश करितात ]

द्रोण—( अश्वत्थाम्यास ) एकून असा प्रकार झालातर ?

कृपी—शाबास वत्सा, शाबास ! हींच तीं वीरकंकण ?

अश्वत्थामा—हो, हींच

द्रोण—बरें, पण अर्जुन कुठे आहे !

अश्वत्थामा—तो द्रुपदाला आपल्या रथावर घालून इकडेच घेऊन येत आहे.

द्रोण—( दूतास ) अरे सवाहका, त्याच्यापुढील काय वृत्त आहे ?

दूत—कुमार अर्जुन द्रुपदाला पुत्रासहित कैद करून घेऊन इकडेच येताहेत.

द्रोण—(स्वगत) एकदरीत झालें हें सुरळीतच झाले; मला शस्त्र उचलण्याचा प्रसग आला नाहीं, आणि दुर्योधनकर्णादि मंडळी अर्जुनाशीं स्पर्धा करित होती

त्याचाहि गर्वपरिहार झाला, आणि माझा मानभग करणाऱ्या द्रुपदास माझ्या शिष्यानीं जिंकलें यातच माझा पुरा सूड उगवला द्रुपदा! मानी ब्राह्मणाचा अवमान आणि मानभग करणें ही काहीं लहानसहान गोष्ट नव्हे, हें आता तुझ्या चागल्या प्रत्ययाला येऊन चुकलेंच असेल!

( पडद्यातून शब्द होतो )

**अर्जुन**—सूता, रथ इथेंच उभा कर आचार्यांचे सन्मुख रथात बसून जाणें युक्त नव्हे

**सूत**—जशी आज्ञा

**अर्जुन**—नकुला, आता याचे हस्त बद्ध कर.

(नकुल तसें करतो नतर सर्वजण रथातून उतरतात व द्रोणाचार्यांपुढें येतात अर्जुन पुढें, त्याचे मागें नकुलसहदेव यानीं हस्त दिलेला द्रुपद, व कर्णानें हस्त दिलेला सत्यजित हे प्रवेश करून द्रुपदास व सत्यजितास आचार्यांपुढें उभें करितात. )

**अर्जुन**—( द्रोणास व कृपीस वदन करून ) आचार्य, आपल्या चरणप्रतापानें आणि आपण आशीर्वाद म्हणून दिलेल्या दर्भइंपिकाच्या पुण्यप्रसादानें द्रुपदराजास युद्धात जिंकून बद्ध करून आणून त्याच्या राज्यासह आपल्या चरणावर घालून ही गुरुदक्षिणा अर्पण करित आहें, हिचा स्वीकार व्हावा आणि मातोश्री, आपण आज्ञा केल्याप्रमाणें हे वीरकंकण आणलें आहे, हे आणि ही राज्यलक्ष्मी प्रेमपूर्वक मी आपल्यास अर्पण करितों

**द्रोण**—अर्जुना,चल ये,तुझ्या मस्तकाचें मला अवघ्राण करूदे हें विद्युत्‌धनू घे. हें तू आपल्या पराक्रमानें आज मिळविलें आहेस. याशिवाय अग्निवेश गुरूंनीं दिलेलें दिव्य आग्नेय अस्त्रहि आज भागीरथीत स्नान करतेवेळी मी तुला देतों मग तुझ्याशीं स्पर्धा कोण करील?

**अर्जुन**—द्रुपदराज! सत्यजितासह आचार्यांना आणि मातोश्रींना वदन करा

**द्रुपद**—(स्वगत) हा द्रोणाचार्य माझा गुरुबधु असून याला मी प्रणाम करू? अथवा हा ब्राह्मण आहे, आणि मी क्षत्रिय आहे, तेव्हा ब्राह्मण म्हणून याला प्रणाम करायला मला काय हरकत आहे?

( सत्यजितासह द्रुपद प्रणाम करितो )

**द्रोण**—कल्याण असो हे, पण आपल्या गुरुबधूकडून असा प्रणाम घेणें उचित नव्हे!

**कृपी**—(द्रुपदास) राजा, मी पाठविलेल्या दर्भइषिका तुला पोंचल्या का ?
(द्रुपद खालीं मान घालतो).

**दुर्योधन**—हे याचे अमात्य !

**शकुनी**—(हळूच कर्णास) 'कल्याण असो !' आता काय कल्याण व्हायचें राहिलेंय ?

**द्रोण**—येऊंदेत त्यांनां पाशमुक्त करा कायहो, तुमचें नाव सत्यवच नव्हे काय? आतातरी सत्य असेल ते बोला मी आपल्या राजाच्या दरबारीं आलों होतो तेव्हा या द्रोणाला आपण ओळखलें नाहीं आतातरी माझी ओळख पटते का? (सत्यवच खालीं मान घालतो. ) ह, अशी खाली मान का घालता आता ?

**कृपी**—(द्रुपदानें नमस्कार केल्यावर) हा नमस्कार केल्याबद्दल मी तुह्माला काय आशीर्वाद देऊ ? क्षत्रिय राजाच्या रणोत्साहापेक्षा ब्राह्मणस्त्रीचा रणोत्साह काकणभर अधिक असतो ह्मणून मी तुह्माला निरोप पाठविला होता, तो पोंचला का तुह्माला ? तुमच्या स्त्रीच्या हातातली जलाशयातील पुतळ्याच्या हातात घातलेलीं हींच वीरकंकण आहेत कीं नाहीं ते पाहून घ्या! हीं आतां वीर्यहीन झाली आहेत आता तुमच्यासारख्यानीच हीं हातात धारण करावी. घालू का मी ही तुमच्या हातात ? (स्वगत) पण मी हें काय बोललें! मर्यादेच्या बाहेर नाही का जात हे !

**द्रोण**—तेजोहीन झालेल्याचा असा अधिक्षेप करणें उचित नव्हे!

**कृपी**—पण धनविहीनाचा अवमान आणि मानभंग करण हेंतरी याच्यासारख्या राजाना उचित होत का ?

**द्रुपद**—(स्वगत) द्रुपदा, धिक्कार धिक्कार असो तुला! स्त्रियानीसुद्धा तुझा असा अवमान करावा? अथवा उघडच आहे, जित मनुष्याचा कोण अवमान करणार नाहीं ?

**द्रोण**—राजा द्रुपदा,—

**द्रुपद**—आता राजा ह्मणून माझा उपहास का करिता ? (स्वगत) फार झालें तर मी याचा दोनतीनदा अवमान केला असेल, पण हे फिरून फिरून मला मर्मभेदक शब्दानी टोंचित आहेत जित मनुष्याचा पदोपदी अवमान आणि मानभंग हा व्हावयाचाच ! पण तो मी कसा सोसू ? यापुढे मी जीवत राहिलोंच आणि दैवानें यदाकदाचित् चागले दिवस दाखिवलेन्, तर या अवमानाबद्दल एक सूडतरी उगवीन नाहीतर मी आपले हे प्राणतरी विसर्जन करीन !

द्रोणः—उपहास ? छे ! तुला राजा ह्मणून घेणे आवडत नसेल, तर चल, तुला नुसता द्रुपदच ह्मणतो द्रुपदा, चल ये आतातरी तू मला आपला गुरुबधु समजून भेट पाहू तू मला प्रणाम करणें उचित नव्हे मी ज्या वेळीं तुझ्या राजसभेंत आलों होतों, त्या वेळीं मी भणगभिकारी, दरिद्री ब्राह्मण होतों त्या वेळीं राजाची आणि अराजाची मैत्री होणे शक्य नव्हते, आता परमेश्वरकृपेनें ती स्थिति पालटून गेली आहे आतातरी आपला गुरुबधु समजून मला भेट त्या वेळेस मी अध होतों, चक्षुहीन होतो, त्या वेळेस डोळसाची मैत्री माझ्यासारख्या अधाला शक्य नव्हती आता मला चक्षु आले आहेत, आतातरी माझ्याशी मैत्री कर द्रुपदा! आपण दोघे गुरुबधु असल्याचे आतातरी तुला स्मरतें काय ?

द्रुपद—आचार्य, अशा आपत्कालीं हीं मानहानीची भाषणें ऐकण्यापेक्षा मला मरण बरें वाटते ! तर अशा वाग्बाणाऐवजी एखादें भयकर निर्वाणीचें शस्त्र घेऊन माझा आणि माझ्या पुत्राचा अत कराल, तर तें आपल्यासारख्या धनुर्धरास आणि क्षमाशील ब्राह्मणास उचित होय! यापेक्षां जास्त काय सागू ? माझ्याकडून आचार्यांचा अवमान झाला हे मी जाणून आहें, पण त्या वेळीं राज्यमदाने धुद झाल्यामुळे मी अध झालों होतों आता धुदी जिरून माझे डोळे साफ उघडले आहेत मी अज्ञानी आहे, आपण सज्ञानी आहात. आपल्याला काय अशक्य आहे? तर कृतापराधाची क्षमा करून मागचें सर्व विसरून जाऊन मला या अपमानात ठेवण्यापेक्षा आमचे दोघाचेहि शिरच्छेद करण्याची आपल्या कर्तृत्वी शिष्याना आज्ञा करावी इतकीच आपल्या चरणापाशीं माझी विनति आहे! यापेक्षा जास्त आपल्यापुढे माझ्याने बोलवत नाहीं आता!

द्रोण—(गहिंवरून) राजा द्रुपदा ! चल ये, भेट मला दृढ आलिंगन दे पाहू मला एकदा अग्निवेश गुरूपाशी आपण गुरुबधु होतों आणि तू ज्या वेळेस आपल्या पित्याला भेटण्यास जावयास निघालास त्या वेळीं मला जसें प्रेमालिंगन दिलेंस त्या प्रेमालिंगनाचा मला पुन्हा एकदा अनुभव घेऊदे चल ये, भेट मला (त्यास भेटून ) तुझ्यासारख्या धनुर्धर राजाचा—माझ्या गुरुबधूचा प्राण घेऊ? अरे, मी ब्राह्मण आहे द्रुपदा ! मी जितका कोपिष्ठ तितकाच क्षमाशील ब्राह्मण आहे माझ्या गुरुबधूच्या खेदाला मी कारण व्हावें, हे मला कदापीहि उचित होणार नाहीं मलाहि हे अत्यत खेदजनक वाटतें तर चल ये, भेट, भेट पाहू एकदा मला मी ब्राह्मण होऊन प्राण घेऊ? शिव शिव ! ब्राह्मणानां

कधींतरी हें उचित होईल काय? द्रुपदा, तुझ्या या दृढ आलिंगनानें मला बाळपणींच्या आपल्या प्रेमाची स्मृति होत आहे मी माझ्या शिष्याकडून तुझें राज्य हरण केलें, याचा तू विषाद मानू नकोस. त्या वेळी तुझ्याकडून जो माझा मानभंग झाला, तो मला सहन झाला नाहीं, आणि तेवढ्याचकरिता मी आपल्या शिष्याकरवीं तुला जिंकलें आता हें राज्य जरी माझें झालें आहे, तरी ज्या अर्थी तू माझा गुरुबंधु आहेस त्या अर्थी अर्जुनानें या गुरुदक्षिणेंत दिलेल्या राज्यापैकी अर्धें राज्य तुझें आणि अर्धें माझें, असें समज भागीरथीच्या दक्षिणेस आणि चर्मण्वतीच्या उत्तरेस असलेल्या दक्षिण-पांचाल देशाचा यापुढे तू अधिपती तेथें तू माकंदी नगरींत अथवा कांपिल्यपुरांत राहून आपल्या पुत्रपौत्रासहित चिरकाल राज्य कर मी ब्राह्मण, ह्या अहिच्छत्रनगरीतच या पुण्यवति भागीरथीच्या उत्तरतीरी रहातों

**द्रुपद**—छे. छे, मला आता राज्य नको अथवा काहीं नको!

**द्रोण**—द्रुपदा, मी तुला अत्यंत प्रेमपूर्वक इतकें सांगत असता तू आपल्या चित्तात अजून विषाद ठेवून असें खिन्न असावेंस, हें उचित नव्हे. अरे, मी तुझा गुरुबंधू ना? मग माझा एवढा शब्द ऐकायचा नाहीं? चल, तुझ्या पुत्राच्या मस्तकाचें मला अवघ्राण करूदे. (सत्यजितास पुढें घेऊन) हा तुझा पुत्र, आणि मी याला आपला समजतों (त्यास आलिंगून) अहाहा! याच्या स्पर्शानें मला किती आनंद होत आहे! मित्रा, नेत्रांस असें पाणी आणू नकोस. तू क्षत्रिय आहेस, तुझा पराजय झाल्याचा तुला खेद होत असेल; पण मी आता इतकें सांगितल्यावर तुला तसें वाटण्याचें कारण नाहीं हा तुझा पराजय नव्हे; तुझ्यात जें अज्ञान वसत होतें त्या अज्ञानाचा हा पराजय झाला असें समज तुझ्यामाझ्यात काहीं परका भाव नाहीं हे माझे शिष्यहि सर्वस्वी तुझेच आहेत असें समज हे धर्मा, हे भीमार्जुन हो, हे दुर्योधनदुःशासनहो, वा कर्णा, वत्सा अश्वत्थाम्या! हे माझे गुरुबंधू-तुम्हाला माझ्या ठिकाणी आहेत-यांना प्रेमपूर्वक प्रणाम करा (सर्व प्रणाम करितात) द्रुपदा, यापुढे चित्तात यत्किंचितहि खेद न करिता अथवा यत्किंचितहि विषाद न वाटू देता मला आपला सखा ह्मणून, पूर्वप्रेमानें माझ्याशीं वाग, इतकीच माझी तुला विनंति आहे

**द्रुपद**—अपराध्यावर क्षमा करणें हें आपल्यासारख्या उदारधीना उचितच आहे पण मी या दयेला पात्र आहें किंवा नाहीं याचीच मला शंका वाटते!

**द्रोण**—छे छे, द्रुपदा, असें ह्मणू नकोस अरे, तू माझा गुरुबंधु आहेस तू असें ह्मटल्यानें माझ्या जिवास टोंचणी लागून राहील चल, सर्व विसर,

पूर्वीचे सर्व विसरून जा त्यातील यत्किंचितहि मनात आणू नकोस तू हे विसरला नाहींस, तर मात्र मला फार दु:ख होईल! चल, चलतर, सर्व विसरून जा आणि पुन्हा एकदा मला प्रेमाने भेट पाहू ?

द्रुपद—( द्रोणास भेटून ) हे पहा मी सर्व विसरून गेलों

द्रोण—द्रुपदा, द्रुपदा, असें का? बाळपणातल्यासारखें एकदा कडकडून भेट! ( भेटतात ) अहाहा! आता मात्र मला बालपणीच्या गाढ आलिंगनाचा आनद होत आहे!

( इतक्यात रक्त वस्त्रे परिधान केलेला बल्लव द्रुपदाच्या ध्रुपदनामक भाटास पाठीवर टाकून लड्डुकासह येतो. )

द्रोण—अरे हा कोण! याने पाठीवरून काय आणलें आहे ते ?

बल्लव—आचार्य! कौरवपाडवाचें द्रुपद राजाशी युद्ध पाहून मलाहि युद्ध करण्याचा उत्साह आला, म्हणून मी समरागणात जाऊन याच्याशी ( ध्रुपदास खाली ठेवून) घनघोर युद्ध करून याला समरागणात घायाळ केला व आपल्यापुढे कैद करून आणला आहे कुमार अर्जुनरायाची धनुर्विद्या पाहूनपाहून मी ती शिकलों, तेव्हा कुमार अर्जुनच माझे गुरु त्याचेकरिता गुरुदक्षिणा म्हणून आणली आहे मीं ही हा द्रुपदराजाचा कुणीतरी जवळचा आप्त आणि राजवशीय आहे

[ त्यास खुला करितो.

द्रोण—द्रुपदा, हा कोण तुझा ?

द्रुपद—हा या द्रुपदाच्या राजघराण्यातील एक दैवज्ञ भाट आहे याचे नाव ध्रुपद याला ज्योतिष चागलें समजते व ह्याला रागरागिण्याची माहिती असून हा पदेहि करतो

बल्लव—( लड्डुकाकडे साश्चर्य पहातो व त्यास एकीकडे ) तर हा ध्रुपद-भाट आहे! द्रुपदराजाच्या वशातला नव्हे! अरे लड्डुका, तर मग आपलें सगळेच फसलें म्हणायचें! हा दैवज्ञ आहे तर आपण आचारी असल्याचे हा ओळखील!

द्रोण—( ध्रुपदास ) ध्रुपदा, तू रणागणात याच्या तावडींत कसा सापडलास?

ध्रुपद—अहो, मी त्या ईशमदिराच्या दीपमालेच्या कठड्यावर उभा राहून युद्ध पहात असता पाय चुकून खाली पडलों, आणि यानी मला औषधपाणी देऊन बरा करतों म्हणून सागून खाद्यावर उचलून घेऊन इथें आणलें

अर्जुन—आणि मग हें रक्ताने भरलेलें शस्त्र कुठून आलें तुझ्या हातात ?

ध्रुपद—हें इतक्यात आपले पुढे आणताना ह्याने माझ्या हातात दिलें

**अर्जुन**—वल्लवा, शाबास! खूप घनघोर युद्ध केलेंस! वल्लवा, तुझे कपडे रक्ताने भिजून कितीतरी लालभडक झाले आहेत हे? कुठलें हें इतके रक्त?

**वल्लव**—शत्रूच्या काळजातून चिळकांड्या उडलेले!

**द्रुपद**—माझं काळीजतर अजून थड आहे! अहो महाराज, मला खांद्यावर घेण्यापूर्वी याने जमिनीवर पडलेले रक्त आपल्या वस्त्रावर आणि अंगावर शिंपडून घेतल्याचे मी प्रत्यक्ष आपल्या डोळ्यानी पाहिलें आहे! ( सर्व हसतात. )

**अर्जुन**—अहो रणशूर, वीर, वल्लव! आपली गुरुदक्षिणा पावली मला

**वल्लव**—( लड्डुकाकडे पाहून लाजतो व त्यास एकीकडे ) लड्डुका, जिवत मनुष्याला उचलून आणण्यात आपण मोठीच चूक केली म्हणायची एकून!

**लड्डुक**—अरे बाबा, जगात खरें आहे ते उघडकीला आल्याशिवाय कधीं रहायचें नाहीं!

**भीम**—(अर्जुनास)इत्तिथ्यि चिरान्न सिद्ध इक्क टिल्ल दित्त! (आता या चोरानासुद्धा एक टोला देतों ) ( वल्लवास ) छे, तुझ्यासारख्या वीराला असें लाजायचे काहीं कारण नाहीं! हे दुर्योधन, दुःशासन, शकुनी, कर्ण—हे लाजताहेत का पहा!

**अर्जुन**—पिह्ह पिह्ह, चिरान्न खिल्ल मिन्न घित्ताल्ल! ( पहा, पहा, चोरानी खालीं माना घातल्या! )

**शकुनी**—(दुर्योधनादिकास एकीकडे) पाहिलेंस? हा काक वृकोदर आपली पडती बाजू पाहून कशी हेटाळणी करितो आहे आपली! तरी तुम्हाला सांगतों आहे मी किती दिवस, कीं, बाबानों, हा सर्प आहे—काळसर्प आहे याचे दात वेळीच पाडून टाका म्हणून! आतातरी उघडले का तुमचे डोळे?

**दुर्योधन**—( एकीकडे ) मामा, होय होय तू म्हणतोस तें अक्षरशः खरें आहे द्रुपदराजाने आम्हांला कैद करावे आणि यानी आम्हाला सोडवावे, हा काहीं लहानसहान मानभंग नव्हे याबद्दल सूड हा उगविलाच पाहिजे!

**शकुनी**—( एकीकडे) अरे, आपले कणिक अमात्य मोठे कार्यकुशल आहेत त्याच्या सल्ल्याने या मानभंगाबद्दल आपण याच्यावर सूड उगवू

**द्रोण**—द्रुपदा, आज तू आणि मी या आपल्या शिष्यवर्गाला घेऊन त्रिविध तापाचें मोचन आणि सकल पापाचा संहार करणाऱ्या या ज्ञानगंगा भागीरथींत स्नाने करू आणि हिच्या पुण्य तटाकीच स्नानोत्तर कर्मंहि उरकू चल.

[ जातात.

---

## संपूरक.

[ स्थल—भागीरथीतटाक त्रिकालज्ञ नारदमुनी
कृष्णस्तवन करित स्नानार्थ प्रवेश करितात. ]

नारद—( स्वगत ) द्रुपद आणि कुरुनंदन यांचा युद्धचमत्कार पाहून मी या पुण्यवती ज्ञानगंगा भागीरथीचे स्नान करावें ह्मणून इथें उतरलों पण इथील जल या नीराच्या स्नानानें अत्यंत आरक्त झाल्याचें निदर्शनास येत आहे शिवाय अवमानकृशानानें दग्ध झालेल्या द्रुपदानें, शंकरास प्रसन्न करून त्याच्यापाशीं द्रोणाचार्यांचा वध करील असा वीर्यमान् आणि अयोनिसंभव कुमार मागण्याची मनीषा धरून या पवित्र जान्हवींत स्नान केल्यामुळें, आणि तसेंच या कुरुवंशीय अधपुत्रांनीं द्रुपद राजानें आपल्यास कैद करावें आणि पंडुपुत्रांनीं आपणास सोडवून द्रुपदराजास जिंकून आणावें, हें आपणास अत्यंत लांछनास्पद आणि मानहानीचें आहे आणि भीमाचें मर्मी भापण अत्यंत त्वेष आणणारें व मानभंगाचें आहे असें मानून क्रोधानें अतिशय संतप्त होऊन सूड उगविण्याचा दुष्ट हेतु धरून हिच्या पवित्र उदकात अवगाहन केल्यामुळें हिच्यातून उष्ण वाफा येत आहेत। त्या अर्थी आपण या ठिकाणीं स्नान वगैरे न उरकता। किंचित् उत्तर तीरास जाऊनच तें उरकावें हें उचित आहे ह, त्या दुष्टबुद्धि दुर्योध नाला शंका पडली कीं, भागीरथींत स्नान केल्यामुळें फार झालें तर बाह्य तापाचा परिहार होईल, आतल्याआत अंतःकरण दग्ध करून टाकणाऱ्या संतापाचें— महासंतापाचें शमन कसें होणार ? पण ह्मणावे मूढा ! ही जान्हवी कायिक वाचिक आणि मानसिक अशा त्रिविध तापाचेंहि शमन करण्यास समर्थ आहे, पण हें तुझ्यासारख्या मतिमंदाला कळावे कसें? शेवटीं लौकिकांत चाईट दिसेल ह्मणून तो या ज्ञानगंगेंत अवगाहन करित असतां पुटपुटला कीं 'ही जर ज्ञानगंगा आहे तर हिच्यात स्नान केल्यानें आमचा मानभंग करणाराचा कसा सूड उगवावा त्याचे ज्ञान होईल काय? तसें झालें तरच ही ज्ञानगंगा!' पण याच्यासारख्या महामूढाल ज्ञान कोणचें आणि अज्ञान कोणचे हेंतरी कसें कळणार? दुसऱ्यानीं याची मुक्तत करून विजय संपादन केला हा याचा मानभंग, आणि या मानभंगाकरिता हा सूड उगविणार ! आणि तो कसा उगवावा याचें ज्ञान याला ज्ञानगंगेने करून द्यावं शाबास, अधपुत्रा शाबास ! मत्सर आणि दुष्टबुद्धि यांहीं प्रेरित होऊन निंद्य कृत्य करण्यास तयार होणें ह्मणजे ज्ञान की अज्ञान याचा ज्याला उमज पडत नाहीं तो ज्ञानगंगेंत स्नान करण्याला पात्रच नाहीं पण असें पात्र नसतानाहि जरी, य

Reg No. B 165

## सुबोध, मनोरंजक, ज्ञानप्रद आणि हितकर अशीं

## स्त्रियोपयोगी पुस्तकें.

| | किंमत | पोस्टेज |
|---|---|---|
| १ महिला पूर्वार्ध. | १–४–० | ०–२–० |
| १ महिला उत्तरार्ध | १–४–० | ०–२–० |
| १ स्त्रियांचीं कर्तव्यें. (कापडी बांधणी ) | १–०–० | ०–१–६ |
| १ गुणसुंदरी † | ०–१२–० | ०–१–६ |
| १ नवयुग † | ०–१२–० | ०–१–६ |
| १ भारतातील सोप्या गोष्टी. | ०–१०–० | ०–१–० |
| १ सरस्वती † | ०–८–० | ०–१–० |
| १ धाकट्या सूनबाई (काप बांधणी) | ०–१२–० | ०–१–० |
| १ ससारातल्या गोष्टी. | ०–६–० | ०–१–० |
| १ द्रोणसकोप | ०–६–० | ०–१–० |
| १, बालभारत | ०–५–० | ०–१–० |
| १ रमा माधव. | ०–४–० | ०–०–६ |
| १ मुरारराव | ०–४–० | ०–०–६ |
| १ बालरामायण | ०–३–० | ०–०–६ |
| १ हंसदूत. | ०–२–० | ०–०–६ |
| १ मोहन-तारा | ०–२–० | ०–०–६ |

हीं व दुसरीं सर्व प्रकारचीं पुस्तकें खालील पत्त्यावर मागवावीं –

**मनोरंजक ग्रंथप्रसारक मंडळी, गिरगांव-मुंबई.**

† कापडी बांधणीचें पुस्तक हवें असल्यास ४ आणे जास्त पडतील

[illegible] NATA SAGAR Press' & Published by K. R. Mitra at [illegible], BOMBAY for the 'Manoranjak Granth Prasarak Mandali'

नम्र जाला भूतां । तेणें कोंडिलें अनंता ॥ —तुकाराम.




Vol. IX No 106

वार्षिक वर्गणीः—मुंबईत २–४–०. बाहेरगांवीं २–८–०.

दर अंकास ट. ह. सह ०–४–६.

भीतीनिया योग नाहीं पैलपाड ।
भलतें गोड करनी घेई । —तुकाराम.

# मनोरंजन.



ॐ

## राष्ट्रीय प्रार्थना.

हे दयाळ परमेश्वरा! आह्मी आमच्या राष्ट्राकरितां अनन्य भावें तुला शरण येत आहों, आमच्यावर कृपा कर. हे कृपावंत! आमच्या राष्ट्रांत थोर बुद्धीचीं माणसें असून त्यांची बुद्धि फुकट जात आहे. याचीं कारणें त्यांची कार्यदिशा एक नाहीं, त्यांपैकीं प्रत्येकाला प्रमुखत्व पाहिजे, लहानपणा कोणासच घ्यावयास नको, त्यांनां एकमेकांचा उत्कर्ष सहन होत नाहीं व ज्या स्वार्थत्यागाच्या गोष्टी ते तोंडानें बोलतात त्या आचरणांत आणून दाखविण्याचें त्यांच्याकडून होत नाहीं, हीं होत. आमच्या बुद्धिमंतांनां प्रायः देशकार्यापेक्षां स्वताचा क्षुद्र स्वार्थ जास्त वाटतो. गेल्या दोन हजार वर्षांचा आमचा राष्ट्रीय इतिहास ह्मणजे प्रायः जबाबदार माणसांनीं खासगी वैरशमनार्थ राष्ट्रहित कसें बुडविलें, अथवा क्षुद्र स्वार्थलाभासाठीं राष्ट्राचें जबरदस्त नुकसान कसें केलें, याच कटकटीच्या कहाण्या आहेत. इतका दैन्यकाल आला तथापि आमचे बुद्धिमान् लोक शहाणे होत नाहींत! ज्या दोषांनीं राष्ट्र अधोगतीला पोंचलें ते दोष अद्याप बुद्धिमंतांच्या अंतःकरणांत अधिकाधिक माजतच आहेत! हे दयाळू देवा! अशा या स्थितीमुळे आमची देशस्थिति सुधारण्याचे मानवी प्रयत्न पंगू झाले आहेत. ही स्थिति बदलण्यास तुझी कृपा अत्यन्त अवश्य आहे ह्मणून तुला आह्मी पुनःपुन्हा अत्यन्त नम्र भावें प्रार्थना करितों कीं, आमच्या बुद्धिमंतांनां तूं नेहमीं त्यांच्या बुद्धीचा देशहिताकडे उपयोग करण्याच्या प्रेरणा दे, त्यांचे हेतु एकरूप असूंदेत; त्यांची बोलण्याप्रमाणें कृति असूंदे, त्यांच्या एकदिलाच्या प्रयत्नांची दिशा तुला पसंत अशी असूंदे; आणि तुझ्या कृपेनें त्यांनां यश येऊन आमच्या राष्ट्राची स्थिति चांगली होऊंदे हे दयामय! आह्मांवर एवढी कृपा कर.



# दशावतारमाला.

शंख दानव वक्रता बहु देवमानवि दावुनी
वेद ठेवुनि पोटि जै जलधींत घे बुडि तोपुनी
सुष्टतारक दुष्टदारक मीनलोचन 'मीन' हो,
मीनकेतनतातपादिच त्याचि मन्मन लीन हो १

अग्निनदन शापितां द्रुत पावले विलया यदा
सर्व वैभव शक्रसामर तैं स्मरे मधुजित्पदां
'कूर्म' होउनि मंदरा धरि पृष्ठि वारिधिमथनीं
तूर्ण तो हरि कामना करि पूर्ण संकट वारुनी २

जेधवा असुरे बळे छळिली समस्त वसुंधरा,
माधवस्तुति तेधवा क्षितिधेनु ती करि सुंदरा;
'शूकरा'कृति घेउनी दशनाग्नि जो वसवी धरा
त्यास संतत वाकुवा दृढ भक्तिनें जन कंधरा ३

पीडिता निज भक्त तो रजनीचरें अति निर्घृणें
स्तंभि तद्धुनि ऐकुनी प्रगटे कृपानिधि तत्क्षणें,
दैत्यकेसरिला तदा दवितो सलील 'नृकेसरी'
कल्पवृक्षहि धिक्करी न दिसे जया दुसरी सरी। ४

वाग्यवाग्पति जिंकुनी हरि जेधवां बळि तत्पदा
'वामन' प्रभु होउनी त्वरितें निवारि सदापदा,
मागुनी त्रिपदा धरा, बळिला अधस्तळि लोटुनी
द्वारपालक होइ तद्धहिं शुद्ध तन्मन पाहुनी। ५

पाहुनी जमदग्निवैभव हैहयाधिप लोभला
कामधेनुस घेउनी निजपत्तनाप्रति चालिला,
दंडुनी नृप धृष्ट तो रणि खंडुनी क्षणि तत्करा
एकविंशति वार 'भार्गव' वीरहीन करी धरा. ६

काननाप्रति जाइ जो शिवतो न भानु यदानना
यातनांतुनि सोडवी सुर तोडुनी खलबंधनां,
अंतरीं अज चिंतितां मुनि अंति जी गति पावती
'राम' तो सुखधाम दे रिपुलाहि ते परमा गती! ७

कंस निर्दय मर्दितो शिशुपाल मौलिस छेदितो
गोकुळामधि सांवळा 'हरि' गोवळ्यांसह खेळतो
चित्सुखें अनुरंजनीं स्मरविव्हला व्रजसुंदरा
खाजवी जयवाजिला 'जय'भक्तिचा बहु हावरा. ८

पाळुनी श्रुतिसाधनां त्रिदिवौकसाअति तुच्छिती
त्रास देउनि राक्षस प्रभु त्यांस सतत हांसती
'बुद्ध' होउनि वेद निंदुनि दानवां भुलवी हरी
सचरे परिसोनि ते वच मोह पूर्ण तदंतरीं. ९

व्यापुनी अवनी यदा यवनेश ते मदिरारत
धेनु कापुनि दापुनी द्विज वागतील मदोद्धत
स्थापिल प्रभु 'कल्कि' होउनि धर्म शेवटीं या महीं
मालिका 'विबुधप्रिया' हरिकंठि अर्पि 'अनंत' ही. १०

त्यांचा नांवलौकिक सर्वत्र पसरला होता त्यांच्या नांवचीं अन्नछत्रे व सदावर्तें काशी, रामेश्वर, बदरीकेदार, प्रयाग, मथुरा, नाशिक वगैरे प्रसिद्ध तीर्थांच्या जागी सतत चाललीं होतीं भाऊसाहेब अंत.करणाचे फार कोमळ असत. दु खिताचे दु ख पाहून त्यांचें मन कळवळत असे, आणि ते दु ख निवारण करण्याचे कामी द्रव्य वेंचण्यास ते मागे घेत नसत त्यांची रहाणीहि अगदी साधी असे त्यांना गाड्याघोडे, वगैरे ठेवण्याचें, सोन्याचे घड्याळ वापरण्याचे किंवा दुसरे ऐषआराम करण्याचें सामर्थ्य नव्हतें असें नाहीं पण थाटामाटानें रहाणें त्याच्या स्वभावाला आवडत नसे. यामुळें सामान्य, अविचारी लोक त्याना कंजुष समजून त्याची निंदा करित असत.

कृष्णराव, भाऊसाहेबाच्या पेढीवर नोकर कसे झाले ह्मणून वाचकाना जिज्ञासा वाटेल. ती हकीगत अशी आहे. कृष्णराव हे लहानपणापासूनच मोठे हुषार व तीक्ष्ण बुद्धीचे ह्मणून नावाजले होते, आणि त्याचे घर भाऊसाहेबाच्या घरापासून अगदी जवळच होते. यामुळें भाऊसाहेब त्याच्या घरावरून जात येत. तेव्हा कृष्णरावांला इंग्रजी व मराठी पुस्तकें घडघड वाचताना, इंग्रजी कविता नीटनेटक्या रीतीने ह्मणताना व सोबत्याबरोबर एखाद्या विषयावर इंग्रजीत अस्खलित बोलताना भाऊसाहेबानी पुष्कळ वेळा पाहिलें होते. कृष्णरावाला कविता करण्याचा व लेख लिहिण्याचा नाद लहानपणींच लागला होता यामुळें कॉलेजातल्या परीक्षाचे नियमित अभ्यास त्याचे हातून न झाल्यामुळें ते परीक्षेत उतरले नाहींत. वडिलाच्या आग्रहावरून त्यानीं परीक्षेच्या पाचचार वाऱ्या केल्या, पण उपयोग होईना, तेव्हा शेवटीं त्यानीं परीक्षेचा नाद सोडून दिला.

परीक्षा पास होईनात, तेव्हा द्राक्षें आंबट या ह्मणीप्रमाणें युनिव्हर्सिटीच्या शिक्षणपद्धतीला नाकें मुरडण्यात, 'घोकपट्टीनें आमच्या तरुणाची होणारी हानि' इत्यादि विषयावर वर्तमान पत्रातून कडक लेख लिहिण्यात आणि सदासर्वदा इंग्रजी शिक्षणाच्या एकांगीपणामुळें आमचा देश ठार बुडत आहे असा आक्रोश करण्यात ते समाधान मानून घेऊ लागले आता मुलगा पुढे शिकत नाहीं, तेव्हां कोठे नोकरीला लावून दिला पाहिजे असा विचार करून कृष्णरावाच्या वडिलांनीं भाऊसाहेबाला हात जोडून त्याच्या पेढीवर ३० रुपयाची जागा देवविली. कृष्णरावहि आपलें काम वेळच्यावेळी योग्य रीतीनें व हुषारीनें बिनबोभाट करित होते व यजमानाचीहि त्याच्यावर कृपादृष्टि होती.

[ २ ]

येथपर्यंत सगळा प्रकार ठीक चालला होता, परंतु या जगांत चालत्या गाड्याला खीळ घालणें, हीच आपल्या जीविताची इतिकर्तव्यता मानणारे कांहीं असतात. या संसाररूपी नाटकांत विदूषकाचें काम पत्करून रंगाचा भंग करून लोकांना कसें गुंग करून सोडावें, तें या लोकांना चांगलें कळत असतें. रामाला राज्याभिषेक झाला काय आणि भरताला झाला काय, अयोध्येच्या प्रजाजनाला सारखेंच होतें. दोघेहि राजपुत्र सत्वगुणी, सदाचारी व प्रजाहितरत होते. पण कलीनें मंथरेच्या अंगांत संचार करून तिच्या द्वारें कैकयीचें मन भारलें व रामाच्या वनवासास कारण होऊन पुढें रामरावणाचें युद्ध घडवून आणिलें, आणि त्यामुळें रामचरित्र इतकें मनोरम झालें व रामायण काव्य हें अत्यंत अद्भुत व सरस उतरलें. तसेंच कृष्णरावाच्या संबंधांतहि ते नोकरीला लागण्याचे पूर्वींपासूनच कोणा अदृश्य देवतेनें सूत्रधारत्व पत्करून पुढील कार्यभाग विचित्र करून सोडला होता.

भाऊसाहेबांना एक पुतणी होती. तारा लहान असतांच आईबापांनीं तिचा त्याग करून परलोक स्वीकारल्यामुळें भाऊसाहेबांनींच तिला लहानाचें मोठें केलें होतें. भाऊसाहेबाला स्वतःला कांहीं मूलबाळ नव्हतें, तेव्हां तारेलाच ते आपल्या मुलीच्या ठिकाणीं समजून तिजवर जीवप्राण करीत असत. त्यांचा विचार असा होता कीं, तिला एखाद्या श्रीमंत घरीं दिलें असतां तिला सासरीं रहावें लागेल व आपण तिच्या आनंददायक सहवासाला मुकूं. त्यापेक्षां एखाद्या सुस्वभावी पण गरीब आणि होतकरू अशा मुलाबरोबर तारेचा विवाह करून त्याला आपला घरजांवई करून ठेवावें ह्मणून भाऊसाहेब अशा एखाद्या मुलाच्या शोधांत होते. कृष्णरावाच्याच बरोबरीचा एक विश्वनाथ ह्मणून मुलगा होता तो भाऊसाहेबांना पसंत आला आणि त्यांनीं आपला हेतू विश्वनाथाच्या बापालाहि कळविला. परंतु तो गृहस्थ मोठा तापट होता. आपल्या मुलानें दुसऱ्याचा घरजांवई होऊन रहावें ही गोष्ट त्याला मुळींच रुचली नाहीं. तो ह्मणाला "शेटजी, आपण श्रीमंत आहां व आह्मी गरीब आहों ह्मणून आपल्या संपत्तीच्या लोभास्तव मी आपल्या मुलाला विकण्यासारखें खाटकाचें कृत्य करणारा असेन असें समजूं नका, तुमची संपत्ति तुह्मापाशीं राहूं द्या, मीं आपल्या मुलाला जवळ ठेवीन. तुह्मी हजार दहा हजार रुपये देईन ह्मणतां, पण आपली सगळी धनदौलत देऊन टाकण्यास तयार झालां तरी मी या गोष्टीला रुकार देणार नाहीं! आमच्या घरांतील मुलांना विकण्याची चाल टाकून नाहीं आहे, हें खूप समजा!"

म्हातान्याचे हे तापट स्वभावाचें निदर्शक असें भाषण ऐकून चार लोक जमले होते ते त्याच्या तोंडावर तारीफ करून म्हणू लागले "बरोबर आहे! मुलाबद्दल पैसा घेणें म्हणजे हा क्रयविक्रय नव्हेतर काय?"

भाउसाहेब क्षमा मागून मुकाट्याने घरी चालते झाले. ज्या लोकांनी म्हातान्याची एवढी तारीफ केली, तेच आता पाठीमागे म्हणू लागले "हा एवढा म्हातारा असून त्याला कवडीइतकीदेखील अक्कल नाहीं! घरी चालत आलेल्या लक्ष्मीला यानें पाठ की हो दिली! घरी कामधेनु चालत आली असता तिला हाकून लावणाऱ्या या मूर्ख थेरड्याची अक्कल गेलीतरी कुठे? आज दहा हजार रुपये मिळते, पुढेमागे आणखी संपत्ति मिळती, पुनः आपला मुलगा कायम तो कायमच! पण म्हण आहेना, दैव देते आणि कर्म नेते!"

म्हातान्याने प्रथम नकाराचा जबाब दिला खरा, पण मागून त्यालाहि त्या गोष्टीचा पश्चात्ताप झाला आणि त्याने एका मध्यस्थाला काहीं रकम देऊ करून त्याच्या मार्फत आपली संमति शेटजींना कळविली व विश्वनाथ आणि तारा याच्या विवाहाचें जुळवून आणिले.

[ ४ ]

वर सांगितलेला विवाह झाल्यावर विश्वनाथ आपल्या सासऱ्याच्या घरी राहू लागला. भाऊसाहेबांनीं त्याला सावकारीच्या धंद्याचें शिक्षण देण्याला सुरुवात केली. कृष्णरावहि तेथेंच नोकरीस राहिला होता यामुळें विश्वनाथ आणि कृष्णराव हे दोघे मित्र अनायासें एकत्र बसून कामकाज शिकू लागले जावईबुवा आणि शेटजी याच्यामध्ये कृष्णराव हें एक सरळ दळणवळणाचे सुलभ द्वार झाले जावईबुवाना काहीं पाहिजे असलें तर तें त्यांनी कृष्णरावाचे मार्फत मागून घ्यावे, भाऊसाहेबाच्या मनात जावईबुवाना कांहीं शिकवासवरायाचे असले तर तेंहि काम कृष्णरावाचे मार्फत करणें अधिक सोईचें आहे असें शेटजीच्या प्रत्ययास येत गेलें. याप्रमाणें काहीं दिवस फार चांगले सुखात गेले.

पण कलीचा नारद जो सैतान त्याच्याने ही गोष्ट पहावेना. ख्रिस्ती शास्त्रात सैतान याने मनुष्यजातीशी वंचना करून तिला अखंड अशा पातकार्णवात लोटून दिल्याचें वर्णिलें आहे या सैतानाचे वंशज हल्लींच्या काळींसुद्धा जेथे तेथें आहेतच. एखादा नवखा मनुष्य मुंबईसारख्या शहराची अवर्णनीय शोभा पहातपहात आनंदात गर्क झालेला पाहिला की फूटपाथवरल्या फरसबंदींत सैतानाचा संचार होऊन त्या प्रेक्षकाला ठेंच लागलीच म्हणून समजावें!

त्या बिचाऱ्याच्या आनंदाचा भंग करण्यात सैतानाला काय मौज वाटत असेल ती त्यालाच माहीत! पुण्याचे एखादे तात्या घाईघाईने जेऊन लगबगीने कमरेचें धोतर सावरीतसावरीत व एका हाताने पगडी सावरीत स्टेशनावर येऊन पोहोंचतात, तोंच गाडी शिटी देते, टिकिटमास्तर आपलें दुकान बंद करतात किंवा टिकिट घेतलें असलें तरी दरवाजावरचे हाफकास्ट टिकिट कलेक्टर तात्याना आत सोडित नाहींत! एखादा विरहव्यथित पती आपली नूतन विवाहित तरुण पत्नी माहेरीं गेली असता तिला प्रणयपत्रिका लिहून ती शिपायाच्या हातीं डाकेंत टाकण्यासाठीं देतो, पण त्या वेड्या दीड दमडीच्या शिपायाला या प्रणयीजनाच्या तळमळीची कल्पनाहि नसल्यामुळें तो तें पत्र घेऊन तडक पोस्टहपिसात जाण्याचें सोडून मध्येंच एखाद्या अड्ड्यावर चिलीम फुंकित बसून त्या दिवशी तें पत्र डाकेंत टाकण्यासच विसरतो! या सैतानाच्या खोड्या एक का दोन, किती सांगाव्या?

कृष्णरावावर भाऊसाहेबाचा भरवसा फार बसलेला पाहून अर्थातच कित्येक उपद्व्यापी लोकाच्या पोटात दुखावयास लागलें त्यानीं प्रथम विश्वनाथाशीं हळहळू विशेष सलगी ठेवण्याचा व त्याच्या डोक्यात भलभलते विचार घुसडण्याचा यत्न केला पण तें साधेना, तेव्हा भाऊसाहेबाकडे जाऊन त्याच्या भोळ्या मनात असें भरविलें कीं विश्वनाथ अलीकडे भलत्यासलत्या नादी लागला आहे, ताराबाईविषयीं त्याच्या मनात प्रीतीचा लेशहि राहिला नसून या सगळ्या अनर्थाचें मूळ कृष्णराव हा आहे विश्वनाथ व कृष्णराव हे दोघेहि इंग्रजी शिकलेले असल्या कारणानें कित्येक नव्यानव्या चालीरीतींविषयीं त्याचे मनात आवड उत्पन्न झाली होती, ही गोष्ट खरी, पण त्याचें वर्तन अद्याप निष्कलंक होतें. [illegible] व्यसनापासून ते अगदीं अलिप्त होते जुन्या लोकाच्या आचारविचाराविषयीं ते कधींकधीं नापसती दाखवीत आणि नव्या इंग्रजी चालीविषयीं ममता प्रदर्शित करीत, इतकेंच कायतें पण मतलबी लोकानीं त्याचा विपर्यास करून भलतेंच काहींतरी भाऊसाहेबाच्या डोक्यात भरवून दिलें होतें याप्रमाणें भाऊसाहेबानीं विश्वनाथाला परजांवई करण्यात व आपल्या आश्रयाला ठेवून घेऊन कृष्णराव याला आपल्या पेटीवर नोकरी देऊन त्याच्यावर विश्वास ठेवण्यात जो उदारपणा दाखविला होता, त्यात सैतानानें बिघाड करून टाकिला

[ ५ ]

मनुष्यास एकदा संशयपिशाचिकेनें घेरले म्हणजे घेरलें मग त्याला प्रत्येक अहेतुक गोष्ट सहेतुक दिसू लागते असा नेम आहे. विश्वनाथाला सर्व गोष्टींची अनुकूलता होती तरी तो अगदीं साधा पोषाख करी, कृष्णरावांच्या व आपल्या योग्यतेंत कांहीं फरक नाहीं असें समजून त्याच्याशी बरोबरीच्या नात्याने मोकळेपणानें वागे; त्याच्याशीं रात्रीं अकराअकरा वाजेपर्यंत बोलत बसे या सगळ्या गोष्टी भाऊसाहेबाचें मन पूर्वीच्यासारखें शुद्ध असतें तर त्यानासुद्धा फार आवडल्या असत्या. आता त्याची दृष्टीच निराळी झाली होती. त्यानां असें वाटे कीं, जावईबुवा साधेपणानें रहातात याचें कारण त्याचा नम्र व निगर्वी स्वभाव नसून आपल्या स्वताविषयीं जावईबुवाच्या मनात भेदभाव व परकेपणा आला आहे हें होय, आणि जावईबुवा व कृष्णराव अर्ध्या रात्रीपर्यंत जे एकत्र बोलत बसतात ते काहींतरी गुप्त कट करित असले पाहिजेत. असें संशयाचें पिशाच एकदा डोक्यात सचरताच भाऊसाहेबाला आपल्या पुतणीचें लग्न अशा भिकारड्या पोराशीं करुन दिल्याबद्दल आणि हे जळतें घर भाड्यानें घेतल्याबद्दल फारफार पश्चात्ताप झाला, हें सागावयास नकोच

तथापि एकदा आपल्या जावयाला चार हिताचे शब्द सांगून तो ताळ्यावर आला तर पाहू म्हणून भाऊसाहेबानी विश्वनाथाला आपल्या बगीच्यात एकीकडे नेलें आणि हळू बोलताबोलता कृष्णरावाविषयींचा आपल्या मनातला संशय उघड करुन दाखविला तो ऐकून विश्वनाथाला फारच आश्चर्य वाटलें आणि तो संशय घालविण्यासाठी त्याने फार प्रयास केले पण जों जों संशय घालविण्याचा विश्वनाथ प्रयत्न करी, तों तों भाऊसाहेबाचा संशय उलट दृढच होत जाई, असा कांहीं विपरीत परिणाम घडून आला तेव्हा विश्वनाथाने तो नाद सोडला व भाऊसाहेबहि कपाळावर हात मारुन "मुलाला इग्रजी शिकविल्याचा हा परिणाम! असल्या मूर्खाला मुलगी देऊन तिच्या जन्माचें मातेरें केलें त्यापेक्षा तिचे हातपाय बाधून तिला विहीरीत लोटून दिलें असतें तर बरें झालें असते. असे निराशेचे उद्गार काढित निघून गेले.

[ ६ ]

फार वेळ मेघगर्जना होत असली म्हणजे विजेचा कडकडाट केव्हा होईल याचा नेम नसतो. भाऊसाहेब व कृष्णराव याच्यामध्यें अलीकडे अगदी क्षुल्लक कारणावरून भाडणें होऊ लागलीं होतीं कृष्णराव आपल्या कामात फार दक्ष असत,

यामुळे कामात कोठे चूक दिसेना व त्याच्या अंगी काहीं चूक लाविल्याशिवाय त्यांना नोकरी वरून काढल्यास जावईबुवास वाईट वाटेल, ह्मणून भाऊसाहेबांना तसें करता येईना ह्मणून कृष्णरावानीच स्वत त्रासून राजीनामा द्यावा असें भाऊसाहेब इच्छित होते आणि ह्मणून ते त्याच्या योग्यतेहून हलकेंसलकें काम त्याना सागत, किंवा तोंडी हुकूम एक देत व त्याप्रमाणे त्यानी केलें ह्मणजे मी कधीं असे सागितलें होतें ह्मणून साफ नाकबूल होत याप्रमाणें कृष्णरावाला मुद्दाम त्रासवून सोडण्याचा सकल्प त्यानी केला होता पण कृष्णराव हे इतके सज्जन होते कीं, ते आपला सगळा अपमान निमूटपणे सोसून आपणावर उपकार करणाऱ्या शेटजींची सेवा इमानानें करीत असत पण मनुष्य कितीहि सोशिक व सज्जन असला तरी त्याच्या सहनशीलतेलाहि मर्यादा असते त्याप्रमाणें कृष्णरावाच्या सोशिकपणाची मर्यादा उल्लघण्याचा समय आता नजीक येऊन ठेपला होता

भाऊसाहेबाचे एक जिवलग स्नेही मूळजी ठाकरशी यांच्या घरी मुलाचें लग्न झालें तेव्हा त्यानी भाऊसाहेबाच्या दुकानच्या सर्व नोकराना अगत्याची आमत्रणें देण्यासाठी त्याची नावे मागितली भाऊसाहेबानी तीं तोंडानेंच सगळी सागितली. पण ती सागताना चुकून ह्मणा, अगर मुद्दाम ह्मणा, कृष्णरावाचें नाव वगळले ठरल्याप्रमाणें सगळ्या मडळीला आमत्रणें पोचून ती मडळी लग्नाच्या पान-सुपारीला व मेजवानीला गेली, पण कृष्णरावाला आमत्रण नसल्यामुळें ते गेले नाहींत आपल्या स्नेह्याचे घरी कृष्णराव लग्नाच्या पानसुपारीलासुद्धा गेले नाहींत, हें पाहून भाऊसाहेब फार रागावले व त्यानी तो राग एकादोघाजवळ बोलून देखील दाखविला इकडे यजमानाचें मन आपल्याविषयीं अलीकडे शुद्ध नाहीं व य कश्चित् लग्नाच्या पानसुपारीसारख्या प्रसगीसुद्धा भाऊसाहेबानी आपले नाव वगळलें, याबद्दल कृष्णरावाला फार चीड आली. या गोष्टीला एकदोन दिवस झाल्यावर भाऊसाहेबाच्या दुकानचा मुख्य मुनीम कृष्णरावाला मुद्दाम बोलावून नेऊन ह्मणाला "कृष्णराव, परवा तुह्मीं पानसुपारीला व मेजवानीला मूळजी शेटच्या येथें आला नाहीं ह्मणून आपल्या शेटजीला तुमचा फार राग आला आहे"

यावर कृष्णराव काहीं बोलले नाहींत तेव्हा तो मुनीम पुढे ह्मणाला "मी तुह्माला मित्रत्वाच्या नात्यानें सागतों कीं, आपल्या मालकाला चीड येईल अशा रीतीचे वर्तन करण्यापासून तुमचें एखादे दिवशी नुकसान होईल!"

शेटजीचे आपल्याविषयीचे वर्तन पाहून कृष्णरावांच्या पोटात उत्पन्न झालेले किल्मिष आता एकदम वाहेर पडले ते ह्मणाले "शेटजी चिडले तर माझे काय करणार आहेत? ते माझ्या चाकरीचे मालक आहेत, माझ्या जिवाचे काहीं मालक नाहींत त्याचे माझ्याशी पूर्वींच्यासारखे वर्तन रहातें तर त्यांच्यासाठी त्याच्या मित्राचे घरी आमंत्रणावाचूनसुद्धा मी गेलो असतो; पण अलीकडे त्याचे मन माझ्याविषयी शुद्ध नाहीं हें मला ठाऊक आहे"

कृष्णरावाच्या मनात आणखी कांहीं बोलावयाचें होतें पण इतक्यात शेटजी आले असे कळल्यावरून मुनिमानें त्याना जावयास सांगितले.

कृष्णरावाचे व मुनिमाचे वरील भाषण झाल्यापासून कृष्णरावाला चैन पडेनासें झालें. त्यानी आपल्या जागी परत येऊन प्रथम एक चिठ्ठी लिहिली; ती तीन तीनदा वाचून पाहिली आणि तीत काहीं वावगें अक्षर पडले नाहीं अशी खात्री करून घेतल्यावर ती एका शिपायाचे मार्फत शेटजींकडे पोचविली. शेटजी कृष्णरावाला बोलावून त्याला मुळजीशेटचे घरी पानसुपारीला का आला नाहीं ह्मणून विचारणार, इतक्यात कृष्णरावांची पुढील चिठ्ठी शेटजीच्या हाती पडली—

"श्री.

मेहरबान शेटसाहेब यास—

कृ. सा. न वि वि

साहेब, आपण कृपाळू होऊन मला पोटापाण्याच्या उद्योगाला लावून दिले, हे आपले उपकार मी अद्याप स्मरत आहें आणि नेमून दिलेले काम इमानानें यथाशक्ति करित आलों, हेंहि आपण पहात आहा अलीकडे माझ्या दुर्दैवानें आपल्या नाराजीला मी पात्र झालों आहें, आणि ह्मणून आपली नोकरी सोडून दुसरीकडे कोठे सोय पहाण्याचा मी विचार केला आहे माझ्या हातून जाणून ह्मणा अज्ञानानें ह्मणा, काही चूक घडली असली तर आपण सदय होऊन क्षमा करावी आपण इतके दिवस मला निभावून घेतले, हे आपले उपकार मी कधीं विसरणार नाही.

आपला तावेदार कृष्णराव."

[ ७ ]

वर सांगितलेल्या गोष्टीला आज आठ वर्षे होऊन गेलीं भाऊसाहेबाचा आतां वृद्धापकाळ झाला आहे व एका मोठ्या असाध्य रोगानें ते बिछान्यास खिळले आहेत त्याची ती स्थिति पाहून त्याची वृद्ध पत्नी शोकातुर होऊन त्याच्या

उशाशीं बसली आहे. ताराबाई तशाच दुःखित व सद्गदित अंतःकरणानें आपल्या चुलत्याच्या प्रकृतीला लवकर आराम होओ ह्मणून मानसप्रार्थना करीत आहेत. भाऊसाहेबाला आता आपल्या जिवाची फारशी आशा उरली नसल्यामुळें ते आपल्या देखत आपल्या इस्टेटीची व्यवस्था करण्याच्या विचारात पडले आहेत. त्याच्या अंगात अतिशय क्षीणता आल्याकारणानें एक शब्दसुद्धा उच्चारण्याची ताकद राहिली नाहीं. अशा वेळीं विश्वनाथ एका गोऱ्या डाक्टराला घेऊन आला. डाक्टरानें नाडीचे ठोके मोजून पाहिले; बरगडीला नळी लावून श्वासाची दीर्घता व त्याचा आवाज याचें सूक्ष्म निरीक्षण केलें आणि नंतर फार हलक्या आवाजानें पुटपुटत ह्मणाले "अजून एक उपाय आहे. तो केला असता रोगी थोडा वेळतरी टिकाव धरील, असें अद्याप मला वाटतें. तो उपाय अखेरचाच आहे आणि गुण यावयाचाच असला तर त्यानेंच येईल."

हे शब्द ऐकून रोग्याच्या भोंवतालीं जमलेल्या मंडळींचीं सुकलेलीं तोंडें थोडीशीं प्रफुल्लित झालीं व त्यापैकीं एकानें विचारलें "असा कोणता उपाय आहे तो सांगा. साध्य असल्यास करून पाहू."

डाक्टरानें सांगितलें "उपाय तीव्र आहे. या रोग्याचें दुखणें आपणावर घेण्यासारखेंच तें आहे. पण तुमच्यापैकीं कोणी तो उपाय करण्यास कबूल असला तर सांगतों. या शेटजींच्या अंगात बिलकूल रक्त उरलें नाहीं. यामुळें फारच क्षीणता येऊन या थराला गोष्ट आली आहे. आता औषधाच्या उपायानें नवें रक्त उत्पन्न होईल ही आशा व्यर्थ आहे. यासाठीं कोणा निरोगी, तरुण, सशक्त, धीट अशा माणसाच्या अंगातलें रक्त शेटजींच्या अंगात बाहेरून घातल्याशिवाय शेटजी जगतील, ही आशा व्यर्थ आहे."

डाक्टरांचा हा अघोरी उपाय ऐकून सगळेजण एकमेकाच्या तोंडाकडे पाहू लागले, पण आपलें रक्त घ्या, असें ह्मणण्यास कोणी धजेना. शेटजींची वृद्ध पत्नी आपलें रक्त देण्यास कबूल झाली, पण तिचें रक्त कामाचें नाहीं असें डाक्तरानें सांगितलें. त्यामुळें नाइलाज झाला. दोनतीन मिनिटें गेलीं, तरी कोणी पुढें होईना. एकजण दुसऱ्याला "तू पुढें हो, तू चांगला सशक्त आहेस" ह्मणून ह्मणे. शेवटीं कोणी पुढें येत नाहीं असें पाहून डाक्तरसाहेब परत जाण्यास निघणार इतक्यात कोणी एक तरुण त्याला आग्रह न करता स्वताच्या खुषीनें पुढें सरसावला "आणि माझ्या अंगातलें हवें तेवढें रक्त घ्या, पण शेटजींना बरें करा." [illegible] लागला. या तरुणाचा चेहरा काळजीनें काळवंडलेला

दिसत होता, तथापि त्याच्या मुद्रेत करारीपणा, कृतज्ञता, सरळपणा आणि उमेद यांची झाक दिसत होती डाक्टरसाहेबांनी त्याला पसंत करुन त्याचा एक हात उघडा केला व त्याच्या दडातून शस्त्रानें हवें तेवढें रक्त काढून तें रोग्याच्या शरीरांत प्रविष्ट केल्यावर जवळ आश्चर्यानें स्तब्ध उभे राहिलेल्या मडळीला ह्मटलें "आता रोगी बरा झाला तर तो या तरुण माणसाच्या पुण्याईनें झाला, असें समजा. आपल्या शरीरांतलें रक्त दुसऱ्यास देण्यास तयार होणाऱ्या या तरुणाचे तुह्मीं आभार मानले पाहिजेत."

हे स्तुतिपर उद्गार ऐकून त्या तरुणानें नम्रपणानें खालीं पाहिलें आणि हळूच ह्मटलें "उपकाराची फेड करण्याचा सुप्रसग मला आणून दिल्याबद्दल मी परमेश्वराचे आभार मानतो"

* * * * *

हा एवढा महानुभव कोण ह्मणून जो तो त्या तरुणाकडे पाहू लागला. भाऊसाहेबहि आपल्या क्षीण नेत्रानें त्याच्याकडे टक लावून पाहू लागले बराच वेळ याप्रमाणे पाहिल्यावर एकदम सद्गदित कठानें ते ह्मणाले " कोण? कृष्णराव?"

कृष्णरावांनी "माझ्या चुकीची क्षमा करा" असें ह्मणून भाऊसाहेबांचे पाय धरले. भाऊसाहेबांनी कृष्णरावाची ही कृतज्ञता पाहून आपल्या जिंदगीचा अर्धा हिस्सा कृष्णरावाच्या नांवे करुन दिला व नतर बाकीच्या जिंदगीची व्यवस्था लाविल्यावर शांतपणानें प्राण सोडला



# करमणूक.

"धोंडोपत, तुह्मी असल्या या भिकार जागेत रहाता, हे तुह्माला शोभत नाहीं!"

"का?"

"अहो, घरवाल्याला भाड ह्मणून केव्हाहि यावयाच नाहीं अशी तुमची नेहमीचीच वहिवाट आहे, त्यापक्षी एखादा सुरेख बगला का नाहीं घेत?"

---

ती—(प्रार्थनासमाजाचे व्यासपीठावर बसून उपासना करणाऱ्या आपल्या पतीस) आपली उपासना आटोपल्यावर मडळी घरी जाताना तत्सबधीं काय बोलते तें आपण कधी ऐकल आहे का?

तो—मीं एकदाच तें ऐकिलें आहे, परतु असें आडून ऐकणे हें पाप असल्यामुळें पुन कधीहि न ऐकण्याचा निश्चय केला आहे

---

"रावसाहेब! जरा पाहून चला तुमच्या छत्रीचा तीर माझ्या डोळ्यात खुपला"

"छट्! खोटी गोष्ट"

डोळा रक्तबबाळ झालेला गृहस्थ सतापून ह्मणतो "मूर्ख नाहींतर! हा पहा माझा डोळा रक्तासारखा झाला आहे"

"होय, तें खरें, परतु भल्या गृहस्था! ही काहीं माझी छत्री नव्हे राममदिरात दर्शनाला गेलों होतों तेथें ही मिळाली"

---

नुकोच लग्न झालेली तरुणी आपल्या प्रियकराच्या गळयात हात घालून लडिवाळपणें विचारिते "नी गडे! मी जर या प्लेगच्या दिवसात मरण पावलें तर आपण काय वर कराल?"

"का वरें?" थोडा वेळ थाबून "दहन करीन, पुरणार नाहीं"

---

एक फाकडे कवी वर्तमानपत्राच्या आफिसात येऊन ह्मणाले "एडिटर साहेब! माझी सर्व कल्पनाशक्ति खर्च करुन मीं ही सुदर कविता रचिली आहे. ही कविता इतकी हृदयगम उतरली आहे कीं मी ही वाचित असताना आमच्या कुटुबाच्या डोळयातून अश्रूंच्या सारख्या धारा चालल्या होत्या."

एडिटर—( कविता वाचून झाल्यावर ) काय ह्मणतां ! बरें आतां आपण असें करा घरीं जा व याउपर कविता रचण्यांत आपण आपली कल्पनाशक्ति खर्चून टाकणार नाहीं असें कुटुंबाला आश्वासन द्या, ह्मणजे त्यांचें रुदन थांबेल.

---

वर्तमानपत्राचा मॅनेजर—पोस्टखात्याच्या कारभारांत केवढा घोटाळा माजला आहे हा ! असा अंधार दुसरे कुठेहि नसेल ! !

वर्गणीदार—आपला अनुभवतर आपण ह्मणता त्याच्या उलट आहे. आपले अंक आह्माला वेळचेवेळीं बिनचूक मिळतात

मॅनेजर—मग मोठेंच आश्चर्य ह्मणावयाचें ! आह्माला तसा अनुभव मुळीच नाहीं. गेल्या १ ल्या तारखेला आह्मीं आमच्या पत्राच्या २२७५ वर्गणीदाराना त्याच्याकडे येणे असलेली बाकी तावडतोब पाठविण्याविषयीं विनतिपत्रे पाठविलीं होतीं, परंतु त्यांतील फक्त १३ इसमानाच तीं पोंचलीं. बाकीच्या २२६२ इसमांकडून जबाब नाहीं !

---

गिऱ्हाईक—परवां तुमच्याकडून नेलेलें घड्याळ बरोबर वेळ देत नाहीं.

घड्याळवाला—काय करावें हो ! सध्याचा वेळच मोठा चमत्कारिक झाला आहे.

---

भिक्षेकरी—बाईसाहेब ! आपल्या सारखी भाग्यवान्, दयाळु अंत:करणाची, सुशील—

बाईसाहेब—ही घे चवली (भिक्षेकऱ्याचे हिरमुसलें तोंड पाहून) का असं नाक का मुरडलं ?

भिक्षेकरी—शेजारच्या बाईसाहेबानीं मला आश्वासन दिलें होतें कीं ही स्तुति ऐकून आपण १ रुपयातरी द्याल

---

रावसाहेब—कारे रामचंद्र, परवाच्या नोटिशीत लिहिलेल्या जागेसाठी कांहीं अर्ज आले आहेत का ?

रामचंद्र—होय रावसाहेब, शंभर एक आले आहेत प्रत्येकाने उत्तराला एक एक टिकीटसुद्धा पाठविलें आहे

रावसाहेब—तर मग त्याना कार्डावर धरसोडीचें उत्तर लिही, ह्मणजे आणखी एकदा ते अर्ज करतील.

---

पचता एक दुष्कर्म दुजें सूद करावया
सिद्ध होतो, असे नित्य पाहतोंच जगांत या २७

एक दुष्कृत्य पचता दुसेरही पचेलसें
मूर्खाला वाटते, त्याच्या विवेक हृदयीं नसे २८

दुष्कर्मसिद्धि दुष्टाला उत्तेजित करीतसे,
आज्यधारा कृशानूला प्रवातीं बल देतसे. २९

लाभार्थ वा विनोदार्थ पापें खल करीतसे,
धरोनि ऐसा क्रम तो परिणामीं सदा फसे ३०

शांतवृत्ति प्रजा सोशी किप्रभूचा महाच्छल,
परि तो दण्ड्य दण्डातें पावतो शेवटीं खल. ३१

असो हा विस्तर पुरे, चिरिला मेष इल्वलें,
शिजवोनि अगस्त्यातें खाद्य तें अर्पिलें खलें ३२

भक्षिता खाद्य मुनि हा "सुसपन्न" असे वदे,
"तृप्तोऽस्मि" हा शब्द त्याचा इल्वला बहु तोष दे ३३

मग हर्षसमाविष्ट इल्वलें त्या दुराशयें
वातापी बाहिला "ये रे! शीघ्र बाहेर शीघ्र ये! ३४

मेषरूपासि सोडोनी, जोडोनी निजविग्रहा,
फोडोनि मुनिचा देह ये, आत न सख्या! रहा" ३५

अगस्त्य तेधवा मद करोनी स्मित बोलला
"तुझा भ्राता जिरविला उदरें मम इल्वला! ३६

उन्मत्तता वा मेषता वा मुकला तव सोदर,
पावला पचता मात्र मरणाहें खरोखर. ३७

भस्मपेषण म्या केलें, मेषता नष्ट जाहली,
निःशेष म्या जिरविली तच्छरीरकणावली ३८

पापी निमग्न जो मर्त्य तो पावे नित्य हे स्थिति,
आरंभिली तया भासु, न तया बहु मानिती ३९

तुमचें छद्म मी जाणें, शठ दोघे तुह्मी खरे,
माझ्यापुढें परि कसें तुमचें शाठ्य ते ठरे ! ४०

तुह्मी काच हिरा मीही, तुह्मी पर्वत मी वट,
दोघे मतंगज तुह्मी, मी मृगाधिप उत्सट. ४१

महाशठा मज कसे फसवाल तुह्मी शठ?
मृगेंद्राच्या पुढे कैसा कलभांचा टिके हठ !" ४२

शब्द हे ऐकतां धांवे अगस्त्यावरि इल्वल,
परि त्यासि मुनिश्रेष्ठ जगों नचि दिले पल. ४३

नेत्रवह्निवलें दैत्य जाळी तो मुनिनायक,
पुरांतकें जसा पूर्वी जाळिला पंचसायक. ४४

दैत्यनाशें हरपल्या मुनींच्या घोर आपदा,
दण्डकारण्य ह्यायोगें योग्य वासास हो तदा ४५

वातापील्वलनाशातें बघतां देव हर्पले,
कल्पपुष्प सुगंधाढ्य जलातें मेघ वर्पले. ४६

जिकडेतिकडे झाला तदा आनन्दनिर्भर,
सर्वांचीं दिसलीं वक्रें फुल्लपद्मविकस्वर ४७

मुनिपीडा जयां गोड पहाया वा करावया
पळाले सर्व ते नीच राहिले न वनांत या. ४८

दैत्यांच्या निधनें झालें दण्डकावन निर्भय,
स्वाश्रमी राहते झाले सुखें मुनि महाशय. ४९

पीडादायक यत्पराक्रम असे तो दण्ड्य होतो नर,
हा जो इल्वलवृत्त बोध करि, तो पावो जनीं आदर,
साधुक्लेश सरो, सुखें जग भरो, हो प्रेम वृद्धिगत,
हा विद्याधरही उमात्मज कवी लाहो शमा संतत. ५०

# डा० आनंदीबाई जोशी.

[ ९ व्या अंकावरून चालू. ]

आणखी कांहीं उतारे —

"मी तिकडे येण्याचें विसरून जावें,' ह्मणून जें लिहिलें तें मला बरोबर दिसत नाही' · · · मी इकडे ज्या कामाकरितां आले, तें येथें राहून पूर्ण होणार नाही ज्या कामास मी कर्तव्य समजतें तें येथें राहून होणें नाहीं ·· ···· · मी जें एकदा करीन ह्मटलें, त्याला कितीहि विघ्नें आलीं तरी होईल तोपर्यंत ढकलीत नेणार, असा दृढनिश्चय केला आहे त्यांत आतां अंतर होणें सुखकारक होणार नाहीं आपण इकडे आल्यास परत जाणार नाही, असें आपलें निश्चयाचें बोलणें ऐकून जरासें वाईट वाटतें ······· आपला निश्चय फिरवायाचा नसल्यास आपण चार वर्षांकरितां इकडे येऊन कधींच माघारें जाणार नाही, असें होण्यापेक्षां आपण येण्याचेंच तहकूब करावें हें बरें चार वर्षें कशींतरी काढीन, माझें धैर्य बिलकूल खचलें नाहीं आपण आपला शब्द परत घेऊन इकडे येऊन देश पाहून मजबरोबर परत जाणार असल्यास सधी सांपडल्याबरोबर निघून यावें · ·· आपण इकडे घर करून राहिल्यानें तिकडचे लोकांस किंत्ता तो कशाचा घालून देणार? आपस्वार्थीपणाच की नाही? तर तो सर्वमान्य नाहीं सज्जन त्यास मान देत नाहीत' त्याची दुर्गुणांत गणना केली आहे. · · · खरा कित्ता घालण्याची जागा अमेरिका नव्हे. योग्य कित्ता घालण्यास हिंदुस्थानापेक्षां दुसरा योग्य देश सांपडेल की नाही, याची शंका आहे ··· चार वर्षांच्या अभ्यासानें होईल तितकी पूर्णता पावून तिकडचा मार्ग धरायचा" (पृ० २८२)

"आपण माझ्या आनंदांत भागीदार व्हावें, परंतु दुःखांत होऊं नये. · सर्व दुःखें मी एकटी सोसण्यास तयार आहें परंतु सर्व सुखें मात्र आपणाजवळ असतांनाच मिळावीं दुसऱ्यानीं दुःख सोसलेलें पहाण्यापेक्षा तें स्वतः सोसणें मला बरें वाटतें. · · आपल्या नेहमीच्या उतावळेपणामुळें मला आपल्याविषयीं फारच काळजी लागते ··· ··· आपण मन्याम धरून असावें या जगांत कोणतीहि गोष्ट त्याच्या आड येत-

देऊ नये सत्यापेक्षां श्रेष्ट दुसरे कांहीं नाहीं.······ ·जरी आपली कृति लोकास कळत नाहीं, तरी ईश्वरास व आपल्या मनास ती कळतेच कुवर्तन आपणास माहीत असते व मनाला खात असेत, तरी त्याकडे वळणारी एक शक्ति आहे. तिचा जोर इतका असतो कीं, तिच्यापुढे इतर सर्व गोष्टींचा लोप होऊन जातो ·· · असुक एक गोष्ट वाईट आहे, अशाविषयीं आपले मन आपल्याला खात असून जर आपण ती गोष्ट केली, तर ईश्वराचा अपमान केल्यासारखे होते व शिवाय असली गोष्ट ज्यांनां मी अगदीं जिवापलीकडे समजते त्यांच्या हातून झाली असे समजल्यावर तर फारच वाईट वाटतें." ( पृ० २८६ )

"माझीं सर्व पत्रे व मजविषयीं वर्तमानपत्रांतील मजकूर अशी सर्व एकत्र करून एक बूक छापून काढावे, असा आपला हेतू आहे.········ असे करणे मला रास्त दिसत नाहीं. यापासून फारच हसू होणार आहे. मजविषयीं चागले ह्मणणारे जितके आहेत, तितकेच किंबहुना अधिकच वाईट ह्मणणारे असतील. दुसरे, आपण जे करितो ते दाखविण्याकरितां नाहीं. आपणच होऊन आपल्या भोंवतालीं दिवा मिरविल्यास लोक कांहीं नको ह्मणणार नाहींत, परंतु त्यांत वैभव ते कोणते ? · ···· आपण आजपर्यंत अशा रीतीनें हंसू करून घेतले नाहीं व हीच 'पण' सदोदित चालेल, अशी त्या जगन्नियन्त्यापाशीं माझी रात्रंदिवस प्रार्थना आहे.········ मी अद्याप कांहींच केले नाहीं ह्मटले तरी चालेल. परतु काय सांगू; मला वाटते कीं, माझे हातीं अतिशय जोखमीचे काम आहे. त्या कामाची फारच मोठी जबाबदारी मजवर आहे, व प्रत्येक पाऊल पुढे टाकण्यापूर्वी मला दूरवर विचार केला पाहिजे ही जबाबदारी कोणी मला दिली आहे असे नाहीं. तर स्वत· लादून घेतली आहे व त्यांत माझे सर्व सुख आहे.···· ···· आपण उभयतां हा देश पाहून मग परत जाऊ.······धीर धरा. उतावीळ करून उपयोग नाहीं. अविचारानें कोणतेहि काम करतां कामा नये. आपण राजीनामा देऊ नये. चाकरी सोडूं नये " (पृ० २९५)

"हे पक्के लक्ष्यांत ठेवा कीं, परमेश्वराला आपली काळजी आहे. रमाबाई ही आनंदीबाई नव्हे व आनंदीबाई रमाबाई नव्हे त्या दोन निरनिराळ्या व्यक्ती, निरनिराळ्या कामाकरितांच केल्या आहेत. मी मेले तर बेहत्तर, पण समजुतीच्या विरुद्ध जाणार नाहीं लोक कशाकरितां माझा

संशय घेतात, व माझें पाऊल कोणत्या कामांत मागे पडलें हें मला समजत नाहीं! लोकाचा राग, द्वेष, अथवा कुचकेपणा याचें मला किंचितहि वाईट वाटत नाहीं" (पृ० २९९)

यावरुन आनंदीबाईच्या पाठीमागें लोकाचा कसा एकसारखा ससेमिरा लागला होता याची चांगली कल्पना करता येण्यासारखी आहे

मी आपला पोषाक, खाणेपिणे, फारच शुद्ध ठेवले आहे. म्हणजे हुबेहुब हिंदुस्थानचा थाट! मी मूर्तिमंत मांसाहारी लोकांच्या देशांत आहे, तथापि मी जशीच्या तशीच आहे ··· मी तर त्यांचे अन्न खातच नाही, परंतु त्यांना मात्र माझें खाण्यास लावते मी कधीं कधी त्यांच्याकरिताहि स्वयंपाक करतें तो त्यांना फारच आवडतो · · एके दिवशी मावशी (कार्पेन्टरबाई) आमी, हेलना, मिसेस डेडन् तिची कन्या व आणखी एक-दोन अशी सर्वजणे लुगडीं नेसली व कुंकू वगैरे लावून थेट हिंदु बनली!! वरान साडी नेसण्याचे मोठेंच प्रस्थ माजले आहे, बाहुल्यासुद्धां साड्या मागतात! मी सर्वांची नावे बदलून त्याच अर्थाचीं मराठी नावे ठेविली म्हणजे हेलनाचें तारा, मिसेस सुअर्टचें सगुणा, आमीचें प्रमिला वगैरे ······ हीं सर्व सकाळीं उठल्यावर 'गुडमॉर्निंग' बद्दल 'नमस्कार' करितात याप्रमाणे व्यवस्था आहे" (पृ० ३०५)

"मला आता वियोग कठीणसा वाटू लागला आहे ·· ही शुष्क पत्रे आपणाविषयींचे माझे प्रेम व्यक्त करू शकतील काय? त्यांचेकडे तितक्याच प्रेमदृष्टीने बघितल्याशिवाय त्याच्यांत ते सामर्थ्य येणार नाही ······ मी आपल्याबरोबर अंधारकोठडींत जरी असलें, तरी ज्या मला सुख वाटतें, तीच मी जर एखाद्या राजमंदिरांत एकटी राहिले, तर तें होणार नाहीं!!!" (पृ० ३१३).

"या जगात आपली जागा कशानेच भरली जाणार नाही आपल्या शब्दसामर्थ्यानें आपण मजसाठीं काय काय केलें, हें मी जाणून व त्याविषयीं कृतज्ञ नाहीं काय? आपण माझे नेते, शास्ते, समाधानकर्ते व त्राते आहां, इतकेंच नव्हे, तर आपण मला गुलामगिरींतून मुक्त करून स्त्रियांच्या उत्तम पदवीप्रत नेऊन ठेवले आहे!!! व त्यामुळें मी सदोदित कृतज्ञ राहीन 'मला आता आपला उपदेश नको आहे' या शब्दांनीं मला फार,

वाईट वाटले जेव्हां माझ्या पोरकट डोक्यांत अशा प्रकारचे विचार येतील, तेव्हां मी आपल्या स्वताला नीचापेक्षां नीच व अधमापेक्षां अधम समजेन ! जर मी आतां सर्वज्ञ झाले असा विचार माझे मनांत आला, तर माझा शेवटच झाला असे मी समजेन !…जें काय आपणास वाटतें, ते मोकळेपणीं आपण एकमेकांशीं बोलून अशाच तऱ्हेनें सत्य कोणतें ते ठरवूं " ( पृ० ३२३ ).

"व्यक्तिस्वातंत्र्य सोडून द्यावे असे माझे मुळींच ह्मणणे नाहीं; परंतु मी जे काय आपणास सांगते व सांगणार, तिकडे मात्र लक्ष्य द्यावे " आपण अगदीं स्वतंत्रपणे वागावे व स्वताच्या मताप्रमाणे काय करणे ते करावे.… मोकळीक, व्यक्ति-स्वातंत्र्य व शूरपणा, या सर्वांस मी फार मान देते.… सवत्र ते मजकरितां व या जगाकरितां तरी राखून ठेवा " ( पृ० ३३३ ).

वरील सर्व उताऱ्यावरून, आनदीबाईनी अमेरिकेत घालविलेल्या तीनचार वर्षांत त्यांच्या मनाची एकदर स्थिति कशी होती व त्यास कोणकोणत्या परिस्थितीतून पार पडावे लागलें, याची वाचकास पूर्ण कल्पना होईल मिशनरी लोकानीतर आनदीबाईस अति त्रास दिला परतु त्याचे हेतू सफल झाले नाहींत यासबधाने एका मोठ्या पाद्र्यानें पुढील उद्गार काढले आहेत—

"मिसेस् जोशी ही ज्या दिवशीं येथे येऊन उतरली, तशीच या वटके-पर्यंत आहे तिच्यांत अणुमात्र बदल झाला नाहीं; आणि ती तशीच स्वदेशीं परत गेली तर ही गोष्ट खिस्ती धर्माला खरोखर लाजिरवाणी होणार आहे "

कोण विघ्नसंतोषीपणा हा ! असे वर्तन करणें हें मिशनऱ्याचे शीलच आहे; परतु आनदीबाई रमाबाईप्रमाणे त्याच्या जाळ्यात सापडल्या नाहींत, हेच कायते विशेष आहे तीन वर्षांत आनदीबाईचा विद्यालयातील अभ्यासक्रम पुरा झाला व त्यांस पदवी मिळण्याची वेळ जवळ येऊन ठेपली पदवीदानाच्या समा-रंभाचे वेळी गोपाळराव आपणाजवळ असावेत, अशी आनदीबाईची अगोदर-पासूनच इच्छा होती व तदनुरूप त्यानी गोपाळरावास कळविलेंहि होतें गोपाळ-रावासहि आनदीबाईस भेटण्याची फार उत्सुकता उत्पन्न झाली होती ह्मणून त्यानीं, आनदीबाईस तीन वर्षांस पुरतील इतके पैसे पोचताच हिंदुस्थानास रामराम ठोकला, तो कायमचाच व्हावयाचा, परतु आनदीबाईच्या आजारामुळें त्याना परत स्वदेशीं येणें भाग पडले ! गोपाळराव प्रत्यागमन निघाले त्या वेळी त्यानी बरोबर पैसा अडका काहींएक घेतला नव्हता वाटेत व्याख्याने देऊन

व प्रसगीं कष्टाचे काम करून त्यानीं ब्रह्मदेश, चीन व अमेरिका येथे प्रवास केला। यावरून त्याच्या साहसी स्वभावाची स्पष्ट कल्पना होते हिंदुस्थानच्या लोकास अशा प्रकारच्या साहसबुद्धीची फार अपेक्षा आहे गोपाळरावाच्या अगी जरी अनेक दोष होते, तरी विलक्षण धैर्य, साहस व बोलकेपणा वगैरे जे दोनतीन गुण त्यास अनुकूल होते, त्यामुळें त्यास जगात आपला मार्ग काढण्यास कोठेहि फारशी अडचण पडत नसे चीनमध्ये असता गोपाळराव आजारी पडले व तेथ त्याचे बरेच हाल झाले, परतु त्यानी त्यास दाद न देता पुढील मार्ग आक्रमिला। औषध ह्मणून राकेल तेल ते ह्याच प्रसगीं अविचाराने प्याले !! असो

गोपाळराव प्रवास करितकरित आनदीबाईच्या पदवीदानसमारभाचे पूर्वी अमेरिकेस येऊन पोहोचले फिलाडेल्फिया येथील कॉलेजची डीन मिस बाडले ह्याना, रमाबाईस भेटण्याची फार इच्छा होती तेव्हा त्यानीं ह्याच सधीस त्याना बोलावणें केलें रमाबाई ह्या वेळेस लडन शहरीं होत्या त्याचे हलीचे स्वरुप त्या वेळेस बाहेर पडलें नव्हतें, सबब आनदीबाईसहि रमाबाईस पहाण्याची उत्कठा झाली रमाबाईजवळ पुरेसे पैसे नव्हते, ते बॉडलेबाईंनी पाठविताच त्या आपल्या मुलीसह फिलाडेल्फिया येथें निघून आल्या पदवीदानसमारभ होण्यापूर्वी आनदीबाई फिरून एकवार डिफथेरियाने आजारी होत्या परतु त्यातून त्या पुन्हा एकवार बऱ्या झाल्या गोपाळराव अमेरिकेस आल्यापासून पदवीदान-समारभ होईपर्यंत मध्यतरी बराच काल गेला, तेवढ्यात ते अमेरिकेतली इतर शहरें पाहून आले पदवीदानसमारभ १८८६ च्या मार्च महिन्याच्या ११ व्या तारखेस मोठ्या थाटानें पार पडला व त्यानतर गोपाळराव व आनदीबाई यानी काहीं महिने मोठ्या आनदात घालविले परतु हा आनद फार दिवस टिकला नाहीं पदवी मिळाल्यावर एक वर्ष दवाखान्यात उमेदवारी करून मग स्वदेशी जावे, असा आनदीबाईचा पुष्कळ दिवसापासूनचा बेत होता व तदनुसार त्या एका दवा-खान्यात कामहि करू लागल्या होत्या परतु त्याची प्रकृती जी दिवसानुदिवस बिघडत चालली होती ती दवाखान्यात काहीं महिने काम केल्यावर जास्तच बिघडली तथापि आपली प्रकृती अनावर होऊन लवकरच आपला अत होईल, असें आनदीबाईस मुळींच वाटले नाहीं त्याचे पुढील बेत एकसारखे चालूच होते. हिंदुस्थानात स्त्रियाकरिता एखादे वैद्यक शिकविण्याचे विद्यालय व लहान लहान पोरक्या मुलाकरता अनाथाश्रम याची स्थापना करण्याचें त्याच्या फार मनात होतें.

आणि हें काम करण्याविषयीं त्या अगदीं उत्सुक झाल्या होत्या परंतु ईश्वरी सूत्र कांहीं निराळें असल्यामुळें त्यांचे हेतू सफल झाले नाहींत! प्रकृती सुधारण्याकरितां त्यांनी अमेरिकेंत अनेक वैद्यकीय उपाय केले, हवा पालटण्याकरितां स्थलांतरें केली; तरीदेखील त्यांस चांगला आराम वाटेना तेव्हां स्वदेशीं गेल्यावाचून प्रकृती बरी व्हावयाची नाहीं, असें त्यांस वाटूं लागलें त्यांच्या हितचिंतकांचेंहि असेंच मत पडलें. शिवाय या सुमारास त्यांना कोल्हापूर दरबाराकडून त्या संस्थानांतील दवाखान्यांत नोकरी करण्यास येण्याविषयीं निमंत्रण आलें. यामुळें स्वदेशीं लवकरच जाण्याचा बेत नक्की ठरला स्वदेशीं जाण्यापूर्वी आनंदीबाईंनीं आपल्या सासूस एक पत्र लिहिलें आहे; त्यांतील कांहीं भाग येथें उतरून घेतों त्यावरून आपल्या कुटुंबांतील इतर मनुष्यांविषयीं त्यांस किती काळजी होती, हें समजून येणार आहे. अलीकडील शिकलेल्या स्त्रियांनी ह्या पत्रांतला मजकूर ध्यानांत ठेवून त्यापासून पुष्कळ बोध शिकण्यासारखा आहे

"आपली खरी स्थिति कळून फारच दुःख झालें.··· ···· मी आणखी सहा महिन्यानीं स्वदेशीं येईन. त्या वेळीं आपण, रावजी भावोजी, अप्पा भावोजी व यमुना इतक्यांनीं येऊन मजपाशीं रहावें. मला जी कांहीं भीठभाकर मिळेल ती आपलीच आहे. आपण वडिलांच्या नात्यानें घराची देखरेख करावी वडिलांना वृद्ध वयांत दगदग मुळींच होणार नाहीं म्हणून घरांत आपल्या देखरेखीखालीं एक स्वयंपाकीण व एक कुणबीण ठेवावी, असें माझ्या विचारांत आहे. ········आपणास माझे जिवांत जीव आहे तोंपर्यंत कांहीं कमी पडणार नाहीं. माझे मनांत अप्पा भावोजींनीं फोटोग्राफीचा चांगला अभ्यास करावा ······· रावजी भावोजींनी फार्मसी व रसायनशास्त्र यांचा चांगला अभ्यास करावा, असें माझें मत आहे. तसें केल्यानें एकतरी स्वदेशीय 'फार्मसिस्ट' होईल त्यांनीं एक स्वदेशीय दवाखाना घालावा चि० सौ० यमुना मजपाशीं राहिल्यानें तिचाहि अभ्यास झाला तर बराच होईल माझ्या मनांत तिला थोडेबहुततरी विद्याज्ञान द्यावें असें आहे" ( पृ० ३५२ ).

याप्रमाणें आनंदीबाईचे भावी बेत चालले होते. स्वदेशीं जाण्यास आनंदीबाई अगदीं उत्सुक झाल्या होत्या; परंतु प्रवासाचे श्रम सहन करण्याइतकी त्यांची प्रकृती अद्याप दुरुस्त झाली नव्हती त्यांस चांगला आराम पडावा म्हणून डोंगरी हवेंतील एखाद्या ठिकाणीं जाऊन रहाण्याविषयीं वैद्यानें सल्ला दिली होती. व तदनुसार त्या डिलावरको नावाच्या शहरीं रहाण्यास जाण्याकरितां ता० ,१०

जुलै १८८६ रोजीं रोसेलहून निघाल्या त्याच्यावरोबर कार्पेन्टरबाईंची मुलगी आमी ही सोबत गेली होती डिलावरको येथें पोंहोंचल्यावर आनंदीबाईस बराच आराम वाटला व त्याची प्रकृती सुधारण्याची आशा वाटू लागली. तोंच २० जुलईच्या सुमारास त्यांना हिंवतापानें पुन्हा पछाडलें! अशा प्रकारची त्याची अवस्था असतां, त्यास एके दिवशीं एका अडलेल्या बाळंतिणीस सोडविण्यास जावें लागलें. तेथें १० तास सारखें काम करावें लागल्यामुळें त्यास फार थकवा आला, तशांत परत येत असतां त्यास पावसानें भिजविलें, यामुळें दुखणें वाटलें हा त्याच्या श्रमामुळेंच त्याची प्रकृती कायमची अनावर झाली, असें बहुतेकांचें मत आहे याच सुमारास कोल्हापुराहून लवकर येण्याविषयीं आनंदीबाईंस पत्र आलें, त्यामुळें आनंदीबाईस अमेरिकेंत जास्त रहातां येईना तेव्हां त्यांनीं पुढच्या जानेवारीच्या आंतच हिंदुस्थानास जाण्याचा निश्चय केला आनंदीबाईंची प्रकृती दुरुस्त होत नाहीं, हें पाहून गोपाळरावास फार काळजी उत्पन्न झाली व त्याचें लक्ष्य आतां कोणत्याहि गोष्टीकडे लागेनासें झालें. प्रथम त्याचे मनांत आनंदीबाईबरोबर हिंदुस्थानांत जावयाचें नसून ते आणखी कांहीं दिवस युरोपांत फिरणार होते परंतु आनंदीबाईंच्या प्रकृतीचें मान जेव्हां ठाक दिसेना, तेव्हां त्यांनीं त्याच्याबरोबर स्वदेशीं जाण्याचें ठरविलें आनंदीबाईंनी [illegible] एकत्र कांहीं दिवस काटल्यानंतर त्या औषध घेण्याकरितां फिलाडेल्फिया येथील [illegible] दवाखान्यांत येऊन राहिल्या परंतु तेथेंहि त्यास बरें वाटलें नाहीं तेव्हां पुन्हा त्या एका डोंगरावरील शहरांत रहाण्यास गेल्या, तेथें मात्र त्यांना [illegible] बरें वाटलें याप्रबंधानें त्यांनीं आपल्या सासूस पुढील मजकूर लिहिला आहे —

"मी [illegible] एका डोंगरावर आहे ⋯ ⋯हवा फार चांगली आहे मी अतिशय अशक्त झालें होतें. भूक नव्हती व शक्तिहि नव्हती रात्रंदिवस [illegible] काम केल्याचा हा परिणाम त्यानंतर हिंवताप लागला होता [illegible] एकदोघांनीं औषध दिलें, त्यांनीं गुण मुळींच आला नाहीं. [illegible] होत नाहीं तेव्हां मी आपलें औषध घेण्यास आरंभ केला ⋯ ⋯ [illegible] नाहीं, पण तापहि आला नाहीं [illegible] ⋯ थोड्याच दिवसांनी माझी [illegible]"

याप्रमाणे थोडीशी हुपारी वाटतांच आनंदीबाई हिंदुस्थानास जाण्याकरितां रोसेल येथें सपटेंबर महिन्यांत येऊन दाखल झाल्या. ह्या वेळपर्यंत त्यांच्या फुफ्फुसाला रोगाचा स्पर्श झाला नव्हता म्हणून त्यांना व त्यांच्या इष्टमित्रांस त्यांची प्रकृती अजूनहि सुधारेल असें वाटत होतें परंतु रोसेल येथे आल्यावर वैद्यानें त्यांची तपासणी करून एका फुफ्फुसाला धक्का बसल्याचें वृत्त जेव्हा त्यास कळविलें तेव्हां मात्र सर्वांस मोठी चिंता उत्पन्न झाली व दुखणें आवरणें कठीण, असें वाटूं लागलें. तथापी आनंदीबाईंनी आपली निराशा बाहेर व्यक्त केली नाहीं. त्यानां अजूनहि पुण्यातील बापुसाहेब मेहेंदळ्याच्या औषधानें गुण येईल असें वाटत होतें! हिंदुस्थानात जाण्याची सर्व तयारी झाल्यावर ता० ९ आक्टोबर १८८६ रोजीं आनंदीबाई गोपाळरावासह न्युयॉर्क येथें येऊन पोहोंचल्या. त्यास पोंचविण्यास रमाबाई व कार्पेन्टरबाई यांचें सर्व कुटुंब आलें होतें आनंदीबाईंचा व कार्पेन्टरबाईंचा चार वर्षांचा सहवास असल्यामुळें परस्परांना परस्पराचा वियोग होणार म्हणून फार दु:ख होत होते मी पुन्हा अमेरिकेस येईन अशी आनंदीबाईस अजून आशा वाटत होती व त्याप्रमाणे त्यांनी आपल्या सर्व स्नेहीमंडळीस कळविलेंहि! परंतु कार्पेन्टरबाईंस, पुन्हा भेटीचा योग येईलच अशी खात्री वाटत नव्हती यामुळें त्यांना व त्यांच्या मुलींना या वियोगसमयीं फार दु:ख होत होतें आनंदीबाई जशा उत्साहाने आल्या तशाच उत्साहाने व निरोगी स्थितीत परत जाव्या, असा त्यांचा फार हेतु होता, पण भवितव्यतेपुढे कोणाचा इलाज चालणार? सरतेशेवटी गोपाळराव व आनंदीबाई ही सर्वांचा निरोप घेऊन इट्रूरिया नावाच्या लंडनास जाणाऱ्या नौकेंत बसलीं अमेरिकेचा किनारा सोडल्यापासून तों हिंदुस्थानात येईपर्यंत आनंदीबाईंची प्रकृती अस्वस्थच होती यामुळे त्यांना व गोपाळरावांना वाटेत फार त्रास झाला व हाल भोगावे लागले. गोपाळरावास आनंदीबाईंची शुश्रूषा करताकरता इतका थकवा आला कीं, ते स्वत: थोडेसे आजारी झाले. या प्रवासात असता गोपाळरावांनी कार्पेन्टरबाईस जी पत्रें पाठविलीं आहेत त्या सर्वांतून आनंदीबाईंच्या आजारावाचून दुसरा मजकूर क्वचितच सापडतो ही पत्रें फारच हृदयद्रावक आहेत ती वाचून पाषाणहृदयी मनुष्याच्या अंतःकरणासदेखील पाझर फुटल्यावाचून रहाणार नाहीं!

हे कुटुंब ह्याप्रमाणें हाल भोगित ता० १६ नोव्हेंबर १८८६ रोजी मुंबईस येऊन पोहोंचले स्वदेशभूमीवर पाय ठेवताच आनंदीबाईंनी गुजराथी पोषाख बदलून ब्राह्मणी पोषाख केला! ह्या वेळी त्यांच्या प्रकृतीस थोडासा आराम पडला

होता व स्वदेशभूमीवर पाय ठेवताच त्याना जो आनद झाला त्या आनदाच्या भरात त्याना एकप्रकारचें अवसानहि आलें होतें यामुळें मुळच्या अशक्तपणास त्यांनी त्या वेळेस दाद दिली नाहीं आनदीबाईना अगोदरच विलायतेंतील लोकानी तयार केलेलें मळमळीत अन्न आवडत नव्हतें तशात आतातर दुखण्यामुळे त्याच्या तोंडाची रुचीच नाहींशी झाली होती यामुळें बोटीत असता त्यानी अन्नसेवन फारसें कधीं केलेंच नाहीं त्याची वासना देशी अन्नावर गेली होती व झुणकाची आमटी, भाजी, भाकरी कधीं एकदा खावयास मिळेल, असें त्यास झालें होतें परतु मुबईस असताना त्याचा हा हेतू सफल झाला नाहीं! आनदीबाई मुबईस आल्यावर पुष्कळानीं त्याचें चागल्या तऱ्हेनें आगतस्वागत केलें व कित्येक वर्तमानपत्रानीं प्रोत्साहनपर लेख लिहिले नगर, नेवासें वगैरे ठिकाणाहून त्यास मानपत्रेंहि मिळालीं हें सर्व ठीक झालें, परतु स्वदेशी आल्यावर आपली प्रकृती सुधारेल असें जें आनदीबाईस वाटत होते तें अनुभवास येईना शेवटी 'घाटावरची हवा बरी' असा मुबईच्या वैद्यानी सल्ला दिल्यामुळें गोपाळरावानी त्यास पुण्यास नेलें पुण्यास गेल्यावर त्याची आप्तमडळी त्याच्याजवळ जमा झाली व आनदीबाई परक्या देशात गेल्याबद्दल त्यापैकीं कित्येकास वैषम्य वाटत असताहि त्यानी त्या वेळेस आनदीबाईकडे प्रेमदृष्टीनेच पाहिलें! पुण्यात येऊन दोन अडीच महिने झाले, तरी आनदीबाईच्या प्रकृतीस आराम पडेना कधीं [illegible] तर [illegible] जास्ती, असा प्रकार होई ज्या बापुसाहेब मेहेंदळ्याच्या भरवशावर आनदीबाई अवलबून होत्या त्या गृहस्थानें त्याना औषध देण्याचें नाकारलें! याचें कारण केवळ त्या गृहस्थाचा चमत्कारिकपणा हेच होय ! आनदीबाई स्त्री असता अमेरिकेस गेल्या व विद्या शिकल्या, या एवढ्या गोष्टीमुळें त्याचें मन [illegible] इतकें कलुषित झालें होतें कीं, मोठमोठ्या लोकाच्या मध्यस्तीसहि [illegible] मान दिला नाहीं! धिक्कार असो अशा स्वभावाला! [illegible] औषध देण्याचें नाकारल्यावर दुसऱ्या एका चागल्या वैद्याचें औषध [illegible] परतु आनदीबाईची प्रकृती आता इतकी बिघडली होती की, [illegible] औषधानें त्या बऱ्या होण्यासारख्या नव्हत्या अशा स्थितीत [illegible] आनदीबाईस अवळ बरें वाटलें व प्रकृती सुधरण्याची [illegible] लागली [illegible] गोपाळरावानीं हें वृत्त कार्पेन्टरबाईस कळविलें [illegible] न लोटतात तोंच आनदीबाईच्या [illegible] त्यानंतर [illegible] ता० २६ फेब्रुवारी १८८७ रोजीं [illegible] जन्म [illegible] त्याच जागीं त्याचें देहावसान झालें ||

डा० आनंदीबाई जोशी यांचें हें अकालिक निधनवृत्त ऐकून महाराष्ट्रांतील लोकांस अतोनात दुःख झालें हें उघडच आहे, ज्या स्त्रीनें अनेक प्रकारचा लोकापवाद सोसून, द्रव्याची फारशी अनुकूलता नसतां शिक्षणाकरिता अमेरिकेसारख्या परक्या देशांत जाण्याचें धाडस केलें व तेथेंहि अनेक प्रकारच्या आपत्ती भोगाव्या लागल्या असतां त्यास न डगमगतां आपलें शिक्षण पुरें केलें; जिनें अमेरिकेसारख्या देशांत राहूनहि आपले आचारविचार व धर्मसमजुती कायम ठेवल्या इतकेंच नव्हे, तर तिकडल्या लोकांस इकडचें वळण लावलें, जिच्या सद्गुणांस्तव मिसेस कार्पेन्टर व इतर कांहीं परक्या लोकांनीं धन्योद्गार काढले व मिशनऱ्यांचेंहि जिच्यापुढें तेज पडलें नाहीं, कर्तव्यप्रीति, देशाभिमान, राष्ट्रहित या विषयासंबंधानें जिनें खोल विचार केला होता व यासंबंधीं जिचीं मतें उन्नत प्रकारचीं होतीं, जिनें आपलें आयुष्य स्वदेशांतील लोकांच्या कारणीं लावावयाचें असा आरंभापासून निश्चय केला होता व तदनुसार वैद्यकीच्या धंद्यांत पारंगत होऊन जी स्वदेशांत निघून आली, आणि हें सर्व जिनें २२ वर्षांच्या आंत साधलें, त्या स्त्रीचा असा प्रकारें अंत झालेला पाहून कोणास वाईट वाटणार नाहीं ? कार्पेन्टरबाईस हें वृत्त कळताच त्यांच्या कुटुंबासतर फार वाईट वाटलेंच, पण तेथील इतर कांहीं लोकांसहि वाईट वाटलें. आनंदीबाईच्या मृत्यूनें आमच्या देशाचें खरोखर फार मोठें नुकसान झालें आहे त्यांच्या मागून पुष्कळ स्त्रियांनीं उच्च प्रकारचें शिक्षण मिळविलें, पण त्यांची सर एकीसहि नाहीं. त्या असत्या तर त्यांनीं आपल्या सुशिक्षित व अशिक्षित भगिनींस उत्तम प्रकारचा कित्ता घालून दिला असता, यांत शंका नाहीं आनंदीबाईच्या मृत्यूनंतर गोपाळरावांस कांहीं सुचेनासें झालें व त्यांच्या वृत्तीस चळ लागला

बावीस वर्षांच्या आंत इतकी मोठी योग्यता संपादन करून तिचा लोकाप्रीत्यर्थ उपयोग करण्याची वेळ येते न येते तोंच आनंदीबाईचा अंत झालेला पाहून, ड्रायडन कवीनें अशाच प्रसंगीं एका स्त्रीसंबंधानें काढलेल्या उद्गाराची आम्हास आठवण होते. तेच उद्गार आनंदीबाईसहि पूर्णपणें लागू पडण्यासारखे असल्यामुळें ते येथें देऊन त्यांचा हा दुःखदायक वृत्तांत पुरा करितों ते उद्गार असे —

As precious gems are not for lasting fire,
They but perfume the temple and expire,
So was she soon exhaled, and vanished hence,
A short sweet odour of a vast expance.

—DRYDEN.

## उपसंहार.

याप्रमाणें, आनंदीबाईचें चरित्र लक्ष्यपूर्वक वाचल्यावर आह्मांस त्यासबंधी जे जे विचार सुचले, ते आजपर्यंत सविस्तरपणें महाराष्ट्र वाचकास सादर केले आहेत तसेंच हे विचार त्यास नीट कळावेत ह्मणून आनंदीबाईच्या चरित्राचें कथासूत्रहि त्याबरोबर जोडलें आहे प्रस्तुत लेखात प्रदर्शित केलेले सर्व विचार सर्वांसच आवडतील असें नाही, तथापि प्रत्यक्षानें त्याबद्दल आपल्या मनाशी विचार करावा अशी सर्वांस आमची सूचना आहे

आह्मीं केलेल्या विवेचनात, चरित्रलेखक व चरित्रनायिका ह्यासबधानें फारसा विरुद्ध मजकूर न आल्यामुळें आह्मी पक्षपात केला असें कोणास वाटेल तर त्यास आमचें एवढेच सांगणें आहे की, त्यानें निष्पक्षपात बुद्धीनें सदर ग्रंथ लक्ष्यपूर्वक वाचावा मग आमचें प्रतिपादन बरोबर आहे की नाहीं हें पहाण्यास सिद्ध व्हावें.

प्रस्तुत टीकेंत ग्रंथकार व चरित्रनायिका यासबधानें जिकडेतिकडे जो प्रशसनीय मजकूर आढळतो त्यास कारण त्या उभयताची कृतीच होय आह्मी फाजील प्रेम कोणासबधानेंहि व्यक्त केलें नाहीं आणि तसें करण्याचें आह्मास काहीं कारणहि नव्हते सदर दोन्ही व्यक्तीस आह्मी स्वत मुळींच ओळखित नाहीं, व त्यातील एकतर निंदा व स्तुती याच्या आटोक्याच्या बाहेर गेलेली आहे ' तेव्हा त्याच्या सबधानें आमच्या ह्यातून पक्षपात होणें अशक्य आहे ग्रंथकाराविषयीं विचार केला तर त्याच्या जातींत त्याच्या इतके सुबक मराठी लिहिणारीण फारच क्वचित् सापडेल त्याच्या प्रस्तुत ग्रंथात, थोड्या ठिकाणी विसगतपणा, पुनरावृत्ती, विस्कळित वाक्यरचना असे काहीं दोष आहेत परंतु सबंध पुस्तकाच्या मानानें पहाता असे दोष फार थोडे असून एकदर लेखनपद्धती फार मनोरम व सुगम अशीच आहे पुरुषापेक्षा स्त्रियामध्यें सामान्यत. जें मार्दव वास करित असतें ते प्रस्तुत पुस्तकातील भाषेंत चागलें उतरलें आहे तें ह्या भाषेतील एक विशेषच आहे असें ह्मटलेंतरी चालेल चरित्रनायिकेसबधीं विचार केला, तर त्या अगदीं निर्दोषी असतील असें आह्मी ह्मणत नाहीं परंतु त्यानीं ह्या जगात जो अल्पकाल घालविला तेवढ्या अवकाशात त्याच्या अगचे—जर काहीं असले तर—दोष निदर्शनास आले नाहींत वास्तविक पहाता त्यानीं एवढ्या काळात जो अव्याहत उद्योग केला त्यात त्याचें मन एकसारखें गुतून राहिलें असल्यामुळें त्याच्या अगचे दोष स्पष्टपणें बाहेर येण्यास अवकाशच नव्हता त्या जर आणखी

कांहीं दिवस जगल्या तर मानवी स्वभावास अनुसरून कदाचित् त्यांच्या हातून कांहीं चुका झाल्या असत्या व त्यांचे दोषहि बाहेर पडते परंतु त्यांचा अकालीं अंत झाल्यामुळें त्यांचे अमोल गुण व भावी दोष यांचा एकदमच कालउदरांत समावेश झाला.

आनंदीबाईस निर्माण करून बावीस वर्षांत त्यांच्या अनेक गुणांचा मात्र पूर्ण विकास करून त्यांस एकदम नाहींसे करण्यांत परमेश्वराचा कांही निराळा हेतू दिसतो. तो हेतू हाच कीं, त्यांचें चारित्र्य हें स्त्रीशिक्षणाचा एक उत्तम नमुना व्हावें. असें नसतें तर त्यांच्याइतक्या अल्पवयस्क व गरीब स्थितींतल्या मुलीस त्यानें इतकी असाधारण कर्तृत्वशक्ति व बुद्धिमत्ता दिली नसती त्यांच्या बुद्धिमत्तेचे व कर्तृत्वशक्तीचे मासले प्रस्तुत विवेचनांत जागोजाग दिले आहेतच त्या सर्वांवरून पहातां आनंदीबाई ह्या 'उपमान' कोटींत जाऊन बसण्यास योग्य आहेत, असें कोणासहि कबूल करावें लागेल त्यांचा कित्ता पुढें ठेवून जर महाराष्ट्रांतील सुशिक्षित—व अशिक्षितहि—स्त्रिया आपली दिशा ठरवितील व शक्त्यनुसार त्यांचें अनुकरण करतील तर त्या आपली खरी उन्नती करून घेतील; आणि असें होऊं लागलें ह्मणजे स्त्रीशिक्षणासंबधानें आज जी प्रतिकूलता दृष्टीस पडते ती आपोआप नाहींशी होईल असें आमचें मत आहे

प्रस्तुत चरित्रग्रंथाचें समालोचन करण्यास जेव्हां आह्मी आरंभ केला, तेव्हां तें थोडक्यांत आटोपण्याचा आमचा विचार होता परंतु चरित्रनायिकेच्या गुणांशीं जों जों आमचा अधिक परिचय होत गेला, तों तों आमचा विचार पालटत चालला प्रस्तुत ग्रंथरूपी उद्यानांत दुसऱ्या खेपेस जेव्हां आह्मी प्रवेश केला व त्यांत असलेल्या अष्टादश कमलांतील सौरभाचा आस्वाद घेऊं लागलों तेव्हां कांहीं वेळपर्यंत त्यांत आह्मी इतकें गुंग होऊन गेलों कीं, आह्मास दुसऱ्या गोष्टीचें भानच राहिलें नाहीं! अशा रीतीनें जो गंध आह्मास इतका मोहून टाकण्यास कारण झाला, त्याचा यथेच्छ जरी नाहीं, तरी बराच लाभ महाराष्ट्रवाचकास करून द्यावा हा हेतू मनांत धरून प्रस्तुत चरित्रावर एवढा विस्तार केला आहे. तो आमच्या वाचकास प्रिय होवो, अशी इच्छा करून वाचकाचा निरोप घेतों.



# विविध वृत्त.

हिंदुस्थानात प्रत्येक वीस मनुष्यात फक्त एकालाच लिहितावाचता येतें

---

जगात इंग्रजी भाषा बोलणाराची संख्या दहा कोटी आहे.

---

आस्ट्रेलियात पर्णरहित वृक्षाची रानेंची राने आहेत

---

मनुष्याची दाढी दर आठवड्यात $\frac{1}{10}$ इंच वाढते

---

बाबू ( वेळू )चे झाड सर्वांत फार जलद वाढते एका दिवसात त्याची वाढ दोन फूट होते.

---

इंग्लंड आणि वेल्स प्रांतात सुमारें ४० हजारावर निरनिराळी आडनांवे चालत आहेत

---

इंग्लिश आणि फ्रेंच भाषेत एकाच अर्थाचे आणि एकाच स्पेलिंगचे सुमारे २१,००० शब्द आहेत

---

सुप्रसिद्ध कादंबरीलेखक मेरी करेली या बाईनी इंग्लंडातील एका पत्रकर्त्यावर कांही क्षुल्लक कारणावरून अब्रूनुकसानीची फिर्याद मांडली होती जज्जसाहेबानी वादीला प्रतिवादीकडून एक फार्दिंग ऊर्फ ३ पैची नुकसानी भरून देवविली !

---

जगातलें सगळें सोनें एका ठिकाणी जमा केलें तर तें २४ फूट लांब २४ फूट रुंद व १६ फूट उंच अशा एका खोलीत साठवून ठेविता येईल, असें एका गणित्याने ह्मटलें आहे

---

आपले व्हॉइसराय कांहीं दिवसापूर्वी इराणच्या आखातांतून सफर करून आले या प्रसंगी इराणातील एका वर्तमानपत्रकर्त्यानें व्हाइसरायाविरुद्ध कांही मजकूर प्रसिद्ध केल्यामुळें सदहु पत्रकर्त्यास तिकडील अधिकाऱ्यानी जेरबंदानी सडकावला !

---

जगांत एकदर दहा लाख माणसें आंधळी आहेत पैकी दोन लाख एकट्या रशियात आहेत. याचे कारण तेथील लोक अंधाऱ्या जागेंत फार रहातात. इजिप्त देशातहि आंधळे लोक फार आहेत त्याचे कारण तेथील वाळूचे कण डोळ्यात जाऊन अंधपणा येतो.

---

तुर्क देशांत स्त्रीशिक्षणाचा प्रसार बराच झालेला आहे तेथें मुलीच्यासाठीं सरकारी शाळा आहेत त्यावर मास्तरिणी व इन्स्पेक्टरिणी सगळ्या स्त्रिया आहेत. तेथे दरवर्षी शाळेंतून जितके मुलगे पास होतात, तितक्याच मुलीहि पास होतात. पुरुष शिक्षकांप्रमाणें स्त्रीशिक्षकिणीहि विद्यालयातल्या मोठमोठ्या परीक्षा देऊन उत्तीर्ण झालेल्या असतात.

---

येत्या बजेटात सहा कोटी रुपयावर शिल्लक राहील असें सुचिन्ह दिसू लागल्यामुळें गुदस्ता जी ५०० ऐवजीं १,००० रुपयाहून जास्त उत्पन्नावर इन्कमटॅक्स घेण्याची प्रजेला सवलत दिली आहे ती आणखीहि वाढविण्यात येईल ह्मणजे १,२०० हून जास्त उत्पन्नावर कर घेण्याची सरकार बहुतकरून सवड देईल अशी पुष्कळांनी उमेद बाळगिली होती. परंतु कर्झनशाहींत याहि बाबतीत लोकांची निराशा झाली!

---

आपल्या देशात मादक पदार्थांचा प्रसार गेल्या पचवीस वर्षांत किती झपाट्याने झाला आहे, तें पुढील आकड्यावरून दिसेल—

| | | |
|---|---|---|
| १८७४–७५ साली अबकारी खात्याचे उत्पन्न | २,६३,२५,००० | रुपये होतें, |
| १८८३–८४ ,, ,, ,, ,, | ४,२६,००,००० | ,, झालें, |
| १८९४–९५ ,, ,, ,, ,, | ५,९४,७५,००० | ,, झालें, |

आणि आता तें ६,२४,९०,००० रुपयापेक्षा थोडें अधिक आहे!!

---

मनुष्याच्या जगण्याचें सरासरीनें मान ३३ वर्षांचें आहे या भूतलावरील मनुष्यापैकीं ¼ लोक ६ वर्षांचे आतच मृत्युमुखीं पडतात ½ लोक १६ वर्षांचे आत परलोकचा रस्ता सुधारतात ६० वर्षांची मर्यादा उलटून आणखी पूर्ततेदाखल पंचवार्षिक कारकीर्द करून या जगाला रामराम ठोकणारा इसम दर १०० मनुष्यामध्यें एकच कायतो असतो

# इकडे तिकडे.

## कै० तुकोजीराव महाराज होळकरांची समयसूचकता.

कै० तुकोजीराव महाराज होळकर हे मोठे निर्भीड, बाणेदार आणि हजरजबाबी होते इंदूर संस्थानांत प्रथम रेलवे झाली तेव्हां बडवायजवळ नर्मदेला जो पूल बांधिला तो खुला करण्याचा समारंभ माजी व्हाइसराय लॉर्ड नॉर्थब्रुक यांच्या हस्तें होण्याचें ठरलें होतें त्यासाठीं व्हाइसरायसाहेबांची स्वारी पटवाय मुक्कामीं आली होती एका प्रसंगीं महाराज व्हाइसरायसाहेबांच्या भेटीस गेले असतां इंदूरचे रेसिडेंट मेजर डेली साहेब हे व्हाइसरायसाहेबांपाशीं बसले होते त्यांनीं महाराजांस पाहून व्हाइसरायसाहेबांस ह्मटलें "हे महाराज इंदूरचे एक बडे सावकार आहेत!"

उत्पन्न वाढविण्याचे कामीं महाराजांचें लक्ष्य फार होतें या गोष्टीवर रेसिडेंट साहेबांचा कटाक्ष होता तो महाराजांनीं लक्ष्यांत घेऊन चटकन् तेथल्या तेथें निर्भीडपणें ह्मटलें "मेजर डेलीसाहेब आमचे दलाल आहेत!"

साहेबांचें तोंड एकदम बंद झालें हें सांगावयास नकोच

---

## वकिलाचें चातुर्य.

तिघे प्रवासी फिरताफिरता एका खेडे गावीं एका पाटलाच्या घरीं उतरले रात्रीं चोराच्या भीतीनें त्यांनीं आपले पैसे त्या पाटलाजवळ ठेवण्यासाठीं दिले, आणि आह्मी तिघे एकत्र होऊन मागूं तेव्हां द्यावे, एकट्यास किंवा दोघांस देऊं नये, ह्मणून त्याला बजाविलें दुसरे दिवशीं गावांतलीं मंदिरें वगैरे प्रेक्षणीय स्थळें पाहण्यासाठीं ते तिघेहि निघाले कांहीं वेळानें त्यांपैकीं एकजण आपल्या सोबत्यांस [illegible] घरीं आला आणि पाटलास सांगूं लागला "आह्मी बाजारांत बैल खरीद केले आहेत त्यांची किंमत द्यावयाची आहे, ह्मणून पैसे आणण्यासाठीं माझ्या सोबत्यांनीं मला तातडीनें पाठविलें आहे तर काल रात्रीं तुमच्याजवळ [illegible] ठेवले ते द्या"

[illegible] त्यानें चोरंग नंतर वाटून त्यानें सगळे पैसे त्या लुच्चाच्या [illegible] पैसे पदरांत घेऊन तो नौदा पळाला आणि दुसऱ्या गावीं [illegible] हिस्सेदारी येऊन पाटलापाशीं पैसे मागूं लागले तेव्हां [illegible] आणि "तुह्मी त्या तिसऱ्याला

मुद्दाम पैसे आणण्यासाठी पाठविलें ह्मणून आपण त्याला ते दिले" अशा रीतीनें त्याची समजूत करूं लागला परंतु ते कांहीं ऐकेनात शेवटी त्यांनी पाटलावर फिर्याद माडली.

पाटील बिचारा घाबरून जाऊन गांवांत एक वृद्ध, अनुभवी आणि शहाणा वकील होता त्याच्या पाया पडून आपल्याला या लचाडातून मोकळा करा ह्मणून विनवू लागला वकिलाने त्याचे वकीलपत्र घेतलें.

ठरल्या तारखेला कोर्टापुढें मुकद्दमा सुरु झाला "तिघे एकत्र जमून मागण्यास येतील तेव्हा त्याना पैसे द्यावयाचे असें ठरलें होतें ना?" असा कोर्टाने पाटलाला प्रश्न केला.

पाटील ह्मणाला "होय, महाराज."

"मग तू त्या एकट्याला का पैसे दिलेस? ज्याअर्थी तू कराराची बाबत तोडली आहेस, त्याअर्थी या दोघाचे झालेलें नुकसान तू भरून द्यावें हा न्याय आहे. यावर तुझें काय ह्मणणें आहे?"

कोर्टानें असें विचारल्यावर बिचारा पाटील काय उत्तर देणार? तो घाबरून गेला होता तथापि त्याने अमळ धीर धरून ह्मटलें "आमचे वकील उत्तर देतील"

त्याबरोबर हे वृद्ध वकील पुढे झाले आणि कोर्टाला अदबीने हात जोडून ह्मणाले "नामदार कोर्टानें जो करार आता सागितला त्याच कराराच्या आधाराने माझें ह्मणणें असें आहे कीं, एकटा किंवा दोघे पैसे मागण्यास आले असतां त्याना देऊ नयेत असें ठरलेलें आहे, आणि ज्याअर्थी वादी हे दोघेच आले आहेत त्याअर्थी त्याना प्रतिवादीनें पैसे देणे हा कराराचा भग होईल प्रतिवादीनी आपल्या तिसऱ्या सोबत्याला घेऊन यावे ह्मणजे कराराप्रमाणें प्रतिवादी त्याची ठेव त्याना परत देईल!"

वकिलाचें हें चातुर्य पाहून न्यायाधिशानी वादीची फिर्याद काढून टाकिली.

---

## केरोसीन तेल.

अलीकडे कित्येक वर्षांपासून शहरातूनच काय, पण प्रत्येक खेड्यापाड्यातूनसुद्धा केरोसीन तेलाचा उपयोग दिवाबत्तीचे कामी करण्यात येत आहे जेथे माणसाची वस्ती आहे तेथें केरोसीन तेल आहेच ह्मणून बहुतेक समजावे अशी स्थिति झाली आहे इतका जरी या केरोसीन तेलाचा प्रसार झाला आहे, तरी हे तेल कशापासून निघते, किंवा कोठे व कसें तयार होतें, याविषयीची नक्की माहिती फारच थोड्याना असते

हें तेल प्राण्याच्या चरबीपासून किंवा वनस्पतीपासून निघालेलें नाहीं या तेलाला दुसरें नाव राकेल असें आहे. राकेल हें इंग्रजी ( Rock-oil) रॉक ऑइल याचा अपभ्रंश आहे रॉक ऑइल ह्मणजे खडकातून निघालेलें तेल हें तेल एका प्रकारच्या कोळशाच्या खाणींत सापडतें या कोळशात हायड्रोकार्बन नावाचा ज्वालाग्राही पदार्थ अधिक प्रमाणात असतो या तेलाच्या खाणी प्रथम अमेरिकेंत पेनसिल्व्हानिया प्रांतात सापडल्या तेथील रानटी लोक या तेलाचा उपयोग प्रथम औषधि ह्मणून करीत असत. संधिवातावर हें तेल चोळण्याचें त्याना ठाऊक होतें त्याचप्रमाणें खाणीत काम करणारे मजूर सर्दीचा विकार घालविण्यासाठीं थोडेसें तेल पोटातहि घेत.

जेथें हें तेल सापडतें तेथे प्रथम झऱ्याच्या पाण्यावर जाड तवंग येतो व तेथील हवा कुंद होते त्यावरुन त्या जागी तेलाच्या खाणी आहेत असें ओळखतात मग जमीन पोखरण्याचें एक यंत्र आणून सुमारें पाचशे फुटाचें एक भोंक पाडतात तेवढ्याने तेल वर आलें तर ठीकच आहे. नाहींतर आणखी शंभर फूट खोल भोंक पाडतात कधींकधी पुष्कळ खणून कांहीं तेल निघत नाहीं, कधींकधीं तेलाचा साठा फार थोडा निघतो, आणि कधींकधी तो साठा संपला असें समजून त्याचा नाद सोडावा इतक्यात तो पुन भरून येतो

या खाणींतून नेहमीं तेलाच्या वाफा निघत असतात ह्मणून या ठिकाणी दिवा वगैरे घेऊन जाणें अतिशय धोक्याचें आहे यत्किंचित् ठिणगी कोठें पडली तर एकदम भडका होऊन खाणींत काम करणाऱ्या हजारों जीवाचा एकदम संहार व्हावयाचा! पण अशा निकराच्या ठिकाणींसुद्धा मजूर लोक खुशाल मौजेनें सिगा ओढतात तेव्हा त्याच्या व्यसनाधीनतेची धन्य ह्मटली पाहिजे!

या तेलाच्या खाणींच्या कामात ज्यानीं प्रथम भांडवल घातलें त्याना कल्पनातीत असा फायदा झाला मूळ भांडवलाच्या दोनशेंपट फायदा कित्येक कंपन्यास मिळाला ह्मणजे एका रुपयाचे वर्षादोन वर्षांत २०० रुपये झाले! गावात मजुरी करून चारदोन आणे रोज मिळविणारे त्याच्या झोंपडीच्या जागीं तेलाची खाण सापडल्यामुळें एकदम लक्षावीश झाले!

या तेलाचा खप आपल्या देशात किती झपाट्यानें झाला आहे हें पुढील आकड्यावरून दिसून येईल सन १८७५-७६ सालीं फक्त ५,३६,५७५ ग्यालन केरोसीन तेल आपल्या देशात आलें होतें. सन १८८१ सालीं ४० लक्ष ग्यालन

आलें आणि १९०१ सालीं तें एक कोट ग्यालनच्या जवळजवळ येऊन पोंचलें. ह्मणजे २५ वर्षांत वीसपट प्रसार झाला!

या तेलात पुष्कळ प्रकार आहेत उत्कृष्ट प्रतीचें केरोसीन असतें त्याचा रग पाण्यासारखा असून त्याला घाण कमी येते व जळतांना काजळी फारशी येत नाहीं या तेलास स्नोफ्लेक असें नाव आहे. विद्यार्थी, वकील, वर्तमानपत्रकर्ते व दुसरे कित्येक लोक, ज्यांना रात्री दिव्यापाशीं बसून लिहिण्यावाचण्याचें काम करावे लागतें, त्यांनीं या तेलाचा उपयोग करणें चांगलें हलक्या प्रतीचें केरोसीन वापरणें हें सुरक्षितपणाच्या दृष्टीनेंहि धोक्याचें आहे. अशा तेलाची थोड्याशा उष्णतेनें वाफ होऊन एकदम भडका होण्याचा सभव असतो ह्मणून थोडेसे पैसे अधिक पडले तरी हरकत नाहीं, पण कुटुंबवत्सल गृहस्थांनीं स्नोफ्लेकसारखे उच्च प्रतीचेंच केरोसीन वापरावे हे उत्तम.

---

## फलज्योतिषावर अविश्वास.

फलज्योतिषावर भरंवसा न ठेवणारे लोक आतांच्याच काळीं आहेत असें नाहीं; पूर्वीच्या काळी चांगल्या विद्वान् मडळीतसुद्धा असे लोक आढळत असत प्रसिद्ध संस्कृत काव्यग्रथ विश्वगुणादर्श याच्या कर्त्याचा फलज्योतिषावर विश्वास नव्हता त्याने एके ठिकाणी ह्मटलें आहे—

> विलिखति सदसद्वा जन्मपत्रं जनानाम्
> फलति यदि तदानीं दर्शयत्यात्मदाक्ष्यम् ।
> न फलति यदि लग्नद्रष्टुरेवाह मोहम्
> हरति धनमिवेहं हन्त दैवज्ञपाशः ॥

**भावार्थः**—ज्योतिषी जन्मपत्रिका करतात तींत चांगली वाईट भावी फलश्रुति लिहिली असते त्याप्रमाणें अनुभव आला तर जोशीबुवाना आपल्या ज्योतिषज्ञानाच्या प्रभावाची घमेंडी मारण्यास आयतेंच फावतें बरें, यदाकदाचित् भविष्य चुकलें, तर लग्नाचा इष्ट काल वरण्यात कोणाचीतरी चूक झाली आणि त्यामुळे पत्रिकेचा ठोकताळा आला नाहीं, असें ह्मणून दोषांतून मुक्त होण्यास त्याना सापडते मिळून जोशीबुवाची दक्षणा काहीं चुकत नाहीं! अशा रीतीनें जोशीबुवा लोकाजवळून पैसे उकळित असतात

---

# देवी परनिंदा.

पृथ्वी निर्माण झाल्यापासून दीर्घकालपावेतो पृथ्वीतलावर वास करणारे ऋषी, राजे, वैश्य, शूद्र इत्यादि लोक आपापल्या व्यवसायात निमग्न राहून आपापली कार्ये यथासाग करित असत जागजागीं ईश्वराचे भजनपूजन, ज्ञानचर्चा, प्रजेचें सरक्षण, दुष्टाचें शासन, व्यापारउद्यम, कृषी, दास्यादि व्यवसाय मनुष्यमात्र आपापल्या वर्णधर्माप्रमाणे करून सर्व लोक सुखाने कालक्रमणा करित होते जगतीतलावर कोणीहि दुःखीकष्टी प्राणी म्हणून नव्हता आणि आपल्या अपत्याचें हे सुख पाहून भूमाताहि सदा सुप्रसन्न असे

परतु सर्व दिवस सारखे नसतात सुखामागून दु ख, ज्ञानोत्कर्षामागून अज्ञान, उद्योगामागून आलस, वैभवामागून दारिद्र्य इत्यादि गोष्टीचें रहाटगाडगें सदा चालूच असते तसें जर न होतें तर मग सृष्टिक्रम म्हणतात तो कसला ! जिकडे तिकडे आपापल्या व्यवसायात दग असलेल्या उद्योगनिरत प्रजेमध्ये आलस्याचा प्रादुर्भाव झाला, कर्तव्यकर्मांची विस्मृति होऊन सपूर्ण जनमडलावर निद्रादेवीने आपला पूर्ण अमल बसविला पाठशालांमधून गुरू मोठ्या आस्थेने शिष्याला ज्ञानामृत पाजित आहेत, परंतु शिष्यवर्ग आनदाने डुलक्या खात आहेत उपासनागृहामध्ये आचार्य मोठ्या भक्तिभावाने परमेश्वराची आराधना करित आहेत परतु उपासक मडळी जणू परब्रह्मस्वरुपाचे ध्यान करण्यात लीन झाली आहे —गाढ निद्रिस्थ झाली आहे, गायकजन आपल्या गायनवादनाची परमावधि करित आहेत, परतु श्रोतेमडळी जीवन्मुक्त स्थितींत पडली आहे एवच जिकडे तिकडे आलस्याने आपलें साम्राज्य पसरलें

पृथ्वी निद्रावश होताच देवादिकाना यज्ञयागादिकाच्या द्वारे नियमित वेळी हविर्भाग पोंचेनासे झाले, अर्थातच त्याची उपासमार होऊं लागली म्हणून निजलेल्या पृथ्वीला जागृत करण्यासाठी देवानी स्वर्गलोकाहून चुटकी वाजविण्यास आरभ केला देवाचीच ती चुटकी ! अर्थात् तिचा ध्वनिहि तसाच भीषण होता हे सागावयास नकोच त्या नादाने पृथ्वीची झोप किंचित् दूर होऊन तिला जरासें चैतन्य आलें व तिने नेत्र उघडून पाहिलें

आपली ही अवस्था देवांच्या नजरेस आल्याचे कळताच पृथ्वी अत्यत लज्जायमान होऊन स्वर्गलोकीं देवासन्निध जाऊन विनीतभावाने म्हणाली "हे देव हो ! आपल्या चुटक्या वाजविण्याने मी जागी झालें खरी, परतु माझी निद्रा घालविण्यासाठी

आपण रात्रंदिवस चुटकी वाजवू कशी शकाल? आणि तसें झालें नाहीं तर माझ्या डोळ्यातील झोंप दूर होणार नाहीं. मोठमोठे वक्ते, उपदेशक, आचार्य, उपाध्याय, गायक, सुधारक येऊन मला अगदी मारून टाकित आहेत त्याचे तें वक्तृत्व श्रवण करून मला निद्रा येते"

पृथ्वीचें हें भाषण श्रवण करून इंद्रादि देव मोठ्या विचारात पडले. ह्या गोष्टीला उपाय काय शोधून काढावा याचा सर्वांनीं मिळून विचार चालविला मोठमोठे गहन संस्कृत श्लोक, त्यातील गूढ समास, अर्थबोध न होणारे अतएव रुक्ष उपदेश यानी पृथ्वीला निद्रा येणे साहजिक आहे परंतु हा प्रकार बंद व्हावा कसा? बुधा नाहीं, शेंडा नाहीं असे विषय शिक्षक शिष्यवर्गाला शिकविणार आचार्य न्यायसंगत अगर न्यायविरुद्ध, अर्थपूर्ण वा अर्थशून्य उपदेश करणार छायेच्या ठायी वस्तुभास आहे कीं वस्तूच्या ठायी छायाभास आहे एतद्विषयी गहन चर्चेमध्ये तार्किक लोक निमग्न रहाणार वक्ते, सुधारक देशोद्धारासाठीं मोठमोठ्या वल्गना चालविणार सनातनाभिमानी प्राचीन काळी आह्मी महान विद्वान्, महान् सत्ताधीश, वीर्यशाली प्रतिदेवच होतो, आमचे पूर्वज आमच्याहून सहस्रपट श्रेष्ठ होते, ते दसपट जास्त वाचत असत, वीसपट निजून नाकातून डारडूर ध्वनि करित असत आणि आमच्यापेक्षा शभरपट स्वप्न पहात असत इत्यादि इत्यादि प्रौढी सागून स्वतास कृतकृत्य मानणार! तेव्हा पृथ्वीचे आलस्य दूर होण्यासाठी काय उपाय करावा या विचारात सर्व देव गढून गेले.

शेवटी सर्व मिळून नारदऋषींना शरण गेले. नारदच ते! त्यानी देवास अभयदान देऊन ध्यानयोगेंकरून एका पुरुषास निर्माण केलें तो पुरुष निर्माण होताच हात जोडून नारदमुनीला विचारू लागला "प्रभो! मी कोण आणि माझें जनन कोणत्या कार्यासाठी आहे?"

नारदऋषी ह्मणाले "वत्सा! तुला मी अहंकारशर्मा असें नाव देतो तुला कोणत्या महत्कार्यासाठी निर्माण केलें आहे हें लवकरच कळून येईल"

पित्याची आज्ञा होताच अहंकारशर्मा 'मी मी' असा ध्वनि करित इतस्तत भ्रमण करू लागला सर्व देवानी त्याला विनति केली कीं "पुरुषानें एकटें रहाणें अनुचित होय तू पृथ्वीवर जा व एक सुंदर वधू पाहून तिचे पाणिग्रहण कर"

लगेच अहंकार शर्मा "मी मी" करित पृथ्वीवर आला. पृथ्वीवर तो नानादेशीं, नानाप्रातीं हिंडला व शेवटीं त्याला अनुरूप अशी एक वधू आढळून आली. या वधूचें नाव हिंसादेवी असे होते ही तरुणी परम रूपवती होती ह्मणून अहंकार-

शर्म्यानें तिचें पाणिग्रहण केलें? छे छे! हिंसादेवीतर त्याच्या अगदीच विरुद्ध होती अहंकारशर्मा मनामध्यें ह्मणाला मी रात्रंदिन 'मी मी' ह्मणतों, माझ्याविषयींच विचार करितों आणि ही तरुणीतर नेहमी 'हे आणि ते' असें ह्मणते व रात्रंदिन अन्याचेंच चिंतन करिते, तेव्हां इलाच आपली गृहिणी करावी हें उत्तम कारण एकातील अभाव दुसऱ्यानें भरून काढल्यानें तो विवाह सर्वांगसुंदर होत असतो, असें श्रेष्ठाचें वचन आहे हिंसादेवीलाहि ते पटलें व लवकरच उभयता विवाह-बंधनानें बद्ध झालीं

अनेक दिन सुखोपभोग घेतल्यावर या दांपत्याच्या पोटीं एका कन्यारत्नानें जन्म घेतला या कन्यारत्नाच्या जन्मग्रहणसमयीं दुंदुभींचा निनाद झाला देवादिकांनीं स्वर्गावरून पुष्पवृष्टि केली या कन्येचें जातकर्म वर्तविण्यासाठीं बृहस्पतीसारखे देव स्वर्गलोकाहून मुद्दाम आले होते बाराव्या दिवशीं मोठ्या समारंभानें मुलीचा नामकरणविधि झाला व तिला परनिंदा असें सुंदर नांव ठेवण्यांत आलें

परनिंदेच्या लाभानें पृथ्वी आनंदसागरांत मग्न झाली दोघींमधील एवढें प्रेम कोणीं कधीं पाहिलें नसेल! पृथ्वीला जेव्हांजेव्हां आलस्यामुळें निद्रा येते असें दिसे तेव्हां देवाच्या उपदेशानुसार परनिंदा पृथ्वीजवळ येऊन बसत असे व ती सन्निध असली ह्मणजे पृथ्वीची उदासीनता, आलस्य वगैरे सर्व दूर होऊन ती हुषार होई याप्रमाणें सुखदुःखांत, संपत्तीविपत्तींत, रोगशोकांत—तात्पर्य प्रत्येक प्रसंगीं परनिंदा पृथ्वीच्या सन्निध रहात असे सुखाच्या प्रसंगीं तिच्याशीं कथालाप करून ती शतगुणित अधिक सुखी होई त्याचप्रमाणें दुःखाच्या प्रसंगीं तिच्या वचनामृतपानानें आपलें दुःख विसरून जाई पृथ्वीचे रोग-दुःख पळून जात

सांप्रत धर्मकर्मे यथासांग चालू लागलीं आहेत, विद्याशिक्षादि कर्मे सुरळितपणें होऊं लागलीं आहेत देवतांना आपापले हविर्भाग मिळत आहेत आणि हा सारा परनिंदेचा महिमा होय!

ही देवी अद्यापि कुमारीच आहे पुष्कळांशीं ही लडिवाळपणा दाखविते असंख्य लोक तिच्या आराधनेंत महत्तम सुख उपभोगितात आपले दुःख क्लेश क्षणभर विसरतात ज्यांना अद्यापि हिच्या अनुपम सौंदर्याचें दर्शन घडलें नसेल त्यांनीं हिच्याशीं परिचित असलेल्या भाग्यवानाच्या साह्यानें हिची ओळख करून घ्यावी त्यानाहि अनुपम सुख अनुभवितां येईल परनिंदेचे निस्सीम भक्त सांप्रत सर्वांगी आढळून येतील अर्थात् या बाबतींत कोणासहि निराश होण्याचा प्रसंग कधींच येणार नाहीं.

———>o<———

# सहल.

पारतन्त्र्य-भव-मग्न असा मी, सचिंत येतां घरीं
कोणी हाक मारिली दुरी —
"येरे मित्रा–दूर फिराया!–कशास जासी घरीं ?
पाहुया चल,— सृष्टी सुंदरी,
तों सौंदर्याचें अगार सृष्टी दिसे,
तद्वर्णन करिता कुंठित मति होतसे,
सायंकाळीं हिरण्यगर्भहि क्षितिजावरती असे,
श्रमानें रक्तवर्णसा दिसे १
पर-प्रकाशित अग-नग-जलधी विरहाकुल भासती,
विनविती भाव मित्राप्रती,
मरीचिमाली! यावें उदयाप्रती,
तुझ्याविण या काय जगाची गती ?
तो,-सागर इकडे, सुरम्य नौका निश्चल पृष्ठावरी
वाहुनी नेत असे या दुरी. २
मंजुळ वायू आनंदानें तरुवर हे डोलवी,
तयाचा ताप सर्व घालवी,
दिनमणि इकडे अंतर्हित जाहला,
रजनिनाथ हा पूर्व दिशीं उगवला,
स्वास्थ्य–शांतता–समाधान हीं भूमिवरी पसरलीं,
सृष्टी तापशून्य भासली ३
परि मानव–मन हे पेटे चिंताग्निनें,
नज्वाला भडके पारतन्त्र्य-इन्धनें,
सुखांत समयीं स्वराज्य भोगित निंचित जे राहती,
असती भाग्यवान ते किती!
अशा विचारीं मित्रासह मी सचिंत आलों घरीं,
पडलों उभयहि निद्रादरी! ४

## लग्नासंबंधी आणि नांवांसंबंधी कांहीं चाली.

जपानी लोक आपल्या मुलींना फुलाचीं नांवें ठेवतात.

---

चिनी लोक मुलींची नावे 'नवर एक, नवर दोन, नवरतीन' अशी ठेवतात.

---

आयर्लंड देशातील लोकात आपल्या मुलाना नावे ठेवण्याचे वेळीं आपल्या गत वाडवडिलाचीं नावे ठेवणें अशुभ समजतात.

---

चिनी लोकात मुलाची नावें वीस वर्षांपर्यंत निराळी असतात मुलगा वीस वर्षांचा झाला ह्मणजे त्याचा बाप आपल्या इच्छेस येईल तें त्याचें नाव ठेवित असतो.

---

झुलूलॅंडमधील लोकात नवरीने विवाहप्रसगी आपल्या शिरोभूषणाला—केशपाशाला—बहुतेक रजाच दिली पाहिजे ! नाहीं ह्मणायला सुमारें एक चोटभर जेमतेम ठेवून बाकीचे सर्व केश भादरून टाकतात !

---

सैबेरियन लोकात नवरीने पतिगृहीं प्रवेश करतेवेळीं भोजनास अत्यावश्यक असे स्वत तयार केलेले पदार्थ ताटात घालून ते ताट पतिगृहीं नेलें पाहिजे व त्यात—पाकशास्त्रात—तिची कुशाग्रता दिसून आली पाहिजे

---

इजिप्त देशातील लोकात मुलाची नावे ठेविते वेळी तीन मेणबत्त्या पेटवितात व त्या प्रत्येकीला आधी—पेटवितेवेळीं—निरनिराळे नाव देऊन जी मेणबत्ती इतर दोन मेणबत्त्यापेक्षा जास्त वेळ जळत राहील त्या मेणबत्तीला दिलेलें नाव मुलास ठेवित असतात

---

मुसलमान लोकात नावे ठेवितेवेळी कधीकधीं तीं कागदाचे चिठीवर निरनिराळीं लिहून नतर त्या चिठ्या त्याचा अत्यत पवित्र असा ग्रथ जो कुराण

त्यात निरनिराळ्या ठिकाणी ठेवतात थोड्या वेळानें तो ग्रंथ उघडताक्षणीच जी पहिल्याने चिठी सांपडेल ते नाव मुलास ठेवतात

---

कोरियन लोकांत विवाहप्रसंगी नवरीनें ज्या दिवशीं लग्न ठरलें असेल त्या विवक्षित दिवशीं अगदीं मूकव्रत स्वीकारण्याची चाल आहे. तिनें हू कीं चू काहींएक करावयाचें नाहीं ही अट जर का नवरीनें मोडली तर सर्व मंडळी तिची अगदीं टेर उडवितात, शिवाय आपल्या जातीला तिला मुकावें लागतें तें निराळेंच! या प्रायश्चित्तापासून विमुक्त होण्याकरितां मोठ्या माराकुटीनें ती एखाद्या पाषाणाप्रमाणे स्तब्ध राहील, नाहीं असें नाहीं. परंतु प्रत्यक्ष नवरदेवतरी कसले खाष्ट! वाक्प्रहारानें तिला टोंचूनटोंचून एखाद्या चवताळलेल्या नागिणीप्रमाणें प्रक्षुब्ध करित असतात तेव्हा आपल्या मानससमुद्रातील मनोविकाररुपी लाटा खवळू न देण्याकरिता बिचाऱ्या त्या नवरीला—एक दिवसच का होईना—जवळजवळ साधूची वृत्ती स्वीकारण्यास काय श्रम पडत असतील ते वाचकांनी कल्पनेनेंच जाणावें.

---

जपानी लोकात वधूने पांढरे रेशमी वस्त्र नेसून नवरदेवापुढें बसावयाचें. वधू व वर याच्यापुढें दोन टेबलें मांडून त्यावर दोन पेले ठेवावयाचे. सकी नावाच्या पदार्थाची एक बाटली ठेवावयाची मनुकाचें झाड काढलेली एक तसबीर ठेवावयाची दोन तोट्या असलेली एक झारी ठेवावयाची मनुकाचें सुकुमार झाड ह्मणजे जणू काय वधूची प्रतिमाच होय देवदाराचें एक जोमदार झाड ठेवावयाचें. देवदाराच्या झाडाचा जोमदारपणा ह्मणजे नवरदेवाच्या सुदृढतेची प्रतिकृतीच होय कासवाचे पाठीवर उभा राहिलेला एक पक्षी दाखवावयाचा. त्या योगानें दीर्घकाल आयुर्मर्यादा व सौख्य व्यक्त होत असतात. ही सर्व मांडामांड झाल्यावर, झारीला असलेल्या दोन नळ्यातून वधूवरांनी आळीपाळीनें झारीत असलेलें पेय प्राशन करावयाचें दोन नळ्याच्या द्वारें आळीपाळीनें त्यातील पेयाचें पान करणे ह्मणजे प्रत्येकाच्या सुखदु खाला अन्योन्य भागीदार होण्याचा भाग दर्शित होत असतो

# बालबोध.

## विदुलेनें आपल्या मुलाला केलेला उपदेश.

विदुला ही सौवीर देशच्या राजाची राणी होती. राजा मरण पावला तेव्हां त्याचा मुलगा संजय हा अगदीं लहान होता ही संधि साधून सिंधु देशच्या राजानें त्याचें राज्य हिसकावून घेतलें पुढें संजय मोठा झाल्यावर आपलें गेलेलें राज्य परत मिळविण्याची खटपट करण्याविषयीं विदुला आपल्या मुलाला उपदेश करूं लागली ती ह्मणाली "बाळा संजया! आपल्या वाडवडिलांच्या कीर्तीला कलंक लावणाऱ्या पुत्राला धिक्कार असो अरे, शत्रूनें जिंकलें ह्मणून तूं निराश होऊन काय बसला आहेस? कांहींतरी पराक्रम करून नांव मिळविलें तर जन्मास आल्याचा कांहीं उपयोग माणसानें आपल्या हातून होईल तितका उद्योग करीत रहावें उद्योगाचें फळ मिळो वा न मिळो, विचारी मनुष्य त्यासाठीं शोक करीत बसत नाहीं तूं स्वतःविषयीं कांहीं अभिमान बाळग आणि धैर्य धर, ह्मणजे उद्योग केला असतां तुझ्या हातून कुळाचा उद्धार होईल विद्येनें, तपानें, संपत्तीनें, पराक्रमानें किंवा दुसऱ्या एखाद्या चांगल्या कर्मानें जो दुसऱ्यांना मागें टाकितो, तोच पुरुष खरा, दुसऱ्यानें तोंडांत मारलीतरी खाणारा, नेभळा, अपमान सहन करणारा तो पुरुष कसचा? दुसऱ्यांनी टाकिलेल्या तुकड्यावर निर्वाह करणारे, भित्रे, कोणतेंहि साहस करण्यास न धजणारे, पराक्रम करून नांव न मिळवितां रहाणारे, अशा लोकांचें जिणें खरोखर व्यर्थ झालें पाहिजे तूं स्वतः कांहीं हातपाय हलविशील तर लोकांनाहि तुला मदत करावीसें वाटेल, आणि त्यांची मदत घेऊन तूं आपलें कार्य सिद्धीस नेशील पण तूंच हातपाय गाळलेस तर लोकतरी तुला कशी मदत देतील? आज किंवा उद्यां खायला नसणें यापेक्षां आणखी वाईट दशा ती कोणती असणार? ही स्थिति स्त्रीला पतीच्या किंवा पुत्राच्या वधापेक्षांहि अधिक वाईट आहे माझी स्थिति पूर्वी कशी होती आणि आतांना कशी आहे ती तूं पहातोसच ही स्थिति पाहून तुझ्या अंगांत जर आवेश संचरला नाहीं, तर तुझ्या जगण्यांत कांहींच अर्थ नाहीं असें मी समजेन. आपलें राज्य परत मिळविण्याच्या उद्योगांत तुला मरण आलें, तरी तुझी कीर्ति राहील परंतु तसें न होतां तूं शत्रूची खुशामत करीत आहेस असें मला दिसलें तर तुझ्या मरणापेक्षां मला अनंत दुःख होईल उद्योग करीत राहिल्यानें केव्हांना केव्हांतरी फळ मिळतेंच पण उद्योग नच केला तर फळ मिळण्याचा संभव रहात नाहीं ह्मणून बाळा संजया! मी सांगतें तें नीट लक्ष्यांत ठेव;

मनांत भय बाळगू नकोस, अंतःकरण कठीण कर; आणि उद्योगाला लाग, ह्मणजे तुझा हेतु परिपूर्ण होईल."

विदुलेचा हा उपदेश ऐकून संजयाला स्फुरण चढलें व त्यानें सिंधु राजाशी युद्ध करून त्याजपासून आपलें राज्य परत मिळविलें.

---

## घाटाच्या पायऱ्या.

तुम्हांला प्रपंचाचा घाट चढून जाण्यात यशस्वी व्हावयाचे आहे काय? तर मग पुढील पायऱ्या काळजीपूर्वक चढून जा, ह्मणजे तुमचें काम होईल.

१ कोणतातरी एक पोटाचा उद्योग चांगला शिका

२ एकाच उद्योगाला चिकटून रहा, घटकेंत हा, घटकेत तो, असें करू नका.

३ कामांत त्वरा ठेवा, पण धादल करु नका.

४ कोणतेहि काम शिस्तीनें व काळजीपूर्वक करा.

५ जे काम हातीं घेण्यालायक आहे, ते चांगल्या रीतीनें पार पाडण्यालायक आहे ह्मणून समजा.

६ आज हातीं आलेली अर्धी भाकर उद्यां मिळणाऱ्या सबंध भाकरीइतकी आहे, अशी खात्री ठेवून संतुष्ट रहा.

७ स्वतावर अवलंबून रहा. करु कीं नको, ह्मणून ज्याला त्याला विचारित सुद्धा नका

८ कोणत्याहि कामांत ठरविलेली वेळ चुकू देऊ नका.

९ आळस सोडा, प्रत्येक क्षण विचारात, किंवा कृतींत यापैकी कोणत्यातरी खात्यात हिशोबी पडला पाहिजे.

१० सर्वांविषयी उदार बुद्धि ठेवा कुत्सितपणा टाका. प्रपंचमार्गांत चुकला पडलेल्या नवशिक्याना करवेल तेवढी मदत करा.

११ एकदम श्रीमंत होण्याची बुद्धि धरू नका. हळूहळू पण भक्कम जे काम होतें तें कायमचें होतें शिडीवर चढणारानी अगदीं खालच्या पायरीपासून क्रमाक्रमानें वर गेलें पाहिजे तसें न करता एखादा काहीं पायऱ्या ओलांडून जाऊ लागला, तर एखादे वेळी तो घसरून पडण्याचा संभव असतो हेंच उदाहरण प्रपंचातल्या किरकोळ गोष्टीला लावून पहात असावें.

१२ आज जे मोठ्या पदाला चढलेले दिसतात, ते एका काळी खालच्या पायरीवर होते, हे नेहमी ध्यानात धरा.

---

# गुलाबाचें फूल.

[ माळ्यानें गुलाबाचें फूल तोडलें असता फुलाची भावी स्थिति डोळ्यापुढें येऊन कवीस वाईट वाटून फुलास उद्देशून ह्मणतो —

आमोद तूझा करि चित्त दंग
सौंदर्य साक्षात् तव अंग-रंग,
तो पारिजातद्रुम वदनातें
करील नेता तुज नंदनातें १

परंतु दीना! सुमना गुलाबा!
सौंदर्य वैरी ठरलें तुला बा!
तदर्थ तूतें खुडिलें नरानीं
लावोनिया तीक्ष्ण नखीं पराणी २

आता न तूतें शिकवी, सुगंध
नाचावया मारुत मंद मंद,
पाहूनि तें नृत्य लतांगना त्या
न डोलती प्रेमभरें सभोंत्या! ३

मोहोनिया मोहक सौरभानें
न भेटती ते अलि संभ्रमानें!
भृंगांगनाचें श्रवणीय साचें
गाणें न लाभे तुज सद्रसाचें! ४

समीरणाच्या लहरीसमेत
उपानभूमीमधि जेथ तेथ
सुगंध तूझा दरवळुनीया
न सौख्यवीजा विरतरी जनीं या. ५

स्वातंत्र्य सर्वप्रिय नष्ट झालें,
सौंदर्य मंदोज गमे विझालें,
स्वार्थप्रमत्तीं तुजला खलानीं
या तोडिलें दुष्टमती नरानीं ६

जपोनि माळी तुज उष्ण काळीं
सप्रेम पाळी खत तोय घाली,
तो तूज तोडी अजि काय? हाय!
माता वधी कोण तरी सहाय? ७

वाटे असंबद्ध नर-स्वभाव
कधीं करी तो न पर-स्व-भाव,
कधीं वधी व्यर्थ परंतु अन्य,
कधीं दयाळू, कधिं सत्व वन्य. ८

हा! हा! तुझ्या कष्टतरी वियोगीं
डसे तरूला सुत-शोकभोगी
ढाळीतसे हत! मिषें रमाचे
त्वदर्थ हा टपटप अश्रु साचे! ९

तू भूषवीसील, पुढें पित्याच्या
वसोनि, देहा न कदापि त्याच्या!
त्याचा तुला होय तुझा तयाला
वियोग हा नित्य, न अंत याला १०

अपत्य लाभोनि परंतु अन्य
होईल हा सत्य पुन्हा सुधन्य,
तूतें न आता परि ती सुखाशा,
मनुष्य आहे सम काल-पाशा ११

सेवूनि तूझा अति रम्य मोद
पावे मनी निर्भर हा प्रमोद,
ह्मणूनिया सतत दुर्गुणीच
करील नष्टप्रभ तूज नीच १२

अशोक, कोरटक, जासवंत,
निर्गंध धत्तूर सदैव इत!
देवेश-शीर्षी जरि शोभतात
कन्चित्स्थलें तीं तुज लाभतात. १३

मोहोनि सारे नर वा! सुमेशा!
हे लाविताती तुज आत्मवेशा;
दासस्थिती ही तुजला अणीती,
करीति नानाविध जाचणी ती १४

शोभार्थ लावीति पटादिकास,
हा स्वार्थ दैत्याधिप होय खास!
हे टाचणी टोंचिति सोस बावा!
संसार दु:खोदधि हा गुलाबा! १५

चन्द्रानना चारुसरोजनेत्रा
सप्रेम तूतें वरितील मित्रा!
सानंद खोवीतिल केश-पाशी
जाणेंच तें जाण मृतेश-पाशी. १६

बारीकशा रेशिमरज्जुनें हा!
बांधोनिया ह्या सुकुमार देहा,
कोणी करें चोळवटील याला
जाईल सौंदर्य-मटी लयाला. १७

तू शोभसी सुंदर बोंसदार,
गंधें तुझ्या नासिक डोलणार,
परी सुमा! तू गतसत्वसार
अल्पावकाशामधिं कोमणार. १८

तू भूवरी जेंवि नभात तारे
परंतु लोपूनि सतेजता रे!
केरामधें तू मग लोळणार,
तेणें न का मन्मन पोळणार १९

---

# नवी सृष्टी —नवा देह.

आशा सारी मावळली ती
उदय पावली आतां भीती
आयुष्याची आली खंती—
मरण तरी येओ!

गत वर्तन ते आतां बघतां
सुजती डोळे रडतां रडतां
शिक्षा त्याची पुढती दिसतां
कंप सुटे शरिरा.

"पश्चात्तापें तव तनु न्हाली
पापें सारीं विलया गेलीं
देवाची तुज ओळख पटली—
कां मग तूं भीसी?

"हृदय तुझें हे आतां कवणा
देउं नको रे! मर्त्यजनांना
अर्पी संतत त्याच्या चरणा—
तारिल तोच तुला"

गुप्तध्वनि हा परिसुनि हंसलों
हंसुनी रडलों, रडुनी हंसलो,
नूतन सृष्टीमाजी शिरलों—
घेउनि देह नवा!

# उपयुक्त ज्ञान.

चहा किटलींत टाकून वर उकळलेलें दूध कढतकढत ओतावें व तीन मिनिटें-पर्यंत झांकून ठेवून नंतर प्याल्यात ओतून साखर घालून प्यावा साध्या चहापेक्षा हा चहा-विशेषत आजारी किंवा अशक्त मनुष्यास—हितकर असतो

---

तेलमिश्रित रंगाचे डागानीं कपडा खराब झाला असेल तेव्हा टरपेंटाईन व अमोनिया हे दोन जिनस समभाग घेऊन जेथें डाग पडला असेल तेथें हे मिश्रण दोनतीनदा चोळावें व नंतर साबूने कपडा धुऊन टाकावा डाग निघून जातात

---

आरसे साफ करावयाचे असतील तेव्हा खडूची पूड करून ती पाण्यात कालवावी व तींत थोडासा प्रवाही अमोनिया टाकून त्या मिश्रणाने आरसा सारवावा नंतर हे मिश्रण साफ सुकलें म्हणजे काहीं वेळाने स्वच्छ पांढरा फडका घेऊन जोराने आरसा पुसून काढावा अगदीं स्वच्छ होतो.

---

ग्यासलेट तेलाच्या दिव्याचा लख्ख प्रकाश पडावा अशी इच्छा असल्यास दिव्यांतील वात प्रत्येक दोन महिन्यानीं बदलीत जावी पूर्वीची वात संपली नाहीं तो नवीन कशाला घ्या, असें मनात आणू नये जुन्या वातीहि काहीं फुकट जात नाहींत त्यांचा उपयोग चूल पेटविण्याचे कामीं फार चांगला होत असतो.

---

[illegible] अगर आपल्या आवडीचे दुसरें एखादें सुगंधी पाणी [illegible] ( ब्लॉटिंग पेपरवर ) शिंपडावें नंतर त्या टिपकागदावर बरेच [illegible] टिपकागद अगदीं सुकला म्हणजे जो कागद [illegible] असेल त्याच्या पोटात हा सुकून ठेवलेला टिपकागद घालावा [illegible] टाकावे पण काहीं तासपर्यंत ठेवावें असें [illegible] सुगंधित कागद प्रियजनाना प्रणयपत्रिका [illegible] पाश्चात्य देशात वहिवाट आहे.

———›o‹———

ज्ञानगंगेंत स्नान करण्याचें त्याला पुण्य घडलें, तरी एकदाना एकदातरी अज्ञानाचा परिहार होऊन त्याला खऱ्या ज्ञानाची नि संशय ओळख पटेल, यांत यत्किंचितहि संदेह नाहीं. या मोक्षदायिनी ज्ञानगंगेचें माहात्म्यच तसें अपूर्व आणि अलौकिक आहे —

जय जय जय भागीरथि ! जलतरंगिणी !
मंदाकिनि ! मधुरजले ! मोहध्वंसिनी ! । ५० ।

पद्मनाभचरणरजे त्रिपथगामिनी !
गंगाधरशिरविहरे तापहारिणी !
काशीतलवाहिनि हे दुःखमोचनी !
विमले सलिले, वरिलें
तव चरणा; करीं करुणा अघहरणा
येई धाउनी !
जय जय जय भागीरथि ! जलतरंगिणी ! १

त्रिविध तापसंहारिणि शांतिदायिनी !
सगरकुलोद्धारि वारिनवहवाहिनी !
जय अलकानंदसुते लोकपावनी !
पुण्ये, धन्ये, करुणे,
विमलजले, शुभसलिले पदकमलें
दावि जान्हवी !
जय जय जय भागीरथि ! जलतरंगिणी ! २

चंडशिलाहिमगिरितट वितटभेदिनी !
चंडातप असह अनल दाहहारिणी !
वृंदारकमतमुनिजनदुरितध्वंसिनी !
त्राही, त्राहीं, नेई
तव चरणीं, अघहरणीं रति धरुनी,
ज्ञानदायिनी !
जय जय जय भागीरथि ! जलतरंगिणी ! ३

अरे, पण या भागीरथीच्या प्रवाहातून ही कुणाची वरें मूर्ती येत आहे? आपण किंचित् बाजूस उभें राहू आणि पाहू कोण येतो आहे तो अथवा संशय कशाला? भागीरथीच्या प्रवाहातून ज्वालामय निघणारी ही क्रोधाशिवाय दुसरी कुणाची मूर्ती असणार ? [ जातात

---

( संपूरक उत्तरार्ध. )

[ स्थळ—भागीरथीतीर उग्र चेहरा, पिंजारलेल्या काळ्या मिशा, आरक्त असून फाटलेले डोळे, फुगलेलें नाक, टोक्यातून अनलशिखा निघत आहेत व हातापायास काळी, तावटी, हिरवीं चिरगुटें गुंडाळली आहेत, चार पाय व आठ हात असून हातात निरनिराळी शस्त्रे व एका हातात मास व रक्ताचा कटोरा घेतला आहे, तोंडातून रक्त गळत आहे, कवरेस शस्त्रें लटकावली आहेत, एका हातात दिवटी घेतली आहे अशा भयकर स्वरूपात क्रोध प्रवेश करितो ]

**क्रोध**—का, असे भीतीने गागरता का ? मी काही आपल्याला परका नाहीं मात्र आजपर्यंत माझें हे मूर्त स्वरुप आपल्याला दृष्टिगोचर झालें नसेल इतके कायते ! पण मी कोण आहें, माझे नाव काय आणि इथें या स्वरुपात माझ प्रवेश कसा झाला, याचें आपल्याला मोठें गूढ पडलें असेल, नाहीं ? तर ऐका कल्पनासृष्टीवर ज्याची सत्ता चालते, त्याच्या आज्ञेवरुन माझा मित्र कल्पना-द याने पाचारण केल्यावरून मला इथे या स्वरूपात यावे लागलें आता मा नाव काय ह्मणून विचाराल तर ऐका ह्या इथे जमलेल्या-मनुष्याचा देह धरणा- इतक्या प्राण्यात एकतरी प्राणी दाखवा, की, ज्याच्यामध्ये क्रोधाने कधीच सच केला नाहीं ! तोच क्रोध मी ल्हानापासून तो थोरापर्यंत आणि रावापास तो रकापर्यंत सर्वांच्या ठिकाणी मी सचार करितो. ही स्त्री, हा पुरुष, असा मजजव भेद नाहीं इतकेच नव्हे, पण डास, मच्छर याच्यासारख्या क्षुद्र कीट॰ पासून तों हत्तीसारख्या विशाल देहधारी प्राण्यापर्यंत यच्चयावत् प्राणिकोटि माझा अप्रतिहत सचार आहे एखाद्या प्राण्याच्या इच्छेविरुद्ध आणि त्या॰ सुखावर पाणी पडणारे एखादे कृत्य घडून येण्याची मी वाट पहात अस तें घडलें की मग मी त्या प्राण्याच्या हृत्कोशात हा पेट घेणारा रक्ताचा काढले अर्क त्यावर ओततों आणि मग ही माझी पाजळलेली दिवटी तिथें लावतो, अ त्याची एकच आगडोंब करुन सोडून मग माझ्या शस्त्रापैकीं एखादे शस्त्र प्राण्याच्या हातात देऊन त्याच्याकडून वाटेलते वदवतों, आणि वाहील तें करवि ह्या दिव्य रक्तार्काचा नुसता एक बिंदु टाकला की पुरे ! तो प्राणी पूर्ण माझ्या स्वाधीन होऊन रहातो, आणि असा तों एकदा माझ्या कह्यात अ ह्मणजे मग त्याच्या यच्चयावत् सर्व इद्रियावर माझे स्वामित्व सुरु होते मग ह मी जसें वागवावयास लावीन तशीं ती इंद्रिये वागतात केंव्हाकेंव्हा मी व

प्राण्यात सचार केला ह्मणजे त्याला प्राण्यांकडून त्यालासच शिक्षा करवितो. कुणाला आपल्या डोक्यात राख घालून घ्यावयास लावतो; कुणाला आपलीच मणगटे कडाकड फोडून घ्यावयास लावतो; कुणाच्या अगात आंतल्याआत ही दिवटी फिरवून त्याच्या सर्वांगाचा एकच भडका करून सोडतो, कुणाचे मस्तक पिकवून त्याच्या डोक्यात भ्रम उत्पन्न करुन त्याला केवळ वेडा करुन सोडतो, आणि त्याची वस्त्रप्रावर्णाचीहि शुद्धि नाहीशी करून त्याला दिगबर करुन जिवतपणीच नरकासारख्या क्लेशकारक स्थितीतून देशोधडी हिंडवतो सारांश, काय हवे ते करितो केव्हाकेव्हा मी त्याच्याकडून दुसऱ्या प्राण्यावर हात टाकवून त्याच्याकडून त्याला शस्त्राघात, विषप्रयोग या शस्त्रापैकी भयकर शस्त्रानी डोळे काटणे, त्याचे सर्वस्व हरण करुन त्याचा नायनाट करणे, त्याच्याकडून गळे दाबवून अथवा ह्या असख्य खड्गापैकीं एखाद्या खड्गाने त्याजकडून कत्तल घालवून अगावर शहारे आणणारे रक्तपातहि करवितो मी एक करवितो आणि एक नाहीं! क्रूरपणाला ज्यापुढे सीमाच उरणार नाहीं, इतकीं अनन्वित आणि अघोर कर्मे मी त्याच्याकडून करवितो! माझें एकच स्वरुप आहे असे नाहीं माझे रुद्र स्वरुप आहे तसेंच सौम्य स्वरुपहि आहे त्याचप्रमाणे कित्येक प्रसगी उच्च-मनोवृत्तींच्या उद्दीपनार्थहि मला केव्हाकेव्हा अवतार धारण करावा लागतो माझी गतीहि पण सर्वत्र आहे च.कश्चित् भिकाऱ्याच्या झोपड्यापासून तो तहत सुधाधव-लित राजहर्म्यापर्यंत मला मज्जाव असा कुठेच नाही! देश, काल आणि वर्तमान या सर्वांना पुरुन मी उरलों आहे, आणि यापुढेहि असाच रहाणार हे माझें मूर्त स्वरूप मनुष्यास फार क्वचित् पहावयास मिळते मी सर्वकाल वायुरूपी अग्नि-ज्वालेच्या स्वरूपानें सचार करित असतों, मला हव्या तितक्या सूक्ष्म रध्रातून हव्या त्या प्राणिकोटीत सहज शिरता येते, असा मी अकुठितगति आहे आणि एकाच काली मी सर्व ठिकाणी असू शकतो! माझ्यापुढे सर्वांनी हात टेकले आहेत माझा सचार या एका मृत्युलोकातच आहे असे नाही, तर स्वर्ग आणि पाताल, चद्र, सूर्य, आदिकरून जे नाना लोक आहेत तेथेदेखील माझा अप्रतिहत सचार आहे! मोठमोठ्या देवादिकानाहि मी माझे दास करून सोडिले आहे, मग इतराची कथा काय? मोटमोठे ऋषिवर्य, साधुसत आणि महान् विचारी पुरुष, या सर्वांनाहि मी एकेक वेळ आपला प्रभाव दाखवून सोडला आहे ज्याचेपुढे माझे काही चालावयाचे नाही अशा एकदोन प्रकृति आहेत;

पण माझ्या सामर्थ्यास त्या फारच कचित येतात! त्या प्रकृती म्हणजे मूर्तिमत सुविचार आणि शांती ह्या होत. त्यांचेपुढें मात्र माझें कांहीं चालावयाचें नाहीं, हें मी जाणून आहें त्यांची माझी गांठ पडण्याचा सहसा योगच जुळून येत नाहीं. माझ्या सत्प्रभावाचा मासला आज ऋषिपुत्र द्रोणाचार्यांच्या ठिकाणी आपल्याला थोडाबहुत दिसून आला आहे. या कटोऱ्यातले रक्ताचे दोन थेंब मी द्रुपदराजाच्या हस्तकोशात टाकिले आहेत आणि त्याचप्रमाणें दुर्योधनादि अंधपुत्रांच्याहि अंतःकरणांत ह्या अर्कापासून तयार केलेलें जहर विष ओतून त्यास ह्या दिवटीनें चेतवून त्यांच्या हातीं आपलीं शस्त्रें टाकून आलो आहे. त्यायोगानें त्यांच्या सर्वांगाचा एकच आगडोंब होऊन गेला आहे. आतां थोडक्याच कालांत भयंकर भडका होऊन जाऊन माझ्या असत्प्रभावाचा मासला पुढें लौकरच ओढव-णाऱ्या प्रलयकालांत दिसून येईल! ज्ञानप्रकाशाच्या देदीप्यमान प्रकाशांत, अथवा अज्ञानाच्या गडद अंधकारांत ही माझी दिवटी अशीच्याअशीच तेवत रहाणार! अचल गिरिवरांनाहि उडवून टाकणारा विचाराचा महान् झंजावात सुटला, शांतीनें प्रलयकालच्या पर्जन्यासारखा धो धो पाऊस पडला, अथवा जागच्याजागी महार्ण-वांनाहि गोठवून टाकणारें शीत पसरलें, तरीहि ह्या माझ्या दिवटीस कशापासून यत्किंचितहि भीति नाहीं! हिचें तेज लुप्तप्राय करण्याची जर कुणाची हिंमत असली, तर त्यानें इथें दंड थोपटून उभें रहावें. नाहींतर माझ्यापुढें माना वाकवून मुकाट्यानें घरोघर चालतें व्हावें. ह्यापुढें ह्या मूर्त स्वरूपांत मला इथें दीर्घ काल रहातां येत नाहीं. मला कल्पना-सृष्टींतच प्रयाण केलें पाहिजे. तेव्हां हा पहा मी ह्या क्षणींच आतां अदृश्य होतों!

[ अदृश्य होतो



गृहं तु गृहिणीहीनं कान्तारादतिरिच्यते ।

मनोरंजक ग्रंथप्रसारक मंडळीची पुस्तकमाला.

पुस्तक ६ वें.

# द्रोणसंकोप

अथवा

## मानभंग आणि सूड.



असाध्य वस्तूची नव्हे प्राप्ति ।
तरी कां मनुष्य धरावे हातीं ॥

—मुक्तेश्वर



लेखक—‘ किरात. ’

[ प्रथमावृत्ति ]



मुंबई,

मनोरंजक ग्रंथप्रसारक मंडळी,

मार्च १९०४

‘ किरात ’कृत ऐतिहासिक व इतर नाटके.

| | | |
|---|---|---|
| १ पानिपतचा दुर्दैवी मोहरा | किमत. | १–०–० |
| १ यक्षप्रमाद अथवा मुक्तवेणीदास–वधन | | १–०–० |
| १ राजाराम आणि ताराऊ | ,, | ०–१२–० |
| १ राणा जगदेव | ,, | ०–१२–० |
| १ विजयानगरचा डळमळीत राजमुकूट | ,, | ०–१०–० |
| १ वुइल्यम टेल् अथवा बाका तिरंदाज. | ,, | ०–८–० |
| १ पन्हाळगडचा किल्लेदार | ,, | ०–४–० |

हीं पुस्तके खालील पत्त्यावर विकत मिळतील —

मनोरजक ग्रथप्रसारक मडळी, गिरगाव–मुबई

# महाभारतप्रशंसा.

इतिहासोत्तमादस्मात् जायते कविबुद्धय

आदिपर्व, अध्याय २ रा, श्लोक ८५.

नाना कथारूपें भारती । प्रगटली असे त्रिजगती ।
आविष्करोनि महामती । व्यासाचिये ॥ ३२ ॥

म्हणोनि हा काव्या रावो । ग्रंथगुरुवतीचा ठावो ।
एथूनि रसा झाला आवो । रसाळपणाचा ॥ ३३ ॥

एथ चातुर्य शाहणें झालें । प्रमेय रुचीस आलें ।
आणि सौभाग्य पोखलें । सुखाचें एथ ॥ ३५ ॥

माधुर्यो मधुरता । शृंगारीं सुरेखता ।
रूढपण उचिता । दिसलें भलें ॥ ३६ ॥

भानुतेजें धवळलें । जैसें त्रैलोक्य दिसे उजळिलें ॥
तेमें व्यासमती कवळिलें । मिरवे विश्व ॥ ३९ ॥

—ज्ञानेश्वर

"जगातील सर्व उत्कृष्ट वीररसप्रधान काव्यामध्यें महाभारताची प्रमुखत्वानें गणना केली पाहिजे . . . महाभारताचा विषय मोठा संमिश्र आहे. नुसत्या 'महाभारत' या एका शब्दावरूनच विशालत्व व संमिश्रत्व यांची कल्पना मनात उभी राहते. भारतातील विषयाच्या अंगभूत गोष्टी व प्रसंग इतके अनेक व भिन्न आहेत कीं, अर्वाचीन सर्व कवींनीं कल्पिलेल्या उत्कृष्ट प्रसंगाचा उगम भारतात सापडेल. सौतीचे म्हणण्याप्रमाणें सर्व अर्वाचीन कविपक्ष्यांचे महाभारतरूपी वटवृक्ष हें विश्रांतिस्थान आहे किंवा ही काव्यस्फूर्तीची एक प्रचंड नदी असून तींतून वाटेल त्या कवीनें आपली तहान भागवून घ्यावी!

* * *

पात्रस्वभाववैचित्र्य व त्याचें यथावस्थ वर्णन हे शेक्सपिअरचे जसे गुण आहेत तसे ते भारतातहि दृग्गोचर होतात. पण आश्चर्य हें कीं, शेक्सपिअरनें जीं भिन्न पात्रें अनेक नाटकात आणलीं, तसलीं व्यासानीं एकाच काव्यात गोंवून दिलीं.

* * * *

इलियड हें जसें राष्ट्रीय काव्य आहे तसें महाभारतहि असून त्यात आर्यांच्या पुराणकथा व प्राचीन इतिहास यांचें भांडार आहे.

* * * *

महाभारतातील संभाषणें वीररसप्रधान काव्यास साजतील अशींच उत्तम आहेत. किंबहुना संभाषण हें महाभारताचें प्रधान व उत्कृष्ट अंग आहे. भारतातील भाषणें जोराचीं, वक्तृत्वपूर्ण आणि त्या त्या पात्राचे स्वभावास साजतील अशींच आहेत . . . त्यामुळें महाभारतास नाटकाचेंच स्वरूप प्राप्त आलें आहे."

चिं. वि. वैद्य.

# प्रस्ताव.

नाट्यं भिन्नरुचेर्जनस्य बहुधाप्येकं समाराधनम् ।

—कालिदास.

द्रोणरुकोप नाटक हें पौराणिक नाटक आहे यास मूळ आधार महाभारताचा आहे. ज्या महाभारतावर आजपर्यंत अनेक स्वरूपात महाकवींच्या उड्यावर उड्या पडल्या, महाराष्ट्र काव्यामध्ये ज्याच्या अनेक प्रतिकृति निर्माण झाल्या व विद्यमानकालींहि ज्याची महाराष्ट्र भाषेंत दोनतीन भाषांतरें अथवा रूपांतरे झाली आहेत, इतकेंच नव्हे– पण प्रसिद्ध बाबू प्रतापचंद्रराय नामक वंगदेशीय विद्वानानें ज्याचें इंग्रजीमध्यें समग्र भाषांतर केलें आहे व रोमेशचंद्र दत्तासारख्या दुसऱ्या एका वंगदेशीय विद्वानानें ज्याला आंग्ल भाषेंत कविताबद्ध करून टाकिलें आहे त्या महाकाव्यातून—त्या वीररसप्रधान राष्ट्रीय महाकाव्यातून—एखादें सुंदर कथानक घेऊन त्यावर नाटक रचून त्यायोगें भिन्नभिन्न अभिरुचीच्या जनवृंदाचें समाराधन करून जमल्यास त्याच्या अभिरुचीची दिशाहि थोडीशी वळवावी, अशा हेतूनें प्रकृत प्रयत्न केला आहे

निरनिराळ्या भाषांतील वाङ्मयाची उत्पत्ति, अभिवृद्धि, त्याच्या स्वरूपांत झालेला फेरफार व त्याचा इतिहास याचें अवलोकन केलें असता असें दिसून येतें कीं, प्रत्येक भाषेच्या वाङ्मयांत प्रथमतः काव्यग्रंथ निर्माण झाले आहेत या काव्यांच्या श्रवणानें अथवा वाचनानें होणाऱ्या आल्हादाची सीमा होऊन एकाच प्रकारच्या रचनेची अति परिचयामुळें अवज्ञा होऊन, त्या रचनेमध्यें नवीननवीन स्वरूपाचा समावेश करावा व एकच प्रकारच्या वाक्यरचनेस विटलेल्या आणि कंटाळलेल्या श्रोतृवृंदास अथवा वाचकवृंदास कांहीं निराळ्या प्रकारानें तोषवावें असें काव्यकारास वाटून त्यांनी नवीन दृश्यकाव्यें रचिलीं असावीं हीं दृश्यकाव्यें म्हणजे नाटकें होत प्राचीन काळच्या ग्रीक व लॅटिन भाषाप्रमाणेंच संस्कृत वाङ्मयातहि असाच प्रकार झालेला आढळून येतो आणि संस्कृत भाषेपासून जन्म पावलेल्या सांप्रतच्या आपल्या महाराष्ट्र भाषेच्या वाङ्मयातहि पुढें तोच प्रकार दिसून येतो

संस्कृत वाङ्मयामध्यें सर्वांत श्रेष्ठकाव्यें म्हटलीं म्हणजे रामायण व महाभारत हीं होत या दोन आदिकाव्यापासूनच पुढील बहुतेक सर्व श्राव्य अथवा अदृश्य काव्यें (Poetry) व दृश्यकाव्ये (Dramas) निर्माण झालीं आहेत

महाभारताच्या आधारें संस्कृतांत जे काव्यग्रंथ झाले आहेत त्यांत दृश्य काव्याचे ग्रंथ असे फारच थोडे आहेत श्राव्य अथवा अदृश्य काव्याचे ( Poetry ) मात्र पुष्कळ आहेत भारतावरून रचिलेलीं नाटकें संस्कृत वाङ्मयांत चारच उपलब्ध आहेत एक भट्ट नारायणाचें वेणीसंहार, दुसरें कालिदासाचें शाकुंतल, तिसरें राजशेखर कवींचें बालभारत व चवथें धनंजयविजय बालभारताचेतर दोनच अंक उपलब्ध आहेत. अदृश्य काव्यग्रंथाकडे पाहिलें तर युधिष्ठिरविजय, नैषधकाव्य,

राघवपांडवीय, रावणार्जुनीय, यदुभारत, भारतमंजरी, किरातार्जुनीय असे कित्येक नामांकित काव्यग्रंथ ठळकपणें दृष्टीस पडतात. वर दिलेल्या दृश्यकाव्यांच्या व अदृश्य काव्यांच्या सरयेकडे पहातां, अदृश्य काव्याकडे कविवर्गाचा जितका ओढा होता तितका दृश्य काव्याकडे नव्हता, असें स्पष्ट दिसतें; व याचें कारण नाटकप्रयोगास प्रतिकूल अशी तत्कालीन परिस्थिति असावी, अथवा कदाचित् नवीन काव्यप्रकारासंबधानें साशंक होऊन कविवर्गानें प्राचीनांची पद्धतीच अनुसरली असावी, अथवा प्राचीन कवींच्या कृतींच्या तोडीचीं काव्यें निर्माण करण्यातच बुद्धीचें खरें कौशल्य व खरा श्रेष्ठपणा आहे असें त्यास वाटत असावें, असें दिसतें आणि त्यामुळेंच त्या काळीं मुबलक नाटककार अवतीर्ण होणें अशक्य झालें असावें अथवा यदाकदाचित् कांहीं नाटकग्रंथ असे झाले असल्यास ते वेळोवेळीं घडलेल्या राजकीय स्थित्यंतराच्या भयंकर आघातामुळें कालाच्या विस्तृत व भेसुर उदरांत गडप होऊन गेले असतील ! यासंबधानें आज निश्चित असें कांहींच अनुमान करितां येत नाहीं.

संस्कृत वाङ्मयांतील ज्या नाटकांस महाभारताचा आधार आहे त्यासंबधानें हें झालें- रामायणाच्या व भागवताच्या आधारें झालेले नाटकग्रंथहि संस्कृतांत चारपांचच दिसतात. एकंदर उपलब्ध अशा संस्कृत नाटकांची संख्या पाहिली तर तीहि ३०।४० नाटक- ग्रंथांच्या पलीकडे जाणार नाहीं. पण यासंबधानें येथें विचार कर्तव्य नाहीं. एकंदरींत दृश्य काव्याकडे कवींचा ओढा कमी होता, हें दाखविण्याचाच आमचा आशय आहे.

हें संस्कृत वाङ्मयासंबधानें झालें. आतां महाराष्ट्र वाङ्मयाकडे पहातां पन्नाससाठ वर्षांपूर्वी त्यांत नाटकग्रंथ असा कोणीच लिहिलेला आढळून येत नाहीं. सर्व कवींचा भर केवळ अदृश्य काव्यग्रंथावर होता, दृश्य काव्यग्रंथावर नव्हता. आदिकवि मुकुंदराजा- पासून तों डफ हातांत घेऊन नाचणाऱ्या रामजोशी, अनंतफंदीपर्यंतच्या कविमंडळाकडे पाहिलें तर ते सर्व साधुसंत होते असें आढळून येतें. परमेश्वरविषयक निस्सीम भक्तीनें ज्यांचीं अंतःकरणें उचंबळून जाऊन तेथूनच त्यांच्या काव्यमकरंदास भरतें येत असल्याचा प्रकार दिसतो. या पांचसहाशें वर्षांच्या काळांत जे हे संतकवी निर्माण झाले त्यांनीं जें महत्कार्य केलें तें राष्ट्राची नीति, धर्म व इतिकर्तव्यता ही जागृत ठेवून त्यांतील व्यक्ति- मात्राच्या ठिकाणीं असणाऱ्या उच्च मनोवृत्ति उत्तम तऱ्हेनें पोसण्याचें होय. या कालाच्या उत्त- रार्धांत महाभारत व रामायण यासारख्या वीररसप्रधान राष्ट्रीयकाव्यांनां महाराष्ट्र भाषेंत आणून सोडणारें कविमंडळ निपजलें व हा काळहि असाच होता कीं, ज्या वेळीं अशाच ग्रंथाचे पाठ देणारे राष्ट्रीय शिक्षक पाहिजे होते. भारतीय वीरांच्या ठिकाणीं असणारे शौर्य, साहस, पराक्रम, धैर्य, सत्यैकनिष्ठता, धर्मनिष्ठा व कर्तव्यदक्षता इत्यादि गुण व इतर उच्च मनोवृत्ति यांचा आपल्या जिवंत वाणीनें पुनश्च प्रादुर्भाव करणारे महापुरुष या काळीं पाहिजे होते व ते तसे निर्माणहि झाले, आणि त्यांनीं जें कार्य करावयाचें तें केलेंहि.

महाराष्ट्र भाषेंत दृश्यकाव्यें रचणारे कवि निपजण्याचा काल यापुढें यावयाचा होता. हिंदु साम्राज्याची घडी बरोबर बसून सर्वत्र शांतता नांदू लागली असती ह्मणजे अर्थात् लोकांच्या मनोरंजनाचीं साधनेंहि निघालीं असतीं व त्याबरोबरच महाराष्ट्रांत नाटक-

फारहि अवतीर्ण झाले असते पण दुर्दैवानें तसा सुयोगच जमून आला नाहीं एकोणि-साव्या शतकाचे पूर्वार्धांत भयंकर राज्यक्रान्ति होऊन महाराष्ट्रांत इंग्रजी अमदानीस सुरुवात झाली येथील राजेरजवाड्यावर इंग्रजी साम्राज्याचें छत्र उभारलें गेलें, आणि मग अर्थातच त्यास युद्धप्रसंगासारख्या खटाटोपांत पडण्याचें कारणच उरलें नाहीं ! नवीन दिशेनें शिक्षण देण्याची दिशा ठरून हाहा ह्मणता विद्याप्रसार सुरू झाला व सर्वत्र शांततेचें साम्राज्य पसरलें ह्या साम्राज्याचा व शांततेचा महाराष्ट्रास लाभ होण्यापूर्वी तो कर्नाटकास झाला होता व तिकडे संस्कृत नाटकाचे प्रयोग जे क्वचित् यात्रेच्या प्रसंगीं करण्यांत येत त्याच्या अनुकरणानें ललिताचे व दशावतारी खेळाचे प्रघात सुरु झाले होते महाराष्ट्रांत शांततेचें साम्राज्य पसरून तेथील राजेरजवाड्याच्या दृष्टीस वरील प्रकार पडल्याने दुसरें कांहीं कर्तव्य उरलें नसल्यामुळें महाराष्ट्रांतहि ललिताची व दशावतारी खेळाची अस्सलबरहुकूम नक्कल सुरू झाली ! या नक्कलेंतच महाराष्ट्रीय नाटकाचें आद्य स्वरूप दृग्गोचर होतें कोणत्याहि देशाच्या नाट्येतिहासाकडे पाहिलें तरी असेंच आढळून येईल कीं, नाटकप्रयोगाकरिता प्रथमत जे विषय निवडले जावयाचे ते दैविक अथवा ईश्वरविषयकच असावयाचे आणि महाराष्ट्रांतहि प्रथमत अशाच विषयाची निवड झाली पुढें महाराष्ट्रांत होणाऱ्या ललिताचें व दशावतारी खेळाचें अव्यवस्थित व अनिश्चित स्वरूप बदलून नाटकाकरिता महाभारत, रामायण व भागवत यांतील पौराणिक कथाभागाची निवड होऊन पौराणिक नाटकाच्या प्रयोगास सुरुवात झाली

द्रौपदीवस्त्रहरण, विराटपर्व, बाणासुरबकासुरादिवध, प्रमिलास्वयंवर, वत्सलाहरण, बभ्रु-वाहननाटक, किरातार्जुनयुद्ध हे व अशा प्रकारचे अनेक कथाभाग निवडले जाऊन त्यावर नाटकप्रयोग होऊं लागले पण हीं नाटकें त्या वेळीं व्यवस्थित रीतीनें लिहिलेली नसत-याच वेळेस दामाजीपंताचा फार्स, नारायणराव पेशवे याच्या मृत्यूचा फार्स, अफझूल-खानाचा फार्स, झांशीचीराणी, हीं नाटकेंहि पुढें आलीं फार्स, प्रहसन व नाटक कशास ह्मणावें याची त्या वेळीं असावी तशी जरी कल्पना नसली, तरी वर निर्दिष्ट केलेल्या प्रसंगाची झालेली निवड पहाता 'भक्तिरसपरिप्लुत' नाटकाचें व 'ऐतिहासिक' नाटकाचें मूळ स्वरूप त्यांत स्पष्टपणें दिसतें, ही गोष्ट विशेष लक्ष्यांत ठेवण्यासारखी आहे लोकोत्तर, असामान्य व आश्चर्यकारक आणि चमत्कृतिजनक गोष्टी व प्रसंग मनुष्यास थक्क करून सोडून त्याच्या मनावर कसकशी कार्यें करितात, याचें वर निर्दिष्ट केलेल्या विषयाच्या निवडींतच स्पष्टपणे प्रतिबिंब दिसून येतें दामाजीपंताचें औदार्य, अफझूलखानाचा वध, नारायणराव पेशव्याचा खून व झांशीच्या राणीची शेवटची धडपड, ह्या लोकर विसरून जाण्याइतक्या सामान्य व दैनंदिन व्यवहारांत नेहेमीं घडून येणाऱ्या गोष्टी नव्हत्या, आणि ह्मणूनच त्या नाटकास विषयीभूत झाल्या-आंग्लविद्येशीं केवळ अपरिचित असणाऱ्या नाटककाराकडून अशा रीतीनें वरील नाटकें पुढें येत होतीं त्याच सुमारास दुसरीकडे इंग्रजी विद्येच्या प्रसाराबरोबर संस्कृत विद्येचाहि प्रसार नवीन पद्धतीनें जोरानें होऊं लागून तत्कालीन सुशिक्षित लोकांच्या परिश्रमानें संस्कृत नाटकाचीं मराठींत भाषांतरें होऊन त्याच्या प्रयोगाचाहि उपक्रम सुरू झाला आंग्ल-विद्याविभूषितानीं इंग्रजी नाटकाच्या भाषांतरास सुरुवात करून कांहीं 'बुकिश' (गद्यात्मक)

खेळहि रंगभूमीवर आणिले, व त्यानंतर शेक्सपिअरसारख्या लोकमान्य आंग्ल महाकवींच्या नाटकग्रथांचीं भाषांतरें होऊन त्यांचे प्रयोग होऊं लागले. याचकाळीं दुसरीकडून लोकाभिरुचीस निराळें वळण लागत चाललें. कांही नाटकें सामाजिक विषयावर होऊन त्यांचे प्रयोगहि लोकप्रिय होऊं लागले पुढे हिंदुसाम्राज्याची महाराष्ट्रांत स्थापना करणारे व त्यास साह्यभूत होणारे वीरपुरुष नाटकाचे विषय झाले. यापुढें वीररसप्रधान अशीं काल्पनिक ऐतिहासिक नाटकेंहि पुढे आलीं एका बाजूने हा प्रकार होत असतां दुसरीकडून संगीत नाटकाची जी एक भयंकर लाट उसळली त्या लाटेबरोबर पाचपन्नास संगीत नाटकें बाहेर आलीं! व 'हा हा मदना' आणि 'रंगीनें लाविला चुटका' यासारखे धांगडधिंगे सुरू होऊन लोकाभिरुचीस चांगलें वळण लागण्याऐवजी अत्यंत घातुक असें वळण लागलें. इकडे गद्यात्मक नाटकांची दिशा बदलून तुकाराम, रामदास, एकनाथ आदिकरून साधुसंतमंडळी सांप्रत नाटकाचे विषय होऊन बसले आहेत. हा प्रकार पाहून अशी भीति वाटते कीं, तेराव्या शतकांतील मुकुंदराज ज्ञानेश्वरापासून तों एकोणिसाव्या शतकाच्या आरंभीच्या डफवाल्या अनंतफंदीपर्यंत ही ऐतिहासिक (!) व भक्तिरस परिप्लुत नाटकांची लाट जाऊन आदळते कीं काय! संगीत नाटकाचा जो सध्या प्रवाह वहात आहे त्यावरहि वरील लाटेचे थोडेंबहुत कार्य होईलसा रंग दिसतो असो.

वर दिलेल्या त्रोटकशा महाराष्ट्र नाट्येतिहासावरुन लोकाभिरुचीची कल्पना व समाजाच्या अंत स्वरूपाचे आविष्करण हीं करण्यास पुष्कळ अवकाश सापडेल, आणि त्याचप्रमाणें राजकीय, सामाजिक व धार्मिक विचारासंबंधानें समाजाचा ओघ कोणत्या दिशेनें वहात आहे याचीहि सूक्ष्मरीतीनें अवलोकन केलें असता बिंबप्रतिबिंबन्यायानें अंशत अटकळ करितां येईल

आमच्या समाजाच्या सध्याच्या राजकीय, सामाजिक व धार्मिक स्थितीचा विचार करिता महाभारतासारख्या लोकमान्य ग्रंथाचा लोकसमूहास परिचय करून देण्याची आज अत्यंत आवश्यकता भासत आहे. महाभारत व रामायण यासारख्या राष्ट्रीय महाकाव्यांतील पुरुषासंबधानें विद्यालयांतील व विश्वविद्यालयांतील विद्यार्थिवर्गाच्या ठिकाणीं आढळून येणारें अज्ञान व त्याच्या पालकाच्या ठिकाणीं स्पष्टपणें दृगोचर होणारें ताटस्थ्य व औदासिन्य हीं अत्यंत शोचनीय होत समाजांत रूढ असलेल्या कथापुराणाच्या लोकमान्य संस्थाहि हळहळ लुप्तप्राय होत चाललेल्या आहेत, व कीर्तनप्रसंगीं हरिदासांनीं "टाळी महाराज" म्हटल्याबरोबर हरिनामाच्या गजराबरोबर होणारी सामिश्र श्रोतृवृंदाची पवित्र पौर्वात्य टाळी जाऊन तिच्या ऐवजीं पाश्चिमात्य टारगट व छिचोर टाळी सुरू लागली आहे! समाजाची ही स्थिति अत्यंत उद्वेगजनक व नैराश्य उत्पन्न करणारी आहे

या सर्व गोष्टीकडे दृष्टी पोंचवूनच आम्ही 'पौराणिक नाट्यकथामाले' चें हें प्रथम पुष्प' गुंफिलें आहे. नाट्याचा आश्रय करण्याचें कारण प्रस्तावनेच्या आरंभीं अवतरणांत जी महाकवि कालिदासाची उक्ति नमूद केली आहे तिच्यावरून उघडच होत आहे. कारण भिन्नभिन्न अभिरुचींच्या लोकांचें समाराधन करण्याचा सुलभ व उत्कृष्ट असा जो एकच मार्ग आहे तो नाट्याचाच होय. आणि एवढ्याचकरिता प्रकृत

त्याच्या चरणीं अनन्यभावानें प्रणाम करून व सहृदय आणि प्रेमळ अशा लोकवृंदास श्री ज्ञानेश्वराच्या—

'ऐसा काव्यनाटका
जे निर्धारिता सकौतुका
त्याचि रणक्षुणती क्षुद्र घटिका
अर्धघटी.'

या उक्तीची विनयपूर्वक स्मृति देऊन हा लांबलेला प्रस्ताव पुरा करितों.

पौष वद्य ४ थी,
शके १८२५.

'किरात.'

Reg. No. B. 165

## मनोरंजक ग्रंथप्रसारक मंडळी, गिरगांव–मुंबई.

[ मंडळीनें प्रसिद्ध केलेलीं विक्रीस तयार असलेलीं पुस्तकें. ]

| | | किंमत. | टपालखर्च |
|---|---|---|---|
| १ | धाकट्या सूनबाई.(कापडी बांधणी) | ०–१२–० | ०–१–० |
| २ | संसारांतल्या गोष्टी | ०–६–० | ०–१–० |
| ३ | गुणसुंदरी † | ०–१२–० | ०–१–६ |
| ४ | नवयुग † | ०–१२–० | ०–१–६ |
| ५ | सरस्वती † | ०–८–० | ०–१–० |
| ६ | द्रोणसकोप | ०–६–० | ०–१–० |
| ७ | रमा आणि माधव. | ०–४–० | ०–०–६ |
| ८ | मुरारराव. | ०–४–० | ०–०–६ |
| ९ | हंसदूत. | ०–२–० | ०–०–६ |
| १० | मोहन–तारा. | ०–२–० | ०–०–६ |
| ११ | स्त्रियांचीं कर्तव्यें. ( कापडी बांधणी ) | १–०–० | ०–१–६ |
| १ | महिला वर्षे १ लें, पूर्वार्ध. | १–४–० | ०–२–० |
| २ | महिला वर्षे १ लें, उत्तरार्ध. | १–४–० | ०–२–० |
| ३ | मनोरंजन पुस्तक ४ थें | १–८–० | ०–२–६ |
| ४ | मनोरंजन पुस्तक ५ वें | १–८–० | ०–२–६ |
| ५ | मनोरंजन पुस्तक ६ वें. | १–१२–० | ०–३–० |
| ६ | मनोरंजन पुस्तक ७ वें. | २–०–० | ०–३–० |
| ७ | मनोरंजन पुस्तक ८ वें | २–८–० | ०–३–६ |
| ८ | महाराष्ट्र महिला (मासिक पुस्तक ) वार्षिक वर्गणी ट. ह. सह २–८–० | | |
| ९ | मासिक मनोरंजन (मासिक पुस्तक ) वार्षिक वर्गणी ट ह सह २–८–० | | |

### बाहेरील पुस्तकें

| | | | |
|---|---|---|---|
| १ | बालरामायण | ०–३–० | ०–०–६ |
| २ | बालभारत | ०–५–० | ०–०–६ |
| ३ | भारतांतील सोप्या गोष्टी | ०–१०–० | ०–१–० |

† कापडी बांधणीनें पुस्तक हवें असल्यास चार आणे जास्त पडतील

Printed at the 'Nirnaya Sagar Press' & Published by K. R. Mitra, at Girgaon, BOMBAY, for the 'Manoranjak Granth Prasarak Mandali'

नम्र जाला भूतां । तेणें कोंडिलें अनंता ॥ —तुकाराम.




वार्षिक वर्गणीः—मुंबईंत २–४–० बाहेरगांवी २–८–०.

दर अंकास ट. ह. सह ०–४–६

भलेंचिया बोला नाहीं पैसावट ।
मळल्या गोट कष्टी येई । —तुकाराम.

# मनोरंजन.



## राष्ट्रीय प्रार्थना.

हे कृपानिधे! जगत्पालका! आम्ही तुजला अनन्यभावें शरण आहोंत. आमच्या आर्य राष्ट्रावर कृपा कर. हे विश्वपालका! इतर लोकांना पृथ्वीवर इतर ठिकाणीं रहाण्यास बहुत देश आहेत; असें असून ते या देशांत येऊन राहूं लागले तरी आम्ही त्यांचा द्वेष करित नाहीं. इतकेंच नव्हे, तर आम्ही त्यांना कोणताहि त्रास देत नाहीं, आणि बंधुभावानें वागत असतों. असें असतां, ज्यांना आम्हीं आश्रय दिला व देतों, ते आमचा द्वेष कां करितात? आम्हीं सनातन धर्म सोडावा व त्यांचे पंथ धरावे, अशी इच्छा कां करितात? आपल्या एखाद्या साधूचें महत्व वाढविण्याकरितां, अनादिकाळापासून जे सनातन धर्माचे ऋषी आले व तुझे जे प्रत्यक्ष अवतार आले, त्यांचा उपहास कां करितात? आम्ही सनातनधर्मी पृथ्वीवर फक्त या एकच देशामध्यें आहोंत. या धर्माचे असा नाशानें आम्हीं या देशांतहि नामशेष व्हावें, अशी आम्हीं आश्रय दिलेल्या लोकांची इच्छा, आमच्या देशाचें अन्नपाणी खाणारांची इच्छा, हे सनातनधर्मरक्षका परमेश्वरा! तुला आवडते कशी? हे परमेश्वरा! अनपराध हा आमचा दोष झाला काय? क्षमा हा आमचा दोष झाला काय? इतर मानवांविषयीं शंका न घेतां त्यांचें आम्ही स्वागत करतों हा आमचा दोष होतो काय? आमच्यासारखे निरपराधी, आमच्यासारखे क्षमाशील, आमच्यासारखे वसुधैव कुटुंब मानणारे, दयार्द्र अंतःकरणाचें, सौम्यवृत्तीचें राष्ट्र आज जें अपमान सोशित आहे, ज्या यातना भोगित आहे, त्यांत हे परमपुरुषा! तुझ्या थोरवीस कमीपणा आहे. आमची लज्जा तुला आहे. आमच्या राष्ट्राला असा निर्वीर्य ठेवल्यापासून तुझ्या भक्तीचा उत्कर्ष तरी या पृथ्वीवर कसा होणार? हे परमेश्वरा! तुझ्या सृष्टि-योजनेंतील स्पष्ट रचनेंत कोठेतरी कांहीं कळ बिघडली आहे असें दिसतें. हे परमेश्वरा! तुझ्या कृपादृष्टीच्या योजनेनें ती दुरुस्त होवो व तीबरोबरच आमच्या राष्ट्राचें भाग्यहि सुधारो!



# १९ व्या शतकांतील बंड.

## प्रकरण ८ वें

## तात्यासाहेब आणि प्रियंवदा.

"ताई, ये, इथे बैस आणि मला तुझ्या त्या मैत्रिणीची हकीगत सांग पाहूं" तात्यासाहेब आपल्या मुलीला प्रेमानें जवळ बोलावून म्हणाले.

संध्याकाळची वेळ. आपला नित्य व्यवसाय आटपून तात्यासाहेब विश्रांति घेत बसले होते. ह्या वेळ ते बहुधा आपल्या त्या एकुलत्याएक मुलीच्या समागमांत घालवीत. मुलीचें नांव प्रियंवदा असें त्यांनीच ठेविलें होतें. परंतु घरांत नोकर चाकर मंडळी यजमानाच्या या प्रिय कन्येला 'ताईसाहेब' या सन्मानदर्शक नांवानें हाक मारीत. तात्यासाहेबहि त्यामुळें प्रियंवदेला 'ताई'च म्हणत असत. तात्यासाहेब सुशिक्षित आणि सुस्थितींतले गृहस्थ असून प्रियंवदेसहि त्यांनीं चांगलें शिक्षण दिलें होतें. ते सुधारणेचे मोठे भक्त नव्हते, तथापि ते दुराग्रही दुर्धरहि नव्हते. शारदाबाईंचें समान हक्काचें तत्त्व त्यांना मुळींच मान्य नव्हतें, तथापि स्त्रियांना सुशिक्षण देऊन त्यांची स्थिति सुधारेल असें करण्याकडे त्यांच्या मनाची साहजिक प्रवृत्ति होती. प्रियंवदेला जवळजवळ पंधरावें वर्ष लागलें होतें तरीहि तिचें लग्न करून संसाराचें अवजड ओझें तिच्या मस्तकावर लादण्याचें श्रेय त्यांनीं अद्यापि संपादन केलें नव्हतें. यावरून शारदाबाईंप्रमाणें आपल्या मुलीला अविवाहित ठेवण्याचा त्यांचा विचार होता, असें मात्र समजूं नये. प्रियंवदेसाठीं योग्य वर पाहून त्यांनीं तिच्या विवाहाचा वाङ्निश्चयहि करून ठेविला होता. ते स्वतः जरी शारदाबाईंकडे जातयेत नसत तरीहि शारदाबाईंच्या वर्तनावर, त्यांच्या हाल-चालीवर तात्यासाहेबांचें विशेष लक्ष्य असे. ते म्हणत कीं "शारदाबाईंनीं हें एक प्रकारचें बंड आरंभिलें आहे. त्यांत त्यांना यश येण्याचा कालत्रयीं संभव नाहीं, हें सुदैव समजावयाचें. नाहींपेक्षां या बंडाचे परिणाम समाजाला अत्यंत अनिष्ट असे झाल्याविना रहाणार नाहींत." स्त्रियांची परवशता त्यांना दिसत होती परंतु ती दूर करण्याला शारदाबाईंनीं चालविलेलाच कायतो एक उपाय आहे, हें मात्र त्यांना सम्मत नव्हतें, तरीहि शारदाबाईंची विद्वत्ता, बहुश्रुतपणा, स्वीकृतकार्याबद्दल दिसून येणारी त्यांची खरीखरी आस्था आणि तत्प्रीत्यर्थ त्यांनीं केलेला आत्मत्याग पाहून तात्यासाहेबांच्या मनांत शारदाबाईंबद्दल पराकाष्ठेचा आदर वसत होता. आणि म्हणूनच प्रियंवदेला ते त्यांच्याकडे जाऊं देत असत. शारदाबाईंच्या आणि कुमुद-

सुंदरीच्या सहवासापासून आपल्या मुलीचा फायदाच होण्याचा संभव आहे, हे ते जाणून होते त्या दोन मुलींचा स्नेह दृढ होऊं देण्याला याशिवाय आणखीहि एक कारण होतें; परंतु तात्यासाहेब त्याची परिस्फुटता कधी कोणाजवळ करीत नसत. त्या मुलींनातर त्याची कल्पनाहि नव्हती शारदाबाईंना कदाचित् असेल, परंतु त्या असल्या गोष्टींकडे लक्ष्यच देत नसत, किंबहुना त्याबद्दल विचार करण्याला त्यांना अवकाशच नव्हता

तात्यासाहेबांचा स्वभाव पराकाष्ठेचा धार्मिक होता. आणि आपल्या खऱ्या आर्य धर्माचा त्यांना मोठा अभिमान वाटत असे त्यामुळें अर्थात् शारदाबाईंचें आपणास 'ब्रह्मो' ह्मणवून घेणें, आपल्या आप्त मंडळीचा सर्वस्वी त्याग करणें इत्यादि गोष्टी त्यांना आवडत नव्हत्या तरीहि यामुळें शारदाबाईंची योग्यता ते कमी समजत नसत, हें वर सांगितलेंच आहे असो.

तात्यासाहेबांनी हांक मारताच प्रियंवदा त्यांच्याजवळ येऊन बसली आणि विचारूं लागली "बाबा, कसली हकीगत सांगू?"

"कांहींतरी सांग; तुझें बोलणें मला ऐकावेसें वाटतें शिवाय तुझ्या त्या मैत्रिणीची आणि तिच्या आईची मिळेल तेवढी माहिती मला पाहिजे आहे. ते दिवशीं काय तुह्मी तेथें एक लहानसें नाटकच केलेंत नाहीं का? तें नाटक मोठें चांगलें होतें ह्मणावयाचें! स्त्रियांनी स्वतंत्र व्हावें, आपल्या पतीला जुमानूं नये, असेंच काहीं त्याच्यात होतें नाहीं का? तेथें जमलेल्या पुरुषमंडळीला तें पसंततरी कसें पडलें? ती मंडळी तिरस्कारानें उठून कशी गेली नाहीं? आश्चर्यच ह्मणायचें! स्त्रियांची प्रत्येक कृति यांना चांगलीच वाटते—"

"पण बाबा, मी त्यांत आज्ञाधारक पत्नीचा 'पार्ट' घेतला होता"

"हो हो, आणि ताई, ह्मणूनच तर मी तुला त्या नाटकांत पार्ट घेऊं दिला, समजलीस? नाहींपेक्षा तुझ्या त्या मैत्रिणीची मी मुळीच भीड धरली नसती बरें, तें नाटक होऊन गेलें त्याबद्दल आतां वादविवाद नको दुसरें कांहींतरी सांग"

"दुसरें काय सांगू बाबा?" प्रियंवदा बुचकळ्यांत पडल्यासारखी झाली. तात्यासाहेबांना शारदाबाईंबद्दल कसली माहिती पाहिजे होती, हें तिला समजेना ती तात्यासाहेबांच्या तोंडाकडे पाहूं लागली.

आपल्याला कशाविषयीं माहिती पाहिजे हें खुद्द तात्यासाहेबांनाहि माहीत नव्हतें ह्मणण्यास हरकत नाहीं, कारण या बाबतींत त्यांनी पूर्वी कांहींएक

निश्चित केलें नव्हतें प्रियंवदेच्या समागमात संध्याकाळचा वेळ घालवावयाचा, एवढाच कायतो त्याचा हेतु होता अर्थात् त्याना काहींच स्पष्ट उत्तर देता आलें नाहीं शेवटीं काहींतरी विचारावें ह्मणून ते ह्मणाले "ताई, पण त्याची जाततरी कोण, आहेका तुला माहीत ?"

"त्याची जात? शारदाबाई ह्मणतात की आपण 'ब्रह्मो' आहोत जातिबंधन आपण मुळींच मानित नाहीं"

"वा! फार उत्तम! ब्रह्मो बनल्यावर जातिबंधनें पाळण्याची आवश्यकता नाहीं हें ठीक आहे ह्मणा, पण त्यापूर्वी तरी त्या कोणत्या जातीच्या असाव्या असें तुला वाटते?"

"मला काहीं बरोबर सांगता येणार नाहीं, पण बाबा—"

"हं, सांग सांग थांबलीस का? प्रियंवदे! तुझें मधुर भाषण कानीं पडलें ह्मणजे माझ्या श्रमाचा परिहार होतो मी सारे कष्ट विसरून जातों आता थोड्या दिवसानीं तुझें लग्न होऊन तू आपल्या पतीच्या घरी गेलीस ह्मणजे मला या घरात क्षणभरदेखील चैन पडणार नाहीं तूर्त तो विचारदेखील मला दुःसह होतो–" तात्यासाहेब क्षणभर स्तब्ध राहिले नंतर ह्मणाले "बरें ताई. सांग पाहू तुला काय वाटतें ते?"

"बाबा, मला किनाहीं असं वाटतं कीं, त्या आपल्यापैकींच असाव्या"

"हं, हं?" तात्यासाहेबाना आश्चर्य वाटल्यासारखें दिसलें "तूतरी मोठी धूर्त आहेस! असेल कदाचित्, तसेंहि असेल. नाहीं कुणी ह्मणावें? त्या जरी पत्ता लागू देत नाहींत तरी कदाचित् मी त्याना ओळखितहि असेन–कदाचित् त्यांचा आपला काहीं संबंधहि असेल, परंतु जाऊंदे, त्याचें काहीं महत्व नाहीं त्या जर पर्वा करित नाहींत तर आपलेंतरी काय अडलें आहे!"

आतां प्रियंवदा आश्चर्यचकित झाली तात्यासाहेब कधी शारदाबाईबद्दल फारसें बोलत नसत, तेव्हा आज हें त्यानी काय चालविलें आहे हेंच तिला समजेना शारदाबाईंचा आणि आपला कदाचित् काहीं संबंधहि असेल ह्मणून ते ह्मणतात, त्याचा अर्थ काय? ती बुचकळ्यात पडली तात्यासाहेबांच्या च्या बोलण्यात काहीं अर्थ असावा याबद्दल मात्र तिची खात्री झाली कारण एकतर ते उगाच काहींतरी कधींहि बोलत नसत आणि शिवाय शारदाबाईंचें अगदी प्रथमपासून तिच्याशी वर्तन असें काहीं ममतेचें होते कीं, त्या ममतेचा आणि

तात्यासाहेबांच्या या बोलण्याचा खचित कांहींतरी संबंध असावा, असें तिला वाटू लागलें.

तात्यासाहेब ह्मणाले "बरें, आपण असें समजू की, शारदाबाई आपल्यापैकीच आहेत त्यांचें वय मला वाटतें हली चाळीसाजवळजवळ असावें, नाहीं का?"

"होय आणि बाबा, त्यांच्या इथ वडीवडी मडळीतरी किती येते' त्याच समाजात मोठ वजन आहे स्त्रियांची स्थिति सुधारण्यासाठी यत्न करणाऱ्या एकदर मडळीची त्यांच्याशी ओळख आहे. येथील स्त्रीसमाजाच्या त्या पुढारीच आहेत. त्याच भाषण नाहीं तुह्मी कधी ऐकल. अहाहा! कायतरी त्याची वक्तृत्वशक्ति आहे' ऐकणारावर त्या तेव्हाच छाप बसवितात त्यानी लिहिलेल तें मोठ थोरल पुस्तकतर तुह्मी वाचल ना?"

"होय, त्याच्या विद्वत्तेबद्दल मला मुळीच संशय नाहीं त्या एका पुस्तकानेच त्यांची सर्वत्र कीर्ति करून ठेविली आहे ह्मणण्यास हरकत नाहीं आजवर आपल्या देशात कोणा स्त्रीनेतर काय परतु पुरुषानेदेखील असा ग्रथ लिहिला असल्याचें माझ्या पहाण्यात नाहीं त्याबद्दल मला त्याचा मोठा अभिमान वाटतो परतु ताई, त्यानी सपादन केलेल्या अशा अनुभवाचा परिणाम मात्र त्याच्या मनावर योग्य झालेला दिसत नाहीं, ही मोठ्या खेदाची गोष्ट आहे स्त्रियाना हली मिळत असेलल्या शिक्षणाचा परिणाम जर असाच व्हायचा असेल, त्या जर समान हक्कासाठी पुरुषाजवळ निष्कारण भाडण्यास सिद्ध होतील–पुरुषाना मुळीच जुमानणार नाहींत–जगन्नियंत्याच्या आज्ञेचें उल्लघन करू पहातील, तर त्या शिक्षणाची दिशा एकदम बदललेली चागली या बडखोर स्त्रिया समाजरचनेत घोटाळे उत्पन्न केल्याविना रहाणार नाहींत. पण मला वाटत नाहीं की, एकदर स्त्रिया शारदाबाईचे ऐकून अशा बहकून जातील फार लाब कशाला! त्याच्या त्या मुलीवरच त्याच्या या एकदर उपद्व्यापाचा काय परिणाम झाला आहे साग पाहू?"

"आतापर्यंत तरी तो शारदाबाईंना अगदीं अनुकूल असाच झालेला दिसून येत आहे बाबा, तुह्माला नाहींका माहीत, तें 'स्वातंत्र्यविजय' नाटक कुमुद-सुदरीनेंच लिहिलें आहे"

"वाहवा' तर मग शारदाबाईचे व्रत वंशपरंपरेनें चालणार एकूण! बरे, ताई, आता थोडी तुझ्या त्या कुमुदनी हकीगत साग पाहू?"

"मला किनई बाबा, ती भारी आवडते" प्रियवदा आता उत्साहानें बोलू लागली "माझ्या एकदर मैत्रिणींत मला तीच फार आवडते मला वाटत,

तिच्यासारखी मुलगी या दुनयेंत दुसरी नसेल तिचा स्वभाव कितीतरी सरळ; कपट कसं तें तिला माहीतच नाहीं ! ती पराकाष्ठेची सत्यप्रिय असून विश्वासु आहे."

"हं हं ! तूतर तिचा स्तुतिपाठच चालविला आहेस ! मित्र असेच असावे आणि ते आरंभी असे असतातहि ! पण ताई, पुढें अनुभवाच्या कसोटीला मात्र ते उतरत नाहींत, ही मोठ्या खेदाची गोष्ट आहे "

" एरवी ती विलक्षण संकोचवृत्तीची आहे, परंतु दृढस्नेह झाला म्हणजे ती फारच मोकळ्या मनानं वागते मग तिच्याजवळ आंत बाहेर कांहींएक नाहीं कोणतीहि गोष्ट ती आपल्या जिवलग स्नेह्यापासून गुप्त ठेवीत नाहीं आतां एक मात्र आहे कीं, तिला वर्चस्वाची स्वाभाविक हौस आहे आपण इतरांपेक्षा श्रेष्ठ आहों असें तिला वाटत आहे माझ्यावरदेखील तिची मर्जी केव्हां बसली सांगू का ? तिला जेव्हां कळून आलं कीं, मजपेक्षा ती अधिक बुद्धिमान् आहे, तेव्हां "

" असे काय !" तात्यासाहेब मान हालवून म्हणाले " एकूण अहंमन्यता मुलीच्या अंगीहि आईप्रमाणेच आहे ! विपुल संपत्तीचातर हा परिणाम नसेल ना ? "

" छे, छे ! बाबा तसं मुळीच नाहीं संपत्तीचा गर्व कुमुदला मुळीच नाहीं ती स्वभावत च अभिमानी आहे आणि मला वाटतं कीं, विपुल संपत्तीऐवजी ती जरी पूर्ण दारिद्र्यात असती तरीदेखील तिचा अभिमान काडीभरहि कमी झाला नसता "

प्रियंवदा आपल्या स्वाभाविक सरळ वृत्तीनेंच आपल्या मैत्रिणीचें वर्णन करीत होती परंतु तात्यासाहेबांना तें पटलें नाहीं ते म्हणाले "छे, छे, छे ! ताई, तू भोळी आहेस, भोळी ! संपत्तीशिवाय हा अभिमान टिकणें कठीण आहे तू आपली कांहींतरी बडबडते आहेस झालें "

" बाबा, इतर मुलींच्या संबधानं ही बडबड होईल कदाचित्, पण कुमुदची गोष्ट अगदी निराळी आहे तिचा जो अभिमान आहे त्या अभिमानाचा आणि तिच्या संपत्तीचा, सौंदर्याचा, किंवा तिच्या बुद्धिमत्तेचा तिळमात्र संबंध नाहीं ती मला एकदां आपल्या दुसऱ्या एका मैत्रिणीची गोष्ट सांगत होती—त्या मैत्रिणीनं पुढं लग्न केलं—पण छे, तुम्हाला हें समजायचंच नाहीं—"

" नाहीं—खरोखरच समजायचें नाहीं आणि तू सांगूहि नकोस पण कायग, कुमुदचें आतां लग्न कधीं होणार ?"

" लग्न ! अशा रीतीनं तिचा उपमर्द करणारा कुणी पुरुष असेलसं मलातरी वाटत नाहीं बाबा, कुमुदला मुळीच लग्न करायचं नाहीं ती जन्मभर अविवाहित

रागार. कारण लग्न झालें म्हणजे स्त्रियांचें स्वातंत्र्य जाऊन त्या सर्वतोपरी पुरुषाच्या गुलाम होतात, असें तिचें मत आहे."

"मला वाटतें, शारदाबाईचें घर म्हणजे या बाष्कळ, मूर्खपणाच्या कल्पनांचें अधिष्ठानच आहे" तात्यासाहेब किंचित् रागानें म्हणाले "त्या मूर्ख पोरीला म्हणावें, तर मग तू खरोखरच लग्न करूं नकोस! वैवाहिक सुख म्हणजे काय, संततिसौख्य म्हणजे काय, त्याची तिला कल्पनाहि होणें नाहीं विवाहाची योग्यता आमच्या समाजांत काय आहे, पत्नीची वास्तविक योग्यता आमच्या धर्मांत किती आहे, हें तिला कळणारतरी कुठून? धर्माचाराविरुद्ध वर्तन करण्यास —सृष्टिक्रमाला धिक्कारून टाकण्यास या अशा स्त्रियांनी प्रवृत्त व्हावें, हा केवढा मूर्खपणा आहे?"

"पण बाबा, तुम्ही कुमुदवर उगाच रागावतां तिचा यांत मुळींच अपराध नाहीं तुमचा धर्म म्हणजे काय त्याची कल्पनाहि त्या विचारीला नाहीं. शारदाबाईंनी तिला आपल्या धर्माची ओळखदेखील होऊं दिली नाहीं त्या आपल्याला 'ब्राह्मो' म्हणवितात आणि कुमुदला मला वाटतें ह्या वेळपर्यंत धर्मच नाहीं. कारण इतर सर्व गोष्टींप्रमाणें या धर्माच्या बाबतींतहि शारदाबाईंनी तिला पूर्ण स्वातंत्र्य दिलें आहे धार्मिक विषयासंबंधीं शारदाबाईंच्या घरीं क्वचितच् गोष्टी निघतात धर्माची थट्टा करणें मला मुळींच आवडत नाहीं"

"शाबास प्रियंवदे, शाबास! हेंच तत्त्व तू ध्यानांत धर धर्माची थट्टा कधींहि करूं नये आणि प्राणांतींहि धर्मत्यागाची कल्पना मनास शिवूं देऊं नये. ज्यानें त्यानें आपापला धर्म पाळावा कुणाचाहि धर्म असो, त्याची कधींहि निंदा करूं नये बरें, तू म्हणतेस तसेंच आपण क्षणभर धरून चालूं कुमुदसुंदरीचा अभिमान हा स्वाभाविक आहे, असें आपण म्हणूं. कदाचित् तो वंशपरंपरेनें तिच्या अंगीं आला असेल पण ताई ती खरोखरच बुद्धिमान् आहेका? आईप्रमाणें तीहि एखादें पुस्तक लिहिणार की काय?"

"बुद्धिमान्! बाबा, कुमुद खरोखरच बुद्धिमान् आहे पण तिची बुद्धिमत्ता निराळ्या प्रकारची आहे तिला कविता करतां येतात, नाटक रचतां येतात, गोष्टी लिहितां येतात शिवाय ती एखादे वेळीं असे कांहीं मार्मिक प्रश्न विचारते कीं, मोठमोठ्या मी मी म्हणणाऱ्या पुरुषांना निरुत्तर व्हावें लागतें! आह्मा मुलींना तिची स्वातंत्र्यप्रियता पाहून धन्यता वाटते तरुण पुरुषमंडळी, मला वाटतें तिचा अभिमान पाहून तिचें कौतुक करीत असतील अशी पत्नी आपल्याला मिळावी

अशी प्रत्येकाला अभिलाषा होत असेल परंतु बाबा, तिची गोष्ट ह्मणाल तर ती या पुरुषमंडळीची मुळींच पर्वा करित नाहीं. आणि हें तिचें करणें त्यांना कितपत रुचत असेल तें मात्र समजत नाहीं."

"वा, प्रियंवदे, तूंदेखील बरीच हुषार आहेस! तुझ्या मैत्रिणीची तूं चांगलीच ओळख करून घेतली आहेस ह्मणायची! हं चालूं दे तरुणपणाचें मनोराज्यच आहे हें, यांत तथ्य काय आहे तें समजण्याला अद्यापि अवकाश आहे ह्मणा."

"तुह्मी कांहींहि ह्मणा परंतु शारदाबाईंचीतर उत्कट इच्छा आहे कीं, आपल्या मुलीनें आपण चालविलेल्या उद्योगांत अग्रेसरत्व स्वीकारावें त्यांची कुमुदवरतर सारी भिस्त आहे परंतु हें कुमुदच्या हातून कितपत घडून येईल याची मात्र शंका आहे कारण कुमुदचा स्वभाव कांहीं निराळा आहे, शारदाबाईंचा स्वभाव कांहीं निराळा आहे ती पराकाष्ठेची संकोचवृत्तीची असल्यामुळें आजवर तिची ओळखदेखील फार थोडी झाली आहे त्यांत दृढस्नेहतर क्वचितच कुणाशीं झाला असेल, परंतु अशा स्नेह्यांना मात्र ती फार आवडते अशा संकोचवृत्तीच्या मनुष्याची समाजावर छाप पडणें मला वाटतें बरेंच कठीण आहे तिच्यांत कांहीं तरी गूढ आहे, कांहींतरी गुप्त आहे आणि तें प्रयत्नानेंच शोधून काढलें पाहिजे. जसजसें संघट्टण दृढ होत जातें तसतशी तिच्या अगदीं एकएक नवीननवीन गुणाची ओळख पटत जाते फक्त एका तरुण पुरुषाचा आणि तिचा काय तो दृढ परिचय आहे आणि त्याच्याजवळच कायतो तिचा पत्रव्यवहार चालतो तो गृहस्थ ह्मणजे डा शरच्चंद्र हें तुह्माला माहीत असेलच!"

"हो हो, तें मी ऐकलें आहे मलातर कुणींसें सांगितलें होतें कीं, त्याचा विवाह व्हावयाचा आहे निदान डा शरच्चंद्र याचातरी तसा हेतु आहे"

"नाहीं, त्यांतहि कांहीं तथ्य नाहीं त्याचाहि निकाल झाला, असें कुमुदनेंच मला सांगितलें आपल्याला लग्नच कर्तव्य नाहीं, असें तिनें त्यांना साफ सांगून टाकलें"

"चमत्कारच ह्मणायचा! असो ताई, तूं अशीच त्यांच्याकडे जात येत जा आज तुझ्या भाषणानें मला फार आनंद झाला पण प्रियंवदे! एक मात्र लक्ष्यांत ठेव शारदाबाईंच्या समान हक्काच्या खुळाला मात्र तूं आपल्या डोक्यांत थारा देऊं नकोस त्यांचीं लांबच लांब भाषणें ऐकून तूंहि त्या पाशांत सांपडूं नकोस, ह्मणजे झालें परंतु मला वाटतें, तुला हा इशारा देण्याचीहि जरूर नाहीं तूं चाणाक्ष आहेस, धर्मभीरु आहेस, तुला योग्य आणि हितप्रद असें थोडेंबहुत

तरी शिक्षण मीं दिलेलें आहे; स्त्रियाची पवित्र कर्तव्यें काय आहेत हें तू चांगलेपणीं जाणते आहेस. तेव्हा तुझ्याविषयी धास्ती बाळगण्याचे कारणच नाहीं तू खुशाल तेथें जात जा आणि तेथें काय काय होईल तें सावत मला सांगत जा थोड्याच दिवसात तेथें काहीं चमत्कार घडून येण्याचे चिन्ह दिसत आहे मग माझा तर्क कदाचित् चुकतहि असेल कुमुदची तू पूर्ण मर्जी संपादन कर— हे विसरू नकोस—ती तुझ्यावर अवलंबून राहील, प्रसगीं तुझा सल्ला घेईल असें कर"

प्रियवदेला तात्यासाहेबांच्या या बोलण्याचा झोक कळला नाहीं ती खिन्न स्वराने विचारू लागली "बाबा, मला तुम्ही त्याची टेहळणी करायाला का सांगता!"

"अहाग वेडे! तसे करण्यात मला काय फायदा! मला त्याची संपूर्ण हकीगत माहीत आहे, समजलीस! कुमुदसुदरीनें तुझ्यावर विश्वासून रहावे, तुझी सल्लामसलत घ्यावी, एवढेंच मला पाहिजे आहे असे तुजकडून करविण्यात माझा काहीं हेतु आहे मी बोलेन तसा चालणारा मनुष्य आहे, हे तुलातरी माहीत असलेंच पाहिजे माझ्या उद्योगात जर मी काहीं यश मिळविलें असेल तर त्याला हें एक कारण आहे शारदाबाईवर मी नजर ठेवावी, जरूर त्या प्रसगीं त्याना योग्य सल्लामसलत द्यावी—त्याना मदत करावी, सारांश जेणेकरून त्याचे कल्याण होईल अशा रीतीने मी त्याच्याशी वर्तन ठेवावें, अशी एक प्रकारें मजवर जबाबदारी आहे प्रियवदे! याला काहीं तशीच कारणें आहेत. ती सध्याच तुला सागण्यात अर्थ नाहीं तूर्त तू माझ्या बोलण्यावर विश्वास ठेवून चाल, म्हणजे झालें शारदाबाई जरी ओळख देत नाहींत, तथापि थोड्याच दिवसात मी स्वताच जाऊन त्याचा परिचय करून घेणार आहे का, झालें तुझे समाधान? आता तुला हसू येत आहे" तात्यासाहेब हसतहसत विचारू लागले.

"शारदाबाई आता मला ओळखत नसल्या तरी मी त्यानाच काय परंतु कुमुदसुदरीच्या बापाला—चद्रशेखरालादेखील ओळखतो, समजलीस चद्रशेखर म्हणजे मोठा विद्वान्, तत्वज्ञानी होता बरें पण ताई, त्याचा काहीं पत्ता आहे का?"

"मुळींच काहीं नाहीं. शारदाबाई त्याचा कधीच तपास करित नाहीत"

इतक्यात तात्यासाहेबाना कोणी भेटावयास आल्यामुळे प्रियवदा उठून आत गेली.

## प्रकरण ९ वें

# दोघी मैत्रिणी.

“मला वाटतं, खालची सभा आता बहुतेक आटोपत आली असेल,” कुमुदसुंदरी कंटाळल्यासारखें करून ह्मणाली “मला या सभा आवडल्या, तर फार बरं झालं असतं खरोखर मी आहें यापेक्षा अगदीं निराळी असतें, तर कितीतरी छान झालं असतं”

शरच्चंद्र आणि कुमुदसुंदरी यांची मागील एका प्रकरणांत सांगितलेली गांठ पडल्याला दोन महिने झाले होते अर्थात् आपला लग्न न करण्याचा दृढनिश्चय कुमुदसुंदरीनें अगदीं स्पष्टपणें शरच्चंद्राला कळविल्यालाहि तितकाच काळ लोटला होता कुमुदसुंदरी आणि प्रियंवदा या शारदाबाईंच्या माडीवर बसल्या होत्या कुमुदसुंदरीचा विश्वास संपादन करण्याबद्दल प्रियंवदेला सांगण्याची ताईसाहेबांना वास्तविक आवश्यकताच नव्हती कारण तो विश्वास तिनें पूर्वींच संपादन केला होता त्या दोघींचा अकृत्रिम स्नेह जमला होता

स्त्रीदास्यविमोचनासाठीं कायकाय आणि कसेकसे प्रयत्न करावे, याचा खल करण्यासाठीं शारदाबाईंच्या दिवाणखान्यांत वारंवार सभा होत असत तशीच आजहि एक सभा भरली होती बराच वेळ कांहीं महत्वाचा वादविवाद चालला होता वर माडीवरदेखील मधूनमधून तो ऐकूं येत होता परंतु कुमुदसुंदरीचें किंवा प्रियंवदेचें तिकडे मुळींच लक्ष्य नव्हतें कुमुदसुंदरीनें वास्तविक ह्मटलें तर या सभांस जावयास पाहिजे होतें, आणि आतापर्यंत ती जातहि होती शारदाबाईंची इच्छाहि तशीच होती इतर बाबतींप्रमाणें या बाबतींतहि कुमुदसुंदरीला अर्थातच पूर्ण स्वातंत्र्य होतें, तथापि शारदाबाईंना मोठी आशा होती की, आपली मुलगी सर्वस्वी या पवित्र कार्याला आपल्याला वाहून घेईल, व आपण स्वीकारलेला मार्ग पूर्णपणें स्वीकारून स्त्रीदास्यविमोचनासाठीं आपण चालविलेले प्रयत्न अव्याहत पुढें चालवील परंतु कुमुदसुंदरीच्या मनाची मानसिक स्थिति कशी होत चालली होती, तिच्या वृत्तीचें परिवर्तन कसें होत चाललें होतें याची थोडीशी कल्पना वर दिलेल्या तिच्या उद्गारावरून होण्याजोगी आहे

“पण प्रियंवदे, खरच सांग, मी आहे यापेक्षा निराळी मला कसं होता येईल?”

“पण त्यावांचून अडलं आहे काय? आणि तशी इच्छा तरी कुणाची आहे?”

“कुणाची म्हणजे? आईची ती बिचारी वाट पहात बसली आहे तिला मोठी

आशा लागून राहिली आहे पण गडे, तिची ती आशा पूर्ण होण्याचं चिन्ह कांहीं मलातरी दिसत नाहीं."

"तूच का ह्मणते आहेस हें! तुझ्या त्या नाटकात तू वसुमतीचा 'पार्ट' केल्याला अद्यापि दोन महिनेदिखील पुरे झाले नसतील!" प्रियवदा ह्मणाली.

"गोष्ट खरी आहे," कुमुदसुंदरीने कचरतकचरत उत्तर दिलें "मी वसुमतीचा 'पार्ट' केला खरा, परंतु त्या नाटकात आईला आवडतील असेच विचार मी घातले होते निदान आतातरी मला असं वाटू लागलं आहे. जोंपर्यंत मी तो 'पार्ट' घेतला होता, तोंपर्यंत तें सारं ठीक वाटत होतं मी वसुमती—नव्हे वडखोर राणी झालें होतें, परंतु आतांआतां मला असं वाटू लागलं आहे कीं, वसुमतीपेक्षा सौंदर्यवल्लरीचीच स्थिति कदाचित् अधिक सौख्याची असावी."

"हें काय भलतच!"

"खरोखर, प्रियवदे! मी हे अगदी भलतच बोलत असलें पाहिजे आईच्या कल्पना उसन्या घेऊन मीं एक नाटक लिहिलें, तिची इच्छा पूर्ण करण्याकरिता—तिने स्वीकारलेलाच मार्ग खरा आहे असं सिद्ध करण्याकरिता मीं लग्न करण्याचंहि नाकारलं तेव्हा मला आता तिच्या ह्मणण्याप्रमाणं होणं सुलभ असलं पाहिजे परंतु गडे, तें सुलभ नाहीं आईकडे पहा, ती सभा भरविते, व्याख्यान देते, निबंध वाचते, निरनिराळ्या संस्था स्थापन करिते, तिच्या भोंवतीं कितीतरी स्त्रिया जमतात त्या सर्व कांहींतरी मिळविण्याच्या उद्योगात आहेत, त्यांना कांहींतरी पाहिजे आहे परंतु प्रियवदे, मला विचारशील तर त्यांना काय पाहिजे आहे, तेंदिखील मला समजत नाहीं!"

"मी सांगू का तुला? निवळ काल्पनिक गोष्टीच्या माग त्या लागल्या आहेत, दुसरं कांहीं नाहीं" इकडेतिकडे पाहिल्यासें करून प्रियम्दा गंभीरस्वराने ह्मणाली.

"निवळ काल्पनिक गोष्टी! माझी अशी जर कुणी खात्री करून देईल तर मी तात्काळ त्यांना जाऊन मिळेन त्यांचतर ह्मणणं आहे कीं, त्या अगदी सत्य गोष्टी आहेत त्यात मिथ्या कांहीं नाहींच, आणि ह्मणूनच मला त्यांची इतकी भीति वाटते आजपर्यंतचं माझं आयुष्य या काल्पनिक गोष्टीतच गेलं आहे"

"कुमुद! तुझ्या मनान आता भरकटण्याला प्रारंभ केला वर का!"

"असं का ह्मणतेस?" कुमुदसुंदरी किंचित् खिन्न स्वरानं बोलू लागली. "हे जग ह्मणजेतरी काय आहे? केवळ मिथ्या भास यांततरी काय सत्य आहे? हें एक प्रकारचं नाटक आहे नाना तऱ्हेची सोंगं यात एकामागून एक येत

असतात एकाची वतावणी झाली की ते पडद्याआड जाऊन दुसरं पुढ येत. असा सारखा क्रम चालू आहे या मिथ्याभासाच्या माग धावण्यात काहीं अर्थ नाहीं. आपण त्याच्यासाठी उगाच का शिणाव? सोंगाची वतावणी झाली ह्मणजे आत्मा या रंगभूमीवरील प्रकाशातून पडद्यामागील अनंत अंधकारात जातो, आणि मला वाटत, यालाच आपण मृत्यु अस ह्मणत असतो. मला वाटत, आत्म्याला त्या वेळीं कशाचहि ज्ञान रहात नसाव परंतु लवकरच पुन्हा त्याला दुसर सोंग घेऊन रंगभूमीवर याव लागत आणि हे नाटक असच अव्याहत चालल असत "

" वा ! आजतर तू वेदांताच्याच गोष्टी सांगत आहेस ! "

प्रियंवदेच्या या बोलण्याकडे कुमुदसुंदरीने मुळीच लक्ष्य न देता ती पुढं ह्मणाली " अग, मन मिथ्याभासाच्या नादी लागून एकदा का गुंग झाल, ह्मणजे मग ते मिथ्याभास त्याला मिथ्या वाटत नाहींत, अगदी सत्य वाटू लागतात आपला आणि या चाललेल्या नाटकाचा जर काहीं संबंधच नाहीं, तर त्यातील खरेपणातरी आपण कसा मानावा? आह्मी ह्मणजे मी आणि माझी आई एकंदर जगापासून अगदी अलग आहो आह्मी दूर उभ्या राहून या जगाच निरीक्षण करित आहो आईला या जगातील कित्येक गोष्टी पाहून राग येतो आणि त्या बदलून टाकाव्या अस तिला वाटत. मलाहि राग आणण्याचा ती यत्न करते—नव्हे मला राग येतहि असे, परंतु तो फार थोडा आणि तोदेखील आईबद्दल माझ्या मनात असलेल्या सहानुभूतीमुळच आता मला मुळीच राग येत नाहीं—मी सारखी या नाटकाकडे पहात असते— आणि खरच सांगते, मधूनमधून मला त्यात मौजहि वाटते "

प्रियंवदेलादेखील कुमुदसुंदरीच्या या भाषणाची मौज वाटत होती, परंतु कुमुदसुंदरीच्या या भाषणाचा ओघ कोठे चालला होता, हे अद्यापि तिच्या ध्यानात आलें नव्हतें तिने विचारिलें " कुमुद, या जगाचा आणि तुझा कोणत्या प्रकारचा संबंध असावा, अस तुला वाटत ? "

" कोणता ह्मणजे? तुझा आहे तसाच दुसऱ्या सर्व मुलींना स्वदेश आहे, स्वभाषा आहे, भाऊ आहेत, वहिणी आहेत, आप्तइष्ट मंडळी आहे प्रियंवदे ! तुसीच गोष्ट घेईनास? तुला सर्व काहीं आहे तुझी कितीतरी नातलग मंडळी आहे तुला एकलकोंड्यासारख—चुकल्याचुकल्यासारख कधींहि वाटण्याचा संभव नाहीं "

" हो, देवाच्या दयेन आह्मास बरीच नातलग मंडळी आहे खरी "

" त्यापैकी सगळेच काहीं श्रीमंत नसतील? "

" नाहीं, कित्येकतर अगदींच गरीब आहेत "

"अहाहा! कितीतरी आनंदाची गोष्ट! तर मग, लोक दारिद्र्याबद्दल जें काहीं बोलत असतात त्याचीदिखील तुला यथार्थ कल्पना करता येत असेल. दारिद्र्य ह्मणजे काय तें समजून घेण्याची जर मी कल्पना करूं लागलें, तर ती कल्पनादिखील माझ्या डोक्यात ठरत नाहीं. अवश्य त्या सर्व गोष्टींची यथास्थित अनुकूलता असल्याविना लोक या जगात दिवस काढण्यास कसे तयार होतात, हेंच मला समजत नाहीं आमची स्थिति अशी आहे कीं, आह्माला देश नाहीं, भाषा नाहीं, आप्त नाहींत—संबंधी नाहींत—"

" तू स्वप्नातल्याप्रमाण कांहींतरी बडबडत आहेस झालं "

" पूर्वीपूर्वी मी याचा विचार करित असें मी आपल्या कल्पनेन या दारिद्र्याचीं, दु:खाचीं सुंदरसुंदर चित्र काढित असें परंतु प्रियवदे, त्यात यथार्थता काहीं नसे. इंद्रधनुष्य सुंदर दिसल तरी तें काहीं खरं नसत, त्यातलीच गोष्ट "

" तरीहि दु ख आणि दारिद्र्य या गोष्टी खऱ्या आहेत हें कबूल केलच पाहिजे."

" तें खात्रीपूर्वक कसं सागता येईल? मी आपल कल्पनेन काहींतरी सागणार मला त्याचा अनुभव असा मुळीच नाहीं या गोष्टी खऱ्या आहेत असं ह्मणतात, पण मी त्याचा खरेपणा कसा मानावा? मला काहीं त्याचा प्रत्यय येत नाहीं किंवा त्या समजतहि नाहींत. "

" मग खरेंतरी काय आहे? कीं काहींच नाहीं? "

" मी आहें ही गोष्ट मात्र सत्य आहे कुणाला बाकीच्या सर्व गोष्टी सत्य वाटत असतील, परंतु मला त्या तशा मानण्याला कारण नाहीं "

"आणि ही इतकी आप्तमंडळी, ज्याचा आपला अगदीं निकट संबंध येतो-"

" हो, तुझ्या संबधानं पाहिल तर अशी पुष्कळ मंडळी आहे पण माझ कुणीहि नाहीं "

" तुझी आई आहे "

"तिचा माझा संबंध फार निराळा आहे ती सदैव माझ्यावर नजर ठेवित असते— मला मार्ग दाखवित असते मला ती मार्गदर्शक देवताच वाटते "

" असं आहे का? बर, तरमग तू आता हा दुराग्रह सोडून लग्न करण्याला तयार हो. ह्मणजे तुझा पती तुझा आणि या जगाचा संबंध कायमचा लावून देईल. आणि मग तुला एकलकोंड्यासारख किंवा चुकल्याचुकल्यासारख वाटणार नाहीं "

" तसं मुळींच होणार नाहीं, प्रियंवदे! मी एकांतवासदिखील पत्करीन, पण पुरुषाची गुलामगिरी मी कधींहि पत्करणार नाहीं."

" पण कुमुद! अनुभवाशिवाय कोणतीहि गोष्ट तूं खरी मानण्यास तयार नाहींस तर लग्न करणं म्हणजे पुरुषाचं गुलाम होणं, हेंतरी तूं खरं कां मानतेस? तुला याचा प्रत्यय कसा आला?"

" खरोखर, हेंतरी खरं कशावरून?" कुमुदसुंदरी क्षणभर स्तब्ध राहून विचार करूं लागली. तिची मुद्रा व्यग्र दिसूं लागली. ती गंभीरस्वरानें नंतर म्हणाली "पण कायग प्रियंवदे, आई सदोदित नाहीं का असं सांगत असते? आणि म्हणूनच तर स्त्रियांना समान हक्क मिळविण्यासाठी तिचे एवढे श्रम चालले आहेत."

" आई सांगते! पण तुलातर त्याचा अनुभव नाहीं ना? तुला स्वताला त्याचा तिळमात्र अनुभव नसतां केवळ आई सांगते तें ऐकून तूं समान हक्कासाठीं या जगाजवळ भांडणार आहेस?"

" मलादिखील हे विलक्षण दिसतें. माझ्या हातून हें कसं होईल हेंदिखील मला समजत नाहीं. आईनं आपल्या कल्पनेनं स्त्रियांची स्थिति फार दुःखद, फार शोचनीय आहे असं ठरविलं आहे. आणि त्यांना सर्वतोपरी पुरुषाच्या बरोबरीनं हक्क मिळाल्याविना ती सुधारायची नाहीं, असं तिचं म्हणणं आहे."

" परंतु कुमुद, तूं एकंदर गोष्टींचा विचार केलास तर तुझं तुलाच दिसून येईल कीं, पुरुषाकडे श्रेष्ठत्व असावं असा सृष्टिकर्त्याचाच हेतु दिसतो. तेव्हां प्रत्यक्ष परमेश्वराच्या इच्छेविरुद्ध बंड करून त्यांत यश येईल, असं कां तुम्हाला वाटतं?"

" तें कसंहि असो. समाज खुषीनं स्त्रियांना समान हक्क देण्याला तयार होणार नाहीं तर सरकाराकडून कायदा करून घेऊन ते मिळविले पाहिजेत. एकदां समान हक्क मिळाले, की स्त्रियांची स्थिति सुधारण्याला मुळींच वेळ लागणार नाहीं, असा आईचा दृढ विश्वास आहे. प्रियंवदे, रूढीला बळी पडून अधपरंपरेनं आपला स्त्रीसमाज चकार शब्दहि न काढतां पुरुषाच्या गुलामगिरींत कसे दिवस काढित आहे, याचं मलाहि आश्चर्य वाटतं, परंतु या अफाट स्त्रीसमाजापैकीं एखादाच स्त्रीनं हीं समाजबंधनं झुगारून देऊन स्त्रियांची ही स्थिति वाईट आहे असं प्रतिपादन करून ती सुधारण्यासाठीं प्रयत्न करावे, हेंतर मला त्यापेक्षांहि विलक्षण वाटतं, इतकंच नव्हे, तर यापासून कांहीं निष्पन्न होईल असा यत्किंचितहि संभव दिसत नाहीं. तरी पण सगळ्या जगाला हालवून सोडण्यास एका स्त्रीनं उद्युक्त व्हावं, ही काय थोडी कीर्ति आहे? यापुढं मी केलेल्या आत्मत्यागाची

[illegible] आहे? वसुमतीला आपण त्या नाटकांत जयजयकार केला. [illegible] हें [illegible] आहे. कारण वसुमतीने आपल्या पतिविरुद्धच [illegible] बंड केलें परंतु हें संपूर्ण समाजाविरुद्ध बंड आहे

[illegible] ! हें नाट्य अलौकिक आहे, याज संशय नाहीं पण यात [illegible], [illegible] येणार नाहीं तुझ्यासंबंधानंतर मला हें [illegible] दिसत आहे. [illegible] काहीं नाहीं तुझ्या विचारांना मुळींच [illegible] दिसत नाहीं जवळजवळ मला वाटतं अनिष्टासारखी तुझी स्थिति झाली आहे [illegible], तुझे स्वाभाविक विचार यांच्या अगदीं विरुद्ध दिशेनें [illegible], असे जे तुझ्या आरंभे प्रयत्न चालले आहेत त्याचाच हा परिणाम आहे"

यानंतर कुमुदिनी [illegible] बोलली नाहीं. [illegible] विचार करित ती स्तब्ध बसून राहिली

कुमुदिनीबद्दल केवळ प्रियंवदेचेच असें मत होतें, असें नाहीं वृद्ध गिरिजेलाहि असेंच वाटत होतें तिनेंतर शारदाबाईंनादेखील अनेकवार तसें स्पष्ट सांगून टाकलें होतें एकदा गिरिजा म्हणाली " कुमुदकडे आता तुझं लक्ष्यच नाहींस झालं आहे तिची काय दशा झाली आहे, पहाते आहेस का तू?"

" तू काय म्हणतेस माझ्या ध्यानात येत नाहीं गिरिजे." शारदाबाई निःस्पृहपणें म्हणाल्या " माझं तर तिच्यावर पूर्ण लक्ष्य आहे "

"माझी कुमुद आताशी हसत नाहीं, खेळत नाहीं, काहीं नाहीं! काहींतरी गहन विचारात ती गढून गेल्यासारखी दिसते सारा दिवस आपली स्तब्ध बसून असते "

"असेल, ती काहींतरी विचार करित असेल. गिरिजे, हसण्याखेळण्याला आता कुमुद काहीं लहान राहिली नाहीं ती आता प्रौढपणात आली आहे, आपल्या पुढील आयुष्यक्रमाविषयी ती आता विचार करित असेल "

"मला विचारशील, तर तुझ्या विचारानीच तिचं मस्तक ठिकाणावर राहिलं नाहीं. ती अगदी भ्रमिष्ट होऊन गेली आहे तिचं लग्न करून टाक, तिला संसारात पडूं दे, म्हणजे या सर्व बाष्कळ गोष्टी ती विसरून जाईल योग्य पतीच्या तंत्रानं चालल्याविना तिच्या विचारांना योग्य वळण लागणार नाहीं "

हें ऐकून शारदाबाईंना संतापच आला. परंतु आपल्या संतापाचा गिरिजेपुढें काहींएक उपयोग व्हावयाचा नाहीं हें त्या पूर्णपणें जाणून होत्या म्हणून त्या संथ परंतु निश्चयी स्वरानें म्हणाल्या "गिरिजे तू दोनशें वर्षे पूर्वी झाली असतीस तर उत्तम झालें असतें मी तुला सांगतें कीं, माझी मुलगी कोणाहि पुरुषाचें दास्यत्व पत्करणार नाहीं."

# प्रियविनोद.

रवि समस्तहि आक्रमुनी नभा
उतरला क्षितिजावरि मंद भा,
रमणमूर्ति समीपचि पातली
म्हणुनि पश्चिम दिग्वधु हर्षली १

समय शांत, सुखप्रद हा असा
वघुनि ताप उरेल हृदीं कसा!
मम मनीं शिवदर्शनकामना
उपजली अनिवार, दळेचिना! २

वसन वेष्टियलें मग भंजेरी
दिसत ज्यांतुनि ही तनु गोजिरी,
नटुनि सुंदरसुंदर भूषणीं,
निरखिलें मुखपंकज दर्पणीं ३

विमल बिल्वदलें, त्रिदलें, फुलें
स्वकरिं घेउनिया मग चाललें,
बहुत दीर्घचि मंदिरपथ तो
मजसि होय कधींतरि संपतो! ४

श्रम अमर्यचि होय सदा खरा
म्हणुनि वृक्षतलीं वसलें जरा,
अधम पामर एक तया स्थला
मज विलोकुनि धावत पातला! ५

निकसता उदकांतरिं सारसें
रत तयांवरि षट्पद होतसे
अधरपानमहोत्सुक, तो,—जसा,
फिरतसे मजभोंवतिं एकसा ६

उडवुनी नयनीं पथधूलिका
भरितसे मम दृष्टिस अधुका,
जणु मनागत मौक्तिक हार हा
प्रहरणी वरि नरकमार्ग हा ७

कनकचंप, गुलाब अशी फुलें
बहुत चातुरिनें कच गुंफिले
विखुरले बहु ते खलनायकें,
कितिक सावरिले, परि नायकें! ८

असह तो मज होय तयाक्षणीं
म्हणुनि इष्टपथा धरिलें झणी,
तरिहि सोडि न तो, मज आडवी,
हरिणि मी जणु सांपडलें दवीं! ९

उडवुनी वसनांचल त्या खलें
उरजयुग्महि निर्भय देखिलें;
वरिवरी बहु झांकितसें तरी
फिरुनि ओढि, करी मज घाबरी! १०

छळुनि यापरिही नच तो सुखी,
करितसे मज ताडण आणखी!
अधहि पाडियलें मज शेवटीं
प्रियकरा! करु काय मि एकटी! ११

परतलें मग गेहिंच पातलें,
शिवसुदर्शन येथुनि घेतलें!
चरित हें अवघेंची पथांतले
श्रुतिवरी सखया! अजि घातले १२

"असे कोण ऐसा मदोन्मत्त सांग?
सखे! सत्वरीं सांग तन्नाम सांग!
जयाच्या करें स्पर्शली मत्सुकांता
तया दावितों मृत्युपंथाचि आतां!" १३

"नका दूषवूं मानसा प्राणनाथा!
नसे कोणिही मत्तनू भ्रष्टकर्ता,
असे जो जगा नेहमीं वेष्टिलेला
तयें मारुतें सर्व हा खेळ केला!" १४

# रावसाहेबांस भेटलेला एक बाळशिक्षक.

रावसाहेब एके दिवशीं आपल्या घरातील वाचनालयाचे खोलींत दरवाजा लावून घेऊन कसलेंसें पुस्तक वाचित आरामखुर्चीवर पडले होते इतक्यात त्याच्या स्नेह्याचा एक दहाबारा वर्षांचा मुलगा एका गड्याला बरोबर घेऊन एकदम खोलीत आला व रावसाहेबाना ह्मणाला "बाबानीं आपल्याला ही आंब्याची भेट पाठविली आहे"

रावसाहेब युनिव्हर्सिटीचे पदवीवर असून वडे सरकारी हुद्देदार होते 'एटीकेट'चे ते मोठे भक्त असत आपल्या स्नेह्याच्या मुलाने परवानगीशिवाय असें एकदम खोलीत शिरुन आपला अपमान करणें, त्याना कसेंसेंच वाटलें! मुलाकडे बराच वेळ पाहून नंतर रावसाहेब गंभीर स्वराने ह्मणतात "तुझ्या बाबाना सांग कीं, तुह्मीं पाठविलेल्या भेटीबद्दल मी तुमचा आभारी आहे आणि तूंहि जराशी चांगली रीतभात दाखवितास, तर तुझेहि मीं आभार मानिले असते!"

मुलगा मोठा धीट आणि समयसूचक होता रावसाहेबाची ही ऐट पाहून त्याला राग आला तथापि तो मुद्रेवर व्यक्त न करिता तो नम्रतेने ह्मणाला "रावसाहेब, चांगली रीतभात मला शिकविण्याची आपण कृपा कराल का?"

"ठीक आहे, मी तुला शिकवितों." असें ह्मणून रावसाहेबानी मुलास थोडीशी तालीम देऊन आंब्याचें ते ताट गड्याचे डोकीवर चढविलें व मुलाला आपल्या खुर्चीवर बसवून गड्यासह बाहेर जाऊन खोलीचें दार बंद करून घेतलें काहीं वेळाने रावसाहेब हळूच दार ठोठावू लागले रावसाहेबांच्या तालमीप्रमाणे मुलाने "कोण आहे?" असा दिमाखानें प्रश्न करताच रावसाहेबानीं अदबीने उत्तर दिल्यावर "अंदर आव" असें मुलानें सांगितल्यावर रावसाहेब हलकेच दरवाजा उघडून गड्यासह आत आले व या नूतन रावसाहेबा (मुला) पुढें तें ताट ठेववून अदबीनें ह्मणाले "रावसाहेब! बाबानीं ही लहानशी भेट आपल्याकडे पाठविली आहे, हिचा आपण स्वीकार केल्यानें बाबावर आपले फार फार उपकार होतील"

नवीन रावसाहेब या रावसाहेबास गंभीरतेने ह्मणाले "तुझे बाबा फार सज्जन मनुष्य आहेत. त्यानीं अगत्याने पाठविलेल्या या भेटीबद्दल मी त्याचा फार फार आभारी आहे, असें त्यानां जरूर सांग" असें ह्मणून मुलाने ते ताट आणणाऱ्या गड्याच्या हातावर आठ आणे ठेविले व स्वयपाक्यास हाक मारुन या मुलाला चहा दे असें सांगितले, व नंतर रावसाहेबास त्याच्या खुर्चीचा चार्ज दिला.



# अहेर.

गोपाळराव घरीं येतात न येतात तो राधाबाईनीं घरातली गाऱ्हाणी त्यांच्यापुढें मांडण्यास सुरुवात केली

आज गोपाळराव रोजच्यासारखे आनंदात नव्हते एकतर ते नुकतेच सेशन कोर्टांतून मुकद्दमा हरवून आले होते, त्यामुळे त्याच्या मनाला ती गोष्ट लागून राहिली होती. कारण, गोपाळराव हे विलायतेहून ब्यारिस्टर होऊन आलेले, आणि विरुद्ध पक्षाचे वकील साधे डिस्ट्रिक्ट प्लीडर, असें असून साध्या वकिलानें ब्यारिस्टरला हार खाण्यास लावणें ह्मणजे सामान्यलोकाच्या दृष्टीनें त्या ब्यारिस्टरला केवढें लांच्छन! पण गोपाळराव करतात काय? मूळची बाजूच लंगडी पडली—आपल्या पक्षाला अनुकूळ अशा पुराव्याचीच वाण पडल्यावर कितीहि हुषार ब्यारिस्टर असला तरी काय करणार? दुसरे असें कीं, त्या दिवशीं जजसाहेबहि ब्यारिस्टरसाहेबाच्या वर्मी लागेल असें काहीं बोलले होते त्यामुळे तर गोपाळरावांचा मिजाज अगदीच बिघडून गेला होता घरी आल्यावर तरी मनाला स्वस्थता मिळावी, किंवा श्रमाचा, अपमानाचा, खेदाचा परिहार होईल असें प्रेमाचें, मधुर, चित्त रंजविणारें वाक्य प्रियपत्नीच्या मुखातून निघावें, तर तेंहि नाहीं तिनें गोपाळराव घरी येऊन ईझिचेअरवर पडतात न पडतात तोंच एक मुकद्दमा आणून उभा केला! मग गोपाळराव चिडले यात काय नवल आहे? राधाबाईचें रोजचें गाऱ्हाणें घरातल्या कोणत्या ना कोणत्या नोकराबद्दल असे. आज अयोध्याप्रसादाविषयींचें होतें गोपाळरावानीं तें ऐकून घेतलें आणि लागलीच संतापून उठून त्याला इकडे पाठवून दे ह्मणून दुसऱ्या एका चाकरास सांगितलें

अयोध्याप्रसाद समोर कोपऱ्यात येऊन उभा राहिला रोजच्यासारखी आज त्याच्या चेहऱ्यावर नम्रता दिसत नव्हती आपण निर्दोषी आहों, अशा प्रकारची खात्री असली ह्मणजे मनुष्याला एक प्रकारची गुर्मी येत असते तशी गुर्मी आता त्याच्या चेहऱ्यावर दिसत होती त्या गुर्मीनें त्याची मान आखडल्यासारखी दिसत होती, भिवया संकोच पावल्या होत्या, कपाळाला आठ्या पडल्या होत्या; डोळे विस्तृत झाले होते, छाती वर निघाली होती, आणि मिशांना नुकताच पीळ भरला होता. अयोध्याप्रसाद घरातल्या घरात पगडी क्वचितच घालित असे. रोज घरात घालावयाची दोन पैशाची पुरभय्येवजा शुभ्र झिरझिरीत कपड्याची

शिवलेली एक टोपी असे, ती तो घालावयाचा पण आज त्याचाहि मिज़ाज काहीं निराळा होता तो आज पगडी घालून अमळसा उर्मटपणाने आपल्या धन्याच्या तोंडाकडे टक लावून पहात उभा होता

त्याचा तो थाटमाट आणि उर्मटपणाची ऐट पाहून गोपाळराव अधिकच चिडले परंतु आपला क्षोभ बाहेर न दाखवता न्यायाधीशाप्रमाणें बाह्यतः शांतवृत्ति ठेवून हळूहळू गंभीरस्वराने ह्मणाले " अयोध्या, तूं आमच्या इथें फार जुनापुराणा चाकर आहेस, ह्मणून आह्मी तुझा मान ठेवितो पण तू पहावें तर दिवसेंदिवस अधिकाधिक मिजासखोर व उर्मट होत चालला आहेस· तुला कुणाचाच धाक वाटत नाहीं. वाटेल त्याला वाटेल तसें टाकून बोलतोस, अशा तुझ्या वर्तनाबद्दल माझ्याकडे पुष्कळ दिवसापासून तक्रारी येत आहेत पण मी तिकडे आजवर लक्ष्य दिलें नाहीं तुझ्या पाढऱ्या केसाकडे पाहून गय केली, तुला पाचचार वेळा बजावूनहि सांगितलें, पण तुझा आपला क्रम आहे तो आहे, तो काहीं बदलत नाहीं. असें आमच्या घरात याउपर खपणार नाहीं हे तुला साफ सागतो. आता परवा पहिली तारीख आलीच आहे, त्या तारखेपासून तुला रजा मिळणार आहे "

अयोध्याप्रसादानें हे सगळें भाषण मुकाट्याने ऐकून घेतले, आणि नतर उर्मटपणाने जबाब दिला " जो हुकुम महाराज! हम खुशीकेसाथ चले जायगे आप छुटी नही देते तो खुद हम आज इस्ताफा देनेको तय्यार हुए थे "

हे शब्द उच्चारताना अयोध्याप्रसादाचे ओठ थरथर कापत होते त्यावरून त्याच्या अंत करणात मनोवृत्तीचें तुंबळ युद्ध चाललें असून कोणत्या पक्षाची सरशी होईल तें निश्चयानें सागता येत नव्हतें, असें दिसलें

अयोध्याप्रसाद आज अठरा वर्षे गोपाळरावाच्या घरी पुण्यास नोकर होता एवढ्या मुदतींत त्याला मराठी चागलें समजत असे व बोलताहि येत असे तो नेहमी घरात आपल्या मालकाच्या बायकामुलाशी मराठीतच बोले असे असता आताच त्याला आपल्या हिंदुस्थानी भाषेत का बोलावेसे वाटलें? याचे कारण, त्याची चित्तवृत्ति आता ठिकाणी नव्हती· रागाच्या सपाट्यात आपण कोण व कुठें आहों, हे विसरलों तरी आपली स्वभाषा मनुष्य विसरत नाहीं. एरवी कृत्रिम जीवनाचे वेळी मनुष्यानें परकीय भाषेत जरी व्यवहार केला, तरी मनाच्या विकारवश स्थितींत त्याची स्वभाषाच त्याच्या तोंडून अकल्पित रीतीने बाहेर पडत असते, असा नियम आहे. ह्मणून आताहि अयोध्याप्रसादाचे तोंडी मराठी भाषा

न येता त्याची देशभाषा हिंदुस्थानी आली त्याचें नवल नाहीं दुसरें कारण कदाचित् असेंहि असेल कीं, हिंदुस्थानी भाषा जितकी जोरदार आणि आवेशाला अनुकूल आहे, तशी मराठी नाहीं ते कांहीं असो, पण अयोध्यानें या वेळीं मराठींत जबाब न देता हिंदुस्थानींत दिला, ही गोष्ट खरी

त्याचा हा उर्मटपणाचा जबाब ऐकून गोपाळराव अधिकच संतापले तथापि तो सगळा राग गिळून टाकून त्यानीं पूर्ववत् शांतपणानें ह्मटलें "तुझ्या आज-पर्यंतच्या नोकरीकडे पाहून तुला या वेळीं कसूर माफ करतों पण वारवार अशी माफी होणार नाहीं, हे खूप लक्ष्यांत ठेव जा आतां लाग कामाला"

[ २ ]

दोनप्रहरची वेळ चोहींकडे अगदीं सामसूम झालें होतें. गोपाळराव कोर्टात गेले होते मोठालीं मुलें हायस्कुलांतून आणि कॉलेजांतून गेलीं होतीं राधाबाई घरातलें कामकाज आटोपून पलंगावर क्षणभर अंग टाकून पडल्या होत्या

दाराशीं पडवीत अयोध्याप्रसाद एका चटईवर जरा पाय लांब करून झोंप घेण्याच्या हेतूनें पडला होता, पण कांहीं केल्या झोंप येईना, ह्मणून डोळे मिटून तो मुद्दाम पडला होता वेणी त्याच्या उशाशीं बसून आपल्याशींच कांहीं गुणगुणत होती

अयोध्याप्रसाद आतां एकदोन दिवसांनीं जाणार, ही बातमी इतर नोकरा-कडून घरांतल्या सगळ्या मुलांना अगोदरच कळून चुकली होती या सर्व मुलांना अयोध्यानें मांडीवर खेळविलें होतें, यामुळें व सतत अठरा वर्षांच्या सहवासानें सगळीं मुलें अयोध्याशीं फारच लडिवाळपणानें रहात होतीं अयोध्या जाणार असें जेव्हां त्यांना कळलें, तेव्हां त्यांना पराकाष्ठेचें दुःख झालें पण त्यांच्या हातीं काय होतें? आतां आणखी दोनच दिवस अयोध्याची संगति आपणास मिळेल, पुढें नाहीं, असें जेव्हां त्यांना कळलें, तेव्हांपासूनतर ती त्याला सोडून फारशीं जातच नसत

आज वेणी त्याच्या उशापाशीं गाणें गुणगुणत बसली असतां अयोध्या जाणार या गोष्टीची तिला एकाएकी आठवण झाली ह्मणून तिनें त्याच्या तोंडावरलें पांघरूण झटकन् काढून त्याच्या तोंडापाशीं आपलें तोंड नेऊन विचारलें "कारे अयुध्या, तू आह्माला सोडून जाणार कारे?"

अयोध्या ह्मणाला "हो बाई, काय करूं? मालकाची तशी इच्छा आहे"

वेणीनें विचारलें "पण परत केव्हां येशील?"

"आतां परत कुठून येणार बाई? एकदां गेलों ह्मणजे गेलो मग परत येणें कसचें?"

अयोध्या आता एकदा गेला म्हणजे मुळीच परत येणार नाहीं, हें वेणीनें ऐकलें तेव्हांतर तिच्यानें रहावेना. तिनें त्याच्या गळ्याला मिठी मारली आणि म्हटलें "आम्ही नाहीं जाऊं देणार तुला तू गेलास म्हणजे परत येणार नाहींस. आम्ही बाबांना सांगू याला जाऊं देऊं नका म्हणून. मग तू कसा जाशील?"

यावर अयोध्या कांहींच बोलला नाहीं तेव्हां वेणीनें पुनः म्हटलें "पुन येण्याचें कबूल करशील तर आम्ही तुला जाऊं देऊं नाहींतर जाऊंच देणार नाहीं"

अयोध्यानें वेणीच्या समजुतीसाठीं म्हटलें "येईन वर बाई"

पण वेणीचें अशा साध्या वचनानें कोठलें समाधान व्हावयाला? तिनें म्हटलें "शपथ घे येईन म्हणून"

त्यावर अयोध्या म्हणाला "शपथच कशाला घ्यावयाला पाहिजे तुम्ही बोलवा, म्हणजे येतों की नाहीं ते पहा"

"पण कधीं येशील तें सांगेनास? असं रे काय करतोस अयुध्या? अशानं आम्ही तुम्ही गडी फू करू सारी जणं"

अयोध्या म्हणाला "खरेंच येईन."

"पण केव्हां?"

"तुमच्या लग्नाच्या वेळीं"

लग्नाचें नांव काढल्याबरोबर वेणीनें "इश्श मेल, काहींतरी वात्रटपणा करतोस" असें म्हटलेंच! लग्न म्हणजे काय याचें काडीइतकें ज्ञान त्या पोरीला नव्हतें पण लग्नाचें नांव काढलें की मान मुरकावयाची, लाजावयाचें, 'इश्श मेल' म्हणावयाचें, हें शिक्षण पोरींना आपोआपच मिळत असतें लिहिणेंवाचणें, टापटिपीनें रहाणें, स्वच्छता ठेवणें, खरें बोलणें, मर्यादेनें वागणें, वेळच्या वेळीं संतोषानें कामें करणें वगैरे गृहशिक्षण मुलींना मिळालें नाहीं तरी हरकत नाहीं, पण लग्नाचें नांव काढलें की मुरकणें, उखाणे घेणें, नव्या लग्न झालेल्या मुलींना नवऱ्याचें नांव घेण्यासाठीं आग्रह करणें, नवरानवरीची कोठेंतरी युक्तीनें गांठ घालून काशीयात्रा घडली म्हणून आनंदानें नाचणें, या प्रकारचें गृहशिक्षण आपल्या मुलींना द्या म्हणून आमच्या बायकांना सांगावें लागत नाहीं ते त्या आपोआप देत असतात असो

लग्नाचें नांव काढताच वेणीला जो खोटा फणकारा आला, त्याच्या तोऱ्यांत ती म्हणाली "कायरे अयुध्या, तू एवढा बुड्ढा झालास तरी माझी थट्टा करतोस? माझ्या लग्नाचं नांव काढतोस, तो तूच करीनास आपलं लग्न?"

मुलें रागावलीं ह्मणजे त्याची समजूत कशी करावी ते अयोध्याला चागलें समजत होते तो ह्मणाला "मीतर करणारच आहे"

अयोध्याचें हे बोलणें ऐकून वेणी खुदकन् हसली अयोध्याचे केंससुद्धा पाढरे झाले होते डोक्यावर किंवा दाढीत एक काळा केंस औषधालासुद्धा सापडला नसता या वयात लग्न करणें वाईट, एवढें वेणीला समजत होतें तें का वाईट तें मात्र समजण्याची अक्कल तिला नव्हती ह्मातान्यानें लग्न केलें ह्मणजे लोक हसतात, एवढे तिला माहीत होतें ह्मणून ती हसली एवढेच तिने विचारलें "तुझ्याइतके ह्मातारे कुणी लग्न करतात का ?"

अयोध्या ह्मणाला "का करू नये ? लग्न न केलें तर आह्माला हातानें जन्मभर रोट्या कराव्या लागतील"

वेणी ह्मणाली "वर, लग्नाला तू किती रुपये खर्चणार ?"

"एक हजार !"

"अबबब ! इतक्या रुपयाच काय करणार ?"

"काय करणार ह्मणजे ? गोट, तोडे, गळ्यातले, डोकीचे सगळे दागिने घालावे लागतील त्याना नकोत इतके रुपये ?"

"वर तर अयुध्या, मी तुझ्या बायकोकरिता एक दागिना देईन तो तिला नेऊन देशील ना ?"

अयोध्याने तें कबूल केलें पुढे वेणीहि पूर्वीसारखी गुणगुणत खेळत होती इकडे अयोध्याने पुन तोंडावरून पाघरूण घेतलें थोड्या वेळाने त्याचा अमळ डोळा लागला

[ ३ ]

वेणी घरात गेली या वेळी तिची आई निजली होती ह्मणून गडबड न करता ती स्वयपाकघरात गेली तेथें एक माजर उन्हाच्या कवडशात स्वस्थ हातपाय लाव करून निद्रासुख घेत पडलें होते कुत्रीं माजरें ह्मणजे लहान मुलाची खेळणी होत तिच्या मनात त्या माजराला काहीतरी फेंकून मारावे असें आले, पण जवळपास काहीं दिसेना कोपऱ्यात कोळशाचा ढीग घातला होता त्यातलाच एक मोठासा कोळसा घेऊन तिनें माजराला हळूच मारला, पण तिचा नेम चुकला आणि माजर पळून गेलें वेणी त्या माजराच्या मागोमाग एकसारखी धावत सुटली धावताधावता केंश तोंडावर येऊ लागले व घामाच्या धारा कपाळावरून चालल्या, ह्मणून वेणीने कोळशाने काळा झालेला हात तसाच तोंडावरून फिरविला

त्यामुळें तिचें तोंड सगळें काळें झालें. पण तिला ही गोष्ट कळली नाहीं. ती धूम त्या माजराचा पाठलाग करीत होती

माजराच्या मागें धावताधावता ती ओसरीवर आली तेथें अयोध्याला घोरताना तिनें पाहिलें आणि चटकन् काहीं विचार तिच्या मनात येऊन तिने त्या माजराच्या मागें जाण्याचा नाद सोडला आणि हळूच दाराच्या आड होऊन आपल्या हातातल्या पाटल्या काढल्या आणि अयोध्याच्या उशाशी असलेली त्याची पेटी उघडून तींत सगळया जिनसाच्या खाली त्या ठेवून दिल्या व पुन पूर्ववत् पेटीचें झाकण लावून ठेविलें हे तिने इतकें जपून केलें कीं, अयोध्या जवळच निजला होता तरी त्याला त्याचा सुगावा लागू दिला नाहीं

ती महिन्याची अखेरची तारीख तेव्हा पगार हातीं पडल्याबरोबर वर चार कपडे होते ते बिछान्यात बांधून आणि पेटीला कुलूप घालून अयोध्यानें सर्वांचा निरोप घेतला. आज ज्या घरात अठरा वर्षें त्यानें नोकरी केली होती ते घर एकाएकीं सोडताना त्याला पराकाष्ठेचें दु ख झालें. त्याचे डोळे पाण्याने भरून आले त्याने येणीचा एकदा मुका घेतला, तिच्या तोंडावरून प्रेमानें हात फिरविला, सर्वांना प्रेमाने रामराम केला आणि देवाचें नाव घेऊन रस्ता धरला येणीनें आपल्या पश्चात् पेटी उघडून काहीं घोटाळा करून ठेविला असेल, ही कल्पनाहि त्याला शिवली नाहीं मी तुझ्या बायकोसाठी एक दागिना देईन, असें ती मुलगी सहज बोल्ली होती, पण बोलल्याप्रमाणें ती खरोखर करून दाखवील, हे त्याला काय ठाऊक ? तसें असते तर त्याने तेथेच सर्वांच्या समक्ष पेटी झाडून दाखवून मग तींत सामान भरलें असते.

अयोध्याप्रसाद हा मूळचा वायव्यप्रातात रायबरेलीकडचा रहाणारा होता. तरी त्याच्या बापापासून दक्षिणेंतच नोकरी करण्याचे प्रसंग आल्यामुळें पुण्याहून जवळच मालखेड येथे त्याने घर केलें होते अयोध्याप्रसादाची बायको मागेंच वारली होती एक मावशी होती, ती घरादाराची व थोडीशी गुरेंढोरे होती त्याची व्यवस्था पहात असे पण १८९६ सालच्या दुष्काळात तीं ढोरेंहि मेली व पुढें लवकरच झालेल्या प्लेगमध्ये ती मावशीहि आटपली तरी अयोध्याला घरीं जाण्यास आतापर्यंत फावलें नाहीं! याचें कारण अयोध्या ह्मणजे गोपाळरावजीच्या घरचा अत्यत विश्वासू आणि कामाचा चाकर गोपाळरावजीच्या वडिलापासून त्याच्या हातीं भाडाराच्या सगळ्या किल्ल्या देण्याची वहिवाट होती पैसाअडका, घरखर्च, देणेघेणें, मुलेंबाळे, घरेंदारें साऱ्याची व्यवस्था अयोध्यानें पहावयाची,

अशी वहिवाट असे यामुळे हजारो रुपयाचा व्यवहार त्याच्या हातून होई, पण कधी एका पैची अफरातफर केल्याचा दोष त्याच्या पदरी घालता आला नाहीं, इतका त्याचा प्रामाणिकपणा जागृत होता गोपाळरावानी गृहव्यवस्थेची सगळी जबाबदारी त्याच्या अंगावर टाकली होती, यामुळे एक दिवसाची रजा घेऊन आपल्या घरी जाऊ ह्मटले तर तसे करण्याची सोय नव्हती आणि ह्मणूनच या इमानी चाकराने आपल्या घरादाराची काय व्यवस्था आहे याची चौकशीसुद्धा कधी केली नाहीं "माझे हेंच घरदार, मला आता वेगळे घरदार करून काय करावयाचे आहे? मला मूल ना बाळ एक मावशी होती तीहि आटपली आता कुणाकरिता मला घर आणि दार करावयाचे आहे ?" असें तो नेहमीं ह्मणत असे

पण या जगात माणसाचे ऋणानुबंध काहीं चमत्कारिक असतात ! खऱ्या इमानदारीची किंमत नाहीं, गुणाची परीक्षा नाही, प्रीतीचा मोबदला नाहीं, व्यवहारात सरळता नाहीं, अंत करणात शुद्धता नाहीं, बोलण्यात खरेपणा नाहीं, वागण्यात नेम नाहीं, एवंगुणविशिष्ट जी दुनिया! तिच्यात माणसाचे ऋणानुबंध कशा प्रकारचे असले पाहिजेत त्याचा विचार करा, ह्मणजे अयोध्याच्या इमानदारी-पणाबद्दल त्याला जें शेवटी बक्षीस मिळाले, ते या नियमाला सोडून होते कीं काय ते कळेल

अयोध्याचा आपल्या मालकाशी जो शेवटीं बेबनाव झाला, त्याची सगळी गुरुकिल्ली राधाबाईपाशी होती अयोध्यापाशीं सगळ्या घरातल्या किल्ल्या, त्याच्या हाती सगळा कारभार, आपण घराच्या मालकीण असून आपले हाती काहीच अधिकार नाहीं, असें वैषम्य राधाबाईला वाटू लागले होते, आणि हेंच एकदर बेबनावाचें मूळ होतें गोपाळरावाचा अयोध्यावरचा पूर्ण विश्वास उडवून दिल्याखेरीज त्याच्यापासल्या किल्ल्या आपले हाती येणार नाहीत, असे राधाबाईना वाटले, आणि ही कल्पना तरी त्याच्या डोक्यात भरविण्याला त्याच्या आईसाहेबच कारण झाल्या होत्या.

राधाबाई त्या खटपटीला लागल्याच होत्या रोज काहींना काहीं गाऱ्हाणे अयोध्याच्या विरुद्ध न्यावयाचे,हेंच त्यानी चातुर्मासात व्रत धरले होते गोपाळरावानी प्रथम तिकडे लक्ष्य देऊ नये पण असें झाले की, राधाबाईनी फुगावे आणि रसून बसावे रुसवा ह्मणजे बायकाच्या-विशेषत तरुण बायकाच्या हाती मोठेच हत्यार असते बायकाच्या रुसव्यापुढे कोणाचा निश्चय अढळ राहिला आहे ? एवढा प्रतापी आणि निश्चयी दाशरथी रामचंद्र, पण तोसुद्धा सीतेने सुवर्णमृगासाठी हट्ट

घेतल्याबरोबर त्या मायावी राक्षसाच्या वधार्थ निघाला मग गोपाळराव राधाबाईंचा हट्ट पुरविण्यासाठी अयोध्याला काढून देण्यास तयार झाले, यात मोठेसें नवल नाही.

अयोध्या निघून गेल्यानंतर वेणीच्या हातातल्या पाटल्या गेल्याबद्दल बोभाटा झाला. राधाबाईंनातर अयोध्याचाच प्रथम संशय आला व त्यांनी त्याच्या मागोमाग पोलीस शिपाई लावून त्याला पकडून आणवावें असें गोपाळरावाच्या मागे टुमणे लाविलें पण गोपाळरावाना जुन्या, इमानदार नोकराविषयी असें वर्तन करणें युक्त दिसलें नाहीं आपण आपल्या हातानें पाटल्या काढून त्या अयोध्याच्या पेटीत मुद्दाम्यानें घालून ठेविल्या, ही गोष्ट कबूल केली असता आई मारील या भीतीनें वेणीहि कांहीं बोलली नाही गोपाळरावांनी पुष्कळ शोध करून पाहिला, पण गेलेल्या रकमेचा शोध लागला नाहीं, तेव्हा अखेर त्यांनीं तिचा नाद सोडून दिला.

[ ४ ]

इकडे अयोध्या आपल्या गावी जाऊन पोहोचला, तेव्हा आता आपण एकटे या घरात भुतासारखे रहाणार हा विचार मनात आल्यावर त्याला फारच वाईट वाटलें त्या घराची तरी कोण दुर्दशा झाली होती ! घरात पावसामुळे ओल येऊन रानातल्यासारखी वनस्पति उगवली होती. घुशींनें ठिकठिकाणीं जागा पोखरून उकरलेल्या मातीचे ढीग घातले होते कुत्री कोठूनतरी दाराच्या फटीतून अगर खिंडारी पडलेल्या भिंतीतून प्रवेश करून आत सुखानें विहार करित होती आपल्या घराची अशी दुर्दशा पाहून अयोध्यानें एक दीर्घ निश्वास सोडला आणि आपल्या एका शेह्याच्या येथे बिन्हाड ठेवून प्रथम घराची दुरुस्ती करण्याचें काम हातीं घेतलें

अयोध्याला आता नोकरी सोडून येऊन बरेच दिवस झाले होते अयोध्या आपल्या घरात एकटा खाटेवर पडला ह्मणजे त्याचें लक्ष्य सगळें गोपाळरावाच्या घरच्या मुलाबाळाकडे लागलें असे तो ती गोष्ट डोळ्याआड करण्याचा पुष्कळ यत्न करी, पण त्याचा इलाज चालेना वेणीच्या त्या दिवशीच्या लग्नाविषयींच्या बोलण्याचें तर त्याला घटकोघटकीं स्मरण येई आणि ती आपणास कबूल केल्याप्रमाणें लग्नाचे वेळी खरोखर पत्र पाठवून बोलावील असेंहि एखादे वेळ त्याला वाटे ती पोरगी ती केवढी, आणि तिला आपण वचन दिल्याचें स्मरण ते किती रहाणार, हा विचार त्याच्या डोक्यात कधींच आला नाहीं !

ती बोलल्याप्रमाणें खचीत करील, आपणास तिच्या लग्नाला बोलावतील, मग आपण जाऊ आणि आपल्या मालकाच्या लेंकराना डोळे भरून पाहू, असेंच त्याला वाटे. अयोध्या पुण्याहून जाणाऱ्यायेणाऱ्या माणसाचा नेहमीं तपास ठेवी, आणि आपल्या मालकाच्या घरची खबर कांहीं आणली आहे का ह्मणून त्याना विचारी पुण्यास जाणाऱ्या माणसाबरोबर मुलाकरिता कधीं खाऊ, कधीं फळफळावळ, कधीं काकड्या, टरबुजें वगैरे जिन्नस तो नेहमीं पाठवित असे त्याला पुन नोकरी मिळवावयाची होती असें नाहीं, पण त्या मुलाकडे त्याचा जीव ओढित असे, हेंच त्याचे खरें कारण होतें

एके दिवशीं अयोध्या खाटेवर बसून गुडगुडी पीत व मधून लावचलाव कपायमान सूर काढून खजरीच्या तालावर हिंदी गीत ह्मणत असता डाकवाल्या शिपायाने त्याच्या हातात एक पत्र आणून दिलें ते हातात पडताच अयोध्याला आनद झाला, पण त्याला वाचता येत नव्हतें गावात मोडीअक्षर वाचता येणारा ह्मणजे एक शाळामास्तर पण तोहि त्या दिवशी एका शेजारच्या गावीं एका रोग्याला औषधपाणी देण्याकरिता गेला होता अयोध्या तत्काळ उठला व घराला कुलूप लावून शेजारच्या गावीं जाण्यास निघाला

अयोध्याने दोन कोस जाऊन मास्तराकडून ते पत्र वाचून घेतले पत्रातला मजकूर ऐकूनतर त्याला फारच आनद झाला ते पत्र वेणीचा वडीलभाऊ दादा याच्या हातचे असून 'चि० वेणीचें लग्न फाल्गुन शु० ५ स गोरजमुहूर्तावर करण्याचे ठरलें आहे, तरी तुह्मी पत्र पहाताच सत्वर निघण्याचें करावें' असा मजकूर होता व त्याखालीं खत गोपाळरावांनीं लग्नाला येण्याविषयीं आग्रहाने लिहिलें होतें अयोध्या त्या गावाहून परत येतायेता रस्त्याने विचार करित चालला होता एकदा त्याला वाटे कीं, आपणास इतके आग्रहपूर्वक मालकानी बोलाविलें आहे, त्याअर्थी न जाणें बरें नाहीं पुन दुसरा विचार असा येई की, लग्नाला रिक्त-हस्तानें जाणें बरोबर नाहीं आपल्या शक्तीप्रमाणें दहापाच रुपयाचातरी अहेर आपणास केला पाहिजे पण सध्या आपण रिकामे आहों आपला हात चालत नाहीं अशा स्थितीत दहापाच रुपये आपल्या ऐपतीच्या मानानें फार आहेत याप्रमाणें विचार करताकरता त्याच्या मनाचा कांहीं निश्चय ठरला आणि त्या निश्चयाप्रमाणें करण्यासाठी रुपये काढण्यासाठी ह्मणून त्याने पेटी उघडली ही पेटी उघडण्याचे प्रसग त्याला आतापर्यंत क्वचितच आले होते आजतरी रुपयाची गरज लागली ह्मणून त्याने पेटी उघडली आणि ती पेटी झाडण्यासाठी त्यातली

एकेक जिन्नस त्यानें बाहेर काढली तेव्हा सर्वांच्याखालीं सोन्याच्या पाटल्या त्याच्या हातास लागल्या त्या वेणीच्या आहेत, हें त्यानें तेव्हांच ओळखलें, पण त्या आपल्या पेटींत कशा आल्या तें त्याच्या लक्ष्यात येईना. बाईसाहेबानी किंवा वेणीनें त्या आपल्याजवळ ठेवण्यासाठी कधी दिल्या होत्या काय, याबद्दलची त्यानें पुष्कळ आठवण करून पाहिलें, पण कांहीं बरोबरसें आठवेना आपण आपल्या हातानें पेटींत त्या ठेवल्याचें त्याला मुळींच आठवेना तो फार बुचकळ्यात पडला. शेवटीं एकाएकीं त्याला वेणीच्या बोलण्याची—तिनें आपल्या बायकोसाठी एखादा दागिना देईन असें ह्मटल्याची—त्याला आठवण झाली त्याबरोबर अयोध्याचे डोळे पाण्यानें भरून आले

आता वेणीच्या लग्नाला जावें कीं नाहीं हा प्रश्नच उरला नाहीं लागलीच पाच मिनिटात चार धुतलेले कपडे बाधून घेऊन अयोध्या बाहेर पडला व कांहीं दिवसांनी पुण्याला येऊन पोहोचला अयोध्याला पुनः पहाताच सगळ्या मुलाना आनदाच्या उकळ्या फुटू लागल्या गोपाळरावानाहि आपल्या पत्राला मान देऊन आपला जुना चाकर मगलकार्याला सत्वर धावून आल्याबद्दल आनद वाटला.

फाल्गुन शु० चतुर्थीस देवदेवक बसलें व पुण्याहवाचन वगैरे होऊन इष्टमित्रादिकानीं अहेर केले सर्वांच्या मागून अयोध्यानें अहेर केला त्यात गोपाळरावाना पागोटें व राधाबाईंना लुगडें दिल्यानतर एका गुलाबी रगाच्या झिरझिरीत कागदात बाधून आणलेल्या पाटल्या वेणीच्या पुढें ठेवून अयोध्या हात जोडून सर्वांना ह्मणाला "मालक, आमच्या ताईसाहेबाच्या या पाटल्या माझ्या पेटीत कुणी घालून ठेविल्या ते मला माहीत नाहीं पण परवा मी इकडे यावयास निघालों तेव्हा माझ्या पेटीत त्या आढळल्या त्या आपल्या आपण नीट पाहून घ्याव्या, आणि या गरीब नोकरावर पूर्ववत् कृपादृष्टि ठेवावी "

अयोध्याचा हा प्रामाणिकपणा पाहून राधाबाईंना आपल्या कारस्थानाची शरम वाटली वेणीनें अयोध्याच्या बायकोसाठी एक दागिना देण्याचे कबूल केलें होतें त्याप्रमाणें आपल्या पाटल्या त्याच्या पेटीत घालून ठेवल्याचे कबूल केलें, आणि गोपाळरावाच्या व सरस्वतीबाईच्या मनातलें सगळे किल्मिष दूर होऊन अयोध्यानें केलेल्या या अहेराची प्रत्येकजण प्रशसा करू लागला लग्न झाल्यावर गोपाळरावानीं व राधाबाईनी आग्रह करून अयोध्याला पुन. आपल्या घरीं ठेवून घेतलें, आणि तो इमानी चाकर आमरण गोपाळरावाचें व त्याच्या वशजाचे हित चिंतित त्याचे देवडीवर राहिला.

---

# जिवलगास संदेश.

[ प्रसंग—आपण लवकरच घरीं येतों, ह्मणून एका तरुणानें आपल्या [illegible]व्यथित भार्येस एक पत्र लिहिलें, परंतु नियमित दिवस उलटून गेले तरी पति येत नाहीं, ह्मणून तिनें हा खालील संदेश पाठविला आहे. ]

[ १ ]

कुणि कृपा करुनि जा कळवा
जिवलगास हा संदेश ।धृ०।
किति दिवस वाट तरि पाहूं
जिव होतो कासावीस,
आज ना उद्यां तरि देवा
येतिल ही धरुनी आस—
लोटिलीं बहुत तीं वरुषें
परि जात न आतां निमिष,
जाहलें काय मज नकळे!
वावली नेत्रमुख-कमलें,
हृदय तें गमे कालवलें
दुःखानें, होतें आयास

[ २ ]

[illegible]त फरक बहु पडला
[illegible] न दिसे काहीं;
आनंद [illegible] न वाटे
[illegible] रडे!
[illegible]
[illegible]
[illegible]
[illegible]
[illegible]
[illegible]

[ ३ ]

गुंफिली वेणि जरि कोणी
तरि वाटे मजसि नकोशी,
घालिती मूद बहु मोदें
परि होते जड ती केशी,
गोष्टी न सुखाच्या रुचती
रुचतें मज मरण विशेषीं,
एकांतिं तुझ्या हातानीं—
गुंफुनि ही घ्यावी वेणी,
हितगुजांत जावी रजनी
उत्कंठा हीच मनास

[ ४ ]

बहु हौस फुलांची ह्मणुनी
प्रतिदिनीं गुंफितें गजरे,
मनि ह्मणतें वाहिन आजी
कधरीं नवे हारतुरे,
परि कोमेजुनि ते जाती
तयांतचि केवळ सारे!
मी अशी वियोगीं विरही
मज गमे, सुमनहारहीं
वाटलें, दुःख बहु वारें
लागलें ह्मणुनि झुरणीस!

[ ५ ]

मैत्रिणी वदति थट्टेनें
जाहले तिकडचे येणें;
मी तदा चोरुनी वघतें
उत्साहें सर्व ठिकाणें;
तितुकेंच काज त्या पुरतें
थट्टेस, कितीतरि कथणें!
एकटी ह्मणे 'कशी फसली!'
दुजि वदे 'वापुडी भोळी!'
घालिता आळ का मगळीं
जिव येतो रडकुडीस!

[ ६ ]

रडु नको ह्मणति कितिकजणी
किति पुसती डोळे दोन्ही;
राहिलें उगिच मी सिट्टुनी
नयनांसें, तरि मैत्रिणी
बोलती 'चलाग जाऊ
अडथळा अणावा कोणी?
पूजिते शंकरा हृदयीं
यावया पति द्रुत गेहीं,
व्रतभग करुनि फळ नाहीं
कुणि व्हावें धनी पापास!'

[ ७ ]

मैत्रिणी सागती मातें
'आत्यावरि बोल नकोस;'
घालोनि शपथ कठाची
मज ह्मणती 'रुसुनी बैस,
पुसतील मुक्यासम कागे
तरि साग असे हा नवस'
परि नशीव माझें फुटकें!
पुसणार कोण मज इतुकें?
मग ढग करुनि का लटके
घालावी भर विरहास!

[ ८ ]

गडगडली गाडि कुणाची
तरि तिकडे दृष्टी जाते;
बोललें कोणी जरि कांहीं
तरि वाटे ऐकावें तें;
होओनि भास आल्याचा
चटकन् मी लाजुनि उठतें;
परि नाहीं कोणी कोठें!
समजता कठ वहु दाटे,
नयनाश्रु जलाच्या लोटें
ओलेपण ये पदरास

[ ९ ]

'प्रियकरिणी' ह्मणुनी लिहिती
पत्राची पहिली ओळ,
तितकेंच वाचुनी पटली
दु त्याची अजवर भूल;
तरि तेंच पत्र की आता
निपजवी मस्तकी शूल!
ही स्थिति सत्य वा मिथ्या,
वघुनि जा ह्मणुनि कळवा त्या,
हा वियोग माझी हत्या
वैसला असे करण्यास'
कुणि कृपा करुनि जा कळवा
जिवलगास हा संदेश!

# आरोग्यासंबंधीं कांहीं सूचना.

## शुश्रूषिकांनीं लक्ष्यांत ठेवण्याजोग्या १५ गोष्टी.

( १ ) आजाऱ्याचे खोलींत मोठ्याने टिक्टिक् करणारे किंवा अवराचे ठोके वाजणारे घड्याळ ठेवू नका

( २ ) पुरेशी हवा आणि उजेड नसलेल्या खोलीत रोगी लवकर बरा होत नाहीं हे विसरू नका

( ३ ) रोग्याचे पाय कधीहि ओले अगर उघडे राहू देऊ नका

( ४ ) रोग्याचे खोलीत करकर वाजणारे जोडे अगर बूट किंवा आवाज करणाऱ्या दुसऱ्या जिनसा ( साखळ्या वगैरे ) घालून जाऊ नका

( ५ ) दिवसातून दोनदा ( सकाळी आणि संध्याकाळी ) रोग्याचे 'टेम्परेचर' घेण्यास विसरू नका

( ६ ) दुसऱ्या रोग्याच्या आजारासंबधीच्या भीतिजनक गोष्टी रोग्यासमक्ष बोलू नका.

( ७ ) मोठ्या मनुष्याचे औषध लहान मुलास देऊ नका कारण जें औषध मोठ्या मनुष्यास गुणकारक होईल तेच लहान मुलास घातक होईल

( ८ ) रोग्याचे खोलीत केव्हाहि कुजबुजू नका कारण कुजबुजण्यापेक्षा मोठ्याने केलेली आरडाओरड बरी, असें एका अनुभविक वैद्याचें ह्मणणे आहे.

( ९ ) खाणेंपिणें, औषध देणें ह्या गोष्टींत जराहि अनियमितपणा करू नका. अनियमित शुश्रूषिका हीच रोग्याला एक मोठा शत्रु आहे

( १० ) रोग्याला खाणेंपिणे किंवा औषध देताना तो निजला असताना त्याला मुद्दाम उठविण्याची आवश्यकता आहे की नाहीं याचा वैद्याकडून पूर्वी निर्णय करून घेतल्याशिवाय त्याला उठवू नका

( ११ ) रोग्यासमोर त्याच्या आजाराच्या कमीजास्तीपणाचा कधीहि खल करू नका या गोष्टी त्याच्या कानी न जातील याविषयी फार खबरदारी घ्या.

( १२ ) काळोख आणि अडगळीच्या जागेत रोग्याला कधीहि ठेवू नका कारण त्यायोगें रोग्याचें मन उदास होते व ही उदासीनता रोगी लवकर बरा होण्यास बराच अडथळा करिते यासाठीं रोग्याच्या खोलीत नेहमी स्वच्छ प्रकाश पडण्याची व खोली प्रशस्त ठेवण्याची खबरदारी घ्या.

( १३ ) औषध देण्यापूर्वी त्यावरील चिठी वाचण्याची हयगय करू नका. कारण ह्या हयगयीने केव्हाकेव्हा प्राणघातक अपघात घडले आहेत.

( १४ ) रोग्याच्या क्षुल्लक तक्रारीसुद्धा शातपणे ऐकून घेऊन वैद्याच्या कानावर घाला. वेडेपणाने रोगी तसें बोलत असेल असें मानून स्वस्थ राहू नका.

( १५ ) अगदी क्षुल्लक गोष्टीतहि वैद्याच्या आज्ञेबाहेर वागण्यास रोग्यास उत्तेजन किंवा मोकळीक देऊ नका उदाहरणार्थ औषध घेण्याचा कटाळा व अपथ्यकर वस्तु खाणे इत्यादि.

---

## मातांनी लक्ष्यांत वागविण्याजोगे १३ नियम.

(१) एक वर्षाच्या आतील मुलास आईनें नेहमी आपल्या अंगावर किंवा निरोगी दाईच्या अंगावर दूध पाजावे आणि दूध पाजणे तेंसुद्धा दर दोन दोन तासाच्या अंतराने पाजावे रात्री होईल तितके करून जास्ती अंतरानें ह्मणजे चार पाच तासानी पाजावे

(२) जर कदाचित् आईला पुरेसे दूध नसेल किंवा निरोगी दाई मिळत नसेल तर मुलास बकरीचे किंवा गाईचें दूध पाजावे परंतु ह्या दुधाचा उपयोग करिताना पुढील गोष्टी विसरु नये. बाहेरील दूध पाजावयाचें असेल तेव्हा प्रथम कांहीं दिवस जेवढे दूध असेल त्याचा अर्धा हिस्सा साधारण गोड केलेलें पाणी त्या दूधात मिश्र करून नतर ते दूध धगधगीत (अगदी कढत किंवा अगदी थंड नव्हे) असताना पाजावे कांहीं दिवसानी अर्धा हिस्सा पाण्याऐवजी, तिसरा, पुढे चौथा हिस्सा पाणी मिश्र करून पाजावे

(३) लहान मुलाच्या दुधासाठी नेहमी काचेची किंवा मातीची भांडी वापरावीं व ती वरचेवर धुऊन साफ करून उपयोगात आणावी. धातूची भांडी कधीहि वापरूं नयेत.

(४) लहान मुलाची भूक किंवा रडे थांबविण्यासाठी कापडाचा चोथा, किंवा नुसती बोंथी कधीहि वापरु नये.

(५) लहान मुलाला जन्मल्यापासून दोन महिन्याच्या आत कोणत्याहि प्रकारचे (भाकरी, बिसकूट, भात वगैरे) जाडे किंवा घट्ट अन्न भरवू नये.

(६) मुलाला सात महिने झाल्यावर व आईचें दूध त्यास पुरत नसल्यास त्याला पातळ व चांगली शिजलेली तांदळाची पेज किंवा दूध घालून केलेलें गव्हाचे पातळ अन्न देण्यास हरकत नाहीं. हे अन्न देत असताना अंगावर दूध

पाजण्याची सवय हळहळू मोडून टाकावी, परंतु ती सवय मुलाचे बारातेरा दांत दिसेपर्यंत व अगदीं रोगी असल्यास अजिबात मोडून टाकूं नये

(७) लहान मुलाला नेहमी सकाळीं दूध पाजण्याच्या किंवा कांहीं अन्न भरविण्याचे अगोदर स्नान घालावें व त्याच्या अंगात स्वच्छ कपडे घालावे लहान मुलाच्या स्नानासाठीं जें पाणी वापरावयाचें तें नेहमी हवेच्या उष्णतेच्या प्रमाणानें असावें व सर्वांग चोळून धुऊन साफ करावें डोकेंसुद्धा चोळून साफ करावें त्यांत खरुज, खाडकें वगैरे होऊं देऊं नये

(८) लहान मुलाचे कपडे कधींहि अंगाबरोबर किंवा घट्ट असूं नयेत तर ते सैल असावेत म्हणजे त्यास आपलें अंग मोकळेपणें इकडेतिकडे फिरविण्यास अडचण होत नाहीं.

(९) लहान मुलाचे कपडे हवेच्या शीतोष्ण प्रमाणावर अवलंबून असावेत नाहींतर कदाचित् अपकार होण्याची भीति असते त्याच्या निजण्याच्या खोलींत नेहमीं हवा मोकळेपणे खेळण्याची तजवीज राखावी

(१०) लहान मुलाला जन्मल्यापासून पंधरा दिवसाच्या आंत उघड्या हवेंत कधींहि नेऊं नये व नंतर नेणें तेंसुद्धा हवा चांगलीशी असल्यास अंगात योग्य रीतीनें कपडे वगैरे घातल्यावरच न्यावें

(११) लहान मुलाला आपल्या आईच्या किंवा दाईच्या बिछान्यावर निजविणें हें अगदीं अनिष्ट आहे

(१२) आईनें आपल्या मुलास चालविण्यासाठीं घाई करूं नये त्यांना आपण होऊन रांगण्यास व टेबल खुर्चा वगैरेंला पकडून उभे राहण्यास व सावकाश सरून धरून चालण्यास द्यावें मूल अगदीं लहान असतांना त्याला चालविण्यासाठीं नाना तऱ्हेच्या गाड्या वगैरे वापरूं नयेत

(१३) आई किंवा दाई गरोदर असल्यास त्यांनीं मुलाला अंगावर कधींहि पाजूं नये.

---

ज्यांना बद्धकोष्ठ व मलावरोध होत असेल त्यांनी प्रातःकाळीं उठल्याबरोबर [illegible] प्यालाभर थंड पाणी प्यावें असा कांही दिवस सारखा क्रम ठेवल्यास त्यांनी पुष्कळ गुण होईल बरेच लोक पुरेसें पाणी पीत नसल्यामुळे त्यांना हा विकार जडत असतो

# करमणूक.

एक—शुक्रवार हा अशुभच वार हो माझी एक दहा रुपयाची नोट त्या दिवशीं गेली.

दुसरा—हो, अशुभ खरा. पण कुणाला? तुह्माला. पण ज्याला ती सांपडली असेल त्याला तो शुभच!

---

हवा फारच बिघडली होती. घरोघर ताप, खोकला पडसें व इतर रोगराई पुष्कळच होती अशा वेळीं एक रोगी दवाखान्यांत डॉक्टरशीं बोलताना ह्मणतो— "डाक्टर साहेब, हवा पहा कशी झाली आहे—!"

डाक्टर—होय, असा उत्तम 'सीझन' आजपर्यंत कधींच आला नव्हता!

---

रावसाहेब दाढीवरून हात फिरवित हजामाची वाट पहात खिडकींत उभे होते इतक्यात रामा गडी बाजारात जाताना पाहून ते ह्मणतात "रामा रामा! तो सद्दू हजाम बघ नाक्यावर अगर जवळपास कुठेतरी उभा असेल! त्याला साग तुला लवकर बोलावलें आहे—शेटची खोटी झाली आहे—"

"जी व्हय, पण न्हाई यत असला तर तेस्नी काय सागू?"

---

श्रीमत सयाजीराव महाराजाची स्वारी एक वेळ आपल्या हत्ती, घोडे वगैरे परिवारासह एका खेडेगांवावरून जात होती. हत्तीस पाहून एक खेडवळ ह्मणतो "कायरे सोम्या हें बघितलेंस का, हे डोंगरासारखें काय चाललें आहे तें?"

सोम्या—अरे ह्मणतात बडोद्याचे ह्माराज आलेआहेत, त्यांची ह्मसवीस असेल! मोठ्या लोकाचे सारेंच मोटे!

---

गुडोपताच्या गांवात आगगाडी नवीनच सुरू झाली होती एक दिवस ते या आगगाडीत बसून परगावीं जात होते गाडी एका शहरावरून जात असतां त्यानीं दुरून एक हत्ती पाहिला, तेव्हा गुडोपत फारच घाबरून एकदम ओरडून महाताला ह्मणतात "अरे बाबा, जरा तुझा हत्ती लांबून घेऊन जा. आमचें इजीन बिचकेलबिचकेल!"

# श्रीयुत गणपतराव काशीनाथ ह्मात्रे.

जगातील सुधारलेल्या राष्ट्रामध्ये आपल्या देशाची गणना होण्यासाठी आपण काय काय उपाय योजिले पाहिजेत, या महत्वाच्या गोष्टीकडे आजकाल आपल्या सुशिक्षित वर्गाचे बरेंच लक्ष्य वेधून राहिलें आहे, परंतु दु खाची गोष्ट ही की, या उपाययोजनेंत सर्वांची एकवाक्यता झालेली नाहीं उलट या बाबतींत बराच मतभेद दिसून येत आहे आपल्याला राजकीय हक्काचा आणि स्वातंत्र्याचा लाभ झाल्याविना आपलें राष्ट्र वर डोकें काढणार नाहीं असा कित्येकाचा दृढ समज झाला असून तदर्थ राष्ट्रीयसभा वगैरेंच्या द्वारें त्याचे दीर्घ प्रयत्न सुरू आहेत; कित्येकाची अशी ठाम समजूत झालेली आहे की, आपल्या समाजात स्त्रीशिक्षण, प्रौढविवाह, विधवाविवाह, जातिभेदनिर्मूलन यासारख्या अनेक सुधारणा होऊन समाज पूर्णपणे सुधारल्याविना आपल्या राष्ट्राची उन्नति होण्याची आशा करणे व्यर्थ आहे आणि ह्मणून ते सामाजिक परिषदेसारख्या संस्थाच्या साह्यानें देशाच्या उत्कर्षाविषयी प्रयत्न करित आहेत, कित्येकाना राजकीय आणि सामाजिक सुधारणा एकसमयावच्छेदेकरून झाल्या तरच आपलें राष्ट्र पुढें सरसावेल असें निश्चयात्मक वाटत असल्यामुळें ते त्या रीतीने झटत आहेत दुसरे कित्येक आहेत त्याच्यामध्ये सामाजिक सुधारणा आधी व्हावी की राजकीय आधीं, हाच वाद पडला आहे कित्येकाना वाटतें की, धर्मात सुधारणा झाली पाहिजे, कित्येकाच्या मतें जुन्या धर्माचें पुनरुज्जीवन झाले पाहिजे, ह्याप्रमाणे नानामतें असून प्रत्येकाचे आपापल्या मताप्रमाणे प्रयत्न चालले आहेत एकदरीनें एवढें खरें की, सर्व देशभर विचारजागृति झाली असून आपापल्या परीनें राष्ट्रहिताविषयी झटण्याची इच्छा सुशिक्षित वर्गाच्या ठायीं उद्भवली आहे, पण हें सुचिन्हच समजलें पाहिजे

परंतु आजपर्यंतच्या आमच्या एकंदर चळवळीचा सूक्ष्मदृष्टीने विचार केला असता आपलें पाऊल सर्व दिशानी सारखें पुढें पडत आहे, असें मानण्यास फारशी जागा दिसत नाहीं, हें कोणीहि कबूल करील त्याचप्रमाणे आपल्या या हतभाग्य आर्यभूमीची प्रस्तुतच्या परिस्थितीत उन्नति करण्याकरिता आपल्या पुढाऱ्यांनी योजिलेल्या उपायात बरीच उणीव असली पाहिजे, हेंहि अनुभवानें आपल्याला शिकविलें आहे ही उणीव कुठे आहे व ती कोणत्या उपायांनी दूर होईल यानिषयीं आपण अवश्य विचार केला पाहिजे

आपल्या तरुण आणि होतकरू मंडळीचा बहुतेक कल आज विश्वविद्यालयाची बी ए , किंवा एम् ए ची परीक्षा देऊन नंतर उदरभरणार्थ वकील, डाक्टर अगर एंजीनीयर होण्याकडेच रोखलेला असतो साधनाभावामुळे अथवा प्रतिकूल परिस्थितीमुळे हे ज्यांस साध्य नसते, त्यांना सरकारी अगर ती न मिळाली तर खासगी नोकरी पत्करून जीवितधारण करण्याशिवाय दुसरा काहींच मार्ग सुचत नसल्याकारणाने ते या नोकरीच्या मागे मिळेल त्या पगारावर धाव घेत सुटले आहेत उरलेल्या वेळात सार्वजनिक वाचनालयात जाऊन वर्तमानपत्रे, मासिक पुस्तकें वाचणे, क्लबात किंवा रिकामटेकड्या मंडळीत जाऊन चहाकाफीचे पेल्यावर पेले घशांत उतरवित अगर पानसुपारी चघळित व तंबाकूच्या धुराने आणि घाणीनें सर्व जागा दुर्गंधमय करित चकाट्या पिटणे, थोर लोकांच्या निरर्थक काहींतरी कुचाळ्या काढित त्यांच्या निंदेने आपली वाणी दूषित करण्यांत आनंद मानणे, ज्या कोणास थोडीशी वक्तृत्वशक्ति असेल त्यानी आपली योग्यता, अधिकार, जबाबदारी इत्यादि गोष्टी न ओळखता मनसोक्त तोंडसुख घेणें, ज्या कोणास काहींसें लेखनसामर्थ्य असेल त्यानी काहींचे बाहींच लेख खरडणें, समाजाला, पुढाऱ्याला, थोर लोकाला किंवा सरकाराला सकारणअकारण शिव्या देत सुटणे, हीच सांप्रत आपली इतिकर्तव्यता बनून राहिली आहे कोणताहि नवीन उद्योग अंगावर घेऊन तो नेटाने चालविण्यास लागणारी साहसवृत्ति, उत्साह, अवसान व धैर्य आह्मामध्ये बिलकूल दिसून येत नाहीं. नवीननवीन शास्त्रीय शोध लावणे, देशांतरी जाऊन नवीननवीन कला शिकून येणे, एखादा नवीन धंदा शोधून काढून तो नेटाने चालविणे, परदेशाशी व्यापार करणे वगैरे मोठमोठ्या कामाचा भार शिरी घेण्यास लागणारे साहस, दृढनिश्चय, शोधकबुद्धि, योजनाशक्ति, धोरण वगैरे राष्ट्रोन्नतिकर गुणांचा पारतंत्र्याच्या बेडीने ह्मणा, पाश्चात्यांच्या सद्गुणाकडे दुर्लक्ष्य करून त्यांच्या फक्त दुर्गुणांचेच अनुकरण केल्यामुळे ह्मणा, अगर अन्य कोणत्याहि कारणामुळे ह्मणा, आमच्यामध्ये अगदीच लोप झालेला आहे आणि ह्मणूनच आमचे राष्ट्र सांप्रत प्रस्तुतची दीनदशा भोगित आहे देशात धंदेशिक्षणाचा प्रसार झाल्याशिवाय, जपानाप्रमाणे पाश्चात्यांचे उद्योगधंदे शिकून त्यांचा आपल्या देशांत फैलाव होईल असे केल्याशिवाय, हिंदुस्थानचे व्हायसराय लार्ड कर्झनसाहेब यानी दिल्ली येथे राज्यारोहणानिमित्त भरलेल्या दरबारचे प्रसंगी हिंदुस्थानातील कलाकौशल्याचें प्रदर्शन उघडताना केलेल्या मोहक भाषणात आपणास उपदेशिल्याप्रमाणे आह्मी

आपल्या देशातील कलाकौशल्य व हुन्नर यांचें पुनरुज्जीवन केल्याशिवाय आपला ऊर्जित काळ खचित यावयाचा नाहीं, आणि नुसत्या उच्च शिक्षणाच्या प्रसारानें आमचें राष्ट्र कधींहि वर डोकें काढणार नाहीं! राष्ट्राचा उत्कर्ष व्हावयास उच्चशिक्षण व धंदेशिक्षण यांचा श्रेयस्कर मिलाफ होणें अत्यावश्यक आहे.

या अत्यंत महत्वाच्या गोष्टीकडे आमच्या पुढाऱ्यांचें दुर्लक्ष्य होत चाललें असतां, त्यांना शुद्धीवर आणण्यासाठींच की काय न कळे, आपल्यांपैकीं कांहीं तरुण होतकरू मंडळी खसुषीनें व आवडीनें या नवीन मार्गाचें अवलंबन करून आपल्या देशबंधूंस उदाहरण घालून देत आहे, ही मोठ्या समाधानाची गोष्ट समजली पाहिजे अशा मार्गदर्शक होतकरू तरुणांपैकीं आमचे मित्र सुप्रसिद्ध शिल्पकला-विशारद श्रीयुत गणपतराव काशीनाथ म्हात्रे यांचा अल्प परिचय **मनोरंजनाचे** वाचकांस करून देण्याचें आज आम्ही योजिलें आहे

श्रीयुत गणपतराव हे जातीनें सोमवंशीय क्षत्रिय पाठारे असून यांचा जन्म १८७९ सालीं पुणें येथें झाला गणपतरावांचे वडील विद्याभिलाषी असून यांनीं पुण्यांत लष्करी अकाउंट खात्यांत नोकरी करून चांगला लौकिक संपादन केला हे हल्लीं सरकारी पेनशनर आहेत गणपतराव हे त्यांचे चवथे चिरंजीव बाळपणीं गणपतरावांचे एक वडील बंधु पुणें येथील एंजिनिअरिंग कॉलेजांत शिकत असतांना घरीं ड्राइंग वगैरे काढित असत व त्यांना गणपतीच्या वगैरे मातीच्या मूर्ती करण्याचाहि नाद असे तेव्हांपासूनच छोट्या गणपतरावामध्यें या कलेची आवड उत्पन्न होऊन तिची त्यास बाळपणांत गोडी लागली ते कागदावर चित्रें काढूं लागले व पुढें मातीचे पुतळेहि बनवूं लागले आणि पुढें या कलेंत यांची स्वाभाविक गति एवढी वाढली कीं, मुंबईच्या चित्रशाळेंत प्रवेश करण्याच्या आधींच म्हणजे आपल्या वयाच्या बाराव्या किंवा तेराव्या वर्षीं यांनीं आपल्या धाकट्या भावाचा एक मातीचा बस्ट (छातीपर्यंत पुतळा) हुबेहुब बनविलेला पाहून सर्वांस अचंबा वाटला!

श्रीयुत गणपतराव यांचा मराठी अभ्यास पुण्यांत झाला पुढें त्यांच्या वडिलांनीं पेनशन घेतल्यावर पुणें सोडून ते सहकुटुंब मुंबईस येऊन राहिले मुंबईस आल्यावर गणपतरावजींनीं इंग्रजी अभ्यासास सुरुवात केली व पांच यत्ता पुऱ्या झाल्यावर त्या अभ्यासाचा राजीनामा देऊन आपल्या आवडत्या विषयाकडे आपला मोर्चा फिरविला सन १८९१ सालीं त्यांनीं सर जे जे स्कूल आफ आर्ट (कला-भुवन) मध्यें प्रवेश केला येथें एक अति महत्वाची गोष्ट नमूद करणें जरूर आहे कीं, गणपतरावांच्या वडिलांनीं मोठ्या चौकसपणानें व बारकाईनें यांच्या बाळपणापासून

चित्रकलेकडे असलेला याच्या बुद्धीचा स्वाभाविक कल ओळखून त्याला कोणत्याहि प्रकारचा अडथळा न आणता व आरंभी वर्णिलेल्या अलीकडील अपायकारक धोपटमार्गात दुराग्रहानें त्यास न शिरवितां मोठ्या शहाणपणानें त्याची आवडती कला त्यास साध्य करून घेण्यास आपली पूर्ण संमति व उत्तेजन दिलें! आणि याचा परिणाम त्यास व त्याच्या चिरंजीवास–उभयतासहि–किती श्रेयस्कर झाला, हें पुढील हकीगतीवरून सहज कळून येईल. त्याचे पासून हा धडा सर्व वडिलानी अवश्य शिकला पाहिजे. कारण त्याच्याप्रमाणेंच ते जर आपल्या मुलावर बारीक नजर ठेवून त्याच्या बुद्धीचा कल कोणत्या विद्येकडे किंवा कलेकडे आहे हे जाणून घेण्याचा प्रयत्न करतील व त्या धोरणानेंच त्याच्या शिक्षणाची तजवीज ठेवितील तर उभयपक्षीं कल्याण होऊन देशात खरी विद्वान् व अनेककलानिष्णात मंडळी लवकर पैदा होईल व देशोन्नतीचा मार्ग सुखकर होईल यात तिळप्राय संशय नाहीं.

गणपतरावानी स्कूल आफ आर्टच्या अथपासून इतिपर्यंत सर्व अभ्यासक्रमात एवढें प्रावीण्य संपादन केलें कीं, तेथील प्रत्येक परीक्षा ते पहिल्या तडाक्याला पसार होऊन प्रत्येकींत अग्रस्थान पटकावित व अनेक प्रशंसापत्रकें, बक्षिसें व सोन्याचांदीची पदकें मिळवित गेले

गणपतरावाचा अभ्यासक्रम पुरा झाल्यावर त्याना त्याच शाळेत पेन्टिंग ह्मणजे चितारकामाच्या वर्गाच्या अध्यापकाची जागा देण्यात आली गणपतरावानी थोड्या अवधीत आपल्या उत्तम कामगिरीने व सौजन्याने आपल्या छात्रवर्गाची मनें आपल्याकडे वरीच वेधून घेतलीं गणपतराव त्याच कामावर राहिले असते तर त्याची नि संशय लवकरच बढती झाली असती कारण त्याच्यावर वरिष्ठ अध्यापकांचें फारच प्रेम होतें परंतु अशा तऱ्हेने स्वतास बाधून घेण्याची त्यास मुळीच इच्छा नव्हती आपल्या आवडत्या विषयाचें ह्मणजे शिल्पशास्त्राचे पूर्णज्ञान मिळविण्याची त्याची बळकट इच्छा होती व तींत चांगलेंच यश मिळवून तेंच काम पुढे स्वतंत्रपणानें चालविण्याचा त्याचा निश्चयहि झाला होता या व इतर कारणामुळें त्यानां स्कुल आफ् आर्टचा संबंध लवकरच तोडावा लागला. हे काहीं अशीं ठीक झालें कारण त्याचें तात्कालिक नुकसान जरी झाले, तथापि ते आपल्या कौशल्यानें आपल्या मायभूमीचें प्रियभूषण होतील हें नि.संशय आहे. बढतीच्या लोभानें नोकरीतच गुतून राहिल्यामुळें बुद्धिवान् व हुषार माणसें आपल्या आवडीच्या उद्योगात, कलेंत, किंवा विद्येत पूर्णता मिळविण्यास कशी निरुपयोगी

होतात व पर्यायानें देशाचें किती अहित करतात, याचा अनुभव अलीकडे थोड्या बहुत प्रमाणानें पुष्कळांस असेलच

गणपतरावाचा आवडता विषय जो शिल्पशास्त्र ( Sculpture ) त्यासंबंधी शिक्षण त्यास शाळेंत असें फारच थोडकें मिळालें, कारण, हा विषय शिकविण्यासंबंधी तजवीज आपल्या येथील स्कूल आफ आर्टमध्यें फारच थोडी आहे हा विषय शिकणें हे मोठ्या खर्चाचें काम आहे तशांत उत्तम युरोपीयन शिल्पकार हिंदुस्थानांत एकहि नाहीं एतद्देशीयांत तर त्याचें नावहि घ्यावयाला नको एवढ्या भयंकर अडचणींस न डगमगता थोडक्या अवधींत स्वयंस्फूर्तानें व स्वप्रयत्नानें त्या कलेचें ज्ञान संपादन करून गणपतरावानी तींत एवढें यश मिळविलें, हे कांहीं लहानसहान काम नव्हे यावरून त्यांच्या दीर्घोद्योगाची, अचाट प्रयत्नाची व विलक्षण बुद्धिमत्तेची चांगलीच साक्ष पटते.

लवकरच गणपतरावांनी सुप्रसिद्ध विद्वान् व रसायनशास्त्रवेत्ते प्रो० गज्जर यांच्या आश्रयानें त्यांच्याच गिरगावांतील रसायनशाळेच्या भव्य इमारतीच्या एका भागांत आपला स्टुडिओ सज्ज करून काम करण्यास सुरुवात केली १८९५ सालापासून गणपतराव आपण केलेल्या मूर्तां व इतर कामें प्रदर्शनास पाठवूं लागले पहिल्याच सालीं त्यास मुंबई आर्ट सोसायटीचें चित्रकामाचें पदक मिळालें पुढील सालीं यास दोन पदकें मिळालीं, एक 'व्हिक्टोरिआ मेडल' उत्तम शिल्पकामाकरितां व दुसरें 'मेयो मेडल' चितारकामांत प्रावीण्य संपादल्याबद्दल यापुढें प्रतिवर्षी हे मुंबईस भरत असलेल्या चित्रकलाप्रदर्शनामध्यें आपलीं चित्रें वगैरे ठेवित असत व त्यांच्या पुष्कळ चित्रांस प्रदर्शनांत परीक्षकाकडून गुणवर्णनपर मौल्यवान् पत्रकें, बक्षिसें व पदकें मिळालीं आहेत तथापि ज्याच्या योगानें त्यांचें नांव इंग्लंडापर्यंत गेलें तो प्लास्टर ऑफ पारिस नांवाच्या एक प्रकारच्या चुन्याच्या मुकटीचा पुतळा त्यानी १८९६ त तयार केला हाडेखील त्यानी मुंबई कलाकौशल्य प्रदर्शनाकरितां केला होता यालाहि भावनगरच्या महाराजाचें बक्षिस व रौप्यपदक मुंबई आर्ट सोसायटीकडून देण्यांत आलें हा पुतळा मनुष्याच्या उंचीचा असून त्याची ठेवणहि मोठी सुरेख साधली आहे एक तरुण सुंदर स्त्री न्हाऊन माखून व सुंदर वस्त्रालंकार परिधान करून देवमंदिरास चालली आहे व तिच्या एका हातांत जलपात्र व दुसऱ्या हातांत पुष्पें वगैरे पूजासाहित्य आहे, असें या पुतळ्यांत फारच मोहकरीतीनें दाखविलें आहे गव्हर्नर, गव्हर्नर जनरल वगैरे अधिकारी व चित्रकलेंत प्रवीण असलेली गुणपरीक्षक मंडळी या सर्वांनी

या पुतळ्याची फारच प्रशंसा केली आहे. मुंबईच्या टाइम्सकारांनी या कामाची तारीफ करतांना म्हटलें कीं, 'सदर्हु पुतळ्याचा कर्ता अलौकिक बुद्धिमत्तेचा माणूस असला पाहिजे!' मुंबईच्या आर्टस्कूलचे प्रिन्सिपाल म्हणजे गणपतरावांचे गुरु यांनी शिष्यादिच्छेत् पराजयं या उक्तीप्रमाणें याचें मोठ्या आनंदानें अभिनंदन केलें व म्हटलें कीं, 'गणपतराव हे हिंदुलोकामध्यें एक उपजत गुणी पुरुष आहेत!' प्रसिद्ध चित्रकार राजा रविवर्मा यांनी सदर्हु पुतळा पाहून 'आजपर्यंत एतद्देशीयांच्या हातून निर्माण झालेल्या अशा प्रकारच्या पुतळ्यांत रा. गणपतराव यांचें काम सर्वांत सुबक झालें आहे' असे उद्गार काढले आहेत. हिंदुस्थानचा अनुभव असलेले व विशेषतः हिंदुस्थानातील कलाकौशल्याचे चहाते व खरे मर्मज्ञ गृहस्थ आंग्लोइंडियन पेनशनर सर जार्ज बर्डवुड यांनी विलायतेंत शिल्पकला-विषयक एका मासिक पुस्तकांत असें प्रसिद्ध केलें कीं 'गणपतरावाच्या अप्रतिम पुतळ्याचें आपल्याच्यानें वर्णन करणें अशक्य आहे!' हा पुतळा श्रीमंत महाराज सयाजीराव गायकवाड यांस पहाण्याची इच्छा झाल्यामुळें त्यांनी गणपतरावास पुतळ्यासह बडोद्यास बोलाविलें होतें. काम पाहून महाराज फार खुष झाले व त्यांनीं गणपतरावास बाबाशाही २०० रुपयांची देणगी बक्षिसादाखल दिली. महाराजांनीं तो विकत घेतला असता तर त्यांच्यातील गुणपरीक्षा, औदार्य, स्वदेशाभिमान वगैरे गुणांची विशेष तारीफ झाली असती! शेवटीं तें काम १२०० रुपयास मुंबई स्कूल आफ आर्टच्या अधिकाऱ्यांनी विकत घेऊन सर्व लोकांस तें अनायासें दिसावें म्हणून शाळेच्या भव्य प्रदर्शन-दालनांत अगदीं मध्यभागीं ठेविलें आहे व तेथें तें फुकट पहाण्याची सर्वांस मोकळीक आहे. याच दालनांत ठेवलेल्या ग्रीक व रोमन देवदेवतांच्या फार प्राचीन पुतळ्यांचे हुबेहुब प्लास्टरचे नमुन्याबरोबर या पुतळ्याची तुलना करून पाहिल्या-नंतर "धन्य आहे या मूर्तिकाराची! यानें आज आपलें नांव राखिलें. ईश्वर यास चिरायु करो!" असे आदरयुक्त उद्गार तोंडातून सहज निघून याच्याबद्दल अभिमान वाटणार नाहीं, असा आर्यभूमीचा हृदयशून्य पुत्र विरळाच सांपडेल! आम्ही आमच्या प्रिय वाचकांपैकीं ज्यास संधि असेल त्यास एकदां हें दालन पाहून येण्याविषयीं आग्रहपूर्वक विनंति करतों.

गणपतरावाचें दुसरें मोठें काम म्हटलें म्हणजे मुद्दाम पारिसच्या प्रदर्शनाकरितां तयार केलेला सरस्वतीचा प्लास्टर आफ् पारिसचा पुतळा होय. हा पुतळा पहिल्या पुतळ्याप्रमाणें किंबहुना त्याहूनहि जास्त सुबक झालेला आहे. सरस्वती आपल्या

मोरावर एक पाय ठेवून उभी आहे व हाताने वीणा वाजवित आहे, असा देखावा या चित्रात दाखविला आहे एकदर चित्राची उंची मोरासह सुमारें नऊदहा फूट आहे मूर्तीचें ध्यान प्रेमळ व सौम्य असून तिची एकदर ठेवणहि फार मनोहर साधली आहे पारिसच्या प्रदर्शनात मोठा गौरव होऊन गणपतरावास याबद्दल त्या प्रदर्शन कमिटीकडून 'आनरेबल मेन्शन् डिप्लोमा' म्हणजे गौरवार्थसूचक चर्मपत्र व ब्रॉन्झ मेडल हीं देण्यात आली. पारिसहून मुंबईस येत असताना हा पुतळा दुर्दैवाने फार छिन्नविच्छिन्न झाला व अशा स्थितीतदेखील त्या पुतळ्याचे वरील वर्णिलेले गुण स्पष्ट रीतीने दिसण्यात येतात म्हणून, जरी हा पुतळा साफ नष्ट करून टाकावा असें गणपतरावाच्या मनात आले होतें, तथापि मित्रमंडळीच्या आग्रहावरून तो नीट रीतीनें त्या स्टुडिओत मांडून ठेवण्यात आला आहे.

यांचें तिसरें मोठें काम म्हटलें म्हणजे भिल्लिणीचा वेष धारण केलेल्या पार्वतीचा पुतळा होय हा उंचीने पाच फूट आहे पार्वतीनें वन्यस्त्रियाप्रमाणें डोईसभोवती साधी पुष्पमाला धारण केली आहे वस्त्र चापूनचुपून परिधान केलें आहे पायात वहाणा घातल्या आहेत व हातात मोठा तिरकमठा घेतला आहे अशा तऱ्हेचा हा पुतळा वरील दोन पुतळ्याप्रमाणेंच सुबक व मोहक वठला आहे, हे या अंकाच्या आरंभीं दिलेल्या चित्रावरून सहज दिसून येईल हा पुतळा एडवर्ड बादशहाच्या राज्यारोहणानिमित्त दिल्ली येथें भरलेल्या दरबारच्या प्रसंगी हिंदुस्थानचे व्हाइसराय लॉर्ड कर्झन यानीं उघडलेल्या हिंदुस्थानातील कलाकौशल्याच्या प्रदर्शनाकरिता मुद्दाम तयार करण्यात आला होता प्रदर्शनाचे व्यवस्थापक डा वॉट हे प्रदर्शनाकरिता वस्तु गोळा करण्याकरिता हिंदुस्थानात ठिकठिकाणी फिरत असता मुंबईस आले व ते गणपतरावाचा स्टुडिओ पहाण्याकरिता गेले ते त्याचीं कामे पाहून फार आनंदित झाले व त्यानी गणपतरावास आपलें काम दिल्लीस प्रदर्शनाकरिता पाठविण्याचा अत्याग्रह केला त्यामुळे, जरी या वेळीं त्यांची प्रकृति बरीच नादुरुस्त होती तरी डा॰ वॉट याच्या विनंतीस मान देण्याकरिता काहींतरी काम त्याना हातीं घेणें भाग पडलें आणि भिल्लिणीचा पुतळा हें त्याचे निष्पन्न होय प्रकृति नादुरुस्त, मुदत थोडी म्हणजे अवघी महिन्या दीड महिन्याचीच असें असूनहि हें काम उत्कृष्ट वठलें, यावरून गणपतरावाच्या कुशलतेची प्रशंसा करावी तेवढी थोडीच

या दिल्ली येथील प्रदर्शनात शिल्पकामाच्या दालनात सर्व हिंदुस्थानातून आलेली जी काहीं पाचसात कामे मांडण्यात आली होतीं त्यांत वरिष्ठ जागा या भिल्लिणीला व हिच्यासोबत मुंबई आर्टस्कुलामार्फत पाठविण्यात आलेल्या याच्याच मागे वर्णिलेल्या मंदिरपथगामिनीला देण्यात येऊन त्यास पहिलें बक्षिस व सुवर्णपदक ही देण्यात आली भिल्लिणीचा पुतळा हल्ली याच्या स्टुडिओत आहे

या वरील तीन मोठ्या कामाशिवाय गणपतरावाची दुसरीहि पुष्कळ कामे नावाजण्यासारखी आहेत त्याची थोडीशी माहिती खाली देतो:—

( १ ) स्नानानंतर (After bath) नुकतीच आघोळ आटोपून आलेल्या एका स्त्रीचा हा एक प्लास्टर आफ पारिसचा लहानसा पुतळा मुंबईतील कलाकौशल्याच्या प्रदर्शनासाठी गणपतरावानी १८९५ सालीं तयार केला यावद्दल त्यास भावनगरच्या महाराजाचें बक्षिस व मुंबई आर्ट सोसायटीचे राप्यपदक ही देण्यात आलीं हे कामहि येथील स्कूल आफ आर्टनें याजपासून विकत घेऊन शाळेच्या प्रदर्शनदालनांत ठेविलें आहे

( २ ) प्रसिद्ध पार्सी डाक्टर टेमुलजी भिकाजी नरिमान यांचा संगमरवरी दगडाचा बस्ट (छातीपर्यंत पुतळा) हा मुंबई येथील पार्सी लाइंग-इन-हास्पिटल (सूतिकालय) स्थापन करण्यात डा नरिमान यानी जे अविश्रांत श्रम व मेहनत केली त्यावद्दल स्मारक म्हणून त्याच गृहांत समारभाने उघडण्यात आला हा पुतळा हुबेहुब उतरला म्हणून त्यास ठरलेल्या किंमतीशिवाय निराळे बक्षिस रा व एम् सी. मर्झबान, मुंबई म्युनिसिपालिटीचे माजी एग्झिक्युटिव एंजिनिअर, यानीं दिलें एवढें जरी झाले, तरी हा पुतळा उघडण्याच्या समारंभप्रसंगी मोठमोठ्या गृहस्थानी या कामाची अतिशय तारीफ केली असताहि गणपतरावाच्या नावाचा उल्लेखहि त्या ठिकाणी होऊ नये, ही किती दु खाची गोष्ट आहे ! सुदैवानें श्रीयुत धरत यानीं नंतर गणपतरावाचें नाव मुंबई गॅझिट दैनिक पत्रातून जाहीर केले नसतें, तर लोकांस हें समजलेंहि नसते हा एतद्देशीयाने केलेला संगमरवरी दगडाचा पहिलाच पुतळा होय

( ३ ) कराचीचे प्रख्यात व्यापारी मि. एच् जे रुस्तमजी याचा संगमरवरी दगडाचा बस्ट ( छातीपर्यंत पुतळा )

( ४ ) मयत शेट वरजीवनदास माधवदास याचा संगमरवरी दगडाचा बस्ट हा मोठ्या समारंभानें मुंबईत माधवबागेत उघडण्यात येणार आहे असे समजतें.

हे दोन्ही पुतळे उत्तम वठल्यावद्दल यानां मालकानी ठरलेल्या किंमतीशिवाय निराळी बक्षिसें दिली.

( ५ ) मयत शेट नसरवानजी जे वाडिया याचा संगमरवरी दगडाचा बस्ट

(६) कै० रा सा विश्वनाथ नारायण मंडलिक याचा प्लास्टर आफ पारिसचा बस्ट या बस्टची हकीगत फार चमत्कारिक व विस्मयकारक आहे ह्मणून ती थोडक्यात येथे देतों कै मंडलिक याचे स्मारक ह्मणून एक संगमरवरी दगडाचा बस्ट करण्याचे ठरल्यावर स्मारक कमिटीने शिरस्त्याप्रमाणें विलायतेस धाव घेतली संगमरवरी दगडाचे पुतळे करण्याच्या पूर्वी मनुष्याच्या फोटोवरून एक शाडूचा पुतळा प्रथम तयार करतात व त्या पुतळ्याचा फोटो पहिल्या फोटोशी किंवा मूळ मनुष्याच्या स्वरूपाशीं जमला ह्मणजे मग संगमरवरी शिळा घडण्यास प्रारंभ करितात सदर प्रसंगीं विलायतेंतील कारागिराकडून शाडूच्या पुतळ्याचा फोटो इकडे पसंतीकरिता आला तो कमिटींत अगदींच नापसंत ठरला तेव्हा स्मारक कमिटीनें तें काम येथील स्कूल आफ आर्टकडे सोंपविलें परंतु त्यांनी तयार केलेले दोन्ही पुतळे कुचकामाचे ठरले व पैसेहि फुकट गेले! कारण त्या दोहोंबद्दल कमिटीस किंमततर द्यावी लागलीच! एवढें झाल्यावर मग कमिटीस बिचाऱ्या गणपत-रावाची आठवण झाली व त्यानीं त्याचेकडे धाव घेतली परंतु ज्या अर्थी कमिटीस त्याच्याकडून फक्त शाडूचा पुतळाच पाहिजे होता व संगमरवरी पुतळा त्यावरून विलायतेंत तयार व्हावयाचा होता, त्या अर्थी तें काम त्यानी पत्करण्याचे नाकारलें परंतु या कामासंबधाने विलायती कारागिराशीं आधीच करारमदार होऊन चुकल्यामुळें आमचा नाइलाज आहे असें कमिटीने त्यास कळविलें, आणि अशी कामें वारंवार निघत असतात व तीं यापुढें तुह्मासच देऊं असें आश्वासन देऊन गणपतरावाना मंडलिकाचा शाडूचा पुतळा करून देण्याविषयी आग्रहाची विनंति केली सर हरकिसनदास नरोत्तमदास यासारखी वडीवडी मंडळी यांत पडल्यामुळें व गणपतराव स्वभावतःच फार भिडस्त असल्यामुळे त्याचा नाइलाज होऊन त्यांनी ती विनंति मान्य करून पुतळा तयार केला व तो कमिटीच्या फार पसंतीसहि उतरला पुढें तो कमिटीनें गणपतरावापासून विकत घेऊन विला-यतेंतील कारागिराकडे पाठवून दिला व त्यावरून संगमरवरी दगडाचा पुतळा तयार होऊन तो मुंबईस आला तरीदेखील तो वठावा तसा वठला नाहींच! हा पुतळा साम्प्रत मुंबई म्युनिसिपालिटीच्या कारपोरेशन हालात ठेवण्यात आला आहे

पुढें कर्मधर्मसंयोगानें लवकरच शेट नसरवानजी माणकजी पेटिट याचे स्मारक म्हणून त्यांचा संगमरवरी दगडाचा पुतळा करण्याचे ठरलें व त्या स्मारक-कमिटीमध्यें मंडलिक स्मारक कमिटीचेच काहीं सभासद होते त्यांनां गणपत-रावानी मंडलिकांचा शाडूचा पुतळा त्यांच्याकडून करवून घेतांना दिलेल्या आश्वा-सनाची आठवण दिली. त्यावर एवढी मोठी जबाबदारीची कामें अगावर न घेण्या-विषयी कमिटीनें त्यांस उपदेश तर केलाच, परंतु काम बरोबर न झाल्यास नुकसान भरून देण्याविषयी कोणातरी मोठ्या इसमाची हमी मागितली ! गणपतरावास आपल्या कामासंबधी खात्री असल्यामुळे त्यानी ही हमीदेखील पत्करिली व प्रो गज्जर हे जामीन रहाण्यास मोठ्या खुषीनें तयार झाले तरीदेखील शेवटी कमिटीनें गणपतरावास दाद न देता हलगर्जीपणानें ते काम विलायतेसच पाठवून दिलें ! तें अद्यापि तयार होऊन आलें नाहीं आल्यानंतर तो पुतळा कसा काय वठला आहे हें पहाण्यास सापडेलच त्याविषयी सध्या बोलणें वाजवी होणार नाहीं परंतु तो कसाहि वठला तरी एवढे स्पष्ट होते कीं, ज्याच्या अंगी खरोखर गुण असेल त्यास उत्तेजन देऊन पुढें आणण्याची जी एक स्वदेशाभिमानप्रेरित बुद्धि असते ती आपल्यामध्ये मुळीच नाहीं म्हणजे आम्ही स्वाभिमानशून्य व स्वदेशाभिमानशून्य आहों, असें मोठ्या दु खानें म्हणावें लागते

( ७ ) शेट बमनजी दिनशा पेटिट याजकरिता तयार केलेला झोरोआस्टरचा संगमरवरी बस्ट.

( ८ ) सर हरकिसनदास नरोत्तमदास यांच्या 'नरोत्तमदास म्यानशन' करिता तयार केलेली गणपतीची शाडूची मूर्ति

( ९ ) सुरत येथील सार्वजनिक कारंजाचा प्लास्टर आफ पारिसचा मॉडेल

( १० ) मुंबईचे प्रसिद्ध कापडाचे व्यापारी शेट कल्याण हरजीवन याचा संगमरवरी दगडाचा बस्ट.

(११) राजापूर येथील सच्छील व वयोवृद्ध पुरुष काका पुराणीक ऊर्फ रघुनाथ महाराज याचा संगमरवरी दगडाचा पुतळा. हा पनवेल येथील श्रीधूतपापेश्वर-आरोग्यमंदिरात नुकताच मोठ्या समारंभानें प्रतिष्ठित करण्यात आला हा पूर्ण आकाराचा असून यात महाराज आसनोपविष्ट दाखविले आहेत. याची मुद्रा व शरीराची ठेवण यात अगदी हुबेहुब साधली असून एकदरीनें हें काम फारच प्रशसनीय झालें आहे

याशिवाय खालीं लिहिलेलीं कामें गणपतरावांच्या स्टुडिओंत सांप्रत चालू आहेत —

( १ ) कोल्हापूर दरबाराकरिता व्हिक्टोरिआ राणीसाहेबाचा बस्ट

( २ ) अमदावाद येथील व्हिक्टोरिआ स्मारक कमिटीकरिता व्हिक्टोरिआ राणीसाहेबाचा संगमरवरी दगडाचा पुतळा ( दगडी बैठक व छत यासहित ) हा साधारणपणें मुंबईंत एस्प्लनेडवर असलेल्या राणीसाहेबाच्या स्मारकाच्या उंचीचा होईल याचा प्लास्टर ऑफ पारिसचा संपूर्ण छोटा मॉडेल (नमुना) फारच सुबक व रमणीय वठला असून तो अमदावादचे कलेक्टर मेहरबान डाडरेटसाहेब, स्मारक कमिटीचे अध्यक्ष, यांच्या फार पसतीस उतरला आहे

म्हैसुरास दिवाण बहादुर सर शेषाद्रि आयर यांचे स्मारक ह्मणून त्यांचा ब्रॉन्झ मेटलचा एक भव्य पुतळा व्हावयाचा आहे, त्याचा आधी शाडूचा पुतळा बनविण्याचें काम म्हैसुर सरकारनें गणपतरावाकडेसच सोंपविण्याचा नुक्ताच हुकूम काढला आहे हें त्या सरकारास फारच भूषणावह आहे व इतर संस्थानिक व राजेरजवाडे हे यांचेंच अनुकरण करतील, अशी आह्मास पूर्ण उमेद आहे

येथपर्यंत यांच्या लहानमोठ्या कामासंबंधी त्रोटक माहिती झाली गणपतराव हे हल्लीं शिल्पकामासंबंधी एक अत्यंत उपयोगी यंत्र बनविण्याच्या प्रयत्नांत आहेत ईश्वर करो व त्यास त्यांत पूर्ण यश मिळो

गणपतरावजी हे स्वभावानें अतिशय नम्र व विनयशील असून फार मनमिळाऊ आहेत डामडौल व गर्व यांचा तर लेशहि त्यांच्या ठिकाणी नाहीं बोलणें फारच माफक या स्वभावाचा परिणाम जरी त्यांच्या धंद्यास प्रतिकूल आहे, तथापि स्वभाव तो स्वभावच ! फार काय, यांच्याकडे जो कोणी जाईल त्यास यांच्या अतिशय साधेपणावरून नामांकित शिल्पकार गणपतराव ह्मात्रे ते हेच की काय, असा संशय उत्पन्न होतो ! एकंदरींत यांच्याकडे पाहिलें ह्मणजे

'भवन्ति नम्रास्तरवः फलोद्गमैर्नवाम्बुभिर्दूरविलम्बिनो घनाः'

या कविकुलगुरु कालिदासाच्या उक्तीची आठवण झाल्याविना रहात नाहीं !

गणपतरावानीं आपल्या कामांत जरी एवढी कुशलता व एवढें यश संपादन केलें आहे, तरी अद्यापपर्यंत शिल्पकलेंत आपली गति फारच थोडी झाली असून तींत शिकावयाचें अजून बरेंच राहिलें आहे असे उद्गार त्यांच्या तोंडून वारंवार निघत असतात आणि यासाठींच युरोपांत जाऊन तेथील प्रसिद्ध विद्यालयामध्ये जगमान्य

शिल्पकाराच्या हाताखालीं शिक्षण मिळवून ही कला पूर्ण साध्य करून घेण्याचा त्यांचा मनोदय आहे या कामास पैशाची भक्कम अनुकूलता असणें जरूर आहे म्हणून मदत मिळविण्याकरिता याच्या वतीनें कित्येक थोर व विद्वान् मंडळीनें पुष्कळ दिवसपर्यंत बरीच खटपट चालविली होती; परंतु तीस देशाच्या दुर्दैवानें यश आलें नाहीं आपल्या देशात श्रीमंत लोक व सरदार मंडळी, गायकवाड सरकारासारखे विद्याभिलाषी राजेरजवाडे याची वाण नसता व धंदेशिक्षणाची आवश्यकता सर्वांस मान्य असताहि गणपतरावासारख्या बुद्धिवान्, गुणवान् व योग्य तरुणास युरोपात जाऊन आपलें ज्ञान परिपूर्ण करण्यास लोकाश्रय मिळू नये ही महद्दु ःखाची गोष्ट आहे ! ज्या देशामध्यें नाचरंग, तमाशे, बैठका वगैरेसारख्या प्रकारामध्यें हजारों रुपयांचा चुराडा होऊन जातो, तेथें अवघे पांचदहा हजार रुपये देशोन्नतीच्या महत्कार्याकरिता गोळा होऊं नयेत, यापरती अधिक लाजिरवाणी व खेदकारक गोष्ट ती कोणती ? हें सर्व आह्मास कळत असूनहि आमच्या देशाच्या खडतर दुर्दैवानें आह्मी पक्के निगरगट्ट बनून राहिलों आहोंत ! असो. द्रव्याची साधारण अनुकूलता झाली ह्मणजे स्वताच्या खर्चानें विलायतेस जाऊन आपला इष्ट हेतु साधण्याचा गणपतरावाचा निश्चय कायम झाला आहे परंतु द्रव्याची अनुकूलता त्यांच्या धंद्याच्या भरभराटीवर अवलंबून आहे अशा दृष्टीनें पाहिलें तरी त्यांच्या देशबांधवाकडून त्यांना मिळावें तितकें उत्तेजन मिळत नाहीं. कलाकौशल्याचा संग्रह करणारे धनिक लोक व राजेरजवाडे यानीं याच्यासारख्या हुषार देशबांधवाला आश्रय दिल्यास त्यांना देशसेवा व गुणाचा सत्कार केल्याचें श्रेय अवश्य येणार आहे. परंतु ज्या देशात कर्तव्यसूर्य अजून उगवला नाहीं व जो देश कुंभकर्णासारखा अज्ञानांधकारातच घोरत पडला आहे तेथे ती सेवा करावी कोणीं आणि तें श्रेय घ्यावें कोणी ? गणपतरावासारखे होतकरू व निष्णात शिल्पकार आपणामध्ये असताना स्मारकें करण्याच्या खटपटींत गुंतलेले लोक पुतळ्याकरितां यूरोपाकडे धाव घेत आहेत, हें त्यांच्या कर्तव्य-पराङ्मुखतेचें व स्वदेशाभिमानशून्यतेचे चिन्ह नव्हे तर कशाचें ? विशेष आश्चर्याची व खेदाची गोष्ट ही की, आमच्यातील ज्या लोकाचे अंगीं त्यास उदार आश्रय देण्याचें किंवा साहाय्य करण्याचें सामर्थ्य सुदैवानें आहे असे गृहस्थ वेळ आली असता प्रसंगविशेषीं दिलेलें वचन विसरूनदेखील आपल्या शहरातील स्वदेशी कारागीर सोडून परदेशात धाव घेतात. मग ते परदेशी कारागीर गाडाभर पैसे घेऊन घोड्याचें चित्र पाहिजे असता गाढवाचें चित्र

पदरात बाधित असले तरी तें त्यास चालतें! याची प्रत्यक्ष उदाहरणें मागे सांगितलेल्या कै. वा. मंडलिक व शेट न. मा. पेटिट याच्या पुतळ्याची होत.

असो. ही कर्मकहाणी आता पुष्कळ झाली. शेवटी उपाय एवढाच की, आपण सर्वांनी दयामय प्रभूला अनन्यभावे शरण जाऊन त्याची प्रार्थना करावयाची की, हे प्रभो, तू आह्मास सद्बुद्धि दे व आह्मास नेहमी आमच्या कर्तव्यासवधानें जागृत ठेव. आमच्या गणपतरावासारख्या होतकरू तरुणास दीर्घायुष्य दे. त्याची मनीषा सफल कर. त्याच्यासारखे अनेक पुत्र या आमच्या प्रिय आर्यभूमातेस दे. आमच्या देशावरील संकटाची वावटळ दूर करून सतत तुझ्या कृपेचा वर्षाव कर. आमच्या देशाची अवनति दूर कर व त्यास उन्नतिपथाप्रत ने. हे प्रभो, तुझ्या कृपाछत्राखाली आह्मांस व आमच्या आर्यभूमातेस सदैव ठेव. आपली ही प्रार्थना जो जगत्पिता पूर्ण करो.



# विविधवृत्त.

सर्व हिंदुस्थानांत ह्मेसुर सस्थानातील लोक अट्टल दारुबाज आहेत.

---

सर्व हिंदुस्थानात कोंकणाइतका गुळाचा खप कोठेंच होत नाही ह्मणतात.

---

शेवटच्या पळपुख्या रावबाजीचे उपानह अद्यापि रोहे येथे आहे.

---

काहीं शतकापूर्वी मनुष्याच्या छायेलाच आत्मा मानणारे लोक होते

---

इग्लडात सध्या ५४० स्त्रिया वर्तमानपत्रकर्त्या असून शिवाय ३००० स्त्रिया ग्रथकर्त्या आहेत.

---

युनायटेड स्टेटमच्या प्रेसिडेटला दररोज ५० हजारावर पत्रे येत असून त्या सर्वांचे जवाब तावडतोब रवाना होत असतात

---

वसई येथील प्रसिद्ध किल्याचे दगड फोडून त्याची खडी म्युनिसिपालिटी रस्त्याच्या उपयोगाला आणित आहे!

---

जगातील सर्व देशापेक्षां युनायटेडस्टेटमध्ये काड्याच्या पेट्या फार खपतात. प्रत्येक मनुष्य प्रत्येक दिवशी सरासरी आठ पेट्या रिकाम्या करतो!

---

महाकवि भवभूति स्वरचित नाटके ज्या देवळाच्या सभामडपात करवित असे ते महाकालेश्वराचे देऊळ अद्याप अस्तित्वात आहे

---

फिजी बेटात असा एक कायदा आहे कीं, जर एखादे वेळी राजाचा पाय निसटला तर त्याच्याजवळ हजर असलेल्या सर्वांनी आपले पाय निसटू द्यावे आणि कदाचित् राजा पडला तर,सर्वांनी धडाधड जमिनीवर लोटागणें घालावी!

## स्त्रीस उद्देशून.

जिवलगे! संगिं मम सारा दुःखाचा मात्र पसारा!
जुंपलिस सदा संसारा, ठावा न सुखाचा वारा!
साखळी, सरी, पाटली–आणुं कोठली
तुझ्या शृंगारा?
ठावा न सुखाचा वारा!
जिवलगे! संगिं मम सारा दुःखाचा मात्र पसारा! १

कोठला जिवलगे! शालु–तुला मी घालुं?
विसर मणिहारा!
ठावा न सुखाचा वारा!
जिवलगे! संगिं मम सारा दुःखाचा मात्र पसारा! २

पातळें जरी पैठणी–तुला कोठुनी?
नसे यां थारा!
ठावा न सुखाचा वारा!
जिवलगे! संगिं मम सारा दुःखाचा मात्र पसारा! ३

दिनरात्र मात्र काळजी सदा त्यालि जी
ओति विषधारा
ठावा न सुखाचा वारा!
जिवलगे! सगिं मम सारा दुःखाचा मात्र पसारा! ४

हृदयाहुनि दुसरें काय–द्यावया हाय!
तेंहि अंगारा!
ठावा न सुखाचा वारा!
जिवलगे! संगिं मम सारा दुःखाचा मात्र पसारा!
जुंपलिस सदा ससारा, ठावा न सुखाचा वारा! ५

## प्रकरण २१ वे.

# भुतानें नेलें.

वाळू व पिलू या दोघांना आज भुताचा चमत्कार दाखवावयाचा असा भीमभाईचा पक्का निश्चय होता ह्मणून त्याने आपल्या सोबत्याला उघडावब करून त्याच्या अगाला व तोंडाला काळे फासलें होतें. त्याचे अगावर एका लगोटीखेरीज दुसरें कांहीं वस्त्र ठेविले नव्हते व चेहरा अधिक उग्र दिसावा ह्मणून त्याच्या डोळ्याच्या अमळ वर व खाली शेंदराचा पट्टा ओढला होता

हे दोघेजण प्रथम एका झाडाआड लपून उभे होते; तरी रात्रीच्या वेळच्या शाततेमुळें वाळू व पिलू याचे सभाषण त्याना चागले ऐकू जात होते वाळूची झालेली घाबरगुंडी आणि पिलूचा भुताखेताच्या चेष्टावरचा दृढ विश्वास या दोन्ही गोष्टी आपणास पाहिजेत तशा अनुकूळ आहेत हें पाहून भीमभाईला व त्याच्या सोबत्याला अर्थातच आनद झाला

ते दोघेहि आता रस्त्याच्या दोन्ही बाजूला झाले, आणि भीमभाईने कांहीं चमत्कारिक आवाज काढून 'पिलू' 'पिलू' अशी हाक मारण्याचा सपाटा लाविला. पिलूच्या नावाची हाक ऐकताच पिलू व वाळू दोघेहि कावऱ्याबावऱ्या दृष्टीने या जगलात आपलें नाव घेऊन आपणास कोण हाक मारित आहे ह्मणून आश्चर्याने पाहू लागले, पण कोणी दिसेना इतक्यात दुसऱ्या बाजूने 'वाळू' 'वाळू' अशी हाक ऐकू येऊ लागली खजुरीचे झाड जवळच होते तेंव्हा ही हाक भुताचीच असली पाहिजे, अशी खात्री होण्यास फारसा काळ लागला नाहीं.

हळूहळू त्या हाकाचा आवाज जवळजवळ ऐकू येऊ लागला, तशी पिलू आणि वाळू याच्या छातींतली धडधड अधिक वाढू लागली होताहोता भीमभाई गाडीच्या अगदी जवळ आला व उडी मारून गाडीवर चढला तेंव्हातर वाळूची भीतीनें बोबडीच वळली आता अधिक थट्टा केली तर कदाचित् मस्करीची कुस्करी होऊन वाळू भीतीने प्राण सोडील, असें भीमभाईला भय वाटलें ह्मणून तो ह्मणतो "गड्यानो! तुह्मी इतके भ्याला का? मीतर भीमभाई आहे भूततर पाठीमागेंच राहिले त्याच्या तावडीतून जीव घेऊन मी कसातरी निसटलो आणि ह्मटले कीं हे आपले ओळखीचे सोबती चालले आहेत, याच्या सगतीने जाऊ, ह्मणून मींच तुह्मा दोघाना हाका मारल्या"

भीमभाई हें सगळें बाळूला धीर यावा ह्मणून बोलत होता. परंतु त्याच्या मनात वीरभद्राची गोष्ट जी एकदा भरली होती ती कांहींकेल्या निघेना त्याला वाटलें कीं, भुतें काय नानातऱ्हेचीं सोंगें घेतात, तसें यावेळी वीरभद्राने भीमभाई-सारखें सोंग घेतले असेल यामुळें भीमभाईच्या भाषणानें त्याची भीति कमी न होता उलटी अधिकच वाढली

इतक्यात भीमभाईच्या सोबत्याने दुरून 'पिलू' 'पिलू' 'बाळू' 'बाळू' अशा हाका मारल्या त्या हाका ऐकून मात्र बाळूची खात्री झाली कीं, गाडीवर चढलेला वीरभद्र नसून दुरून हाक मारणारा तो असेल शिवाय दुरून 'खाऊ' 'खाऊ' असाहि आवाज आता येऊ लागला तेव्हातर तो वीरभद्राचाच आवाज याविषयीं कोणालाच शंका उरली नाहीं त्या दोघाना भेवडावण्यासाठी भीमभाई आता फार भ्याल्यासारखें दाखवू लागला भीमभाईसारखा मजबूत पहिलवान जर इतका भितो, तर आता आपली स्थिति काय होईल या विचारानें पिलू व बाळू दोघेहि अधिकच घाबरले पिलू ह्मणाला "भीमभाई, आता आपण गाडी परतवावी हें चागलें असें मला वाटते"

बाळू ह्मणाला "भी–भी-भीमभाई–प-प-प-परत चला!"

"परतून जाणार कुठे? भुतानीं चारी बाजूनी घेरलेलें दिसत आहे." भीमभाईनें सागितलें

परत फिरण्याचे त्याचे विचार चालताहेत, इतक्यात पुन 'खाऊ' 'खाऊ' हे शब्द कानीं आले

भीमभाईनें विचारलें "पण तुह्मी कुणीकडे जाण्यासाठीं घरून निघाला होता?"

"ध–ध–ध–ध—धर्मशा–शा—

बाळूच्या तोंडून पुढे अक्षरच उमटेना ह्मणून पिलूने सागितले कीं व्याह्या-कडची तेही मडळी धर्मशाळेंत उतरली आहे त्याच्यासाठी फराळाचे सामान, फळफळावळ वगैरे घेऊन चाललो आहों भीमभाई ह्मणाला "मग इतकें भिण्याचें कारण नाहीं बरें पण, ग आदे लिंबूतरी बरोबर आणिले आहे की नाहीं?"

पिलू लिंबू शोधावयाला लागला लिंबू निघाल्यास आज आपल्या जिवावरलें सकट टळणार हें पाहून बाळूलाहि बराच आनद वाटला पिलू गाडीतलें सगळें सामान उसकटून पहात होता, पण लिंबू कोठे सापडेना भीमभाईहि तें शोधण्याचे कामीं त्याला मदत करण्याच्या बहाण्यानें त्या गाडींत खाण्याजोगें सामान कायकाय आहे तें नीट बारकाईनें पाहू लागला गाडींत बदाम, पिस्ते,

मनुका, फळफळावळ वगैरे जिन्नस होते त्यांपैकीं थोडक्या वेळात जेवढे त्याला खातां आले तेवढ्याचा बोकणातर त्यानें भरलाच, आणि शिवाय दोन चांगल्या भरगम मुठीहि त्यानें भरून घेतल्या शेवटी लिंबू सापडलें नाहीं तें नाहींच !

इकडे 'खाऊ खाऊ' करणारें भूत गाडीच्या जवळजवळ येत चाललें. तेव्हा तर नगळ्याचा धीर सुटला भीमभाई घावरल्यासारखें दाखवून घरच्या माणसाचें स्मरण करू लागला पिल्ू व बाळू हे खरोखरच घावरले होते. तेतर डोळ्यात पाणी आणून देवाला, सत्यनारायण नवसित व आपल्या आईचे स्मरण करित देवाचा धावा करित होते.

इकडे तें भूत मोठमोठ्या डुरकावण्या काढित अगदी गाडीपाशीं येऊन थडकलें. तेव्हा भीमभाई अमळ धिटाईने पण हात जोडून कापऱ्याकापऱ्या आवाजानें ह्मणाला "महाराज, मला माफ करा माझ्यावर कृपादृष्टि करून माझा जीव वाचवा"

पिल्ू व बाळू हेहि त्याच्यासारखेच हात जोडून प्रार्थना करू लागले. तेव्हा तो वीरभद्र घोगऱ्या आवाजानें ह्मणाला "अरे, मी तीन दिवसाचा उपाशी आहें व माझा रोजचा आहार एका माणसाचा आहे तेव्हां तीन दिवसाचा आहार मला देवानें एकदमच पाठवून दिला हें बरें केलें. आता तुह्मा तिघाना जर मी सोडून दिलें तर मीं काय खावें?"

भीमभाई फारच काकुळतीला आला, तेव्हा "कोणा एकाला तरी मी खाईन व बाकीच्याना सोडून देईन," एवढें त्यानें कबूल केलें

आता तिघांपैकीं कोणी बळी पडावे, हा मोठाच प्रश्न उपस्थित झाला बाळू ह्मणाला "मी आपल्या आईला एकुलताच एक मुलगा आहे तेव्हा मी बळी पडलों तर माझी आई आणि बहीण याना कुणाचा आधार रहाणार नाहीं ह्मणून माझा जीवतर वाचलाच पाहिजे."

पिल्ू ह्मणाला "माझ्यामागें पाचचार कच्चीबच्ची आहेत मी मेलो तर त्यानी कुणाच्या तोंडाकडे पहावें?"

भीमभाई ह्मणाला "मला आईबाप किंवा मुलेंबाळें नाहींत, ही गोष्ट खरी. पण मी नुक्तेच लग्न करून बायकोला घरीं आणिलें आहे आमच्या संसाराला नुक्ताच कुठे आरंभ होऊं घातला आहे इतक्यातच जर मी मेलों तर माझ्या बायकोवर केवढा शोकाचा प्रसग येणार !"

याप्रमाणें त्या तिघातून कोणीच वीरभद्राला बळी जाण्यास तयार होईना इकडे वीरभद्रतर आरोळ्या मारून 'खाऊ, खाऊ' करित होता शेवटीं असें ठरलें की, वीरभद्रानेच वाटेल त्याला पसत करुन उचलून न्यावे या गोष्टीला अर्थातच भीमभाईची समति नव्हती तो ह्मणाला "असें केले तर मी सर्वांत लठ्ठ असल्यामुळे मलाच प्राणास मुकावे लागणार आहे' "

पण दुसरी तोड कोणतीच निघेना, तेव्हा भीमभाई कपाळावर हात मारुन या व्यवस्थेला दु खाने कबूल झाला "तुह्माला आह्मा तिघातून कोण पाहिजे तो घ्या" असें वीरभद्राला सागण्यात आलें ही वेळ फारच निकराची होती आता कोणावर गदा येते पहावे, ह्मणून जो तो सचिंत मुद्रेने वीरभद्राकडे पहात होता भीमभाईला जरी खरोखर भीति वाटत नव्हती तरी पिल्लू व बाळू याना आपलें ढोंग कळू नये ह्मणून तो फार घाबरल्यासारखें मुद्दाम दाखवित होता

भीमभाई व त्याचा गमती सोबती याच्यामध्ये अगोदर ठरल्याप्रमाणे वीरभद्राने भीमभाईलाच मागितलें तेव्हा भीमभाईनें अगदी हातपाय गळाल्या-सारखें दाखविलें, आणि शेवटीं आपल्या दैवींच असें मरण यावयाचें होतें असें कपाळाला हात लावून ह्मणत व माझ्या बायकोचे समाधान करुन तूच तिला आता तिच्या माहेरीं पोहोंचवून दे ह्मणून बाळूला सागून तो वीरभद्राबरोबर जाण्यास मोठ्या कष्टाने तयार झाला वीरभद्राने त्याचा हात आपल्या बगलेत धरुन त्याला फरफरा ओढित नेलें

भीमभाईचा शेवटीं अशा रीतीने दुख कारक अत झाल्याबद्दल हळहळत पिल्लू व बाळू दोघे चालते झाले पिल्लू पुढें धर्मशाळेत गेला व बाळू झालेली हकीगत भीमभाईच्या घरीं कळविण्यासाठीं निघाल्या ठिकाणी परत गेला.

## प्रकरण २२ वें.

## कोणजाणे !

भुताच्या हातून जिवत सुटलों याबद्दलचा आनद बाळूच्या पोटात मावेनासा झाला होता. ह्मणून तो परत जाताना मोठ्या उल्हसित वृत्तीनें झपाझप पावलें उचलित होता बाळू सजीभाईच्या घरी परत आला तेव्हां बरीच रात्र झाली होती. सजीभाईला सगळ्या दिवसभर दगदग झाली होती, यामुळे त्यानां फार लवकर गाढ झोप लागली होती त्याचें कुटुंब घरातली आवर आटोप करित होतें. बाकीच्या मडळीची नुकतीच कोठे अथरुणाला पाठ लागली होती. इतक्यात बाळूची हाक ऐकून सर्वांना अचबा वाटला.

दार उघडल्याबरोबर बाळू आत गेला तू इतक्या लवकर कसा परत आलास, आणि पिलूची काय अवस्था झाली, व गाडी कोठे आहे, वगैरे प्रश्न त्याला अर्थातच विचारण्यात आले पण बाळूची इतकी बोबडी वळली होती कीं, त्याच्या तोंडांतून अक्षरच फुटेना त्याच्या मुद्रेवर काही आनदाचे, काहीं भीतीचें आणि काही आश्चर्याचें चिन्ह प्रतिबिंबित झालें होते त्याची ती कावरीबावरी मुद्रा पाहून मडळीची जिज्ञासा अधिकच उत्तेजित झाली होती, तींत त्याच्या स्तब्धतेने आणखी भर पडली

हा प्रकार पाहून बरीच मडळी त्याच्या भोंवतीं जमली आणि त्याला नानापरीने प्रश्न विचारू लागली अगोदरच बाळू भोळा, आणि तशात भीतीनें आणि आनदानें बावरलेला, आणि आतातर मडळीने त्याला प्रश्न विचारविचारून अगदीच वेडा करून सोडलें होते मग बाळूच्या गमतीला काय विचारावयाचे आहे ? सगळ्याच्या प्रश्नाला त्याचा आपला एकच जबाब असे आणि तो काय ? तर "कोण जाणे !"

" अरे बाळू, तू परत का आलास ? "

" कोण जाणे !"

" तुझ्या बरोबर पिलू होता ना, तो कुठे आहे ?"

" कोणजाणे !"

" त्याची न् तुझी ताटातूट कशी झाली ? "

" कोणजाणे !"

" अरे तो व गाडी नदींत वहाततर नाहीं ना गेली ?"

"कोणजाणे ! "

सर्व प्रश्नाना हा त्याचा एकच जबाब ऐकून मंडळीला वाटलें की बाळूला खास वेड लागलें म्हणून त्यांनीं घरात आवरआटोप करित असलेल्या मजीभाईच्या कुटुंबाला ही हकीगत कळवून त्याना आणिलें त्याच्या प्रश्नालातरी तो सरळ उत्तर देईल असें सर्वांना वाटले होते, पण व्यर्थ. बाईंनी त्याला विचारलें " बाळ, तू गाडी घेऊन ना गेला होतास ?"

" कोणजाणे !"

" अरे, तू आणि पिलू असे दोघे बरोबर गेला होताना ? पिलू कुठं आहे ? ती गाडी कुठं आहे ? बैल कुठं आहेत ?"

" कोणजाणे !"

बाईला वाटले, बाळ उगाच वात्रटपणा करित असेल म्हणून त्या संतापून म्हणाल्या "पुरे झाला वात्रटपणा ! आता खरं सांगतोस की तिकडे कळवू ? तुलातर उठता लाथ नू बसता बुक्की पाहिजे ! का, असंच ना ?"

" कोणजाणे !"

बाईचा संतापहि वृथा गेला, हे पाहून जमलेल्या मंडळीपैकी एकाला त्वेष आला त्याने बाळूच्या पाठींत एक जोराने बुक्का मारून त्याला शुद्धीवर आणण्याचा प्रयत्न केला त्यायोगानें तो पाठ चोळितचोळित पुनः म्हणाला " कोणजाणे !"

इतकें झालें तेव्हा तर त्याला वेड लागलें याविषयी कोणासच शंका उरली नाहीं, आणि जो तो आपापल्याजागीं बाळूच्या दुःस्थितिबद्दल हळहळत स्वस्थ बसला इतक्यात मजीभाईच्या येथील आचारी मोठा धूर्त होता, त्याने हातात दोन बुंदीचे लाडू घेऊन " तुला भूक लागली आहे काय ?" म्हणून बाळूला विचारलें त्या प्रश्नालाहि " कोणजाणे !" असा जबाब त्याने दिला, तथापि ते लाडू खाली ठेवा असें बोटाने खुणावून त्याने आपल्या उजव्या हाताची अस्तनी मागे सारली त्यावरून हा लवकरच शुद्धीवर येईल अशी त्या आचाऱ्याला आशा वाटू लागली त्याला आणखी दोन लाडू खाऊ घातल्यावर व निर्मळ थंडगार पाणी पिण्यास दिल्यावर त्याने बाळूशीं हळूहळू पुनः बोलण्याचा उपक्रम केला, आणि त्याला भुताने कदाचित् झपाटलें असेल अगर तो भ्याला असेल, अशी कल्पना करून खरें काय आहे ते समजून घेण्यासाठी भुताच्या गोष्टी काढल्या त्याबरोबर बाळूची बंद झालेली वाचा हळूहळू उघडली, आणि आपणास वाटेंत वीरभद्र कसा भेटला व त्याच्या हातून आपण कसे सुटलो तें बाळूने एकदाचें सांगितलें

## प्रकरण २३ वें.

# भीमभाईच्या घरीं.

बाळुला भुताची इतकी भीति वाटत होती कीं, त्या सबंधाच्या गोष्टी आपण बोललो तर वीरभद्र तत्काळ येऊन उभा राहील आणि आपणास उचलून घेऊन जाईल अशी त्याला खात्री वाटत होती, आणि ह्मणून कोणी काहीं विचारलें तरी 'कोण जाणे' असें सांगून भुताविषयींचा उल्लेख करण्याचें तो टाळित होता पण शेवटीं आचाऱ्याला त्याची खुबी कळली व त्यानें आपण स्वत. उत्तम मांत्रिक असून भुताचा बंदोबस्त तत्काळ करण्याची शक्ति आपले अंगात आहे असें जेव्हां सांगितलें व आपण मागें अमक्या ठिकाणीं भुताला कोंडून ठेवलें, तमक्या ठिकाणाहून त्याला हाकून लाविलें असें सांगून बाळूच्या ठिकाणीं त्यानें विश्वास उत्पन्न केला, तेव्हां बाळूची भीति जाऊन त्यानें झालेली हकीगत सांगितली व भीमभाईला वीरभद्रानें कसा बळी घेतला तेंहि कळविलें. भोळ्या मंडळीला ही बातमी अगदीं खरी वाटली आणि वीरभद्रानें भीमभाईला मारून टाकिलें असेल हा विचार मनांत येऊन त्यांना अति खेद झाला ही दु खकारक वार्ता मजीभाईच्या कानावर घालावी असें ज्यालात्याला वाटे. पण मजीभाई ह्मणजे काय? जिवंत समंध! तशांतून आज त्यांना सगळ्या दिवसभराचा शीण येऊन गाढ झोंप लागलेली त्या झोंपेतून त्याला जो कोणी उठवील त्याची पुण्याई चांगली जबरच असली पाहिजे. तेव्हां त्या भानगडींत कोण पडतो? पण मजीभाईखेरीज करून बाकीच्या सगळ्या मंडळीला ही बातमी कळण्यास अवकाश लागला नाहीं

कित्येकांचा असा काहीं उतावळा स्वभाव असतो कीं, कोणतीहि गोष्ट त्याच्या पोटांत ह्मणून रहात नाहीं. तिनें कानांतून एकदां प्रवेश केला ह्मणजे तोंडावाटे बाहेर पडेपर्यंत ती त्याच्या पोटांत ढवळत रहाते व त्यामुळें त्यांना चैन पडत नाहीं. मजीभाईच्या येथें जमलेल्या पाहुण्यांपैकीं एकदोघे अशा उतावळ्या स्वभावाचे होते. त्यांना भीमभाईचा असा शोचनीय अंत झाल्याबद्दलची खबर ऐकून अशी काहीं अस्वस्थता वाटू लागली कीं, ती खबर आतां केव्हां आपण भीमभाईच्या घरीं जाऊन कळवूं असें त्यांना झालें अशी काहीं सुवार्ताहि कळवावयाची नव्हती कीं ती जितकी लवकर कळेल तितकी आनंदांत भरच पडेल बोलूनचालून आकस्मिक मृत्यूचीच खबर ती! ती जितकी उशीरा कळेल तितकी बरी; शिवाय अशी खबर मृताच्या आप्तस्वकीयांना कळवावयाची तर फार जपून

कळवावयास पाहिजे आता मध्यरात्र उलटलेली भीमभाईचें घरहि वरेंच दूर होतें तथापि अशावेळीं असली दु खाची खबर इतक्या जलदीने पोंचविण्यास दोघेजण स्वयसिद्ध झाले हेंतरी नवलच कीं नाहीं? अथवा नवल कसलें! उतावीळपणा ज्याच्या अगीं आहे त्याच्या हातून असला अविचार पदोपदीं घडावयाचाच असा नियम दिसतो

तेवढ्या रात्री मजीभाईच्या येथल्यापैकीं दोघाजणानी भीमभाईच्या घरीं जाऊन भीमभाईचा अत्यत शोचनीय अत झाल्याची बातमी त्याच्या घरच्या माणसाना कळविली तेव्हा अर्थातच त्या माणसानी आकात केला भीमभाई हा त्या घराण्यात एकटाच कर्ता पुरुष असून चागला पैसेवाला व मनमिळाऊ असल्यामुळें दहाजणाचा पोसिदा होता भीमभाईची वृद्ध मावशी, कुटुब, दोन विधवा वहिणी, आत, तिघे भाचे व याशिवाय विद्याभ्यासाकरिता राहिलेले असे लाबच्या एका नातलगाचे दोघे मुलगे असा मोठा परिवार भीमभाईच्या आकस्मिक मृत्यूनें अगदीं उघडा पडला तेव्हा त्याच्या शोकाचें काय वर्णन करावें मध्यरात्रीनतर भीमभाईच्या घरात एकाएकीं रडारड झालेली ऐकून शेजारपाजारचे लोकहि हा काय प्रकार आहे तो पहाण्यासाठी धावत आले, व काय झालें ह्मणून विचारू लागले पण काय झालें तें सागावे कोणी? दु खाच्या आवेशात त्याच्या प्रश्नाचा जबाबच कोणी देईना तेव्हा काहींतरी विलक्षण शोककारक प्रसग आला आहे असा तर्क करून आपली सहानुभूति दाखविण्यासाठी आसपासचे जमा झालेले लोकहि गुजराथी चालीप्रमाणें छाती पिटून आणि मोठ्यानें हेल काढून रडण्यात यथाशक्ति मदत करू लागले हा शोकध्वनि याप्रमाणें भर पडतपडत फारच मोठा झाला त्यामुळें घरातली व आसपासची मुलें जागीं होऊन त्यानीही आपला सूर त्यात मिळविला मग त्या ध्वनींत सा, री, ग, म, प, ध, नी, या सप्तसुरापैकीं प्रत्येक सूर पृथक्पृथक् ऐकू येऊन मोठीच मौज झाली, हें सागावयास नकोच!

याप्रमाणें काहीं काळपर्यंत भीमभाईचें घर ह्मणजे सगीतशाला होऊन राहिल्यावर मग त्या शोकाचें कारण हळूहळू लोकाना कळलें भीमभाईला वीरभद्रानें नेलें असें कळल्याबरोबर पुष्कळाच्या उरात धडकी भरली कित्येक थोडे अधिक छातीचे होते त्यानी त्या बातमीच्या सत्यतेविषयीं शका प्रदर्शित करून आपण त्या रस्त्यावर जाऊन भीमभाईचा तपास करण्याचें पतकरलें, पण त्याच्या

त्र्यांनीं विषाची परीक्षा न पहाण्याविषयींचा उपदेश करून त्यांना परत फिरण्यास लाविलें.

असा प्रकार पहांटेच्या चार वाजेपर्यंत चालला होता. शोक करतांकरतां आता स्त्रियाच्या घशाला कोरड पडू लागली, आवाज चिप्प झाले; डोळ्यांतलें पाणी आटून ते लाल आणि निस्तेज झाले; अश्रूचे ओघळ तोंडावरून चालले होते ते वाळून त्यांच्या खुणांनीं त्याच्या स्वभावत: सुंदर अशा चेहेऱ्यावर विरूपता आणली, रात्रीं लावलेले दिवेसुद्धा स्नेहशून्य होऊन घराचा मालक—आपला आश्रयदाता—गेल्यामुळें निस्तेज होत चालले व हळूहळू मालवले

सकाळीं उजाडल्यावरोबर भीमभाईच्या स्नेही मडळीला ही हकीगत कळताच त्याच्यात जे कित्येक भुताखेतावर अविश्वास ठेवणारे होते त्याच्यामध्ये मोठाच हंशा पिकला व भीमभाईचा बळी घेणाऱ्या वीरभद्राचा पत्ता लावून तो हातीं लागल्यास त्याची चागली खोडकी जिरविण्याच्या निश्चयानें त्यातले कित्येक निघाले ते निघाल्यास फार वेळ झाला नसेल तो भीमभाई आदले रात्री आपण खूप मोठी गमत करून बाळू आणि पिलू या दोघाना फसविलें त्याबद्दल हर्ष मानितमानित व आनदानें डुलत ह्मणा, अगर रात्रीच्या जागरणामुळें डोळ्यावर आलेल्या झापडीमुळें ह्मणा, डुलक्या घेतघेत आपल्या घराकडे येताना दिसला. त्याला पाहून त्याच्या मित्राना फार आनद झाला आणि त्यानी "तुला ज्या वीरभद्रानें रात्रभर अडकावून ठेविलें होते त्याचा समाचार घेण्यासाठीं आह्मी निघालों होतों" असें जेव्हा सांगितलें व रात्रीं भीमभाईच्या घरी झालेल्या गोंधळा-बद्दलची हकीगत कळविली, तेव्हातर भीमभाईला आपली थट्टा सगळ्या गावभर जाहीर झाल्याबद्दल आनद व थोडासा पोरकटपणाचा अभिमानहि वाटला.

## प्रकरण २४ वे.

# प्रसंग धिटाई आणितो.

मागल्या प्रकरणात सांगितलेल्या गोष्टीला फार दिवस झाले नाहींत तोंच मजीभाईची मुलगी पिरोजा हिच्या लग्नाचा दिवस जवळ येऊन पोहोचला वऱ्हाडी मंडळीला पत्रें गेली पिरोजेच्या आईने आपल्या मुलीच्या अंगावर उंची वस्त्रें व आभरणे घालून तिला सजविण्याचा क्रम सुरू केला वास्तविक पहाता ती निसर्गत च सुंदर असल्यामुळें कृत्रिम उपायांनी तिला शोभा आणण्याची खटपट करण्याचे कारण नव्हते पण स्त्रियांना स्वताच्या मुलीच्या सौंदर्याविषयीं पक्का भरवसा नसतो ह्मणून ह्मणा, किंवा लग्नाच्या बाजारात स्वाभाविक सौंदर्यापेक्षा छनूछन् आवाजाला लुब्ध होणारी गिऱ्हाइकें फार असतात असा अनुभव आल्यामुळे ह्मणा, पण स्त्रियांना आपल्या उपवर मुलीच्या अंगावर होतील तितके डागदागिने घालण्यात कौतुक किंबहुना तसें करण्याची आवश्यकता वाटते, ही गोष्ट निर्विवाद आहे मजीभाईची बायको या गोष्टीला अपवाद नव्हती मजीभाईला सावकाराच्या भीतीमुळे आपली श्रीमती बाहेर दाखविण्याची चीड असे, परंतु मुलीच्या लग्नाचे प्रसंगीं त्यानी आपला जातिस्वभाव चार दिवस गुंडाळून ठेवून आपल्या गृहिणीच्या तंत्राने वागण्याचा निश्चय केला होतासें दिसत होतें यामुळे तेहि मुलीने अंगावर एवढे दागिने घातले याबद्दल रागें भरले नाहींत.

मजीभाईनी पिरोजेकरिता योजिलेला वर कसा काय होता याविषयी मतभेद होण्याचा संभव होता मजीभाईच्या दृष्टीने तो एका श्रीमंत सावकाराचा एकुलता एक व लाडका मुलगा असल्याने सर्वथा स्पृहणीय होता, मजीभाईच्या कुटुंबाच्या दृष्टीनें आपल्या मुलीच्या अंगावर पुष्कळसे डागदागिने घालण्यासारखा व वयानें तरुण आणि थोडासा गुलजार गुलहौशी असल्यामुळे त्याच्याविरुद्ध बोलण्यासारखें तिला काहीं दिसलें नाहीं पिरोजा चांगली शिकलीसवरलेली मुलगी होती व तिला तरुण माणसात--विशेषत. घरची श्रीमती, वडील माणसाचे फाजील लाड, वाईट संगति व दुर्व्यसनाची आवड यानीं घेरलेल्या तरुण माणसात--सामान्यत. आढळून येणाऱ्या खोडी ऐकून ठाऊक असल्यामुळे व भावी वरराजाचे कित्येक चाळे मैत्रिणींकडून व प्रत्यक्ष तिच्या भावाकडून तिला कळून चुकल्यावरून तिच्या दृष्टीनें अशा नवऱ्याशीं जन्माची गाठ पडण्यापेक्षा जगतात वास्तव्य करणाऱ्या

एखाद्या क्रूर अस्वलाशी पडलेली बरी, असें तिला वाटत होतें. लोक काय ह्मणत हें पहाण्यात काय अर्थ आहे? ते मजीभाईच्या तोंडावर वराची योजना फारच नामी झाली ह्मणत; आणि त्याच्या पाठीमागें धनलोभास्तव आपल्या पोरीला दुर्वृत्त तरुणाच्या गळ्यात बाधण्यास तयार झाल्याबद्दल मजीभाईला नावें ठेवीत. अशाच्या मताची खरोखर कितीशी किंमत समजावयाची याचा विचार ज्याचा त्यानेच करावा.

कोणी ह्मणतील की, मुलींनी आपल्या पसतीचा नवरा करणें ही रीत सर्वथा वाईट आहे त्यामुळे आईबापाचा बोज रहात नाहीं, मुलींना आपण आपल्या आईबापाहून अधिक शहाण्या आहो असें वाटू लागतें, किंवा त्याच्या हातून उतावीळपणानें किंवा अविचाराने अक्षम्य चुका होतात या सगळ्या गोष्टी खऱ्या धरून चाललो तरी मजीभाईनी पिरोजेकरिता केलेली वरयोजना तिच्या भावी सुखाची निखालस हानि करणारी होती. ही गोष्ट दुसऱ्या कोणास ठाऊक नसली तरी आह्मा त्रिकालज्ञ कादबरीकारानां पक्की ठाऊक आहेना? धडधडीत हे भविष्यज्ञान आह्मास असताना आह्मी पिरोजेला भलत्याच नरपशूच्या हाती कसे पडू देऊ? शिवाय भोळा बाळू आमच्या मदतीस असल्यावर चमत्काराला काय कमी आहे!

पिरोजचे लग्न मागें वर्णिलेल्या तरुणाशी ठरल्यापासून तिची कळी न उमलता उलट सुकत चालली होती. ही गोष्ट तिच्या आईच्या लक्ष्यात येऊन चुकली होती, आणि ती तिला परोपरीने समजाविण्याचा यत्न करित होती; परंतु व्यर्थ! पिरोजला आपल्या आईच्या उलट बोलता येईना; पण तिला जें शब्दानीं व्यक्त करता आलें नाहीं तें तिच्या नेत्रातून टप्‌टप् टपकणाऱ्या अश्रूंनी पूर्णपणे व्यक्त केलें.

तिच्या आईला त्या रडण्याचा अर्थच कळेना तिला वाटलें की, आपल्या पोरीला लग्नात पुष्कळसे दागिने घालतील की नाहीं याची शका येऊनच ती रडत आहे व आपण अखेर गरीबाच्या घरी पडलो याबद्दल वाईट वाटत आहे ह्मणून तिचे समाधान करण्यासाठी ती पिरोजच्या भावी सासरचे ऐश्वर्य व रत्नखचित अलकार याचे वर्णन करून "माझ्या सोनुकलीची वरात जेव्हा हत्तीवरून मिरवित जाईल, तेव्हा गावातले लोक कनई तटस्थ होऊन पहात रहातील, आणि आमच्या जावईबुवावरून अन् त्याच्या या राणीसाहेबावरून लिंबलोण उतरतील," अशा तऱ्हेचे काहीं लाडाचें, काहीं विनोदाचे आणि काहीं कौतुकाचें

भाषण करू लागली पण या भाषणानें पिरोजचें समाधान न होता उलट तिला जास्तीच रडण्याची उकळी फुटली.

हा प्रकार सजीभाई आत शयनमदिरातून ऐकत होते अपत्यस्नेह हा कधीं जन्मात त्याना शिवला नव्हता पण आणखी चार दिवसानीं आपले घर मुलीला पारखें होणार, हा विचार मनात येऊन त्याचें स्वभावत निष्ठुर अत करणहि स्नेहानें थोडेसें द्रवलें, आणि त्यात पिरोजेचें रडणें ऐकल्यावर तर त्याच्यानें रहावेना त्यानी तिला आत बोलावून आपल्या पोटाशी धरलें आणि ह्मटलें "पोरी, तुझ्याकडे पाहिलें तर क्षणभर या ससारातल्या सगळ्या चिंता मी विसरतों तू फारच मोहक आणि गोड मुलगी आहेस तू आता लग्न होऊन आपल्या नवऱ्याच्या घरी गेलीस ह्मणजे आह्माला हे घर कसें ओकेओके दिसू लागेल तू श्रीमताच्या घरी पडणार आहेस, तेव्हा तुला तेथें खाण्यापिण्याची चैन राहील, सुदर, उची, रेशमी साड्या तू नेसशील, अगावावर मोलवान अलकार घालून ठुमकतठुमकत घरात मिरविशील, नोकराचाकराना हुकूम करशील, गाडी घोड्यावरून फिरशील, आपल्या सुदर, तरुण श्रीमत, सद्गुणी आणि प्रेमळ नवऱ्याची प्रीति सपादन करून खरें सुख एकएकटे भोगशील! त्यावेळी आमची आठवणतरी तुला होईल का? आता हा तुझ्या कोमल हाताचा स्पर्श जो मला एवढा आनद देत आहे, तुझा मधुर आवाज जो आमच्या अत-करणाला गार करित असतो, तो हात व तो आवाज दोन दिवसानी परक्याचा होणार, आमचा त्यावर काहीं हक्क रहाणार नाहीं, याबद्दल मला आणि तुझ्या आईला किती वाईट वाटते याची तुला कल्पना नसेल पण बाळे, तुला घर चागलें मिळालें, आणि आता थोरामोठ्याच्या इथें तू सुखात नांदत रहाशील, हें पाहून आमच्या मनाला केवढें समाधान होत आहे ह्मणून सागू? तुझ्या मनाजोगा तरुण, कुलीन, गोरा, श्रीमत, गुणवान् आणि तुझ्यावर प्रेम करणारा असा तुला नवरा मिळाल्यावर तुला आमची आठवणतरी होईल काय?"

बापाचें हें काहींसें प्रेमाचे, काहींसें भावी पतीच्या अगीं नसते गुण प्रस्थापित करणारें मानभावीपणाचे, आणि काहींसें खुशामतीचे भाषण ऐकून यावर काय उत्तर द्यावे ते पिरोजला सुचेना आईबाप दोघेंहि आपल्यावर इतके प्रेम करितात हें तिला आजच समजलें! आई कधीकधीं "बाळे, तुला कस घर मिळेल तें मिळो, माझ्या जिवाला ती एक मोठी जाचणी लागून राहिली आहे!" असे प्रेमळ उद्गार काढित असे हें पिरोजला माहीत होतें पण बापाचा मुलावर

इतका दरारा होता कीं, जणू काय एखादा उग्र वाघ घरात आणून ठेविला आहे! त्याच्यापुढें जाण्यास एरवींसुद्धा मुलें थरथर कांपत. मग मागें सांगितल्या-प्रमाणें एकदां पिरोजवर खप्पा मर्जी झाल्यावर मजीभाईविषयीं केवढी भीति तिच्या मनांत उभी रहात असेल, याचा विचार वाचकांवरच सोपवितों

पिरोजला उत्तर सुचेना, पण आपल्या भावी पतीची जी स्तुति बापानें केली ती तिला मुळींच रुचली नाहीं आणि ती तिची अरुचि तिच्या मुद्रेवरहि स्पष्ट दिसत होती पण बापापुढें बोलतां येईना. मजीभाईंनीं योजिलेला वर डाविस, पाजी, दुर्व्यसनी व सर्वगुणसंपन्न होता, ही गोष्ट सर्वांना जाहीर होती व त्याच्या दुष्कृत्यांच्या पुष्कळ गोष्टी खुद्द पिरोजच्या कानापर्यंत आल्या होत्या त्यामुळें ज्याला तुम्ही सुंदर, सद्गुणी, प्रेमळ, इत्यादि म्हणतां तो खरोखर किती डाविस, नीच, पाजी, दुर्व्यसनी व दुराचारी आहे ते लोकांना विचारा, असें भीतीमुळें तिला म्हणतां येईना, आणि अशा माणसाची स्तुति ऐकून आलेला संताप पोटांत राहीना अशा स्थितींत तिच्यासारख्या कोमल अंतःकरणाच्या पोरीला रडें फुटावें, यांत आश्चर्य नाहीं पिरोजला आपला संताप न आवरल्यामुळें व आपल्या भावी दुःस्थितीच्या स्मरणानें रडण्याचे उमाळे यावेत, आणि मजीभाईला वाटावें कीं आपल्यापासून ही आतां लवकरच दूर होणार म्हणून तिला वाईट वाटत आहे. म्हणून आपल्यापासून दूर झाल्याचें दुःख हलकें करण्यासाठीं तिच्या भावी सुखाचें अधिकाधिक वर्णन मजीभाई करूं लागले तों तों तिच्या रडण्याला अधिकच भरतें आलें संतापाचा व दुःखाचा पहिला आवेग ओसरल्यावर ती धैर्य आणून हळूच म्हणाली "पण बावा, माझ्या लग्नाची एवढी घाई कां करतां? आणि मला असल्या ठिकाणीं कां लोटतां?"

मजीभाई म्हणाले "असल्या ठिकाणीं! म्हणजे? तें ठिकाण काय वाईट आहे! श्रीमंती पहा किती आहे ती!"

"गुण पहा कसे आहेत ते!"

पिरोजचें हें सडेतोड उत्तर ऐकून मजीभाई अंतःकरणांत चरकले आणि जरी त्यांना लहान तोंडीं मोठा घास घेतलेला खपत नसे असा त्यांचा तापट स्वभाव होता, तरी 'तू लोभाला भुलून मुलीला बळी देणार आहेस' असें त्यांची विवेकवाणी त्यांना सांगत असल्यामुळें पिरोजेनें निर्भीडपणानें केलेलें उत्तर व ती विवेकवाणी यांच्या जोडगोळीपुढें त्यांच्या मायावीपणाचा जोर कितीसा चालणार? ते रागानें लाल झाले, पण मुलीच्या उत्तरावर योग्य प्रत्युत्तर त्यांना

सुचेना शेवटी **'शेषं कोपेन पूरयेत्'** या म्हणीप्रमाणें मजीभाईनी मुलीला चूप करण्यासाठी दटावून म्हटलें "बरें बरें, समजलों तुझ्यात किती शहाणपण आहे तें! जरासें ढिले सोडल्याबरोबर तुझी जीभ वहायला लागली, कुणाविषयीं कसें बोलावें हे तुला कुणी कधी शिकविलेंच नाहीं तर तुला येणार तरी कुठून! तुला त्याचे *गुण आवडोत की न आवडोत, त्याच्याशी तुझें लग्न दोन दिवसानीं* व्हायचें आहे, तर तो नवरा तुला आता आवडून घेणें भाग आहे कुणींतरी वात्रटाने तुला काहींतरी सांगितलें आणि तू आपली ज्याच्यात्याच्यापाशी ते सांगत फिरतेस त्याचे कोणते गुण वाईट आहेत? एखाद्या भिकाऱ्यापाशीं सद्गुण असले तरी ते काय कामाचे? व्यवहारात आजकालच्या तरुण मंडळीचें चुकते ते इथेंच"

पिरोजला आपल्या बापाचा तापट स्वभाव ठाऊक होता, आणि म्हणूनच ती इतके दिवस त्याच्यासमोर जाण्याससुद्धा भीत असे पण प्रसंग येऊन बेतला म्हणजे भित्रें हरीणसुद्धा शूर होऊन वाघावर उलटतें म्हणतात, तशी गत आता पिरोजची झाली होती. आता आपण भित्रेपणा धरून जें दैवी असेल तें होईल असें म्हणून मुकाट्यानें बसलो, तर दोन दिवसानीं आपल्यावर एकदा अक्षता पडल्या म्हणजे झालें मग पदरी पडलें आणि पवित्र झालें असें म्हणण्यापलीकडे मनाचें समाधान करण्यास दुसरी जागाच रहाणार नाहीं त्यापेक्षा आताच धीटपणा करून आपल्या मनची गोष्ट बापाचे कानावर घालून मोकळें व्हावें हें बरें, असे तिचें मन आता तिला सांगू लागलें, आणि ती अधिक धिटाईनें मनातली गोष्ट सांगण्यास तयार झाली

## प्रकरण २५ वें.

# पिरोजा मंजीभाईच्या लोभाला बळी पडणार आँ!

मागच्या प्रकरणात सांगितल्याप्रमाणें पिरोजला आतां विलक्षण धैर्य येऊन ती आपला मनोभाव आपल्या पित्याला स्पष्टपणें कळवित होती मजीभाईनी प्रथम तिला पुष्कळ समजावून सांगण्याचा प्रयत्न केला "तू मोठ्या घरी पडणार आहेस, तेथें तुला रहाण्याला टोलेजगी वाडा, बसायाला मखमलीच्या गाद्या, खाण्याला सुग्रास पक्वान्नें मिळतील, अंगावर उंची रेशमी वस्त्रें, हवा खाण्याला किंवा मैत्रिणींच्या घरीं जाण्यायेण्याला दोन घोड्याची बग्गी, हाताखाली पांच पचवीस नोकरचाकर असा तुझा थाट राहील; तुझ्या गळ्यांत मोत्यांचे हार, हातात हिऱ्याच्या पाटल्या, कानांत हिऱ्यामाणकाचे इअररिंग याप्रमाणें सोनें, मोती आणि रत्नांमाणकाच्या दागिन्याच्या ओझ्यानें तू वांकून चालशील, मग तू आपल्या गरीब आईबापालासुद्धा ओळखणार नाहींस आज ज्याला तू बाहेरख्याली, ठोंच्या, शख ह्मणते आहेस त्याची तू पट्टराणी झालीस आणि त्याची मर्जी संपादन करून घेतलीस ह्मणजे तुला आमची आठवणसुद्धां होणार नाहीं, मिया आणि बिबी गुलगुल गोष्टी करित दिवसचेदिवस काढाल, मग तुझें दर्शन आह्मांला दुर्लभ होईल; तुझ्याकडे यावयाचें ह्मणजे अगोदर पुढे वर्दी पाठवून राणीसाहेबांचा हुकूम आणावा लागेल, मग तू ह्मणशील कीं 'कोणबाई हा बाबाचा त्रास! घटकोघटकी येऊन काय करायच आहे! मी का रानात पडलें आहें ह्मणून एवढे माझ्या समाचाराला वारंवार येतात!' आमच्या येण्याजाण्याचा याप्रमाणें तुला कटाळा येऊ लागेल, साराश आज तुझ्या हिताची ह्मणून जी गोष्ट आह्मी करतो तिला तू नावे ठेवतेस, पण उद्यां तूच त्या गोष्टीत इतकी गुरफटली जाशील की, आह्मी तुझे कुणी आप्तस्वकीय आहो हेंसुद्धा तू विसरशील!" याप्रमाणें पानचटपणाचें चऱ्हाट मजीभाईनी सुरू ठेविलें. तें केव्हा संपतें असें पिरोजला झालें होतें पण करते काय? तिला आपल्या लग्नाबद्दलचा सोक्षमोक्ष आज करून घ्यावयाचा होता यामुळें ते सगळें बोलणें ती मुकाट्यानें ऐकून घेत होती तिला स्वताला जगाचा काहींच अनुभव नव्हता, तरी तिनें दुर्व्यसनी पुरुषाच्या हातून त्याच्या निष्कलंक वर्तनाच्या स्त्रीचा कसा वारवार छळ होतो, तिच्या साऱ्या जन्माची कशी माती होते, आणि कितीहि अपरंपार संपत्ति असली तरी वाईट नादी लागलेला मनुष्य ती तेव्हाच उडवून टाकून अखेर

कसा भिकेस लागतो, याविषयींचें उत्कृष्ट चित्र रेखाटलेल्या कादंबऱ्या अनेक वेळा वाचल्या होत्या, आणि बाळपणच्या तिच्या तीव्र स्मरणशक्तीमुळे ते सगळे वाचलेलें तिच्या मनात पूर्णपणें जागृत होतें यामुळें श्रीमान् परंतु विद्याहीन आणि दुर्व्यसनी अशा पतीशी दुर्दैवानें गांठ पडली असता आपल्या कायकाय हालअपेष्टा होतील व आपली अखेर गत काय होईल हें तिनें कल्पनेनें ताडलें होतें, आणि आपल्या भावी दुर्दशेचे कल्पनेनें रंगविलेलें तें भयंकर चित्र डोळ्यासमोर धरताच प्राण गेला तरी बेहत्तर आहे, पण असा प्रसंग टाळण्यासाठी काय हवें तें करीन, अशा प्रकारची प्रतिज्ञा करण्याचें धैर्य तिच्या ठायी एकदम आलें होतें तेराचौदा वर्षांची कोवळी मुलगी, जिनें आजपर्यंत आपल्या बापाच्या तोंडाकडे वर मान करून कधी पाहिलें नाहीं, ती आज मंजीभाईसारख्या तापट, चिरडखोर बापापुढे धिटाईनें बोलत होती, यातलें इंगित हेंच होतें.

पिरोजा काहीं वेळ स्तब्ध बसली आणि मग एकदम उसळी आल्यासारखे होऊन बोलू लागली ती ह्मणाली "बाबा, आता मी काहीं लहान नाहीं तुह्मी मला मायेनं वाढवून लिहावाचायला शिकविलं त्याच्या योगानं कोणतं बरं व कोणतं वाईट हे आता मला समजू लागलं आहे तसंच तुह्मी व आई माझ्यावर केवढी ममता करता, माझं किती कल्याण चिंतता, मला किती शिकवितासवरता, तें मला कळतं या तुमच्या उपकाराची फेड माझ्यानं कुठून करवणार आहे? मुलीनं वडिलांची आज्ञा पाळावी हा तिचा धर्म आहे, त्याप्रमाणं मी करावं. पण जी गोष्ट सगळ्या जन्मभर कायम रहाणार तिच्याविषयीं असला उतावीळपणा करून काय उपयोग? मला कुठं चांगलं स्थळ लवकर मिळालं नाहीं हा माझ्या दैवाचा दोष असेल, पण माझा तर नाहीं ना? सध्याचं स्थळ तुह्माला चांगलं दिसतं, पण तिथं नांदायला तुह्माला जायचं नाहीं, मलाच जावं लागणार आहे. मग तें मला आवडतं किंवा नाहीं हे नको का बघायला? गाड्याघोडे, उंची कपडे, दागदागिने, वाडे, वाड्या, सगळी धनदौलत दुरून बघणाराला फार चांगली दिसते गुलाबाला कांटे असतात, ते दुरून पाहून गुलाबाची वाखाणणी करणाराला बोचत नाहींत, तर जवळ जाऊन त्याला हात लावणाराला बोचत असतात तिथं मला रोज गोडगोड पक्वान्नं खाण्यास मिळतील ह्मणून तुह्मी सांगितलं, पण पक्वान्नं सर्वांनाच गोड लागत नाहींत ज्वरानं पीडित झालेल्यास, काळजीनं झुरणारास, किंवा शोकानं विव्हळणारास पक्वान्नं गोड लागतात का ह्मणून विचारा पाहू? तशीच माझी स्थिति होणार आहे वरून मखमलीची गादी

दिसावी, परंतु तिच्या पोटांत टाचण्या उभ्या करून ठेवलेल्या असाव्या, तसं त्या घरात जेवढं सुख बाहेरून पहाणाराला दिसेल, तेवढ्याच आत हृदयाला बोचणाऱ्या असंख्य टाचण्या भरून ठेविलेल्या आढळतील. तुम्ही माझेसाठी हे श्रीमंताचं स्थळ पाहिलं तें मला सुख लागावं एवढ्याचसाठी ना? तें जर तिथं लागणार नाहीं अशी माझी खात्री आहे, तर उगाच हट्ट धरून मला तिथंच का लोटता? मी गरीबाच्या घरीं मीठभाकर खाऊन तुमचं कल्याण चिंतित राहीन, पण श्रीमंताच्या घरचीं असलीं पक्वान्नं मला नकोत!"

मजीभाईसारख्या मिजासी माणसाला आपल्याबरोबर एका अल्पवयी तरुण पोरीनें लहान तोंडीं मोठा घास घेऊन बोलणें कुठून खपणार? त्यानें प्रथम फार विलक्षण असा सहनशीलपणा मुद्दाम धारण केला होता तरी तो मर्यादेच्या बाहेर जाऊं लागताच मजीभाईनीं त्याला आवरलें आणि पिरोजेला दूर लोटून रागानें चरफडत म्हटलें "बस, बस! तुझें एक अक्षर अधिक नको 'अति तेथें माती' अशी म्हण आहे ती काहीं खोटी नाहीं पायातली खेटरें पायातच ठेविली पाहिजेत! एवढीशी पोर मला शहाणपण शिकवितें आहे! जशी काहीं हीच आतां एक जगांत शहाणी ठरली आहे! आजपर्यंत काय पोरींचीं लग्नें श्रीमंताच्या मुलाशीं कधीं झालींच नाहींत? काय म्हणे, मला भिकारी नवरा पतकरला! पतकरला कशाला, तोच तुझ्या नशिबीं ठेविलेला आहे. असें सुंदर, श्रीमंत स्थळ नवस केल्यानें मिळणार नाहीं, आणि तें मी मोठ्या मुष्किलीनें हिच्या कल्याणासाठीं मिळविलें, पण हिच्या नशिबीं एखाद्या भिकाऱ्याचे पोराशीं लग्न लावयाचें असलें तर त्याला आपण काय करणार? श्रीमंताच्या इथें काय म्हणे टांचण्या बोचतात. काहीं श्रीमंताचीं मुलें दुर्व्यसनी आणि छांदिष्ट असतात खरी, पण त्याच्याशीं आपल्याला काय करायचें आहे? एकतर जावईबुवा तशांतले नाहींत, आणि थोडासा वयपरत्वें बाहेरख्यालीपणा करित असले म्हणून तुझ्या कपाळाला कां एवढी तिडीक उठावी? बाहेरच्या बायका घरांत आणून त्यांना नांदण्यासाठीं तुझ्या हातीं ते देणार नाहींतना! मग त्याची पंचाईत तुला कशाला हवी? पण मीतरी हा वेडेपणा काय करित बसलों आहे? माझ्या घरांत मी मुखत्यार आहे माझ्या मुलीनें मी म्हणेन तसेंच केलें पाहिजे, मग तें तिला आवडो वा न आवडो बस्स, माझ्या मनानें घेतलें तें केल्याशिवाय मी रहाणार नाहीं"

इतकें बोलून मजीभाई रागारागानें उठले आणि डोक्यावर पगडी ठेवून मुलीच्या लग्नाची त्वरा करण्यासाठीं म्हणून काहीं काम मनांत योजून फणफणतच बाहेर पडले

पिरोजला आपल्या बापाचें मन वळेल अशी अगोदरच फारशी उमेद नव्हती; आणि तिला एकाएकीं स्फूर्ति झाली नसती तर इतकें बोलण्याचें धैर्यहि तिला झालें नसतें परंतु आतातर निराशेचा काळाकुट्ट अंधार तिच्या डोळ्यांपुढे एकदम दिसूं लागला आपला सारा जन्म आता असाच दुःखात, हालअपेष्टात आणि रात्रंदिवस मनास जाळित रहाणाऱ्या विवंचनेत जाणार असें तिला आता पक्कें कळून आलें

पिरोजेची ही दुःस्थिति पाहून आमच्या सहृदय वाचकांचीं मनें कळवळतील यात शंका नाहीं पण कादंबरीकाराच्या किंवा वाचकाच्या हातीतरी काय आहे? तिला सुखी करण्याचें आपल्या हातात असतें तर तें करण्यास आपले हात आपोआपच पुढे सरसावले असते पण जेथें आपला निरुपाय आहे तेथें आपण काय करणार? पिरोजसारखी कोमल, तरुण, विचारी आणि निरपराधी मुलगी नजीभाईच्या लोभाला बळी पडणार ऑ! अरेरे! गरीब विचारी!

पण पिरोज! तुला अजून उमेद धरण्यास जागा आहे आपल्या भोळ्या बाळूची काहीं भोळेपणाची करामत तुझ्या फायद्यावर पडली तर अजूनहि तुझें इष्टकार्य घडेल नाहीं कशावरून?

## प्रकरण २६ वें.

## इतक्यातच जांवईबुवांचे गुण पाघळावयाला लागले!

मजीभाईनीं आपल्या मुलीसाठीं योजिलेला वर कशा प्रकारचा होता याविषयींचा उल्लेख मागील प्रकरणीं आलाच आहे याचे नाव खुशालचद असे असून त्याचे विषयी पिरोजला जी माहिती कळली होती ती अक्षरश खरी होती; आणि ती ठणठणपुरात इतकी महशूर होती की, मजीभाई आपल्या भावी जावयाची कितीहि महती गाऊ लागले, तरी त्यानासुद्धा त्या स्तुतीला या गोष्टीमुळें मर्यादा घालावी लागे

लोभाचें आकर्षण काहीं जबरदस्त असते लोभाने मनुष्य डोळे असून आंधळा व कान असून बहिरा बनतो पिरोजेने खुशालचदाशीं आपला विवाह झाला असता आपल्यावर काय प्रसग ओढवेल, याचे अत्यत करुणपर चित्र आपल्या शब्दानी काढून दाखविलें होतें पण त्याकडे पहाण्याचें मजीभाईचे अतश्चक्षु पतकरीनात जावई करीन तर खुशालचदालाच, असा जणू काय मजीभाईचा निश्चयच होता. या कामीं मजीभाईच्या काहीं स्नेही मडळीनेंहि त्याना हिताचे चार शब्द सांगून त्याचे मन पालटण्याचा यत्न करून पाहिला होता. पण त्याच्या योगानें इष्टकार्य न घडता उलट मजीभाई जास्त हट्टास मात्र पेटले, आणि लोकानी आपल्या भावी व्याह्याचें किंवा जांवईबुवाचें मन बहकावू नये ह्मणून त्याची खुशामत करू लागले. लग्नाच्या अगोदरपासूनच त्याना काहींना काहीं निमित्त करुन एखादी जाफत द्यावी, टीपार्टी करावी, किंवा सर्वांनी मिळून कोठेतरी सहलीला जाण्याचें ठरवावे व सहलीचा सगळा खर्च एकट्या मजीभाईनीं सोसून सर्वांकडून स्तुतिपर शब्द मिळवावे, याप्रमाणें चाललें होते मजीभाई ह्मणजे कसला कर्जबाजारी आणि कजुष मनुष्य! पण भावी लाभाच्या आशेने आज तो ह्वा तसा पैसा उधळित होता उद्या जावईबुवाच्या हातात त्याच्या वडिलाची इस्टेट गेली ह्मणजे, अगर आपल्या मुलीच्या अगावर एकदा पुष्कळसे दागिने पडले ह्मणजे लोकाचें कर्ज चुकते करून द्यावयाला मोठेसें जड जाणार नाहीं, ही काय ती मजीभाईला सगळी आशा होती

आजची मजीभाईच्या येथली जाफत अशापैकींच एक होती. रात्री नऊ वाजतां फराळ वगैरे आटोपून मडळीला पानसुपारी, अत्तर गुलाब, हारतुरे वगैरे वाटले. इतक्यात दिलजानी नावाच्या लखनौच्या (ज्याला इष्किबाज लोक ऐटीनें नकलौ असें ह्मणतात) एका प्रसिद्ध वेश्येचा नाच उभा राहिला.

लहानलहान मुलें, तरुण मुली आणि स्त्रिया असणार अशा घरीं वेश्येचा नाच त्या सर्वांच्या देखत करविणें हें किती गर्ह्य आहे! पण आपल्या समाजात गर्ह्यागर्ह्यतेचा खरा विचारच कोठे आहे? जे कुलीन गृहस्थ आपल्या बायकाना एखाद्या नीतिपर व्याख्यानाच्या श्रवणासाठीं सभेंत घेऊन जाण्यात गर्ह्यता मानतात, तेच अचकट विचकट शृंगारिक नाटकाला त्यानां खुशाल घेऊन जातात! बालपणी दुर्दैवाच्या फेऱ्यात सापडलेल्या निरपराधी विधवेचें मुखावलोकन अशुभ समजून त्याना लग्नकार्यासारख्या प्रसगीं समोर फिरकूंहि देत नाहींत, तेच वेश्यासारख्याचा नाच सर्वांच्या समक्ष उभा केल्यावाचून त्या मंगलकार्याची सांगता होत नाहीं असें मानून त्या अमंगल स्त्रीला खुशाल बोलावून सभ्य स्त्रीपुरुषाच्या समाजात प्रविष्ट करतात! आमच्या मुलाना नीतिशिक्षण द्या, नीतिशिक्षण द्या, म्हणून जे आईबाप शाळेंतल्या शिक्षकाना वारंवार बजावून सागतात, तेच आपल्या अथवा आपल्या स्नेह्याच्या घरीं अशा नाचाच्या अथवा गाण्याच्या वेळीं आपल्या मुलाना किंवा सुनालेकीनासुद्धा घेऊन जाण्यास शरमत नाहींत! तेव्हा आता आमच्या लोकाच्या विपरीत समजुतीची धन्य झटली पाहिजे कीं नाहीं!

असो आज मडळी नाच, गाणें, तमाशा वगैरेच्या रंगात दंग झाली आहे; बायकाहि खुष होऊन वेश्येचें नृत्य व गायन ऐकून आनद करित आहेत; दिलजानीचा कोमल पण चढत्या आवाजाचा सारंगीच्या आवाजाशी बेमालूम रीतीनें मिलाफ झालेला पाहून कोणी तिच्या कठाची तारीफ करित आहेत, कोणी 'वहावा, वहावा! क्या मजा है! कलीजा कैसा ठंडा हो जाता है!' अशीं स्तुतिपर वाक्ये सभेच्या ठेक्यावरोवर तोंडातून काढून लखनौवालीकडून गायनशास्त्रनिपुणतेविषयीचे मुग्ध सर्टिफिकेटतरी मिळावे म्हणून तिची सारखी खुषामत करित राहिले आहेत, दिलजानीनें सर्वांचीं दिलें खरोखरच जणू काय त्याचेपासून छिनावून घेतलीं आहेत, तिनें सर्व सभा याप्रमाणें वश करून घेतली आहे या वेळीं जो आनदसागरात तरंगत नव्हता, असा एकहि दुर्दैवी प्राणी तेथ हजर नव्हता!

एकहि प्राणी नव्हता? अरेरे, सभेच्या आनदाचे वर्णन करताकरता आम्हीहि वहावलो वाटते! कारण, फिरोजेला आता कोठला आनद? तिचा आणि तिच्या बापाचा सवाद झाला त्या दिवसापासूनच तिचा सारा आनद मावळला, तिच्या आशेचा कोमल अकुर खुडला गेल्याबरोबर तिची स्वाभाविक आनदवृत्ति मावळली.

तिला आईच्या आग्रहामुळें कांहीं वेळ तो नाच पहाण्यास बसावें लागलें होते; पण पुढे थोड्याच वेळाने काहीं संधी पाहून ती तेथून उठली आणि जिन्याच्या खालच्या पायरीवर एकटीच चिंतामग्न अशा स्थितींत बसली होती

काय करील विचारी? तिचें बापापुढं काय चालणार? ती अशी निराश होऊन वसे, आणि स्वताशी ह्मणे "कर्माची गति विचित्र आहे ती टाळण्याच सामर्थ्य देवादिकात नाहीं, मग आपणतर य कश्चित् मनुष्यप्राणी, आणि त्यातहि अबला. ललाटीं लिहिलेल कुणाच्यान पुसवणार आहे?" याप्रमाणे कसेतरी मनाचे समाधान करण्याचा यत्न ती करी, आणि आता झोप येईल तर क्षणभर चित्ताला विसावातरी मिळेल ह्मणून डोळे मिटून वसे मधूनमधून दिलजानीचा भरारी मारणारा उच पण कोमल व मधुर आवाज वाऱ्याच्या झुळकेवरोवर तिच्या कानी पडे, पण त्याने इतर प्रसगी जो आनद तिच्या मनाला झाला असता, त्याच्या शताशहि या वेळीं होईना झोपहि येईना व डोळे उघडे ठेवूनहि बसवेना इतक्यात एकाएकी थोड्याशा अतरावर "हा, हात आवरा" असे काहीं घाबरेघाबरे शब्द व काहीं धडपड चालल्याचा आवाज तिच्या कानी आला ह्मणून ती दचकून उठली व काय प्रकार आहे तो पहाण्यासाठीं ह्मणून पुढे झाली तो तिच्या दृष्टीला काहीं विचित्रच प्रकार दिसला. तो पाहूनतर ती भीतीने अगदी गागरून गेली, तिच्या अगाचा थरकाप झाला; तिचे ओंठ काहीं रागाने, काहीं भीतीने व कांहीं आश्चर्याने कापू लागले तिच्या दृष्टीला जो देखावा आता दिसला तो पहाण्याची बुद्धि आपणास झाली नसती तर किती वरें झालें असते, असें तिच्या मनाला वाटलें. या देखाव्यानें तिच्या मूळच्या व्यथित अत.करणाला तीव्र यातना होऊ लागल्या.

पण हा असा देखावा होता तरी कसचा?

पिरोजेचे भावी पतिराज खुशालचद याचे मजीभाईकडे जाणेयेणे अलीकडे वरेंच वारवार होऊ लागल्यामुळें त्याच्या घरच्या नोकरचाकराशी सलगी ठेवण्याची सधिहि ते अलीकडे साधून घेऊ लागले होते त्याच्या एकदर वर्तनाचे दिग्दर्शन मागें आलेंच आहे, त्यावरून हे राजेश्री मजीभाईच्या घरच्या एका मोलकरणीवर फिदा होऊन तिच्याशी अति प्रसग करण्याच्या सधीची वाट पहात होते, यात कोणास मोठेसें आश्चर्य वाटण्याचे कारण नाहीं आज ही सधी अनायासेंच प्राप्त झाली होती मजीभाईच्या कुटुबातली सगळी मडळी, नाचगाण्याच्या बैठकीचे जागी जमा झाली होती नोकरचाकरहि सगळे बाहेर ओसरीवर बसून मजलशीची मौज पहात होते त्यात खुशालचदाचे प्रीतिपात्र रभा नावाची

मोलकरीण कोठें दिसेना. तेव्हा ती कदाचित् पलीकडल्या औटहौसमध्यें निजली असेल असें अनुमान करून आणि तिची गाठ घेण्यास हा प्रस्तुतचा काळ फारच अनुकूळ आहे असें वाटून जावईबोवाची स्वारी कांहीं निमित्त करून हळूच त्या मजलशीतून उठली, आणि आवारात इकडेतिकडे हिंडण्याचें मिष करून धोरणा-धोरणानें औटहौसमध्यें जाऊन पोहोंचली. तेथें एक दिवा मिणमिण जळत होता. त्याच्या प्रकाशानें स्वारीनें बारीक नजरेनें पाहिलें तेव्हा त्याला दिसून आलें कीं येथें कोणी बाई निजली आहे खास अधिक जवळ जाऊन पाहिल्यावर रंभेच्या अंगावरची त्याच्या ओळखीची चौघडीहि पण दिसली तेव्हा आपण शोध करित आहों तेच माणूस आहे याविषयी स्वारीला शंकाच राहिली नाहीं आपल्याला कोणी पहात नाहीं ना, ह्मणून त्यानें इकडेतिकडे पाहिलें, पण कोणी दिसेना तेव्हा स्वारीनें आपल्या मनातल्या कृष्ण कृत्याचा उपक्रम करण्यासाठीं निजलेल्या माणसाच्या तोंडावरलें पांघरूण हळूच काढले आणि जबरदस्तीनें अंगावर हात टाकणार, इतक्यात वर सांगितल्याप्रमाणें "हा, हात आवरा!" असा आवाज झाला त्याबरोबर स्वारी घाबरली त्याना वाटलें कीं ही रंभा आता मोठ्यानें ओरडली तर सासुरवाडीस आपली अब्रू जाणार ह्मणून जावईबोवा तिला हळूच ह्मणतात "रंभे, तुझ्या पाया पडतों, पण तू मोठ्यानें ओरडू नकोस कुणी ऐकतील तर माझी फजीती होईल"

जावईबोवाचे हे शब्द त्या निजलेल्या माणसानें ओळखले, आणि मोठ्यानें ह्मटलें "कोण? तुह्मी आहा काय जावईबुवा! तुह्माला इतक्या रात्रीं रंभेशीं असें काय काम येऊन पडलें ते सागता की मी भाईसाहेबांला बोलावू?"

त्या माणसाचे हे शब्द ऐकून खुशालचंदाची भीतीनें बोबडीच वळली तो 'चूप रहा' असें खुणेनें त्या माणसाच्या तोंडावर हात ठेवून आणि गयावया करून विनवू लागला हें सगळें हलक्या आवाजानें चाललें होतें पण पिरोजा जवळ जवळ येत चालली होती व जिकडेतिकडे रात्रीची शातता व स्तब्धता असल्या-कारणानें ते शब्द हळू उच्चारले होते तरी तिच्या कानापर्यंत जाऊन पोंहचल्या-वाचून राहिले नाहींत

हें निजलेलें माणूस कोण होतें व तें येथें कसें आलें तें सागण्याची आवश्यकता नाहीं हा आपला बाळूच, असें आमच्या वाचकानीं ताडलें असेलच पण हा त्या जागीं रंभेची चौघडी पांघरून का निजला होता, तें वाचकास माहीत नसल्यामुळें येथें सागणें अवश्य आहे

## प्रकरण २७ वें.

# गरीब बिचारी पिरोजा!

आज मजीभाईची स्वारी बाळूवर फार रागावली होती, आणि त्याला कारणहि तसेंच झालें होतें आज मंडळी आपल्या येथें फराळाला येणार, त्यांना फराळ झाल्यावर सोडावाटर लेमोनेड वगैरे लागेल, ह्मणून मजीभाईनी बाळूला दुपारीच बजावून सांगितलें होतें की "आतां उन्हाळ्याचे दिवस आहेत, ह्मणून सोडावाटर वगैरेच्या बाटल्या दोनतीन तास अगोदर पाण्यांत घालून थंड करून ठेव!' बाळू बिचारा भोळा प्राणी! त्यानें लागलीच सोडावाटरच्या व लेमोनेडच्या बाटल्या बाजारांतून आणल्या, घरीं आल्याबरोबर एका मोठ्या भांड्यांत पुष्कळसें पाणी भरलें आणि मजीभाईनीं सांगितल्याप्रमाणें सोडावाटर थंडगार करण्यासाठीं एक एक बाटली फोडून ती त्या भांड्यांत ओतूं लागला यांप्रमाणें पांचपंचवीस बाटल्या फोडून त्यांत ओतल्यावर त्या भांड्यावर झांकण घालून व तें भांडें कोणी हात लावणार नाहीं अशा सुरक्षित जागीं व्यवस्थित रीतीनें ठेवून तो तेथून चालता झाला पुढें फराळ वगैरे आटोपल्यावर मंडळीसाठीं थंडगार केलेलें सोडावाटर आणण्यास मजीभाईनीं सांगितलें तेव्हां बाळूनें त्या भांड्यांतलें ग्लासभर पाणी प्रत्येकाच्या पुढें केलें तें अर्थातच पानचट लागलें हे मजीभाईला कळताच त्यांना संताप येऊन त्यानीं बाळूला हें काय आणलेंस ह्मणून विचारलें. तेव्हां बाळू ह्मणाला "मला काय दोष लावतां? आपणच दुपारीं सांगितलें ना कीं सोडावाटर व लेमोनेड थंडगार होण्यासाठीं पाण्यांत ठेव ह्मणून? मग मी हें काय केलें आहे? अक्षरशः आपल्या ह्मणण्या-प्रमाणें वागलों तरी आपलें माझ्या नशिबी बोलणें खाणें आहेच!"

हें बाळूचें भाषण ऐकूनतर मजीभाई अधिकच संतापले आणि ह्मणाले "मूर्खा, चल, निघ इथून माझ्या पाहुणे मंडळीच्या मानापानांत तुझ्या हलगर्जी-पणामुळें कमतरता पडली काळें कर, जा पुनः माझ्या घराचा उंबरठा चढलास तर खबरदार!"

हें घडलें तेव्हां रात्रीचे नऊ वाजण्याचा सुमार होता इतक्या रात्रीं बाळूनें कोठें जावयाचें? ह्मणून मजीभाईच्या दृष्टीआड होण्याकरितां तो ही आौटहौस-मधली बायका बसतउठत ती जागा अगदीं रिकामी पाहून तेथें निजला होता तेथें त्याला पांघरायला कोण देणार? आणि सगळ्या दिवसाभराच्या कामाच्या थकव्यामुळें त्याला झोपेनेंतर अगदीं घेरलें होतें ह्मणून त्यानें जवळच एका

गुडीवर जे काही पाघरूण हाताला लागलें ते पाघरून घेतलें आणि झोप ताणली. बाळू ऐन झोपेच्या भरात असताना वर सांगितलेला प्रकार खुशालचंदाशी घडला

बाळू आणि खुशालचंद हे बोलताबोलता एकेरीवर आले खुशालचंद प्रथम त्याची मनधरणी व विनवणी करीत होता, पण बाळू ऐकत नाहीं असें जेव्हा दिसलें तेव्हा त्यानें सगळी लाजलज्जा सोडून अचकटविचकट शब्दात म्हटलें ''ओरड जा मजीभाई प्रत्यक्ष आले तरी ते माझें काय करणार आहेत ? मुलगी देणार नाहींत, एवढेच कीं नाहीं ? पण पाहिजे आहे कुणाला त्याची ती कुरूप, अवलक्षणी कारटी ! जगात या माझ्या पैशाला भाळणाऱ्या रोजच्या दहा बायका मी पैदा करीन भाऊसाहेबाना म्हणावें 'तुम्ही हें खूप लक्ष्यात ठेवा की, जोपर्यंत नखरेबाज, इष्कबाज आणि मला प्यार करणाऱ्या दुसऱ्या शेकडो बायका या शहरात आहेत तोपर्यंत पिरोजशी माझें लग्न झालें तरी हा फक्कड तिचें नाव घेणार नाहीं, मग प्रेम करण्याची गोष्ट कशाला पाहिजे !''

हे शब्द पिरोजेच्या कानात तापलेल्या तेलाप्रमाणें चरका देत गेले पिरोजेला आतापर्यंत ज्या गोष्टीविषयीं नुसती शका होती, ती गोष्ट आपल्या भावी पति-राजाच्या तोंडून प्रत्यक्ष ऐकल्यामुळें तिला आता सुखाचा आशातंतुसुद्धा राहिला नाहीं अशा नरपशूशीं आपला विवाह लावून देणार, त्यापेक्षा बाबा आपल्याला विहिरींत लोटून देतील तर काय बावगें होईल ? असें ती आपल्या मनात म्हणू लागली भावी दु स्थिति एखाद्या काळसर्पाप्रमाणें आपला ग्रास करण्यासाठीं धावून जवळ आली आहे असें वाटून ती भांबावून गेली, मागें एखादा भयंकर सर्प लागला आहे आणि पळण्यास वाट सापडत नाहीं अशी स्थिति झालेला मनुष्य जसा मूर्च्छा येऊन पडतो, तशी पिरोजा एकदम किंकाळी फोडून मूर्च्छा येऊन पडली

पिरोजेची किंकाळी ऐकून मंडळी लागलीच धावली, नाच गाणें बद राहिलें; रगात भग झाला, आनदात गर्क झालेली आणि स्वर्गसुख अनुभवणारी मंडळी एकदम त्या लोकापासून भ्रष्ट होऊन मृत्युलोकात येऊन पडली

अशा रात्रीं पिरोजा एकटी या ठिकाणीं आरोळी मारून बेशुद्ध पडली याचें कारण कोणाला कळेना मंडळीनें भरपूर पाणी तिच्या तोंडावर शिपून तिला शुद्धीवर आणिलें नतर जो तो तिला ''तू का ओरडलीस ? तू इथे कशी आलीस ? तुला भूत, खवीस, वेताळ वगैरे काहीं दिसून भय वाटलें कीं कोणा चोरट्यानें येऊन तुझ्या अंगावरच्या दागिन्यासाठीं अंगावर हात टाकला, की झालें तरी काय ?'' वगैरे प्रश्न विचारून बेदम करूं लागला

पिरोजा काय सांगणार? ती मुळींच बोलेना. त्यावरून लोक नानाप्रकारच्या अटकळी करूं लागले. "तू गाणें ऐकण्याचें सोडून इथें रात्रीची एकटी कशासाठी आलीस?" म्हणून तिच्या आईनें विचारलें परंतु खरा प्रकार—तिनें पाहिलेलें आपल्या भावी पतीचें वर्तन— आपल्या आईपाशीं सांगण्यासुद्धां तिला शरम वाटली तिच्या ओंठापर्यंत येई, पण बाहेर शब्द फुटेनात पोटांत राहींना आणि बाहेर पडेना, याप्रमाणे आतल्या आत कुचंबून कांहीं वेळ राहिल्यावर शब्दावाटे नाहीं तर अश्रूंच्या रूपानें तें किल्मिष एकदाचें बाहेर पडलें पिरोजेला रडें आवरेना आई जों जों तिला "कां रडतेस?" म्हणून विचारी, तों तों तिला रडण्याची अधिकच उसळी येई काय करील विचारी! प्रत्यक्ष पाहिलेला प्रकार ती आपल्या तोंडानें कसा वर्णन करील! प्रत्यक्ष आपला भावी पति आणि त्याचें हें असलें बदफैली वर्तन तिनें आपल्याच तोंडानें कसें सर्वांना कळवावें! ती जों जों घुटमळे आणि लाजे, तों तों खत पिरोजेच्या वर्तनाविषयीं साशंक होऊन तिची आई तिला तिरस्कारानें झिडकारी, आणि आपली शंका परोपरीनें व्यक्त करी हें पिरोजेनें पाहिलें तेव्हां रडें आवरून ती मुकाट्यानें उठून एकीकडे चालती झाली

मागाहून कांहीं वेळानें तिची आईहि उठून निजण्यास गेली सगळी मंडळी निजली आहे, पण पिरोजा मात्र एकटी सचिंत होऊन नेत्रावाटे अश्रुमोचन करित बसली आहे, हें पाहून तिच्या आईला चमत्कार वाटला, आणि तिनें तिला पुनः एकवार प्रेमानें पोटाशीं घेऊन व कुरवाळून सचिंत होण्याचें कारण विचारलें. आता रडूनरडून पिरोजेचें अंतःकरण थोडेंसें मोकळें झालें होतें; तेव्हां तिनेंहि फारसे आढेवेढे न घेता झालेला सगळा प्रकार सविस्तर सांगितला.

ती हकीगत ऐकून पिरोजेच्या आईचें पित्त खवळलें. तिला रागहि आला आणि वाईटहि वाटलें बायकांना आपल्या मुलींत कोणी खोड काढली तर एकवार पतकरेल, पण जावयांत कोणी कांहीं व्यंग काढलेलें मुळींच खपत नाहीं! परंतु ह्या स्त्रीस्वभावाला अगदीं उलट अशी पिरोजेच्या आईची या वेळीं वागणूक झाली आपल्या भावी जावयाचे असले ढंग ढळढळीत दिसत असून डोळे झाकून त्या ठिकाणी आपली मुलगी देण्यापेक्षा तिला अविवाहित ठेविलेली अगर एखाद्या भिकाऱ्याच्या पण सद्वर्तनी पोराला दिलेली बरी, असें तिला वाटूं लागलें, आणि ती मजीभाईला ही हकीगत कळविण्यासाठीं रागारागानें चालती झाली

## प्रकरण २८ वें

# बराच प्रकाश पडला.

मागल्या प्रकरणात सांगितलेली हकीगत ऐकून पिरोजेच्या आईला रागाचा झटका आला आणि तिने मजीभाईला निजलेले जागे करून पिरोजेला अशा वदफैली माणसाला देण्याचा बेत रहित करून दुसरा कोणीतरी चागला वर शोधण्याविषयीं त्याची मनधरणी चालविली, परतु मजीभाई एकतर अत्यत घिमा मनुष्य असे, आणि दुसरें असें कीं, पैशाच्या लोभामुळें ठरलेलें लग्न मोडण्याचें त्याच्या मनात येईना. तथापि पिरोजेच्या बोलण्यावरच सर्वथा भरवसा न ठेवता कळलेल्या हकीगतींत खरें काय आहे हे पहाण्याचा त्यानी विचार केला, आणि ज्या बाईवर ती निजली असता खुशालचदानें हात टाकला असें पिरोजा सागत होती त्या बाईला प्रथम बोलावून आणून "तू कुठे निजली होतीस, तुझी व जावईबुवाची काय बोलाचाली झाली" वगैरे मजकूर तिला विचारला ती बाई त्या रात्रीं गावात आपल्या मावशीच्या घरीं रहाण्यास गेली होती, तेव्हा अर्थातच तिला हे विचित्र प्रश्न ऐकून फार चमत्कारिक वाटलें तथापि तिने सरळपणें जवाब दिला कीं "मी आपल्या मावशीच्या घरी गेलें होतें, घरातलें कामकाज वगैरे आटपून मडळी गाणें ऐकण्यास गेली—तेव्हाच साडे नऊ वाजण्याचे सुमारास मी गेलें, माझी व जावईबुवाची गांठसुद्धा कुठे पडली नाहीं, मग बोलण्याचालण्याची गोष्टतर दूरच!"

ही बाई नसेल, दुसरी कोणी असेल, ह्मणून दुसऱ्याहि सगळ्या बायाना विचारलें पण त्यातर सगळ्या गाणें ऐकण्याच्या जागी होत्या तेव्हा पिरोजेने सागितलेला मजकूर अर्थात् खोटा व बनावट आहे, असें ठरण्यास उशीर लागला नाहीं खुशालचद हा वाईट वर्तनाचा व दुष्ट स्वभावाचा असून त्याच्याशी लग्न करण्याची आपली खुषी नाहीं, अशा अर्थाचे भाषण एकदोन प्रसगी पिरोजने स्पष्टपणें केलेलें मजीभाईच्या लक्ष्यात होते तेव्हा कोणीकडूनतरी आपले ह्मणणें खरें भासवावें यासाठीं तिने हा खोटाच आळ खुशालचदावर घातला, अशी आता मजीभाईची खात्री होऊन ते तिची चागली खरडपट्टी काढण्यासाठीं ती निजली होती तिकडे जाऊ लागले, पण त्याच्या कुटुबाने त्याना मना करून ती वेळ युक्तीने चुकविली.

ह्या सगळ्या प्रकारात बाळूचें अग असल्यामुळेंच त्याला मोठा बहारीचा रग आला होता, हें सागावयास नकोच! बाळूचें अग या गोष्टींत आहे, हें आतापर्यंत कोणालाहि ठाऊक नव्हतें, परतु आता खरा प्रकार त्याच्याच हातानें उघडकीला आला आदले दिवशीं मजीभाई त्याच्यावर सतापले होते आणि "तू आता

आपलें तोंड काळें कर" असें ह्मणून त्यांनीं वाळूला रजा दिली होती, ही गोष्ट वाचक विसरले नसतील. अर्थात् सकाळीं वाळू निजून उठल्यावर शेटजींचा अखेरचा निरोप घेण्यास त्यांचे समोर जातांच मंजीभाई त्याच्यावर चिडले आणि ह्मणाले "कारे मूर्खा! काल तुला तोंड काळें करायला सांगितलें असतां आता पुनः कशाला आलास?"

वाळू ह्मणाला "तोंड काळें करायचें खरें, पण कुणाचें करूं तें विचारायला आलों धनीसाहेब!"

"काय गद्धा आहे! अरे, निघ जा व्याद गेलेली पुन माघारी आली!"

"नाहीं शेटजी. मी गेलोंच नाहीं, तर माघारा कुठून येणार? मीतर इथेंच बाहेरच्या ओटहौसमध्यें निजलों होतों. तुह्मीं तोंड काळें करण्याचें काम सांगितलें होतें तें केल्याशिवाय व आपली परवानगी घेतल्याशिवाय आह्मीं नोकरांनीं कसें जावें?"

"अरे बाबा, आतां तू जा, नकोस माझा जीव खाऊं. तुझ्या कामाला आणि शहाणपणाला हात जोडले पाहिजेत! पुनः माझ्या घरचा उंबरठा चढूं नकोस, एवढी मेहेरबानगी कर."

"पण शेटजी, माझ्या हातून असा गुन्हा कोणता घडला, तेंतर मला कळेल? मी आजपर्यंत कितीदा तरी आपल्या उपयोगीं पडलों आहे, याचा कांहीं विचार करा, आणि गरिबाच्या पोटावर मारु नका—"

"अरे शहाण्या! तूं माझा निरोप घेण्यास आलास आणि आता पुनः रहाण्या-बद्दलची गोष्ट काढित बसला आहेस?"

"नाहीं धनीसाहेब, मी निरोप घ्यायला नाहीं, रजा मागायला आलों आहें."

"कसली रजा?"

"इथें रहाण्याबद्दलची वाटेल तर जाण्याची द्या, नाहीं तर रहाण्याबद्दलची द्या. मला दोन्ही गोष्टी सारख्याच—"

"तर मग मी तुला मोठ्या खुशीनें जाण्याची रजा देतों बाबा, जा एकदाचा, आणि माझा पिच्छा सोड. कां, आता कां उभा?"

"एक फिर्याद आहे, धनीसाहेब!"

"कुणावर आणि कशाबद्दल?"

"जावईबुवांवर. त्यांनीं माझ्यावर काल जुलूम केला."

"तुझ्यावर जुलूम? हें तू काय बोलतो आहेस? तुला वेडतर नाहीं लागलें?"

"नाहीं साहेब, जो परक्या स्त्रीवर बेलाशक हात टाकतो त्याला वेड लागलें ह्मणायचें कीं मला?"

'परक्या स्त्रीवर' हे शब्द ऐकताच मजीभाईला आदले रात्री पिरोजनें सांगितलेल्या गोष्टीची आठवण झाली त्या बाबतीत बाळूला काहीं माहिती असल्याचें त्याच्या या संदिग्ध शब्दावरून दिसल्यामुळे त्याच्यापासून अधिक माहिती काढण्याकरिता मजीभाई त्याला अधिकाधिक खोदखोदून प्रश्न विचारू लागले. मजीभाई ह्मणाले "परक्या स्त्रीवर जुलूम करताना तू त्याना पाहिलेस?"

"नुसते पाहिलेंच काय, पण प्रत्यक्ष अनुभव घेतला"

"ह्मणजे? आणि ही जुलमाची गोष्ट कुठे घडली?"

"कुठे ह्मणून काय विचारता? या समोरच्या ऑटहौसमध्ये"

"बरे, ज्या बाईवर जुलूम केला ती बाई कोण, कुणाची, ते तुला माहित आहे?"

"माझ्या माहितीची ह्मणून काय विचारता? मीच प्रत्यक्ष असें का ह्मणाना?"

हे उत्तर ऐकून सर्वांना फारच आश्चर्य वाटलें, आणि हा काय गोंधळ आहे याचा उलगडा कोणासच होईना तेव्हा मजीभाईनीं पुन विचारलें "तू त्याच्या कृत्यात सामील असशील तें मी नाही तुला विचारीत, जुलूम कोणत्या बाईवर झाला तें सांग"

"ती बाई पण मीच"

"ह्मणजे? तुझ्या बोलण्याचा अर्थच कळत नाहीं बाईवर जुलूम झाला असें ह्मणतोस आणि ती बाई कोणती ह्मणून विचारलें तर मीच ह्मणतोस, यातला अर्थ काय समजायचा? तुझी बायको असें ह्मणण्याचा तुझा मतलब आहे काय?"

"मी बायको कुठून चुलीतून आणू? माझी बायको मीच, आणि नवराहि मीच!"

मजीभाई त्रासून ह्मणतात "अरे, पण तू आता ह्मणालास कीं बाईवर जुलूम केला ह्मणून, आणि आता ह्मणतोस कीं ती बाई मीच, हे कसें? तू कधी बुवा आणि कधीं बाई असा का असतोस?"

मजीभाईच्या या बोलण्यावर आणि बाळूच्या वेडसरपणाचा भाषणावर गमत पहाण्यासाठीं जमलेल्या मंडळींत हशा पिकला, हे सांगावयास नकोच

बाळू ह्मणाला "ह्मणजे असें कीं मी बाईची चौघडी तोंडावरून पांघरून निजलो तेव्हा लोकाच्या दृष्टीने तर बाईच झालो कीं नाहीं!"

"तर मग तू चौघडी पांघरून निजला होतास बाई नव्हती तर! आणि जावईबुवानीं त्रास दिला तो तुला दिला, असे तुझे ह्मणणे की नाही?"

"इतका वेळ समजावित होतो, ते आतां कुठं गळी उतरलें असो मी सांगतो तें खरें आहे. खोटें असेल तर पिरोजाबाईला विचारा. जावईबुवानीं माझ्या तोंडावरचें पांघरूण काढलें तेव्हा मी मोठ्यानें ओरडलो ती ओरड ऐकून पिरोजा-बाई धावत आल्या, आणि दूर चांदण्यात उभ्या राहून सगळा प्रकार पहात होत्या."

बाळूच्या या एकंदर हकीगतीनें आदले रात्रीं घडलेल्या एकंदर प्रकारावर बराच प्रकाश पडला, आणि पिरोजा उगीच आपल्या पदरचें सांगत नसून जें पाहिलें तेंच सांगत होती, अशी मंजीभाईचीहि खात्री झाली.

## प्रकरण २९ वे.

## प्रणयपत्रिका.

वाळू नोकरी सोडून जाऊ लागला तेव्हा त्याने मजीभाईच्या घरातल्या सगळ्या माणसाना भेटून त्याचा निरोप घेतला. मजीभाईच्या घरची बाजारच्या सामानाची ने आण करण्याचे प्रसग गेल्या दोनचार दिवसात त्याला अनेक वेळा आले होते आणि त्या वेळी त्याच्या स्वाधीन केलेल्या पैशाचा हिशोब घेण्याची मजीभाईस फुरसत नसल्यामुळें आता एकदम तो सगळा हिशोब कागदावर लिहून तो कागद मजीभाईला देण्यासाठी त्याने खिशातून काढला होता. पण मजीभाईचे चित्त ठिकाणावर नव्हते यामुळे त्यानी तो हिशोबाचा कागद पिरोजेजवळ देण्यास सागितले होते त्याप्रमाणे तो देण्यासाठी वाळू पिरोजेच्या खोलीत गेला या वेळी पिरोजा एकटीच चिंताक्रात होऊन बसलेली होती. वाळूने तिला आपला येण्याचा हेतू कळवून आणि शेटजीनी हा कागद आपलेपाशीं देण्यास सागितलें आहे असें सागून खिशातून एक कागद काढला व तो उलगडून न पहाता तसाच तिच्या स्वाधीन केला, आणि नतर मोठ्या प्रेमाने तिचा निरोप घेतला पिरोजेनेहि त्याला वारवार येऊन भेटण्यास सागून वाळूला निरोप दिला तसें करताना तिचे नेत्र अश्रूनी भरून आले होते व कठ सद्गदित झाला होता आदले रात्री घडलेल्या प्रसगाची खरी हकीगत वाळूने सागितल्यामुळे पिरोजेच्या शब्दावरचा विश्वास कायम राहिला, नाहींतर प्रत्यक्ष आपल्या भावी पतीवर अत्यत घाणेरडा आरोप करण्याससुद्धा ही पोर तयार झाली हा कलक पिरोजेला लागला असता हे वाळूचे अखेरचे उपकार पिरोजा विसरली नव्हती, आणि ह्मणूनच वाळू नोकरी सोडून जाऊ लागला तेव्हा तिला इतकें वाईट वाटलें, यात नवल नाहीं

वाळू गेल्यावर काहीं वेळानें पिरोजेनें आपलें मन स्थिर करून वाळूने हातीं दिलेला कागद उघडून पाहिला तों एकाएकी काय चमत्कार तिच्या दृष्टीस पडला ! आणि हा कागद बावानी आपलेकडेस पहाण्यासाठी पाठविला असें तिला कळलें, तेव्हा तर तिची बुद्धि अगदी कुठित झाली ! तिचे ऊर धडधड उडू लागले, मुद्रेवर भयाचें, आश्चर्याचें व आनदाचे चिन्ह प्रतिबिंबित झालें. ती पुन पुन तो कागद वाचून पाही आणि पुन विचारात पडे असें त्या कागदात लिहिलें तरी काय होतें ?

काय होते ह्मणून काय विचारावयाचे! त्यात प्रेमाने वेडावून गेलेल्या एका तरुणाने आपल्या प्रियजनास उद्देशून लिहिलेला अत्यंत हितगुजाचा मजकूर होता. तें सगळे पत्र येथे देता येणें शक्य नाहीं, आणि कोणाचा रहस्यभेद करणें युक्तहि नाहीं; ह्मणून आपल्या वाचकापासून त्या पत्रातल्या कित्येक गोष्टी लपविणे आह्माला भाग आहे, याबद्दल वाचक उदार बुद्धीने आह्माला क्षमा करतीलच. तें पत्र येणेप्रमाणें—

"चित्तचकोर मनोहारिणी!

तू किती निष्ठुर आहेस! परमेश्वरानें तुझीं सर्व गात्रें कोमल केलीं असता अंतःकरणाचेच ठायी एवढी निष्ठुरता का ठेविली आहे बरे? माझ्या मनोरूपी उद्यानातली परी, लावण्यवती तरुण स्त्रियातली कोहिनूर, सर्वांगसौष्ठव अशी पुतळी, निसर्गदेवतेने आपले कौशल्यसर्वस्व खर्चून काढलेली चालतीबोलती तसवीर, माझ्या पंचप्राणाची मोलवान् ठेव, माझ्या जिवाचा आधार, सुखाचे धाम, आशेचे माहेर, नवजीवनाचा उगम, हृदयाचा प्रकाश, सगळें काही तू आहेस! तुझ्या संगतीचा लाभ घडावा ह्मणून हा बंदा गुलाम रोज परमेश्वराची प्रार्थना करित आहे. याला तारणें किंवा मारणें आता सर्वस्वी तुझ्या हातात आहे. अधिक काय लिहू! माझें मन तू जाणतच आहेस.

तुझा नम्र उपासक

गुलाब."

हें पत्र पाहून पिरोजा चपापली ती मनात ह्मणाली "गुलाबदास ह्मणून या शहरात एक प्रसिद्ध, विद्वान्, सद्गुणी, श्रीमान् आणि तरुण गृहस्थ आहे त्याच्याच हातचे हे पत्र असेल काय! आणि मला अशा तऱ्हेचे विनययुक्त आणि मनाला रिझविणारें पत्र पाठविण्यासारखे असे कोणते गुण माझे अंगी आहेत! बरें, हे पत्र मलाच पाठविले कशावरून? वर लिहिलेल्या 'चित्तचकोर मनोहारिणी' या शब्दावरून ती भाग्यवान् स्त्री मीच, असें मी कशावरून ह्मणाव!" असे नानातऱ्हेचे तर्क व शंका पिरोजेच्या मनात एकदम उभ्या राहिल्या परंतु जितक्या त्वरेने अशा शंका उत्पन्न होत, तितक्याच लवकर त्या लयहि पावत. मनुष्यस्वभावच असा काहीं विचित्र आहे कीं, एखादी भाग्याची गोष्ट आपलेविषयी आहे किंवा दुसऱ्याच्या सबंधाची आहे अशी शंका जेथें त्याला उत्पन्न होते तेथे तो सगळी परिस्थिति आपणासच अनुकूल आहे असें धरून चालतो

आणि आपणच खरे भाग्यवान् असें समजून जिवाचें समाधान करून घेतो पिरोजेची या वेळीं अशीच स्थिति झाली होती. ती सुंदर, सद्गुणी, सुशिक्षित आणि तरुणांचें चित्त आकर्षण करून घेणारी मोहिनी होती, याविषयीं खरोखर पहाता संशय होता असें नाहीं तिच्यासारखी लावण्यसंपन्न युवती क्वचितच आढळते असती, असें तिऱ्हाइतानेंसुद्धा म्हटलें असतें पण पिरोजेला स्वताच्या अंगच्या या गुणसमुच्चयाविषयीं इतका भरवसा नव्हता आपण य कश्चित् क्षुद्र प्राणी आहों असें तिला वाटे आणि त्यामुळें गुलाबदासासारख्या सकलकलागुणसंपन्न अशा तरुणाच्या प्रीतीस पात्र होण्यासारखी योग्यता आपले ठायीं नसावी असें पिरोजेला वाटलें, आणि ह्मणूनच वर दिलेलें पत्र अकल्पित रीतीनें हातीं पडलेलें वाचताच तिच्या मनात ज्या शंका आल्या व तिचा जो गोंधळ उडाला तो अगदीं यथार्थ होता, असें ह्मटलें पाहिजे

आणि खरा प्रकारहि तसाच होता गुलाबदासानें जें पत्र लिहिलें होतें तें पिरोजेला उद्देशून मुळीच नव्हतें तें जिला उद्देशून लिहिलें होतें ती निराळीच कोणी होती परंतु नोकराच्या हातून घडलेल्या अकल्पित चुकीनें तें त्या तीस न पोंचता बाळूच्या हातात पडलें होतें त्याच वेळीं बाळूच्या हिशेबाचे दुसरेहि कित्येक कागद होते, आणि बाळू विलक्षण बावळी, भोळी आणि निष्काळजी असल्यामुळें हिशोबाच्या कागदाऐवजीं ती प्रणयपत्रिका त्यानें पिरोजेच्या स्वाधीन केली होती. त्या प्रेमपत्रिकेवर कोणाचें नाव गाव मुद्दाम घातलें नसल्यामुळें सदर पत्रिका आपणासच उद्देशून लिहिली असेल असा पिरोजेचा जो ग्रह झाला तोहि अर्थात् स्वाभाविकच होता

पिरोजेचें लग्न आणखी आठचार दिवसात एका दुष्ट, दुर्वर्तनी, छचोर, पण श्रीमंत तरुणाशीं तिच्या इच्छेच्या अगदीं विरुद्ध व्हावयाचें होतें, अशा वेळीं सदर पत्रिका तिच्या हातीं पडली, यायोगानें तिच्या सुकलेल्या चेहऱ्यावर पुन नवीन तेज आलें खुशालचंद जसा श्रीमंत होता, तसाच गुलाबदासहि होता, किंबहुना तो त्याहून दुप्पट पटीनें सरस होता शिवाय गुलाबदास अधिक दिलदार, चांगल्या वर्तनाचा आणि प्रेमळ होता पिरोजेची व त्याची केव्हांकेव्हां गाठ पडत असे तेव्हां ही गोष्ट तिच्या प्रत्ययाला येत होती गुलाबदास आपल्या मुलीला पाहतो असें मजीभाईला अगोदर कळतें, तर त्यानीं खुशालचंदाशीं तिचें लग्न ठरविलें नसतें, परंतु गुलाबदासाचें खूळ फार मोठें, आपल्या आवाक्याच्या बाहेर आहे असें समजून मजीभाईनीं त्याकरिता खटपट करण्याचेंसुद्धा

Reg. No B 165




Printed at the 'Nirnaya Sagar Press' & Published by K. R. Mitra [illegible], BOMBAY, for the 'Manoranjak Granth Prasarak Mandali'